ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळीची आर्यधर्म ग्रंथमाला.



ग्रंथ ५ वा.

# सार्थ-सटीप-महाभारत

भाग ४ था.

## -विराटपर्व संपूर्ण.




मुख्य संपादक

श्रीयुत चिंतामण विनायक वैद्य,

एम. ए.; एलएल. बी.

महाभारत ए क्रिटिसिझम, हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर वेदिक पीरिएड, रिडल ऑफ रामायण, महाभारत उपसंहार, इत्यादि ग्रंथांचे कर्ते.



शके १८५५, सन १९३३.

किंमत ३ रुपये.

ज्योतिषशास्त्रकोविद

## श्री. गोविंद जनार्दन बोरकर शास्त्री



उर्फ

## श्री. गजाननस्वामी ज्योतिषी

सकलगुणैश्वर्यमंडित, साहित्यप्रेमी, विद्याभिलाषी,

गुर्जराधिपति



श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड

सेनाखासखेल, समशेरबहादूर-राज्य बडोदें.

# अर्पणपत्रिका.

ज्योतिषशास्त्रविशारद

## श्रीमंत गोविंद जनार्दन बोरकर शास्त्री

ऊर्फ

## श्री गजाननस्वामीमहाराज

यांना

त्यांच्यांठायीं वसत असलेलें ज्योतिषशास्त्र, हस्तसामुद्रिक
व मुखसामुद्रिक ह्या विद्यांचें अलौकिक नैपुण्य,
अचाट परोपकारबुद्धि, अप्रतिम औदार्य,
स्तुत्यर्ह सौजन्य, निस्सीम दत्तभक्ति
इत्यादि उज्ज्वल गुणांच्या
अभिनंदनार्थ हा ग्रंथ
प्रेमादरपूर्वक
अर्पिला
असे.

# प्रास्ताविक दोन शब्द.

पूर्वसंकेतानुरूप हा सार्थ-महाभारताचा चवथा भाग-'विराटपर्व'-आज वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहोंत. सभापर्वाप्रमाणेंच हें विराट पर्वहि, फार लहान नाहीं व फार मोठें नाहीं, असें असल्यामुळें तें एकाच भागांत प्रसिद्ध केलें आहे. ह्या विराटपर्वाचे एकंदर अध्याय ७२ असून श्लोकांची संख्या २२६२ आहे. पुढील उद्योग, भीष्म, कर्ण, शांति इत्यादि पर्वें फार मोठीं असल्यामुळें, तीं मात्र, सभापर्वाच्या प्रस्तावनेंत सांगितल्याप्रमाणें एकापेक्षां अधिक भागांत पूर्ण करावीं लागतील. हरिवंशासह हा महाभारत ग्रंथ एक लक्ष श्लोकात्मक आहे; व तो संपूर्ण ग्रंथ २५ किंवा २६ भागांत कशा पद्धतीनें पूर्ण करण्याचा संकेत आम्ही केला आहे, त्या संबंधाची सविस्तर माहिती सभापर्वाच्या प्रस्तावनेंत दिली आहेच. अर्थात् त्याची पुनरुक्ति करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

धर्म, नीति, व्यवहार, इतिहास, काव्य, समाजरचना, राजकारण, इत्यादि दृष्टीनें प्रत्येक पर्वांत लक्षांत घेण्यासारखा भाग कोणता, त्यासंबंधानें प्रत्येक भागाचे शेवटीं समालोचनांत उहापोह करण्याचा क्रम आम्ही ठेविला आहे. त्याप्रमाणें ह्या विराटपर्वांत आलेल्या कथाभागांचें सोपपत्तिक विवेचन समालोचनांत केलें आहेच. अतिशयोक्तीचे प्रसंग वगळले असतां महाभारताच्या प्रत्येक पर्वांत कांहीं कांहीं भाग फारच महत्त्वाचे आहेत, हें निःसंदेह आहे; व त्याचें महत्व समालोचनांतील विवेचनावरून मर्मज्ञ वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

उदाहरणार्थ—सभापर्वांत राजाचें कर्तव्य म्हणून राजानें प्रजेशीं कसें वागावें याविषयीं नारदाच्या मुखानें धर्मराजास केलेला उपदेश जसा प्रत्येक राज्यकर्त्या पुरुषास मननीय आहे, त्याचप्रमाणें ह्या विराटपर्वांत राजसेवकांनीं राजाशीं कसें वागावें यासंबंधानें धौम्य गुरूंनीं पांडवांस केलेला उपदेश प्रत्येक राजसेवकानें लक्षांत बाळगण्यासारखा आहे. द्यूत ( जुगार ) या सारखें व्यसन किती अनिष्ट परिणामी असतें, आणि मनुष्य एकदां व्यसनाधीन झाला म्हणजे तो कितीहि चतुर असला तरी कसा बुद्धिहीन होऊन सर्वस्वास आंचवतो, याचें चित्र सभापर्वांत द्यूत प्रसंगांत धर्मराजाच्या वागणुकींत दाखविलें आहे; तर परस्त्रीचे ठायीं अभिलाष बुद्धि ठेवल्यानें कसे अनिष्ट परिणाम होतात, हें विराट पर्वांत

कीचक व सैरंध्री यांच्या प्रसंगानें कीचकाचे चरित्रांत दाखविलें आहे. शिवाय चांद्रवर्ष व सौरवर्ष हा ज्योतिषविषयक शास्त्राचा प्रश्न ह्या विराट पर्वांत भीष्माच्या द्वारें सोडविला आहे. आणि सर्वांत विशेष महत्वाची गोष्ट म्हणजे आपत्तिकालीं प्राप्त प्रसंगाकडे लक्ष देऊन मनुष्यानें कसें वागलें असतां स्वीकृत कार्यांत यश येतें, याचें चित्र विराट राजाच्या घरीं पांडवांच्या वागणुकींत उत्तम वठविलें आहे. आमच्या राजकारणी पुरुषांनीं सांप्रतच्या आपत्तीच्या कालीं तें लक्षांत घेण्यासारखें आहे. तात्पर्य, संसारांत गांजलेल्या व राजघराण्यांत तसेंच जगाच्या व्यवहारांत वागणाऱ्या प्रत्येक मानवी प्राण्यास हें विराटपर्व आदर्शरूप असेंच आहे.

आमच्या आर्य-ग्रंथांत उपनिषत्-ग्रंथ तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें व श्रीमद्भागवत ग्रंथ भक्तिमार्गाच्या दृष्टीनें जसे श्रेष्ठतर आहेत, तसाच व्यवहार, समाजकारण व राजकारण या तीनही दृष्टीनें महाभारत ग्रंथ श्रेष्ठ आहे. महाभारत ग्रंथासारखा मार्गदर्शक दुसरा ग्रंथच नाहीं, असें जें विद्वानांचें मत आहे, तें खरें आहे; आणि हें आम्हीं आरंभींच पहिल्या भागाच्या उपोद्घातांत वाचकांच्या दृष्टोत्पत्तीस आणलें आहे. सांप्रतच्या आपत्तिकालांत मनाची शांति टेवून कर्तव्यजागृति करणारा महाभारतासारखा दुसरा ग्रंथ नाहीं, असें आमचें प्रांजल मत आहे; आणि म्हणूनच हल्लींच्या जीवन-कलहाच्या कालांत ह्या श्रेष्ठतम ग्रंथांचा प्रसार मराठी भाषा बोलणाऱ्या बहुजनसमाजांत सर्वत्र व्हावा अशाविषयीं आमचा हा प्रयत्न आहे. सहृदय वाचक आमचा हा प्रयत्न लक्षांत घेऊन तो गोड करून घेतील अशी आम्हांस उमेद आहे. असो; इतकें सांगून आतां आपण पुढील कार्याकडे वळूं,

ग्रंथप्रकाशनाच्या द्वारां बहुजनसमाजांत ज्ञानाचा प्रसार करावा, या उद्देशानें मंडळीनें, १ आर्यधर्म ग्रंथमाला, २ सुबोध ग्रंथमाला, आणि ३ श्रीसयाजी साहित्यमाला याप्रमाणें तीन मालांच्या द्वारां विविध-विषयांवर दरसाल कमीतकमी २४०० पृष्ठांचे ग्रंथ प्रसिद्ध करावयाचे, असा संकेत केला आहे, हें वाचकांस माहित आहेच. त्या संकेतानुरूप मंडळीच्या सहकार पद्धतीच्या रचनेपासून गेल्या तीन वर्षांच्या अवधींत वरील तीन मालांच्या द्वारें एकंदर ३३ ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. पैकी, आर्य धर्म ग्रंथ-मालेच्या द्वारें पांच ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. ते असे- १ सान्वय सार्थ भगवद्गीता पृष्टसंख्या ९००, सार्थ महाभारत आदिपर्व भाग १-२ पृष्टसंख्या १७००, सभापर्व पृष्टसंख्या ५५०, व विराटपर्व पृष्टसंख्या सुमारें ५०० याप्रमाणें ह्या मालेंतून सरासरी ३७०० पृष्ठांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत.

२ सुबोधग्रंथमाला—यामालेंतून नवीन व पुनर्मुद्रणाचे मिळून एकंदर १२ ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्यांत श्रीयुत चिंतामण विनायक वैद्य यांचा ' मराठा स्वराज्य-संस्थापक—श्री शिवाजी महाराज ' २ श्रीयुत करंदीकर यांचा कृषिविद्या. व ३ श्रीमंत संपतराव गायकवाड यांचा नेपाळचा प्रवास, हे ग्रंथ नवीन असून, ४ परिचारिका, ५ विश्वनिरीक्षण, ६ स्त्रियांचे रोग, ७ अर्वाचीन कविता, ८ स्पर्शा-स्पर्श, ९ सार्थ—पंचदशी, १० अध्यात्मरामायण, ११ वेदकाल—निर्णय, व १२ बृहद्योगवासिष्ठसार भाग १ ला, असे ९ ग्रंथ पुनर्मुद्रित आहेत.

३ श्रीसयाजी—साहित्यमाला—या मालेंतून गेल्या तीन सालांत १६ ग्रंथ प्रसिद्ध झाले असून, हे सर्व ग्रंथ आमचे विद्याभिलाषी श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांनीं साहित्यप्रकाशनाच्या कार्याकरितां जो दोन लक्ष रुपयांचा स्वतंत्र निधि ठेवला आहे त्याच्या व्याजांतून वेगवेगळ्या तज्ज्ञ लेखकांकडून तयार करविलेले आहेत. ह्या ग्रंथांत—१ बालक, त्यांची सुश्रुषा व संवर्धन, हा ग्रंथ व्यवहारात प्रत्येक कुटुंबास उपयोगी असा आहे. दीघनिकाय भाग २ व बौद्धधर्म, हे ग्रंथ बौद्धधर्म प्रतिपादक आहेत, आणि ४ पाश्चिमात्य तत्त्वज्ञान, ५ विद्युत, ६ सुलभ नीतिशास्त्र ७ तंजावरचे मराठे राजे, ८ लौकिक दंतकथा, हे ग्रंथ जरी भाषांतररूप आहेत तरी इतिहास, तत्त्वज्ञान व शास्त्रीयज्ञान या दृष्टीनें अभ्यासकांस ते फार उपयोगी असे आहेत. नववा ग्रंथ नीतिशास्त्रप्रबोध हा स्वतंत्र असून यांत आर्य व पाश्चिमात्य ग्रंथाधारासह नीतिशास्त्राचा सोपपत्तिक विचार केलेला असल्यामुळें हा ग्रंथ मननीय असा आहे. या शिवाय याच मालेच्या अंगभूत बालज्ञानमाला म्हणून बालांच्या उपयोगाकरितां एक माला सुरू आहे. त्या मालेंतून गत तीन सालांत जिवबादादा केरकर, सम्राट अशोक, नरसी मेहेता, कर्ण, रामदास, झांशीच्या शूर राणी लक्ष्मीबाई व ब्रह्मचारी भीष्म, याप्रमाणें बालोपयोगी सात चरित्रग्रंथ मंडळीच्या विद्यमानें प्रसिद्ध झाले असून या पुस्तकांची एकंदर पृष्ठसंख्या आठशें वर झाली आहे. तात्पर्य, दरसाल २४०० पृष्ठांचे ग्रंथ प्रसिद्ध करावयाचे, ह्या केलेल्या संकेतानुरूप, तीनही माला मिळून मंडळीनें गेल्या तीन सालाच्या अवधींत ७२०० पृष्ठांचे ऐवजीं सुमारें १२००० वर पृष्ठांचे ग्रंथ प्रसिद्ध करून शक्तीबाहेर आपलें कर्तव्य बजावण्याचा प्रयत्न केला आहे.

हातीं घेतलेलें ग्रंथप्रकाशनाचें हें कार्य यापेक्षांहि अधिक नेटानें चालवून हल्लींपेक्षांहि स्वल्प किंमतींत ग्रंथांचा प्रसार करावा, असा मंडळीचा विचार

चालू आहे. हल्लीं आम्ही मोठ्या ( डेमी ) आकाराचे ग्रंथ कायमचे ग्राहकांस शंभर पृष्ठांस सहा आणे व लहान (क्राऊन) आकाराचे ग्रंथ शंभर पृष्ठांस चार आणे, अशा दरानें देण्याचा क्रम ठेविला आहे. परंतु ग्राहकांची संख्या पाच हजार झाल्यास हे ग्रंथ यापेक्षांहि निम किंमतीस देतां येतील असा आमचा अंदाज आहे. साहित्यप्रेमी वाचकांनीं मनावर घेऊन आपणातर्फे एकएकच वर्गणीदार मिळवून देण्याचा निश्चय केला, तरी ही गोष्ट सहज साध्य होणार आहे.

आमच्या कार्यास सर्वांची सहानुभूति मिळवावी आणि ग्रंथाचा प्रसार सर्वत्र व्हावा, अशा उद्देशानें वेगवेगळ्या समाजाग्रणी व सत्कार्येच्छु सज्जनांस मंडळीचे वेगवेगळे ग्रंथ अर्पण करण्याचा एक नियम मंडळीनें आंखला आहे. मंडळीच्या ह्या ज्ञानप्रसाराच्या कार्यास ज्यांच्याकडून प्रोत्साहन मिळतें, त्यांस त्यांच्या इच्छेप्रमाणें त्या त्या विषयाचा ग्रंथ प्रेमादरपूर्वक अर्पण करण्यांत येतो. त्या नियमास अनुसरून सांप्रतचा हा सार्थ–महाभारताचा चवथा भाग–विराटपर्व–ग्रंथ, दादर येथील प्रसिद्ध ज्योतिषी श्रीमान् गोविंद जनार्दन बोरकर शास्त्री उर्फ गजानन स्वामी, यांस प्रेमादरपूर्वक अर्पण करण्यांत आला आहे. श्री. गजानन स्वामी हे एक प्रासादिक ज्योतिषशास्त्रकोविद असून परोपकाररत, साहित्यप्रेमी व दत्तभक्त आहेत. त्यांनीं रत्नागिरी जिल्ह्यातील आपल्या चिंचखरी नांवाच्या नैसर्गिक वनश्रीनें संपन्न अशा जन्मभूमींत हजारों रुपये खर्च करून सुंदर मंदिर उभारून त्या ठिकाणीं दत्तमूर्तीची स्थापना केली आहे. आणि औंध संस्थानाधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांच्या हस्तें नुकताच त्या मंदिराचा उद्‌घाटन समारंभ करून रत्नागिरी जिल्ह्यांतील हजारों लोकांस अन्नदानानें, ईश्वरभजनानें व श्री दत्ताच्या दर्शनलाभानें, तृप्त केलें आहे. आमच्या आर्यसंस्कृतीचे ते एक मोक्ते असून महाभारताच्या कार्यास त्यांनीं पुढें होऊन प्रोत्साहन दिलें आहे; आणि ह्या उपकृतीचें दर्शक म्हणून हा भाग त्यांस सादर समर्पण करण्यांत आला आहे.

असो, यापुढें उद्योगपर्वास आरंभ केला आहे. उद्योगपर्व ६६१८ श्लोकात्मक असून त्यामुळें तें दोन भागांत पूर्ण करणार आहोंत. मंडळीनें शिरावर घेतलेलें हें मोठें व महत्वाचें कार्य, आमचे प्रेमळ वाचक हंसक्षीर न्यायानें गोड करून घेतील अशी विनंती करून, हे प्रास्ताविक दोन शब्द येथें पुरे करतों.

मुंबई, पौष, शुक्ल १ शके १८५५. दा. सा. यंदे.

# अनुक्रमणिका.

—ॐ—



## १ पांडवप्रवेशपर्व पृष्ठें-१ ते ५७

## २ समयपालनपर्व पृष्ठें–५८ ते ६४



## ३ कीचकवधपर्व पृष्ठें–६५ ते १३८

## ४ गोहरणपर्व पृष्टें–१३९ ते ३५८

## वैवाहिकपर्व ३५९ ते ३७४



परिशिष्टें—



### या भागांत आलेलीं चित्रें.



---

## चुकीची दुरुस्ती

पान ३३६ वर अ. ६६ श्लोक १९ याचा अर्थ पुढीलप्रमाणें समजावा:—

" पुढें शुद्धीवर आल्यावर, तो सुरेंद्रतुल्य अर्जुन एकटा युद्धास उभा असून शत्रूच्या कचाटयांतून मुक्त झाला आहे असें पाहून, तो धृतराष्ट्रपुत्र ( दुर्योधन ) लगबगीनें कौरववीरांस म्हणाला ( १९ ),

आर्य-धर्म-ग्रंथमाला




भाग ४ था-विराटपर्व-संपूर्ण



अध्याय ८—विराट:–'बल्लवा, तूं आचारी आहेस हें मला खरें वाटत नाहीं.

# सार्थ-महाभारत

## विराटपर्व

### पाण्डवप्रवेशपर्व

#### अध्याय १

[ पांडव विराट राजाकडे जाण्याचा निश्चय करतात. ]

॥ श्रीगणेशाय नमः । श्रीवेदव्यासाय नमः ॥

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

जनमेजय उवाच— कथं विराटनगरे मम पूर्वपितामहाः ।
अज्ञातवासमुषिता दुर्योधनभयार्दिताः ॥ २ ॥
पतिव्रता महाभागा सततं ब्रह्मवादिनी ।
द्रौपदी च कथं ब्रह्मन्नज्ञाता दुःखिताऽवसत् ॥ ३ ॥

श्रीगणेशास आणि श्रीवेदव्यासास नमस्कार असो.

नारायण व नरोत्तम नर (अर्जुन) यांस, त्याचप्रमाणें सरस्वती देवीस, नमस्कार केल्यानंतर जय नामक ग्रंथ ( महाभारत ) वाचावयास लागावें ( १ ).

जनमेजय म्हणाला:— दुर्योधनाच्या भीतीनें व्याकुळ झालेल्या माझ्या पणजोबांनीं विराटनगरांत राहून अज्ञातवास कसा केला ? ( २ ). तसेंच ब्रह्मन् ! महाभाग्यशाली, पतिव्रता व श्रीकृष्णभजनांत सतत निमग्न असणाऱ्या द्रौपदीनें अज्ञातवासांतले ते दुःखाचे दिवस कसे कंठले ? ( ३ ).

वैशम्पायन उवाच— यथा विराटनगरे तव पूर्वपितामहाः ।
अज्ञातवासमुषितास्तच्छृणुष्व नराधिप ॥ ४ ॥
तथा स तु वराँल्लब्ध्वा धर्मो धर्मभृतां वरः ।
गत्वाऽऽश्रमं ब्राह्मणेभ्य आचख्यौ सर्वमेव तत् ॥ ५ ॥
कथयित्वा तु तत्सर्वं ब्राह्मणेभ्यो युधिष्ठिरः ।
अरणीसहितं[1] तस्मै ब्राह्मणाय न्यवेदयत् ॥ ६ ॥
ततो युधिष्ठिरो राजा धर्मपुत्रो महामनाः ।
[2]संनिवर्त्याऽनुजान्सर्वानिति होवाच भारत ॥ ७ ॥
द्वादशेमानि वर्षाणि राज्यविप्रोषिता वयम् ।
त्रयोदशोऽयं संप्राप्तः कृच्छ्रात्परमदुर्वसः ॥ ८ ॥
स साधु कौन्तेय इतो वासमर्जुन रोचय ।
संवत्सरमिमं यत्र वसेमाऽविदिताः परैः ॥ ९ ॥

वैशंपायन म्हणालाः— राजा, तुझ्या प्रपितामहांनीं विराटनगरींत अज्ञातवास कसा केला तें ऐकः—धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ युधिष्ठिरास त्याप्रमाणें (वनपर्वांत वर्णन केल्याप्रमाणें ) वर मिळाल्यावर, त्यानें आश्रमांत जाऊन ब्राह्मणांस ती सर्व हकीकत सांगितली ( ४–५ ). ब्राह्मणांस तें सारें वर्तमान सांगितल्यावर युधिष्ठिरानें त्या (अग्निहोत्री) ब्राह्मणास दोन्ही अरणी[1] दिल्या (६). नंतर महात्मा यमधर्माचा पुत्र युधिष्ठिर राजा आपल्या सर्व बंधूंना जवळ बोलावून,[2] भारता, याप्रमाणें म्हणालाः—(७). "आपण राज्यभ्रष्ट झाल्यास हीं आज बारा वर्षें झालीं. आतां आपणांस हा लागलेला तेरावा संवत्सर अज्ञातवासांत काढावयाचा असल्यानें तें वर्ष काढणें अति कठिण आहे ( ८ ). तर, कौंतेया अर्जुना, ज्या ठिकाणीं आपण ह्या संवत्सरांत वास केला असतां आपणांस कोणी ओळखणार नाहीं, असें स्थळ तुला कोणतें चांगलें दिसतें ? " ( ९ ).

१ सहितं=मिथुनम् । अरणीसहितं मन्थं-इति पाठान्तरे मन्थमाभावमन्थनदण्डम्, अरणीभ्यां सहितम् । ( नी. )

२ वर्ततेतिर्गत्यर्थः । एकत्र आनीय । संनिकृष्येति पाठे स एवार्थः (नी.)

अर्जुन उवाच— तस्यैव वरदानेन धर्मस्य मनुजाधिप ।
अज्ञाता विचरिष्यामो नराणां नात्र संशयः ॥ १० ॥
तत्र वासाय राष्ट्राणि कीर्त्तयिष्यामि कानिचित् ।
रमणीयानि गुप्तानि तेषां किंचित्स्म रोचय ॥ ११ ॥
सन्ति रम्या जनपदा बह्वन्नाः परितः कुरून् ।
पाञ्चालाश्चेदिमत्स्याश्च शूरसेनाः पटच्चराः ॥ १२ ॥
दशार्णा नवराष्ट्राश्च मल्लाः शाल्वा युगंधराः ।
कुन्तिराष्ट्रं च विपुलं सुराष्ट्रावन्तयस्तथा ॥ १३ ॥
एतेषां कतमो राजन्निवासस्तव रोचते ।
यत्र वत्स्यामहे राजन्संवत्सरमिमं वयम् ॥ १४ ॥
युधिष्ठिर उवाच— श्रुतमेतन्महाबाहो यथा स भगवान्प्रभुः ।
अब्रवीत्सर्वभूतेशस्तत्तथा न तदन्यथा ॥ १५ ॥
अवश्यं त्वेव वासार्थं रमणीयं शिवं सुखम् ।
संमन्त्र्य सहितैः सर्वैर्वस्तव्यमकुतोभयैः ॥ १६ ॥

**अर्जुन** म्हणालाः— "राजा, त्या यमधर्माच्याच वरप्रसादानें आपणांस अज्ञातवासामध्यें कोणीहि मनुष्यें निःसंशय ओळखूं शकणार नाहींत ( १० ). तेव्हां असा वास करण्यासाठीं मी कित्येक रमणीय व संरक्षित राष्ट्रें सांगतों, त्यांपैकीं तुम्हांस कोणतें पसंत पडतें तें सांगा ( ११ ). कुरुदेशाच्या सभोंवतीं पंचाल, चेदि, मत्स्य, शूरसेन व पटच्चर, हे फार रमणीय व धनधान्यादिकांनीं समृद्ध असे देश आहेत ( १२ ). तसेंच, दशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, शाल्व, युगंधर, विस्तीर्ण कुंतिराष्ट्र आणि सुराष्ट्र व अवंति हेहि देश आहेत ( १३ ). तर, राजा, यांपैकीं कोणतें ठिकाण आपण पसंत करितां, कीं जेथें आपणांस वर्षभर राहतां येईल ?"( १४ )

**युधिष्ठिर** म्हणालाः—"महाबाहो, भूतमात्रांचा स्वामी भगवान् यमधर्म जें बोलला तें सर्व मला ठाऊक आहे; त्यास अनुसरूनच सर्व घडून येईल; त्याच्याविरुद्ध कांहींएक होणार नाहीं ( १५ ). तथापि, आपल्या वसतीसाठीं एखादें सुंदर, सुखावह व पवित्र असें स्थळ अवश्य पाहिजे. याकरितां आपण सर्वांनीं एक विचार ठरवून अशा ठिकाणीं निर्भयपणें एकत्र वास करावा (१६).

मत्स्यो विराटो बलवानभिरक्षोऽथ पाण्डवान् ।
धर्मशीलो वदान्यश्च वृद्धश्च सततं प्रियः ॥ १७ ॥
विराटनगरे तात संवत्सरमिमं वयम् ।
कुर्वन्तस्तस्य कर्माणि विहरिष्याम भारत ॥ १८ ॥
यानि यानि च कर्माणि तस्य [1]वक्ष्यामहे वयम् ।
आसाद्य मत्स्यं तत्कर्म प्रब्रूत कुरुनन्दनाः ॥ १९ ॥

अर्जुन उवाच— नरदेव कथं तस्य राष्ट्रे कर्म करिष्यसि ।
विराटनगरे साधो रंस्यसे केन कर्मणा ॥ २० ॥
मृदुर्वदान्यो ह्रीमांश्च धार्मिकः सत्यविक्रमः ।
राजंस्त्वमापदाकृष्टः किं करिष्यसि पाण्डव ॥ २१ ॥
न दुःखमुचितं किंचिद्राजा वेद यथा जनः ।
स इमामापदं प्राप्य कथं घोरां तरिष्यासि ॥ २२ ॥

मत्स्य देशाचा राजा विराट हा बलवान् असून पांडवांवर त्याचें मोठें प्रेम आहे. शिवाय, तो धर्मशील व उदार असून वृद्धहि आहे. तो आपल्या प्रजेचें प्रिय करण्याविषयीं नेहमीं दक्ष असतो ( १७ ). म्हणून, भारता, विराट-नगरांतच आपण राहून, त्या भूपतीचीं कामें करीत हें वर्ष घालवावें ( १८ ). आतां, बंधूंनो, विराट राजाकडे गेल्यावर त्याचीं कोणकोणतीं कामें आपणांस करितां येतील तें सांगा "( १९ ).

अर्जुन म्हणाला:—"राजा, त्याच्या राज्यात तुमच्या हातून कशी नोकरी होईल ? विराट नगरींत कोणतें काम करून तुम्ही दिवस घालविणार, ( तें प्रथम सांगा ) ( २० ). तुम्ही कोमल अंत:करणाचे, विनयशील, धार्मिक व सत्यपराक्रमी आहां; तर, राजा, तुम्ही अशा आपत्तीमध्यें सांपडलां असतां काय कराल बरें ! ( २१ ). सामान्य लोक जाणतात तसें जरूर असणारें दुःख राजास कांहींच ठाऊक नसतें, तेव्हां हा घोर प्रसंग आला असतां तो तुमच्या हातून कसा पार पडेल ?" ( २२ ).

1 वक्ष्यामहे—निर्वोढुं शक्ष्यामहे । वहेरिदं रूपम् ( नी. )

युधिष्ठिर उवाच— शृणुध्वं यत्करिष्यामि कर्म वै कुरुनन्दनाः ।
विराटमनुसंप्राप्य राजानं पुरुषर्षभाः ॥ २३ ॥
सभास्तारो भविष्यामि तस्य राज्ञो महात्मनः ।
कङ्को[1] नाम द्विजो भूत्वा मताक्षः प्रियदेवनः ॥ २४ ॥
वैदूर्यान्काञ्चनान्दान्तान्फलैर्ज्योतीरसैः[2] सह ।
कृष्णाक्षाँल्लोहिताक्षांश्च निर्वर्त्स्यामि मनोरमान् ॥ २५ ॥
विराटराजं रमयन्सामात्यं सहबान्धवम् ।
न च मां वेत्स्यते कश्चित्तोषयिष्ये च तं नृपम् ॥ २६ ॥
आसं युधिष्ठिरस्याऽहं पुरा प्राणसमः सखा ।
इति वक्ष्यामि राजानं यदि मां सोऽनुयोक्ष्यते ॥ २७ ॥
इत्येतद्वो मयाऽऽख्यातं विहरिष्याम्यहं यथा ।
वृकोदर विराटे त्वं रंस्यसे केन हेतुना ॥ २८ ॥ [ २८ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि युधिष्ठिरादिमन्त्रणे प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

युधिष्ठिर म्हणालाः—"अहो पुरुषश्रेष्ठ कौरवकुलनंदन ( बंधूंनो ), विराट राजाकडे गेल्यावर मी कोणतें काम करीन तें ऐका ( २३ ). त्या महात्म्या राजाच्या सभेंत मी कंक[1] नांवाचा ब्राह्मण होऊन सभासद होईन. मी अक्षविद्येंत प्रवीण असून मला द्यूत खेळण्याची आवड आहे ( २४ ). वैदूर्य रत्नांचे, सोन्याचे व हस्तिदंताचे, वर काळेतांबडे डोळे असलेले, सुंदर फासे टाकून मी चार वर्णांच्या सोंगट्या पटावर चालवीन[2] ( २५ ). अमात्यांसह व बांधवांसह विराटराजास मी संतुष्ट करीत असतां मला कोणीहि ओळखणार नाहीं; व तो राजाहि जेणेंकरून संतोषित राहील असेंच वर्तन मी करीन (२६). जर कदाचित् त्या राजानें मला प्रश्न केला, तर मी सांगेन कीं, मी पूर्वी युधिष्ठिराचा जिवलग मित्र होतों ( २७ ). तेथें राहून मी काय करणार तें सर्व तुम्हांस सांगितलें. बा वृकोदरा, विराट नगरींत राहून तूं कशा रीतीनें करमणूक करशील तें सांग "(२८).

याप्रमाणें हा विराटपर्वाच्या प्रवेश उपपर्वापैकीं पहिला अध्याय समाप्त झाला.

---

१ कंक=यम; युधिष्ठिर हा यमाचाच पुत्र होय. तसेंच 'कंक' शब्दाचा अर्थ छद्मद्विज=कपटवेषी ब्राह्मण असाहि आहे. २ फलैः=फलकैः ज्योतीरसैः ज्योतिः लोहितं, रसः पारदः श्वेतवर्णः ( नी. ). शारी ( सोंगट्या ) शब्द येथें नाहीं—श्लोक क्लिष्टार्थ आहेत.

# अध्याय २

[ भीम व अर्जुन आपलीं कामें सांगतात. ]

भीमसेन उवाच— पौरोगवो[1] ब्रुवाणोऽहं बल्लवो नाम भारत ।
उपस्थास्यामि राजानं विराटमिति मे मतिः ॥ १ ॥
सूपानस्य करिष्यामि कुशलोऽस्मि महानसे ।
कृतपूर्वाणि यान्यस्य व्यञ्जनानि सुशिक्षितैः ॥ २ ॥
तान्यप्यभिभविष्यामि प्रीतिं संजनयन्नहम् ।
आहरिष्यामि दारूणां निचयान्महतोऽपि च ॥ ३ ॥
यत्प्रेक्ष्य विपुलं कर्म राजा संयोक्ष्यते स माम् ।
अमानुषाणि कुर्वाणस्तानि कर्माणि भारत ॥ ४ ॥
राज्ञस्तस्य परे प्रेष्या मंस्यन्ते मां यथा नृपम् ।
भक्ष्यान्नरसपानानां भविष्यामि तथेश्वरः ॥ ५ ॥
द्विपा वा बलिनो राजन्वृषभा वा महाबलाः ।
विनिग्राह्या यदि मया निग्रहीष्यामि तानपि ॥ ६ ॥

भीमसेन म्हणाला:—"भारता, विराट राजाकडे गेल्यावर तेथें पौरोगव बल्लव असें नांव धारण करून त्या राजाचीं सेवा करावी असें मला वाटतें ( १ ). मी पाकक्रियेंत कुशल असल्यामुळें मी सिद्ध केलेल्या पदार्थापुढें निष्णात लोकांनीं पूर्वीं तयार केलेले पदार्थ अगदीं टाकाऊ आहेत असें ठरलें म्हणजे विराटाचे मनांत माझ्याविषयीं प्रेम उत्पन्न होईल. ( शिवाय ) मी लांकडांचे मोठे मोठे भारे वाहून आणीन (२—३). तीं माझीं पुष्कळ अमानुष कर्में पाहून तो राजा मला पाकाध्यक्षाचे जागीं नेमील ( ४ ). इतर राजसेवकांनीं तीं माझीं अचाट कृत्यें पाहिलीं म्हणजे ते मला आपल्यावरचा राजासारखा मानितील; भक्ष्य—भोज्यरस—पेय पदार्थांचा मीं मालक होईन ( ५ ). राजा, मदोन्मत्त हत्ती किंवा बलाढ्य बैल यांना आवरण्याचा प्रसंग आल्यास त्यांनाहि मी आवरून धरीन ( ६ ).

१ पुरोगु-वायु, त्याचा जो पुत्र तो पौरोगव. बल्लव=सूपकार=पाकक्रिया करणारा.

ये च केचिन्नियोत्स्यन्ति समाजेषु नियोधकाः।
तानहं हि नियोत्स्यामि रतिं तस्य विवर्धयन् ॥ ७ ॥
न त्वेतान्युद्ध्यमानान्वै हनिष्यामि कथंचन।
तथैतान्पातयिष्यामि यथा यास्यन्ति न क्षयम् ॥ ८ ॥
[1]आरालिको गोविकर्त्ता सूपकर्त्ता नियोधकः।
आसं युधिष्ठिरस्याऽहमिति वक्ष्यामि पृच्छतः ॥ ९ ॥
आत्मानमात्मना रक्षंश्चरिष्यामि विशांपते।
इत्येतत्प्रतिजानामि विहरिष्याम्यहं यथा ॥ १० ॥

युधिष्ठिर उवाच— यमाग्निर्ब्राह्मणो भूत्वा समागच्छन्नृणां वरम्।
दिधक्षुः खाण्डवं दावं दाशार्हसहितं पुरा ॥ ११ ॥
महाबलं महाबाहुमजितं कुरुनन्दनम्।
सोऽयं किं कर्म कौन्तेयः करिष्यति धनंजयः ॥ १२ ॥

समाजांत मल्लयुद्ध करणारे जे कोणी लढण्यास येतील त्यांस मी जेर करून जिंकीन व अशा रीतीनें त्या राजाचें प्रेम वाढवीन ( ७ ). मी या मल्लयुद्ध करणाऱ्यांचा वध कधींहि करणार नाहीं. त्यांस मी अशा रीतीनें चीत करीन, कीं त्यांचा नाश होणार नाहीं ( ८ ). मला कोणीं विचारल्यास, मी युधिष्ठिराजवळ मत्तगजांस[1] आवरण्याच्या, तुफान बैलांस वेसण घालण्याच्या, पाक सिद्ध करण्याच्या व मल्लांशीं झुंजण्याच्या कामावर होतों असें सांगेन ( ९ ). आपल्या बळावर आत्मसंरक्षण करून मी सुखानें राहीन; असें, राजा, मी प्रतिज्ञा करून सांगतों "( १० ).

**युधिष्ठिर** म्हणाला:—"अग्नि ब्राह्मणाचें रूप घेऊन खांडव वन जाळून टाकण्याच्या इच्छेनें पूर्वी, श्रीकृष्ण जवळ असतां, विजयशाली, महाबल व महाबाहु अशा ज्या कौरवकुलनंदन अर्जुनाजवळ गेला, तो हा कुंतीसुत धनंजय कोणतें कर्म करणार आहे? ( ११–१२ )

1 अराल=मत्तगज ( विश्वः ). विकर्ता दमनेन विकृतिजनकः ( नी. )

योऽयमासाद्य तं दावं तर्पयामास पावकम् ।
विजित्यैकरथेनेन्द्रं हत्वा पन्नगराक्षसान् ॥ १३ ॥
वासुकेः सर्पराजस्य स्वसारं हृतवांश्च यः ।
श्रेष्ठो यः प्रतियोधानां सोऽर्जुनः किं करिष्यति ॥ १४ ॥
सूर्यः प्रतपतां श्रेष्ठो द्विपदां ब्राह्मणो वरः ।
आशीविषश्च सर्पाणामग्निस्तेजस्विनां वरः ॥ १५ ॥
आयुधानां वरं वज्रं ककुद्मी च गवां वरः ।
ह्रदानामुदधिः श्रेष्ठः पर्जन्यो वर्षतां वरः ॥ १६ ॥
धृतराष्ट्रश्च नागानां हस्तिष्वैरावतो वरः ।
पुत्रः प्रियाणामधिको भार्या च सुहृदां वरा ॥ १७ ॥
यथैतानि विशिष्टानि जात्यां जात्यां वृकोदर ।
एवं युवा गुडाकेशः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ॥ १८ ॥
सोऽयमिन्द्रादनवरो वासुदेवान्महाद्युतिः ।
गाण्डीवधन्वा बीभत्सुः श्वेताश्वः किं करिष्यति ॥ १९ ॥

ज्यानें रथांत आरूढ होऊन एकट्यानेंच खांडव वनांत जाऊन इंद्रास जिंकिलें, व सर्पांचा आणि राक्षसांचा वध करून त्या अग्नीला तोषविलें ( १३ ), आणि ज्यानें सर्पराज वासुकीच्या भगिनीचें ( उलूपीचें ) हरण केलें, जो युद्धविशारदांमध्यें श्रेष्ठ आहे, तो हा अर्जुन काय करील ? ( १४ ). तेजस्वी पदार्थांमध्यें सूर्य श्रेष्ठ, मनुष्यांत ब्राह्मण, सर्पांत ज्याच्या दाढांत विष आहे तो श्रेष्ठ, तेजस्वी पदार्थांमध्यें अग्नि हा श्रेष्ठ आहे ( १५ ); आयुधांमध्यें वज्र व बैलांमध्यें कोशिंडवाला बैल श्रेष्ठ होय. जलाशयांमध्यें सागर, व वृष्टि करणाऱ्यांमध्यें पर्जन्य श्रेष्ठ आहे ( १६ ). नागांमध्यें धृतराष्ट्र व गजांमध्यें ऐरावत श्रेष्ठ होत; प्रियवस्तूंमध्यें पुत्र अधिक व सुहृदांमध्यें भार्या वरिष्ठ होय ( १७ ). निरनिराळ्या जातीमध्यें जसे हे विशिष्ट आहेत, त्याचप्रमाणें वृकोदरा, हा तरुण अर्जुन सर्व धनुर्धाऱ्यांमध्यें वरिष्ठ आहे ( १८ ). तो हा इंद्र व श्रीकृष्ण यांच्या तोडीचा असणारा, महातेजस्वी, गांडीव धनुष्य धरणारा, पांढरे घोडे बाळगणारा अर्जुन, ( तेथें ) काय काम करील ? (१९).

उषित्वा पञ्च वर्षाणि सहस्राक्षस्य वेश्मनि ।
अस्त्रयोगं समासाद्य स्ववीर्यान्मानुषाद्भुतम् ।
दिव्यान्यस्त्राणि चाऽऽप्तानि देवरूपेण भास्वता ॥ २० ॥
यं मन्ये द्वादशं रुद्रमादित्यानां त्रयोदशम् ।
वसूनां नवमं मन्ये ग्रहाणां दशमं तथा ॥ २१ ॥
यस्य बाहू समौ दीर्घौ ज्याघातकठिनत्वचौ ।
दक्षिणे चैव सव्ये च गवामिव वहः कृतः ॥ २२ ॥
हिमवानिव शैलानां समुद्रः सरितामिव ।
त्रिदशानां यथा शक्रो वसूनामिव हव्यवाट् ॥ २३ ॥
मृगाणामिव शार्दूलो गरुडः पतताामिव ।
वरः सन्नह्यमानानां सोऽर्जुनः किं करिष्यति ॥ २४ ॥
अर्जुन उवाच—प्रतिज्ञां 'षण्ढकोऽस्मीति करिष्यामि महीपते ।
ज्याघातौ हि महान्तौ मे संवर्तुं नृप दुष्करौ ॥ २५ ॥
वलयैश्छादयिष्यामि बाहू किणकृताविमौ ।
कर्णयोः प्रतिमुच्याहं कुण्डले ज्वलनप्रभे ॥ २६ ॥

ह्यानें पांच वर्षें इंद्रलोकीं राहून आपल्या पराक्रमानें मनुष्यास अद्भुत वाटणारी अस्त्रविद्या संपादन केली, व लोकोत्तर तेज प्राप्त करून घेऊन दिव्य अस्त्रें मिळविलीं (२०). ज्याला मी बारावा रुद्र, तेरावा आदित्य, नववा वसु, किंवा दहावा ग्रहच आहे, असें मानतों (२१); ज्याचे दोन्ही बाहु समान व दीर्घ असून त्यांच्या त्वचेवर प्रत्यंचेच्या आघातांनीं उजवीकडे व डावीकडे बैलाच्या खांद्यावरील घट्टयांप्रमाणें कठिण घट्टे पडले आहेत ! (२२) जो पर्वतांमध्यें हिमालयासारखा, नद्यांमध्यें जसा समुद्र, देवांमध्यें जसा इंद्र, वसूंमध्यें जसा अग्नि, पशूंमध्यें जसा सिंह, पक्ष्यांमध्यें जसा गरुड, तसा योध्यांमध्यें श्रेष्ठ असणारा हा अर्जुन काय करील ?" ( २३–२४ ).

अर्जुन म्हणाला:—"राजा, मी षंढक[1] आहें अशी प्रतिज्ञा करीन. माझ्या बाहूंवर पडलेले हे मोठाले घट्टे झांकून ठेवणें कठिण आहे (२५). ते हे घट्टे पडलेले बाहु मी ( षंढाच्या ) बाहुभूषणांनीं आच्छादून टाकीन; कानांत

१ षंढ=श्रीगोपाल; त्याचा मित्र षंढक=श्रीकृष्णसखा; दुसऱ्या पक्षीं क्लीब=नपुंसक.

पिनद्धकम्बुः पाणिभ्यां तृतीयां प्रकृतिं गतः ।
वेणीकृतशिरा राजन्नाम्ना चैव बृहन्नला ॥ २७ ॥
पठन्नाख्यायिकाश्चैव स्त्रीभावेन पुनः पुनः ।
रमयिष्ये महीपालमन्यांश्चाऽन्तःपुरे जनान् ॥ २८ ॥
गीतं नृत्यं विचित्रं च वादित्रं विविधं तथा ।
शिक्षयिष्याम्यहं राजन्विराटस्य पुरस्त्रियः ॥ २९ ॥
प्रजानां समुदाचारं बहु कर्म कृतं वदन् ।
छादयिष्यामि कौन्तेय माययाऽऽत्मानमात्मना ॥ ३० ॥
युधिष्ठिरस्य गेहे वै द्रौपद्याः परिचारिका ।
उषिताऽस्मीति वक्ष्यामि पृष्टो राज्ञा च पाण्डव ॥ ३१ ॥
एतेन विधिना छन्नः कृतकेन यथा नलः ।
विहरिष्यामि राजेन्द्र विराटभवने सुखम् ॥ ३२ ॥[ ६० ]

इति श्रीमहाभारते० विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि युधिष्ठिरादि-मन्त्रणे द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

दैदीप्यमान कुंडलें घालून (२६), दोन्ही हातांत शंखाच्या बांगडया भरून व केसांची वेणी बांधून 'मी नपुंसक आहें' असें भासवित, राजा, मी बृहन्नला[1] नांव घेईन (२७). स्त्रीस्वभावास अनुसरून पुनः पुनः जुन्यापुराण्या (राजांच्या वगैरे) गोष्टी सांगून राजाला व इतर स्त्रीजनांना संतुष्ट करीन (२८). राजा, विराटाच्या अंतःपुरांतील स्त्रियांना मी अनेक प्रकारचें गायन, वादन व चित्रविचित्र नर्तनहि शिकवीन (२९). प्रजांना सद्वर्तनाचें शिक्षण देऊन त्यांनीं केलेल्या अनेक कामांची प्रशंसा करून, कपटवेषानें मी आपलें स्वरूप गुप्त ठेवीन (३०). महाराज, विराटराजानें मला विचारल्यास, युधिष्ठिराचे घरीं मी द्रौपदीची दासी होतें, असें सांगेन (३१). राजेंद्रा, भस्मानें आच्छादिलेल्या अग्नीप्रमाणें मी अशा रीतीनें गुप्तपणें विराटाच्या घरीं सुखानें राहीन" (३२).

याप्रमाणें श्रीमहाभारताच्या विराटपर्वांतील प्रवेशपर्वाचा दुसरा अध्याय समाप्त झाला.

---

१ बृहत्+नरः=नारायणसखा. 'रलयोर्डलयोश्च सावर्ण्यम्' या न्यायानें नर शब्दाऐवजीं नल झाला; व पुढें लचा ड होऊन, तें नांव 'बृहन्नडा' असेंहि झालें.

# अध्याय ३

[ नकुल, सहदेव व द्रौपदी अज्ञातवासांतील आपापलीं कामें युधिष्ठिरास सांगतात. ]

वैशंपायन उवाच—

इत्येवमुक्त्वा पुरुषप्रवीरस्तथाऽर्जुनो धर्मभृतां वरिष्ठः ।
वाक्यं तथाऽसौ विरराम भूयो नृपोऽपरं भ्रातरमाबभाषे ॥ १ ॥

युधिष्ठिर उवाच—किं त्वं नकुल कुर्वाणस्तत्र तात चरिष्यासि ।
कर्म तत्त्वं समाचक्ष्व राज्ये तस्य महीपतेः ॥
सुकुमारश्च शूरश्च दर्शनीयः सुखोचितः ॥ २ ॥

नकुल उवाच—अश्वबन्धो भविष्यामि विराटनृपतेरहम् ।
सर्वथा ज्ञानसंपन्नः कुशलः परिरक्षणे ॥ ३ ॥
ग्रन्थिको नाम नाम्नाऽहं कर्मैतत्सुप्रियं मम ।
कुशलोऽस्म्यश्वशिक्षायां तथैवाऽश्वचिकित्सने ।
प्रियाश्च सततं मेऽश्वाः कुरुराज यथा तव ॥ ४ ॥
ये मामामन्त्रयिष्यन्ति विराटनगरे जनाः ।
तेभ्य एवं प्रवक्ष्यामि विहरिष्याम्यहं यथा ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— महाधर्मनिष्ठ पुरुषश्रेष्ठ अर्जुन ह्याप्रमाणें भाषण बोलल्यावर स्वस्थ बसला तेव्हां युधिष्ठिर राजानें दुसऱ्या भावास विचारलें (१).

**युधिष्ठिर** म्हणाला:— "बा नकुला, तूं फार कोमल, सुंदर व शूर असून तुला सुखच उचित आहे. करितां त्या नृपाच्या राज्यामध्यें तूं काय काम करशील तें सांग "( २ ).

**नकुल** म्हणाला:—"मी विराटराजाचा अश्वबंध होईन. अश्वांचें संगोपन कसें करावें ह्याची सर्वप्रकारची माहिती असून त्यांत मी निपुण आहें (३). मी ग्रंथिक[1] असें नांव घेईन. हें काम मला फार प्रिय आहे. घोडयांना शिकविण्याच्या व त्यांची चिकित्सा करण्याच्या कामांत मी कुशल आहें. कुरुराज, जसें तुम्हाला तसेच मलाहि अश्व नेहमीं प्रिय वाटतात ( ४. ). विराटनगरांतील जे कोणी प्रजाजन माझा सल्ला घेण्यास येतील त्यांना मी याप्रमाणें सांगेन कीं, ( ५ )

---

१ ग्रंथिक = आयुर्वेद जाणणारा = अश्विनीकुमार. हे देवांचे वैद्य होते. आणि अश्विनीकुमारांचेच नकुल व सहदेव हे पुत्र असल्यामुळें 'ग्रंथिक' हें नांव नकुलानें घेतलें.

पाण्डवेन पुरा तात अश्वेष्वधिकृतः पुरा।
विराटनगरे छन्नश्चरिष्यामि महीपते ॥ ६ ॥
युधिष्ठिर उवाच—सहदेव कथं तस्य समीपे विहरिष्यसि।
किं वा त्वं कर्म कुर्वाणः प्रच्छन्नो विहरिष्यसि ॥ ७॥
सहदेव उवाच—गोसंख्याता भविष्यामि विराटस्य महीपतेः।
प्रतिषेद्धा च दोग्धा च [1]संख्याने कुशलो गवाम् ॥ ८ ॥
[2]तन्तिपाल इति ख्यातो नाम्नाऽहं विदितस्त्वथ।
निपुणं च चरिष्यामि व्येतु ते मानसो ज्वरः ॥ ९ ॥
अहं हि सततं गोषु भवता प्रहितः पुरा।
तत्र मे कौशलं सर्वमवबुद्धं विशांपते ॥ १० ॥
लक्षणं चरितं चापि गवां यच्चापि मंगलम्।
तत्सर्वं मे सुविदितमन्यच्चापि महीपते ॥ ११ ॥

पूर्वी धर्मराजानें माझी अश्वशाळेवर नेमणूक केली होती. राजा, ह्याप्रमाणें विराटनगरांत मी गुप्त रीतीनें राहून कालक्रमण करीन" (६).

**युधिष्ठिर** म्हणालाः— "सहदेवा, तूं त्या विराटाजवळ कसा राहशील आणि कोणतें काम करून तुला गुप्तपणें कालक्रमण करतां येईल?" (७).

**सहदेव** म्हणालाः—"गाईंची परीक्षा करणारा म्हणून मी विराट राजाच्या गोशाळेचें काम पाहीन; गाई वळवणारा व दूध काढणारा मी आहें; गाईंची परीक्षाहि[1] करण्यांत मी कुशल आहें" (८). तंतिपाल[2] ह्या नांवानें मी प्रसिद्ध होईन व आपल्या कामांत निपुण असा राहीन. माझ्याविषयीं तुम्हास काळजी नको (९). पूर्वी आपण मला नेहमीं गाईंची व्यवस्था पाहण्यासाठीं पाठवीत होतां, तेव्हां तें सर्व कौशल्य पूर्णपणें आपणास माहीत आहे (१०). गाईंचीं लक्षणें, त्यांचे स्वभाव व त्यांच्या ठिकाणीं असलेलीं सुचिन्हें व दुसरें सर्व कांहीं राजा, मला चांगलें समजतें (११).

१ संख्याने परीक्षायाम् (नी.) २ तंति=गुरांची दावण, दोरी किंवा गुप्त हेतु (नी.) अर्थात्, तंतिपाल म्हणजे गुरांची व्यवस्था पाहणारा व धर्मराजाचा गुप्त हेतु सिद्धीस नेणारा.

वृषभानपि जानामि राजन्पूजितलक्षणान् ।
येषां मूत्रमुपाघ्राय अपि वन्ध्या प्रसूयते ॥ १२ ॥

सोऽहमेवं चरिष्यामि प्रीतिरत्र हि मे सदा ।
न च मां वेत्स्यते कश्चित्तोषयिष्ये च पार्थिवम् ॥ १३ ॥

युधिष्ठिर उवाच—इयं हि नः प्रिया भार्या प्राणेभ्योऽपि गरीयसी ।
मातेव परिपाल्या च पूज्या ज्येष्ठेव च स्वसा ॥ १४ ॥

केन स्म द्रौपदी कृष्णा कर्मणा विचरिष्यति ।
न हि किंचिद्विजानाति कर्म कर्तुं यथा स्त्रियः ॥ १५ ॥

सुकुमारी च बाला च राजपुत्री यशस्विनी ।
पतिव्रता महाभागा कथं नु विचरिष्यति ॥ १६ ॥

माल्यगन्धानलंकारान्वस्त्राणि विविधानि च ।
एतान्येवाऽभिजानाति यतो जाता हि भामिनी ॥ १७ ॥

राजा, ज्यांचें नुसतें मूत्र अवघ्राण केलें असतां वंध्या धेनु ( गर्भिणी होऊन ) प्रसूत होते, असे मंगलकारक चिन्हें असणारे बैलहि मी ओळखतों ( १२ ). अशा प्रकारें मी तंतिपाल होऊन राहीन; मला या कामाची सदोदित आवड आहे. मला कोणीहि ओळखणार नाहीं; व राजालाहि मीं संतुष्ट करीन "( १३ ).

युधिष्ठिर म्हणाला:—"ही आपली प्रियपत्नी आपणांस आपल्या प्राणाहून अधिक प्रिय आहे. ही मातेप्रमाणें पालन करण्यास व ज्येष्ठ भगिनीप्रमाणेंच मान देण्यास योग्य आहे ( १४ ). ही कृष्णा, ( श्रीकृष्णानें भगिनीप्रमाणें मानलेली ) द्रौपदी काय काम करीत ( तेथें ) राहील ? इतर स्त्रियांप्रमाणें कामकाज करणें हिला मुळींच माहीत नाहीं ( १५ ). ही कोमलांगी बाला राजपुत्री असून यशस्विनी व भाग्यशालीहि आहे. अशी ही पतिव्रता कोणतें काम करून राहील ? ( १६ ). ही आमची पत्नी झाल्यादिवसापासून हिला फुलें, गंध, अलंकार व नानाप्रकारचीं वस्त्रें इत्यादि कामांचीच कायती माहिती आहे !" ( १७ )

द्रौपद्युवाच—सैरन्ध्योऽरक्षिता[1] लोके भुजिष्याः[2] सन्ति भारत ।
नैवमन्याः स्त्रियो यान्ति इति लोकस्य निश्चयः ॥
साऽहं ब्रुवाणा सैरन्ध्री कुशला केशकर्मणि ॥ १८ ॥
युधिष्ठिरस्य गेहे वै द्रौपद्याः परिचारिका ।
उषिताऽस्मीति वक्ष्यामि पृष्टा राज्ञा च भारत ॥ १९ ॥
आत्मगुप्ता चरिष्यामि यन्मा त्वं परिपृच्छसि ॥ २० ॥
सुदेष्णां प्रत्युपस्थास्ये राजभार्यां यशस्विनीम् ।
सा रक्षिष्यति मां प्राप्तां मा भूत्ते दुःखमीदृशम् ॥ २१ ॥
युधिष्ठिर उवाच—कल्याणं भाषसे कृष्णे कुले जाताऽसि भामिनि ।
न पापमभिजानासि साध्वी साधुव्रते स्थिता ॥ २२ ॥

द्रौपदी म्हणाली:—"भारता, सैरंध्री[1] नांवाच्या स्त्रिया अरक्षित झाल्या असतां लोकांनीं त्यांचें पालनपोषण करावें; ( कारण ) दुसऱ्या कोणत्याहि स्त्रिया अशा रीतीनें वागत नाहींत, असा लोकांचा समज आहे; म्हणून मी सैरंध्री आहें, मला वेणीफणी करण्याचें काम उत्तम येतें, असें म्हणेन ( १८ ). भारता, विराटराजानें मला विचारल्यास, मी युधिष्ठिराचे घरीं द्रौपदीची दासी म्हणून होतें, असें सांगेन ( १९ ). ज्या अर्थीं तुम्ही मला विचारतां, तो तुमचा हेतु मी आपलें स्वरूप गुप्त राखून अज्ञातवास करण्यांत पार पाडीन ( २० ). मी विराटराजाची यशस्विनी पत्नी सुदेष्णा, हिची सेवा करीन; आश्रयासाठीं मी तिच्याकडे आलें आहे असें पाहून ती माझें संरक्षण करील. तुम्ही असे खिन्न होऊं नका "( २१ ).

युधिष्ठिर म्हणाला:—"कृष्णे, फार चांगलें सांगितलेंस. तुझा ( थोर ) कुळांत जन्म झाला आहे. साध्वी, तूं साधूचें व्रत आचरण करीत आहेस; ( म्हणून ) पाप म्हणजे काय हें तुला माहीतच नाहीं ( २२ ).

---

१ सीर = अंतःपट, तो धारण करणारी ती सैरंध्री = अंतःपुरांतील परिचारिका म्हणजे दासी. २ भुजिष्या = पालनीय, भुज पालने ( नी. ). हा कूट शब्द आहे.

यथा न दुर्हृदः पापा भवन्ति सुखिनः पुनः ।
कुर्यास्तत्त्वं हि कल्याणि लक्षयेयुर्न ते तथा ॥ २३ ॥ [ ८३ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवशोपर्वणि युधिष्ठिरादिमन्त्रणे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

जेणेंकरून पापी दुष्टजन तुला ओळखून काढून पुनः हर्षित होणार नाहींत, अशा रीतीनें कल्याणि, तूं वाग "( २३ ).

याप्रमाणें श्रीमहाभारताच्या विराटपर्वांतील प्रवेशपर्वांपैकीं हा तिसरा अध्याय समाप्त झाला.

## अध्याय ४

[ धौम्य पुरोहिताचें काम व त्यानें केलेला उपदेश. ]

युधिष्ठिर उवाच—कर्माण्युक्तानि युष्माभिर्यानि यानि करिष्यथ ।
मम चापि यथा बुद्धिरुचिता विधिनिश्चयात् ॥ १ ॥
पुरोहितोऽयमस्माकमग्निहोत्राणि रक्षतु ।
सूदपौरोगवैः सार्द्धं द्रुपदस्य निवेशने ॥ २ ॥
इंन्द्रसेनमुखाश्चेमे रथानादाय केवलान् ।
यान्तु द्वारवतीं शीघ्रमिति मे वर्त्तते मतिः ॥ ३ ॥
इमाश्च नार्यो द्रौपद्याः सर्वाश्च परिचारिकाः ।
पञ्चालानेव गच्छन्तु सूदपौरोगवैः सह ॥ ४ ॥

[ म्हणाला:—" तुम्हीं ( अज्ञातवासांत ) जें जें करणार तें सांगितलें, व मींहि दैवानुसार काय करीन तें तुम्हास सांगितलें ( १ ). ह्या आमच्या पुरोहितानें आचारी व बल्लव यांसह द्रुपदराजाच्या घरीं जाऊन (तेथें) आमच्या अग्निहोत्राचें संरक्षण करावें ( २ ). इंद्रसेनादिकांनीं आपले रिकामे रथ घेऊन जलदीनें द्वारकेस जावें, असें मला वाटतें. द्रौपदीच्या ह्या सहचारिणी स्त्रिया व सर्वच दासी, यांनीं आचारी-बल्लवांसह पांचाल देशालाच जावें (३-४).

सर्वैरपि च वक्तव्यं न प्राज्ञायन्त पाण्डवाः ।
गता ह्यस्मानपाहाय सर्वे द्वैतवनादिति ॥ ५ ॥

वैशम्पायन उवाच—

एवं तेऽन्योन्यमामन्त्र्य कर्माण्युक्त्वा पृथक्पृथक् ।
धौम्यमामन्त्रयामासुः स च तान्मन्त्रमब्रवीत् ॥ ६ ॥

धौम्य उवाच—विहितं पाण्डवाः सर्वं ब्राह्मणेषु सुहृत्सु च ।
याने प्रहरणे चैव तथैवाऽग्निषु भारत ॥ ७ ॥
त्वया रक्षा विधातव्या कृष्णायाः फाल्गुनेन च ।
विदितं वो यथा सर्वं लोकवृत्तमिदं तव ॥ ८ ॥
विदिते चापि वक्तव्यं सुहृद्भिरनुरागतः ।
एष धर्मश्च कामश्च अर्थश्चैव सनातनः ॥ ९ ॥
अतोऽहमपि वक्ष्यामि हेतुमत्र निबोधत ।
हन्तेमां राजवसतिं राजपुत्रा ब्रवीम्यहम् ॥ १० ॥

आणि सर्वांनीं असें सांगावें कीं, पांडव आम्हास माहीत नाहींत. आम्हांला सोडून ते द्वैतवनांतून कोणीकडे तरी गेले "( ५ ).

**वैशंपायन** म्हणालाः—ह्याप्रमाणें त्यांनीं प्रत्येकानें कोणकोणतें काम करावयाचें तें सांगून ( नंतर ) एकमेकांचा निरोप घेऊन धौम्याचा निरोप घेतला. तेव्हां धौम्यानें त्यांस असा बोध केलाः—( ६ )

**धौम्य** म्हणालाः— "पांडवांनो, ब्राह्मणांसंबंधानें, आप्तेष्टांसंबंधानें, तसेंच शत्रूवर चाल करून जातांना किंवा युद्धप्रसंगाचे वेळीं, आणि अग्निहोत्राचे वेळीं, आणि अग्निहोत्राचे बाबतींत ( केव्हां काय केलें पाहिजे ) तें सर्व तुम्हांला विदितच आहे ( ७ ). द्रौपदीचें रक्षण करणें, हें युधिष्ठिरा, तूं व अर्जुनानें करावें; कारण लोकांचें सर्व वृत्त कसें असतें हें तुला ठाऊक आहे (८). ( तथापि ) माहीत असलेली गोष्टहि आप्तेष्टांनीं पुनः प्रेमानें सांगावी, हाच सनातन धर्म, काम व अर्थ होय ( ९ ). म्हणून राजपुत्रांनो, राजगृहीं तुम्ही कसें वागावें हें मी सांगतों. हें सांगण्याचा (वरील) हेतु लक्षांत घ्या (१०).

यथा राजकुलं प्राप्य सर्वान्दोषांस्तरिष्यथ ॥
दुर्वसं चैव कौरव्य जानता राजवेश्मनि ॥ ११ ॥
अमानितैर्मानितैर्वा अज्ञातैः परिवत्सरम् ।
ततश्चतुर्दशे वर्षे चरिष्यथ यथासुखम् ॥ १२ ॥
दृष्टद्वारो लभेद्द्रष्टुं राजस्वेषु न विश्वसेत् ।
तदेवाऽऽसनमन्विच्छेद्यत्र नाऽभिपतेत्परः ॥ १३ ॥
यो न यानं न पर्यङ्कं न पीठं न गजं रथम् ।
आरोहेत्संमतोऽस्मीति स राजवसतिं वसेत् ॥ १४ ॥
यत्र यत्रैनमासीनं शङ्केरन्दुष्टचारिणः ।
न तत्रोपविशेद्यो वै स राजवसतिं वसेत् ॥ १५ ॥
न चाऽनुशिष्याद्राजानमपृच्छन्तं कदाचन ।
तूष्णीं त्वेनमुपासीत काले समभिपूजयेत् ॥ १६ ॥
असूयन्ति हि राजानो जनाननृतवादिनः ।
तथैव चाऽवमन्यन्ते मन्त्रिणं वादिनं मृषा ॥ १७ ॥

राजाचे येथें राहण्याचा प्रसंग आल्यास, राजपुत्रांनो, जेणेंकरून तेथून तुम्ही निर्दोष सुटाल, तें मी तुम्हांला सांगतों. विचारी मनुष्यालासुद्धां, कौरव्या, राजगृहीं राहणें अवघड आहे ( ११ ). मानापमानाकडे लक्ष न देतां तुम्ही ( वर्षभर अज्ञातवासांत राहिल्यावर ) पुढें चौदावें वर्ष लागतांच सुखानें नांदाल ( १२ ). राजास भेटावयाचें असल्यास द्वारपाळा-मार्फत ( परवानगी आणून ) भेटावें. राजाच्या खासगींतील माणसांवर विश्वास ठेवूं नये. दुसरा कोणी जेथें बसावयास येणार नाहीं, अशाच जागेवर बसावें ( १३ ). मी राजाच्या मर्जींतला आहें असें समजून जो ( राजाच्या ) पालखींत, पलंगावर, उच्चासनावर, हत्तीवर किंवा रथांत बसणार नाहीं त्यानेंच राजगृहीं रहावें ( १४ ). ज्या ज्या ठिकाणीं बसल्यानें आपणाविषयीं दुष्ट हेर शंका घेतील त्या त्या स्थानीं जो बसणार नाहीं तोच मनुष्य राजगृहीं राहण्यास योग्य आहे ( १५ ). राजानें विचारल्यावांचून त्यास मसलत कधींहि सांगूं नये. त्याच्याजवळ मुकाट्यानें स्वस्थ बसावें; योग्य समयीं त्याची स्तुति करावी(१६). (परंतु ती स्तुति मिथ्या असूं नये) कारण, राजेलोक मिथ्या भाषण करणाऱ्यांचा द्वेष करतात; तसेंच खोटें बोलणाऱ्या मंत्र्याचा अपमान करितात ( १७ ).

नैषां दारेषु कुर्वीत मैत्रीं प्राज्ञः कदाचन ।
अन्तःपुरचरा ये च द्वेष्टि यानहिताश्च ये ॥ १८ ॥
विदिते चाऽस्य कुर्वीत कार्याणि सुलघून्यपि ।
एवं विचरतो राज्ञि न क्षतिर्जायते क्वचित् ॥ १९ ॥
गच्छन्नपि परां भूमिमपृष्टो ह्यनियोजितः ।
जात्यन्ध इव मन्येत मर्यादामनुचिन्तयन् ॥ २० ॥
न हि पुत्रं न नप्तारं न भ्रातरमरिंदमाः ।
समतिक्रान्तमर्यादं पूजयन्ति नराधिपाः ॥ २१ ॥
यत्नाच्चोपचरेदेनमग्निवद्देववच्चिह ।
अनृतेनोपचीर्णो हि हन्यादेव न संशयः ॥ २२ ॥
यद्यद्भर्ताऽनुयुञ्जीत तत्तदेवाऽनुवर्तयेत् ।
प्रमादमवलेपं च कोपं च परिवर्जयेत् ॥ २३ ॥

सुज्ञानें केव्हांहि राजस्त्रियांशीं, अंतःपुरांतील माणसांशीं, व राजा ज्यांचा द्वेष करितो, किंवा जे त्याचा द्वेष करितात, त्यांशीं मैत्री करूं नये ( १८ ). अगदीं क्षुल्लक कामें असलीं तरी तीं राजाला कळवून करावींत. राजाजवळ याप्रमाणें वागणाऱ्याची कधींहि नुकसानी होत नाहीं ( १९ ). एखाद्या उत्कृष्ट स्थानीं आपण नित्य बसत असलों, तरी तेवढ्यावरच त्या स्थानीं आपण होऊन बसूं नये. राजानें तें दाखवून तेथें 'बसा' म्हणून सांगितलें तरच तेथें बसावें; तोंपर्यंत, एखाद्या जन्मापासून आंधळा असणाऱ्या मनुष्याप्रमाणें आपणास तें स्थान दिसत नाहीं, असेंच मर्यादेचा विचार करून मानावें ( २० ). कारण, मर्यादा उल्लंघन करणारा पुत्र असो, नातु असो, किंवा बंधु असो, त्यास विजयशाली राजे चाहत नाहींत ( २१ ). अग्नीप्रमाणें किंवा देवाप्रमाणें राजांची ( दुरून व मानपूर्वक ) सेवा करावी. असत्यानें त्यांच्याशीं वागल्यास निःसंशय ते प्राणच घेतील ( २२ ). राजानें जशी आज्ञा केली असेल तसेंच काम करावें; किंवा जें विचारलें असेल तेवढयाचेंच उत्तर द्यावें; त्याच्या आज्ञेकडे दुर्लक्ष करूं नये. प्रमाद, अहंकार आणि क्रोध हे टाळावे ( २३ ).

समर्थनासु सर्वासु हितं च प्रियमेव च ।
संवर्णयेत्तदेवाऽस्य प्रियादपि हितं भवेत् ॥ २४ ॥
अनुकूलो भवेच्चाऽस्य सर्वार्थेषु कथासु च ।
अप्रियं चाऽहितं यत्स्यात्तदस्मै नाऽनुवर्णयेत् ॥ २५ ॥
नाऽहमस्य प्रियोऽस्मीति मत्वा सेवेत पण्डितः ।
अप्रमत्तश्च सततं हितं कुर्यात्प्रियं च यत् ॥ २६ ॥
नाऽस्याऽनिष्टानि सेवेत नाऽहितैः सह संवदेत् ।
स्वस्थानान्न विकम्पेत स राजवसतिं वसेत् ॥ २७ ॥
दक्षिणं वाऽथ वामं वा पार्श्वमासीत पण्डितः ।
रक्षिणां ह्यात्तशस्त्राणां स्थानं पश्चाद्विधीयते ॥ २८ ॥
नित्यं हि प्रतिषिद्धं तु पुरस्तादासनं महत् ।
न च संदर्शने किंचित्प्रवृत्तमपि संजयेत् ॥ २९ ॥

सर्व गोष्टींचें समर्थन करतांना, राजाला प्रिय व हितकर असेंच भाषण करावें; ( दोन्ही न साधल्यास, ) प्रिय भाषण न करितां, परिणामीं हितकर असेंच भाषण करावें ( २४ ). कोणतेंहि कृत्य उपस्थित झालें असतां, किंवा कोणतीहि गोष्ट निघाली असतां आपण राजाला अनुकूल असावें. त्यास जी गोष्ट आवडणार नाहीं, किंवा जिच्यापासून त्याचें अहित होणार आहे, अशी गोष्ट करण्याविषयीं राजास सल्ला देऊं नये (२५). माझ्यावर राजाची मर्जी आहे असें समजून शहाण्या मनुष्यानें त्याची सेवा करूं नये, तर नेहमीं सावध राहून त्यास हितकारक व आवडणारें असेंच कृत्य करीत जावें ( २६ ). त्यास अनिष्ट अशा गोष्टी जो करीत नाहीं, त्याच्या शत्रूशीं मसलत करीत नाहीं व आपल्यास घालून दिलेल्या मर्यादा जो उल्लंघीत नाहीं, तोच राजगृहीं वास करण्यास योग्य ( २७ ). शहाण्यानें राजाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूस बसावें; शस्त्रधारी रक्षकांचें स्थान राजाच्या पाठीमागील बाजूस असतें ( २८ ). त्याच्या समोर असणारें मोठें आसन नेहमीं वर्ज्य समजावें. राजाच्या समक्ष (वेतन किंवा बक्षीस) जें कांहीं चाललें असेल त्यांत आसक्त होऊं नये (२९).

अपि ह्येतद्दरिद्राणां व्यलीकस्थानमुत्तमम् ।
न मृषाऽभिहितं राज्ञां मनुष्येषु प्रकाशयेत् ॥ ३० ॥
असूयन्ति हि राजानो नराननृतवादिनः ।
तथैव चाऽवमन्यन्ते नरान्पण्डितमानिनः ॥ ३१ ॥
शूरोऽस्मीति न दृप्तः स्याद्बुद्धिमानिति वा पुनः ।
प्रियमेवाऽऽचरन्राज्ञः प्रियो भवति भोगवान् ॥ ३२ ॥
ऐश्वर्यं प्राप्य दुष्प्रापं प्रियं प्राप्य च राजतः ।
अप्रमत्तो भवेद्राज्ञः प्रियेषु च हितेषु च ॥ ३३ ॥
यस्य कोपो महाबाधः प्रसादश्च महाफलः ।
कस्तस्य मनसाऽपीच्छेदनर्थं प्राज्ञसंमतः ॥ ३४ ॥
न चोष्ठौ न भुजौ जानू न च वाक्यं समाक्षिपेत् ।
सदा वातं च वाचं च ष्ठीवनं चाऽऽचरेच्छनैः ॥ ३५ ॥
हास्यवस्तुषु चाऽन्यस्य वर्तमानेषु केषुचित् ।
नाऽतिगाढं प्रहृष्येत न चाऽप्युन्मत्तवद्धसेत् ॥ ३६ ॥

फुशारकी मिरविणें हें दरिद्री लोकांनासुद्धां नावडतें असतें. राजाचे मुखांतून एखादें अनृत भाषण निघालें, तर तें लोकांत प्रसिद्ध करूं नये ( ३० ). कारण जे लोक राजांचें असत्य बाहेर काढतात, त्यांचा राजांकडून द्वेष होतो. त्याच-प्रमाणें आपल्यास पंडित मानणाऱ्या पुरुषांचाहि राजेलोक अपमान करि-तात ( ३१ ). मी शूर आहें किंवा शहाणा आहें अशी घमेंड मारूं नये. जी गोष्ट राजाला प्रिय असेल, तीच करीत त्यास प्रिय होऊन ऐश्वर्य उप-भोगावें ( ३२ ). राजप्रसादानें दुर्लभ ऐश्वर्य आणि प्रिय प्राप्त झालें तरी राजाला जें प्रिय व हितकर असेल तेंच करण्याविषयीं सावध असावें ( ३३ ). ज्याचा कोप मोठी पीडा करणारा व ज्याची कृपा मोठें भाग्य देणारी, त्याचें वाईट करणें हें कोणता सुज्ञ पुरुष मनांत आणील ? (३४). ओंठ ( चावणें ), हातपाय व गुडघे चाळविणें व पुटपुटणें, हीं कृत्यें करूं नयेत; आणि थुंकणें, ढेकर देणें, दुसऱ्याशीं भाषण करणें, हीं नेहमी हळूच करावीं ( ३५ ). दुसऱ्या कोणा राजसेवकाची थट्टा चालली असतां, फार आनंदित होऊं नये आणि उन्मत्तासारखें हसूं नये ( ३६ ).

न चाऽतिधैर्येण चरेद्गुरुतां हि व्रजेत्ततः ।
स्मितं तु मृदुपूर्वेण दर्शयेत प्रसादजम् ॥ ३७ ॥
लाभे न हर्षयेद्यस्तु न व्यथेद्योऽवमानितः ।
असंमूढश्च यो नित्यं स राजवसतिं वसेत् ॥ ३८ ॥
राजानं राजपुत्रं वा संवर्णयति यः सदा ।
अमात्यः पण्डितो भूत्वा स चिरं तिष्ठते प्रियः ॥ ३९ ॥
प्रगृहीतश्च योऽमात्यो निगृहीतस्त्वकारणैः ।
न निर्वदति राजानं लभते संपदं पुनः ॥ ४० ॥
प्रत्यक्षं च परोक्षं च गुणवादी विचक्षणः ।
उपजीवी भवेद्राज्ञो विषये योऽपि वा भवेत् ॥ ४१ ॥
अमात्यो हि बलाद्भोक्तुं राजानं प्रार्थयेत यः ।
न स तिष्ठेच्चिरं स्थानं गच्छेच्च प्राणसंशयम् ॥ ४२ ॥

किंवा त्याप्रसंगीं धैर्यानें काष्ठासारखें बसूं नये; तर ( संतोष झाला असें दाखवीत ) संतोष दाखविणारें किंचित् स्मित करावें ( ३७ ). लाभ झाला असतां जो आनंदित होत नाहीं, किंवा अपमानानें जो खिन्न होत नाहीं, आपलें काम नित्य एकाग्र मनानें करितो, त्यानें राजगृहीं राहावें ( ३८ ). जो अमात्य राजाची किंवा राजपुत्राची सदोदित स्तुति करितो, तो पंडित अमात्य होऊन राजाला नेहमीं प्रिय होतो ( ३९ ). जो अमात्य प्रथम अनुग्रह होऊन नंतर विनाकारण दंडित झाला तरी राजाची निंदा करणार नाहीं, तो पुनः ऐश्वर्य मिळवील ( ४० ). ज्याची उपजीविका राजावर अवलंबून असेल किंवा ज्यास राजाच्या मुलुखांत राहावयाचें असेल, त्यानें शहाणपणानें राजाच्या समक्ष किंवा त्याच्या पाठीमागें त्याचें गुणवर्णन करावें ( ४१ ). जो मंत्री राजाला जुलुमानें राज्य भोगण्यास ( कांहींतरी निमित्तानें लोकांस शिक्षा देण्यास ) सांगतो, तो आपल्या पदावर फार वेळ टिकत नाहीं; व त्याजवर प्राणसंकट येतें ( ४२ ).

श्रेयः सदाऽऽत्मनो दृष्ट्वा परं राज्ञा न संवदेत् ।
विशेषयेच्च राजानं योग्यभूमिषु सर्वदा ॥ ४३ ॥
अम्लानो बलवाञ्छूरश्छायेवाऽनुगतः सदा ।
सत्यवादी मृदुर्दान्तः स राजवसतिं वसेत् ॥ ४४ ॥
अन्यस्मिन्प्रेष्यमाणे तु पुरस्ताद्यः समुत्पतेत् ।
अहं किं करवाणीति स राजवसतिं वसेत् ॥ ४५ ॥
आन्तरे चैव बाह्ये च राज्ञा यश्चाऽथ सर्वदा ।
आदिष्टो नैव कम्पेत स राजवसतिं वसेत् ॥ ४६ ॥
यो वै गृहेभ्यः प्रवसन्प्रियाणां नाऽनुसंस्मरेत् ।
दुःखेन सुखमन्विच्छेत्स राजवसतिं वसेत् ॥ ४७ ॥
समवेषं न कुर्वीत नोच्चैः सन्निहितो वसेत् ।
न मन्त्रं बहुधा कुर्यादेवं राज्ञः प्रियो भवेत् ॥ ४८ ॥

अमात्यानें नेहमीं आपल्या हिताकडे लक्ष ठेवून, दुसरा कोणी राजास लाहा मसलत देणार नाहीं अशाविषयीं जपावें, व युद्धाच्या किंवा कसरतीच्या स्थानीं त्यानें राजापेक्षांहि अधिक काम करावें ( ४३ ). जो सदोदित उत्साही, बुद्धिबळानें युक्त, शूर असून नित्य छायेप्रमाणें राजामागें जातो; व जो सत्यभाषण करणारा सौम्य आणि जितेंद्रिय असतो, त्यानेंच राजगृहीं वसती करावी ( ४४ ). ( एखाद्या कामाकरितां ) दुसऱ्यास हांक मारली असतां, जो आपण होऊन पुढें होतो, व ' महाराज, मी काय करूं ? ' असें म्हणतो, त्यानें राजगृहीं राहावें ( ४५ ). आंत ( घरदार वगैरे संभाळण्याकरितां ) किंवा बाहेर ( युद्धादिकासाठीं ) राजानें आज्ञा केली असतां जो निर्भय रीतीनें तें कार्य करतो, त्यानेंच राजगृहीं राहावें ( ४६ ). घरांतून निघून प्रवासास आरंभ केला म्हणजे ज्यास ( स्त्रीपुत्र, अन्नपानादिक ) प्रिय वस्तूंचें स्मरण होत नाहीं, व जो (प्रवासादि) त्रासांतच सुखाची अपेक्षा करितो, तोच राजगृहीं राहण्यास योग्य होय ( ४७ ). राजासारखा वेष करूं नये; त्याच्या समीप श्रेष्ठ आसनावर बसूं नये; आणि त्याची मसलत बाहेर फोडूं नये; अशानेंच राजाला मनुष्य प्रिय होतो ( ४८ ).

न कर्मणि नियुक्तः सन्धनं किंचिदपि स्पृशेत् ।
प्राप्नोति हि हरन्द्रव्यं बन्धनं यदि वा वधम् ॥ ४९ ॥
यानं वस्त्रमलंकारं यच्चाऽन्यत्संप्रयच्छति ।
तदेव धारयेन्नित्यमेवं प्रियतरो भवेत् ॥ ५० ॥
एवं संयम्य चित्तानि यत्नतः पांडुनन्दनाः ।
संवत्सरमिमं तात तथाशीला बुभूषत ।
अथ स्वविषयं प्राप्य यथाकामं करिष्यथ ॥ ५१ ॥
युधिष्ठिर उवाच—अनुशिष्टाः स्म भद्रं ते नैवद्वक्ताऽस्ति कश्चन ।
कुन्तीमृते मातरं नो विदुरं वा महामतिम् ॥ ५२ ॥
यदेवाऽनन्तरं कार्यं तद्भवान्कर्तुमर्हति ।
तारणायाऽस्य दुःखस्य प्रस्थानाय जयाय च ॥ ५३ ॥
वैशंपायन उवाच—
एवमुक्तस्ततो राज्ञा धौम्योऽथ द्विजसत्तमः ।
अकरोद्विधिवत्सर्वं प्रस्थाने यद्विधीयते ॥ ५४ ॥

कांहीं अधिकारावर राजानें नेमिल्यास, अगदीं थोड्या धनासमुद्धां शिवूं नये. द्रव्य खाणारा कैद होतो अथवा वध प्राप्त करून घेतो (४९). वाहन, वस्त्र, अलंकार, अथवा दुसरें जें कांहीं राजा देईल तेंच नेहमीं धारण करावें. अशा रीतीनें (जो वागतो) तो राजास फार आवडतो (५०). बाबानो पांडु पुत्रांनो, याप्रमाणें तुम्हीं मनोनिग्रह उत्तम रीतीनें करून हें वर्ष घालवावें, आणि मी सांगितल्याप्रमाणें शील ठेवून सुख भोगावें, व नंतर आपल्या देशीं गेल्यावर यथेच्छ वर्तन करावें"(५१).

युधिष्ठिर म्हणाला:—"आम्हांस योग्य उपदेश मिळाला. तुमचें कल्याण असो. आमची माता कुंती किंवा महाज्ञानी विदुर ह्यांशिवाय दुसरा कोणीं असें सांगणार नाहीं ( ५२ ). आतां आमचा अज्ञातवास सुखावह होण्याकरितां, त्याचप्रमाणें ( पुढें ) आम्हीं शत्रूवर चाल करून विजय संपादन करण्यासाठीं, जीं जीं कर्में करावयास पाहिजे असतील, तीं आपण यानंतर करावीं" ( ५३ ).

वैशंपायन म्हणाला:—ह्याप्रमाणें राजानें सांगितलें असतां द्विजश्रेष्ठ धौम्यानें प्रस्थानसमयीं जे विधि करावे लागतात ते सर्व केले ( ५४ ).

तेषां समिध्य तानग्नीन्मन्त्रवच्च जुहाव सः ।
समृद्धिवृद्धिलाभाय पृथिवीविजयाय च ॥ ५५ ॥
अग्नीन्प्रदक्षिणीकृत्य ब्राह्मणांश्च तपोधनान् ।
याज्ञसेनीं पुरस्कृत्य षडेवाऽथ प्रवव्रजुः ॥ ५६ ॥
गतेषु तेषु वीरेषु धौम्योऽथ जपतां वरः ।
अग्निहोत्राण्युपादाय पाञ्चालानभ्यगच्छत ॥ ५७ ॥
इन्द्रसेनादयश्चैव यथोक्ताः प्राप्य यादवान् ।
रथानश्वांश्च रक्षन्तः सुखमूषुः सुसंवृताः ॥ ५८ ॥ [ १४१ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि धौम्योपदेशे चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

त्यानें पांडवांचे अग्नि प्रज्वलित करून त्यांमध्यें समंत्रक आहुति अर्पण केल्या. अशाकरितां कीं, त्यांस समृद्धि आणि वृद्धि मिळून पृथ्वीचें साम्राज्य मिळावें ( ५५ ). नंतर त्या अग्नींना व तपोधन ब्राह्मणांनां प्रदक्षिणा घालून द्रौपदीस पुढें चालवून पांडव निघून गेले (५६). ते वीर गेल्यानंतर तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ धौम्य ( पांडवांचीं ) अग्निहोत्रें घेऊन पंचाल देशास गेला ( ५७ ). आणि इंद्रसेनादिक लोक सांगितल्याप्रमाणें यादवांकडे जाऊन रथांचें व घोड्यांचें संरक्षण करीत, ( सर्व गोष्टी ) गुप्त राखीत, सुखानें राहिले ( ५८ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांपैकीं चवथा अध्याय संपला.

## अध्याय ५

[ पांडव द्रौपदीसह विराटराजधानींत जात असतां थकलेल्या द्रौपदीस अर्जुनानें खांद्यावर घेतलें आणि शस्त्रें शमीवर ठेवून ते विराटनगरीस गेले. ]

**वैशम्पायन उवाच**—ते वीरा बद्धनिस्त्रिंशास्तथा बद्धकलापिनः ।
बद्धगोधाङ्गुलित्राणाः[1] कालिन्दीमभितो ययुः ॥ १ ॥

**वैशंपायन म्हणालाः**—ते वीर तरवारी लटकावून, बाणभाते बांधून, (दंडाभोंवती) गोधा[1] व (बोटांत) अंगुलित्राणें घालून यमुनेचे बाजूनें निघाले(१).

१ धनुष्याच्या दोरीच्या प्रहारांनीं इजा होऊं नये म्हणून एक प्रकारचें चर्मत्राण दण्डास व बोटांस बांधतात तें.

ततस्ते दाक्षिणं तीरमन्वगच्छन्पदातयः ।
निवृत्तवनवासा हि स्वराष्ट्रं प्रेप्सवस्तदा ॥
वसन्तो गिरिदुर्गेषु वनदुर्गेषु धन्विनः ॥ २ ॥
विध्यन्तो मृगजातानि महेष्वासा महाबलाः ।
उत्तरेण दशार्णास्ते पञ्चालान्दक्षिणेन च ॥ ३ ॥
अन्तरेण यकृल्लोमाञ्छूरसेनांश्च पाण्डवाः ।
लुब्धा ब्रुवाणा मत्स्यस्य विषयं प्राविशन्वनात् ॥ ४ ॥
धन्विनो बद्धनिस्त्रिंशा विवर्णाः श्मश्रुधारिणः ।
ततो जनपदं प्राप्य कृष्णा राजानमब्रवीत् ॥ ५ ॥
पश्यैकपद्यो दृश्यन्ते क्षेत्राणि विविधानि च ।
व्यक्तं दूरे विराटस्य राजधानी भविष्यति ।
वसामेहाऽपरां रात्रिं बलवान्मे परिश्रमः ॥ ६ ॥

नंतर ते पादचारी यमुनेच्या दक्षिण तीरानें पुढें चालले. कारण वनवास पूर्ण करून स्वराष्ट्रास पोंचण्याची त्यांची इच्छा होती. ते धनुर्धारी त्या तीराकडील पर्वतांतील व अरण्यांतील अडचणीच्या प्रदेशांत मुक्काम करीत चालले (२). मोठालीं धनुष्यें धारण करणारे ते महाबलाढ्य पांडव दशार्णदेशाच्या उत्तरेकडून व पंचाल देशाच्या दक्षिणेकडून मृगांच्या निरनिराळ्या जाती (शिकारींत) मारीत चालले ( ३ ). यकृल्लोम व शूरसेन ह्या देशांच्या दरम्यान जात 'आम्ही पारधी आहोंत' असें सांगत वनांतून मत्स्यदेशांत शिरले ( ४ ). त्या धनुष्यें धारण करणारांनीं आपल्या तरवारी लटकाविल्या होत्या, त्यांचीं श्मश्रु वाढलेली होती, व त्यांचीं मुखें ( वाटेच्या दगदगीनें ) विवर्ण झालीं होतीं ! जनपद ( शेतीचा प्रदेश ) आला तेव्हां द्रौपदी युधिष्ठिरास म्हणाली:-(५). " पहा, पाऊलवाटा व नानाप्रकारचीं शेतें दिसत आहेत; ह्यांवरून विराट नगरी उघड दूर असावी, यास्तव आपण आणखी एक रात्र येथेंच राहूं; मी अगदीं थकून गेल्यें आहें " ( ६ ).

युधिष्ठिर उवाच— धनंजय समुद्यम्य पाञ्चालीं वह भारत ।
राजधान्यां निवत्स्यामो विमुक्ताश्च वनादितः ॥ ७ ॥
वैशम्पायन उवाच— तामादायाऽर्जुनस्तूर्णं द्रौपदीं गजराडिव
संप्राप्य नगराभ्याशमवतारयदर्जुनः ॥ ८ ॥
स राजधानीं संप्राप्य कौन्तेयोऽर्जुनमब्रवीत् ।
क्काऽऽयुधानि समासज्ज्य प्रवेक्ष्यामः पुरं वयम् ॥ ९ ॥
सायुधाश्च प्रवेक्ष्यामो वयं तात पुरं यदि ।
समुद्वेगं जनस्याऽस्य करिष्यामो न संशयः ॥ १० ॥
गाण्डीवं च महद्गाढं लोके च विदितं नृणाम् ।
तच्चेदायुधमादाय गच्छामो नगरं वयम् ।
क्षिप्रमस्मान्विजानीयुर्मनुष्या नाऽत्र संशयः ॥ ११ ॥
ततो द्वादश वर्षाणि प्रवेष्टव्यं वने पुनः ।
एकस्मिन्नपि विज्ञाते प्रतिज्ञातं हि नस्तथा ॥ १२ ॥

**युधिष्ठिर** म्हणाला:– "भारता धनंजया, तूं पांचालीस उचलून (खांद्यावर) घे. हें इतकें वन आपण चालून गेलों म्हणजे राजधानींतच आपणांस मुक्काम करितां येईल" ( ७ ).

**वैशंपायन** म्हणाला:— अर्जुनानें गजराजाप्रमाणें द्रौपदीस खांद्यावर घेतलें व थोडक्याच वेळांत नगराच्या समीप आल्यावर तिला खालीं उतरिलें ( ८ ). राजधानीस पोंचल्यावर युधिष्ठिरानें अर्जुनास म्हटलें:–"आपण पुरांत प्रवेश करण्यापूर्वीं आयुधें कोठें नीट ठेवावीत? ( ९ ) शस्त्रांसह आपण जर नगरींत प्रवेश केला, तर या नगरांतील लोक निःसंशय घाबरतील (१०). शिवाय, गांडीव धनुष्य मोठें प्रचंड असून लोकांच्या ओळखीचें आहे; तेव्हां, तें आयुध घेऊन जर आपण नगरींतून चाललों, तर आपणांस लोक लागलीच ओळखतील, यांत कांहीं संशय नाहीं ( ११ ). आणि, आपणांपैकीं एकाला जरी कोणीं ओळखिलें, तर पुनः बारा वर्षें वनांत काढावीं लागतील. आपण तशी प्रतिज्ञा केली आहे" ( १२ ).

अर्जुन उवाच—इयं कूटे मनुष्येन्द्र गहना महती शमी ।
भीमशाखा दुरारोहा श्मशानस्य समीपतः ॥ १३ ॥
न चापि विद्यते कश्चिन्मनुष्य इति मे मतिः ।
योऽस्मान्निदधतो द्रष्टा भवेच्छस्त्राणि पाण्डवाः ॥ १४ ॥
उत्पथे हि वने जाता मृगव्यालनिषेविते ।
समीपे च श्मशानस्य गहनस्य विशेषतः ॥ १५ ॥
समाधायाऽऽयुधं शम्यां गच्छामो नगरं प्रति ।
एवमत्र यथायोगं विहरिष्याम भारत ॥ १६ ॥
वैशम्पायन उवाच—एवमुक्त्वा स राजानं धर्मराजं युधिष्ठिरम् ।
प्रचक्रमे निधानाय शस्त्राणां भरतर्षभ ॥ १७ ॥
येन देवान्मनुष्यांश्च सर्वांश्चैकरथोऽजयत् ।
स्फीताञ्जनपदांश्चाऽन्यानजयत्कुरुपुंगवः ॥ १८ ॥
तदुदारं महाघोषं सपत्नबलसूदनम् ।
अपज्यमकरोत्पार्थो गाण्डीवं सुभयंकरम् ॥ १९ ॥

**अर्जुन** म्हणाला:—"राजा, ह्या उच्च प्रदेशावर मोठी शमी आहे; तिला मोठमोठ्या फांद्या असून, वर चढण्यासहि ती कठिण आहे; ( शिवाय ) ती स्मशानाचे समीप आहे ( १३ ). आपण ( या वृक्षावर ) शस्त्रें ठेवीत असतां पाहणारा येथें कोणी मनुष्यहि नाहीं, असें मला वाटतें ( १४ ). ही शमी या अरण्यांत आड वाटेवर असून गहन स्मशान जवळ आहे. या वनांत श्वापदांची व सर्पादिकांची दाट वसतीही आहे ( १५ ). ह्या शमीवर आयुधें ठेवून आपण नगरांत जाऊं; आणि या रीतीनें भारता, ठरल्याप्रमाणें येथें आपापलीं कामें करून राहूं " ( १६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—राजा जनमेजया, ह्याप्रमाणें धर्मराज युधिष्ठिरास बोलून अर्जुन ( लागलींच ) शस्त्रें ठेवण्याचे तयारीस लागला ( १७ ). ज्या धनुष्याच्या साहाय्यानें त्या कुरुपुंगवानें एका रथांत बसून देवांना, मनुष्यांना, अन्य सर्व समृद्ध देशांनाहि जिंकिलें ( १८ ), त्या महाटणत्कार करणाऱ्या अतिशय भयंकर गांडीव धनुष्याची दोरी अर्जुनानें सोडिली ( १९ ).

येन वीरः कुरुक्षेत्रमभ्यरक्षत्परंतपः ।
अमुञ्चद्धनुषस्तस्य ज्यामक्षय्यां युधिष्ठिरः ॥ २० ॥
पाञ्चालान्येन संग्रामे भीमसेनोऽजयत्प्रभुः ।
प्रत्यषेधद्बहूनेकः सपत्नांश्चैव दिग्जये ॥ २१ ॥
निशम्य यस्य विस्फारं व्यद्रवन्त रणात्परे ।
पर्वतस्येव दीर्णस्य विस्फोटमशनेरिव ॥ २२ ॥
सैन्धवं येन राजानं पर्यामृषितवानथ ।
ज्यापाशं धनुषस्तस्य भीमसेनोऽवतारयत् ॥ २३ ॥
अजयत्पश्चिमामाशां धनुषा येन पाण्डवः ।
माद्रीपुत्रो महाबाहुस्ताम्रास्यो मितभाषिता ॥ २४ ॥
तस्य मौर्वीमपाकर्षच्छूरः संक्रन्दनो युधि ।
कुले नास्ति समो रूपे यस्येति नकुलः स्मृतः ॥ २५ ॥
दक्षिणां दक्षिणाचारो दिशं येनाऽजयत्प्रभुः ।
अपज्यमकरोद्वीरः सहदेवस्तदायुधम् ॥ २६ ॥

ज्याच्या साहाय्यानें वीरत्वानें कुरुक्षेत्राचें रक्षण केलें, त्या ( आपल्या ) धनुष्याची अक्षय्य दोरी—परंतप युधिष्ठिरानें सोडिली ( २० ). तसेंच ज्या धनुष्यानें समर्थ भीमसेनानें युद्धांत पांचालांचा पराजय केला व दिग्विजयाचे वेळीं अनेक वीरांना एकट्यानें जर्जर केलें ( २१ ), ज्याचा टणत्कार ऐकून रणांगणांतून शत्रु पळून जात, ( कारण ) जणूं त्यामुळें वज्रप्रहारानें पर्वत विदीर्ण होऊन जात आहे ( असा भास होई ) ( २२ ), आणि ज्यानें भीमसेनानें सिंधुपति राजाचा समाचार घेतला होता, त्या धनुष्याची दोरी भीमानें सोडली ( २३ ). महाबाहु, आरक्त मुखकांतीचा व मितभाषणी माद्रीचा पुत्र नकुल यानें ज्या धनुष्यानें पश्चिम दिशा जिंकली ( २४ ), त्या आपल्या धनुष्याची दोरी—कुळांत ज्याच्यासारखा रूपसंपन्न कोणीहि नसल्यामुळें ज्यास नकुल म्हणत, त्या युद्धांत—शत्रूस रडावयास लावणाऱ्या वीरानें सोडिली ( २५ ). दाक्षिण्ययुक्त आचाराचा वीर सहदेव यानें ज्या धनुष्यानें दक्षिण दिशा जिंकिली त्याची प्रत्यंचा काढली ( २६ ).

खड्गांश्च दीप्तान् दीर्घांश्च कलापांश्च महाधनान् ।
विपाठान्क्षुरधारांश्च धनुर्भिर्निदधुः सह ॥ २७ ॥

वैशम्पायन उवाच—अथाऽन्वशासन्नकुलं कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
आरुह्येमां शमीं वीर धनूंष्येतानि निक्षिप ॥ २८ ॥

तामुपारुह्य नकुलो धनूंषि निदधे स्वयम् ।
यानि तस्याऽवकाशानि दिव्यरूपाण्यमन्यत ॥ २९ ॥

यत्र चाऽपश्यत स वै तिरोवर्षाणि वर्षति ।
तत्र तानि दृढैः पाशैः सुगाढं पर्यबन्धत ॥ ३० ॥

शरीरं च मृतस्यैकं समबन्धन्त पाण्डवाः ।
विवर्जयिष्यन्ति नरा दूरादेव शमीमिमाम् ॥ ३१ ॥

आबद्धं शवमत्रेति गन्धमाघ्राय पूतिकम् ।
अशीतिशतवर्षेयं माता न इति वादिनः ॥ ३२ ॥

कुलधर्मोऽयमस्माकं पूर्वैराचरितोऽपि वा ।
समासज्ज्याऽथ वृक्षेऽस्मिन्निति वै व्याहरन्ति ते ॥ ३३ ॥

( नंतर ) त्यांनीं त्याचप्रमाणें दैदीप्यमान पल्लेदार तरवारी, मूल्यवान् भाते व तीक्ष्ण बाण हीं सर्व आपापल्या धनुष्यांवर बांधलीं ( २७ ).

वैशम्पायन म्हणाला:—आतां कुंतीपुत्र युधिष्ठिरानें नकुलास आज्ञा केली:—"वीरा, ह्या शमीवर चढून हीं धनुष्यें ठेवून दे" (२८). तेव्हां नकुलानें शमीवर चढून, तिच्यामध्यें ज्या ढोली व फटी त्यास सोयिस्कर वाटल्या त्यांत धनुष्यें स्वतः ठेविलीं ( २९ ). ज्या ठिकाणीं पर्जन्याचा वगैरे त्रास पोंचणार नाहीं असें त्यास दिसलें, तेथें बळकट दोऱ्यांनीं सुदृढ बांधलीं (३०). लोकांनीं दुरूनच या शमीस टाळावें म्हणून पांडवांनीं मृताचें एक शव ( मडास ) बांधलें (३१). आणि घाण आल्यावर कोणीं शव बांधलें असें विचारलें, तर ही आमची एकशें ऐंशी वर्षांची माता आहे, हा आमचा पूर्वापार चालत आलेला कुलधर्म असल्यामुळें आम्ही तिचें शव ह्या वृक्षास बांधून ठेविलें आहे, असें ते म्हणत ( ३२–३३ ).

आगोपालाविपालेभ्य आचक्षाणाः परंतपाः ।
आजग्मुर्नगराभ्याशे पार्थाः शत्रुनिबर्हणाः ॥ ३४ ॥
जयो जयन्तो विजयो जयत्सेनो जयद्बलः ।
इति गुह्यानि नामानि चक्रे तेषां युधिष्ठिरः ॥ ३५ ॥
ततो यथाप्रतिज्ञाभिः प्राविशन्नगरं महत् ।
अज्ञातचर्यां वत्स्यन्तो राष्ट्रे वर्षं त्रयोदशम् ॥ ३६ ॥ [१७७]

इति श्रीमहाभारते० विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि पुरप्रवेशे अस्त्रसंस्थापने पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

गुराखी, धनगर वगैरे जे कोणी ( मार्गांत ) भेटले, त्यांस तसेंच सांगत ते शत्रूंस जर्जर करणारे पार्थ नगराजवळ येऊन पोंचले ( ३४ ). जय, जयंत, विजय, जयत्सेन व जयद्बल, अशीं गुप्त नांवें युधिष्ठिरानें (आपणांसुद्धां) सर्वांस ठेविलीं ( ३५ ). त्यानंतर सर्वजण पूर्वसंकेताप्रमाणें तें अज्ञातवासाचें तेरावें वर्ष घालविण्याच्या इच्छेनें त्या अफाट विराट नगरांत शिरले ( ३६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांपैकीं पांचवा अध्याय संपला.

---

## अध्याय ६

[ पांडवांस दुर्गादेवीचें दर्शन व वरप्राप्ति. ]

---

वैशंपायन उवाच—विराटनगरं रम्यं गच्छमानो युधिष्ठिरः ।
अस्तुवन्मनसा देवीं दुर्गां त्रिभुवनेश्वरीम् ॥ १ ॥
यशोदागर्भसंभूतां नारायणवराप्रियाम् ।
नन्दगोपकुले जातां मङ्गल्यां कुलवर्धिनीम् ॥ २ ॥

वैशंपायन म्हणाले:—विराटाच्या रम्य नगरीस जात असतां युधिष्ठिरानें मनामध्यें त्रैलोक्याची अधिष्ठात्री देवी दुर्गा हिचें स्तवन केलें ( १ ). यशो-देच्या गर्भापासून उत्पन्न झालेली, नारायणानें ( ' देव तुला उमा, भद्रकाली, इत्यादि नांवांनीं पूजितील ' अशीं ) अनेक वरप्रदानें दिलेली, नंदगोपाळाच्या कुलांत जन्मलेली, मंगलप्रद, कुळ वाढविणारी ( २ ).

कंसविद्रावणकरीमसुराणां क्षयंकरीम् ।
शिलातटविनिक्षिप्तामाकाशं प्रतिगामिनीम् ॥ ३ ॥
वासुदेवस्य भगिनीं दिव्यमाल्यविभूषिताम् ।
दिव्याम्बरधरां देवीं खड्गखेटकधारिणीम् ॥ ४ ॥
भारावतरणे पुण्ये ये स्मरन्ति सदा शिवाम् ।
तान्वै तारयते पापात्पङ्के गामिव दुर्बलाम् ॥ ५ ॥
स्तोतुं प्रचक्रमे भूयो विविधैः स्तोत्रसंभवैः ।
आमन्त्र्य दर्शनाकाङ्क्षी राजा देवीं सहानुजः ॥ ६ ॥
नमोऽस्तु वरदे कृष्णे कुमारि ब्रह्मचारिणि ।
बालार्कसदृशाकारे पूर्णचन्द्रनिभानने ॥ ७ ॥
चतुर्भुजे चतुर्वक्त्रे पीनश्रोणिपयोधरे ।
मयूरपिच्छवलये केयूराङ्गदधारिणि ।
भासि देवि यथा पद्मा नारायणपरिग्रहः ॥ ८ ॥
स्वरूपं ब्रह्मचर्यं च विशदं तव खेचरि ।
कृष्णच्छविसमा कृष्णा संकर्षणसमानना ॥ ९ ॥

कंसानें शिळेवर आपटलें तेव्हां आकाशांत उडून गेलेली, असुरांना भय उत्पन्न करणारी ( ३ ), श्रीकृष्णाची बहीण, दिव्य पुष्पांनीं सुशोभित व दिव्य वस्त्र-परिधान केलेली, खड्गढाल धारण करणारी (इचें स्तवन केलें) (४). भू भार (हरण करण्यासाठीं) जिचा पुण्य अवतार झाला आहे, त्या कल्याणकारी देवीचें जे सदोदित स्मरण करितात, त्यांचा पापापासून, चिखलांत रुतलेल्या दुर्बल गाईप्रमाणें, ही उद्धार करते (५). त्या दुर्गादेवीचें प्रत्यक्ष दर्शन व्हावें असा हेतु मनांत धरून धर्मराजानें आपल्या बंधूंसह अनेक स्तुतिपर वाक्यांनीं तिचें स्तवन करण्यास आरंभ केला (६). " कृष्णस्वरूपे, वरदायिनी, कुमारिके, ब्रह्म-चारिणि, बालसूर्याप्रमाणें तेजस्विनि, पूर्णचंद्रानने, (तुला आमचा) नमस्कार असो (७). ( विष्णुप्रमाणें ) चतुर्भुज, व ( ब्रह्मदेवाप्रमाणें ) चतुर्मुख, नितंब व स्तन पुष्ट असलेली, मोराच्या पिसाऱ्याचीं वलयें घालणारी, केयूर, अंगद वगैरे भूषणें धारण करणारी, देवि, तूं नारायणपत्नी लक्ष्मीप्रमाणें आम्हाला भासत आहेस ( ८ ). आकाशगामिनि, तुझें स्वरूप व ब्रह्मचर्य स्पष्ट आहेत. तूं कृष्णाच्या छवीसारखी नीलवर्ण असून बलरामासारखें तुझें मुख आहे ( ९ ).

विभ्रती विपुलौ बाहू शक्रध्वजसमुच्छ्रयौ ।
पात्री च पङ्कजी घण्टी स्त्री विशुद्धा च या भुवि ॥ १० ॥
पाशं धनुर्महाचक्रं विविधान्यायुधानि च ।
कुण्डलाभ्यां सुपूर्णाभ्यां कर्णाभ्यां च विभूषिता ॥ ११ ॥
चन्द्रविस्पर्द्धिना देवि मुखेन त्वं विराजसे ।
मुकुटेन विचित्रेण केशबन्धेन शोभिना ॥ १२ ॥
भुजंगाभोगवासेन श्रोणिसूत्रेण राजता ।
विभ्राजसे चाऽऽवद्धेन भोगेनेवेह मन्दरः ॥ १३ ॥
ध्वजेन शिखिपिच्छानामुच्छ्रितेन विराजसे ।
कौमारं व्रतमास्थाय त्रिदिवं पावितं त्वया ॥ १४ ॥
तेन त्वं स्तूयसे देवि त्रिदशैः पूज्यसेऽपि च ।
त्रैलोक्यरक्षणार्थाय महिषासुरनाशिनि ॥
प्रसन्ना मे सुरश्रेष्ठे दयां कुरु शिवा भव ॥ १५ ॥

इंद्रध्वजासारखे उभारलेले विशाल दोन बाहू-(अभयप्रदान करणारे)-पात्र धारण केलेला एक आणि कमल धारण केलेला एक, पांचव्या हातांत घंटा असलेली, पाश-धनुष्य-महाचक्र व इतर नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले तीन हात, (असे एकंदर आठ हात तुला आहेत.) पृथ्वीवर अत्यंत शुद्ध स्त्री तूंच आहेस. कानांतील कुंडलांनीं तूं सुशोभित आहेस (१० – ११). देवि, चंद्राशीं स्पर्धा करणारें तुझें मुख आहे, तुझा मुगुट अद्भुत आहे, तुझी वेणी फारच शोभायमान दिसते (१२). भुजंगाच्या शरीराच्या आकृतीचा कमरपट्टा जो तूं घातला आहेस त्यामुळें मंदर-पर्वताला (वासुकि) भुजंगानें बद्ध केलें आहे कीं काय, असा भास होतो (१३). तुझ्या उंच ध्वजावर मोरांचीं पिसें झळकतात. कौमार्य-व्रताचा अंगीकार केल्यामुळें तुझ्या योगानें स्वर्गास पवित्रता आली आहे (१४). त्यामुळें त्रैलोक्याच्या रक्षणासाठीं देव तुझी स्तुति करितात व तुझें पूजन करितात. हे महिषासुरमर्दिनि देवि, मला प्रसन्न हो, सुरश्रेष्ठे, मजवर तूं दया कर आणि मला कल्याणरूप हो (१५).

जया त्वं विजया चैव संग्रामे च जयप्रदा ।
ममापि विजयं देहि वरदा त्वं च सांप्रतम् ॥ १६ ॥
विन्ध्ये चैव नगश्रेष्ठे तव स्थानं हि शाश्वतम् ।
कालि कालि महाकालि सीधुमांसपशुप्रिये ॥ १७ ॥
कृतानुयात्रा भूतैस्त्वं वरदा कामचारिणि ।
भारावतारे ये च त्वां संस्मरिष्यन्ति मानवाः ॥ १८ ॥
प्रणमन्ति च ये त्वां हि प्रभाते तु नरा भुवि ।
न तेषां दुर्लभं किंचित्पुत्रतो धनतोऽपि वा ॥ १९ ॥
दुर्गात्तारयसे दुर्गे तत्त्वं दुर्गा स्मृता जनैः ।
कान्तारेष्ववसन्नानां मग्नानां च महार्णवे ॥ २० ॥
दस्युभिर्वा निरुद्धानां त्वं गतिः परमा नृणाम् ।
जलप्रतरणे चैव कान्तारेष्वटवीषु च ॥ २१ ॥
ये स्मरन्ति महादेवि न च सीदन्ति ते नराः ।
त्वं कीर्तिः श्रीर्धृतिः सिद्धिर्ह्रीर्विद्या संततिर्मतिः ॥२२॥

जया आणि विजया ही तूंच असून युद्धांत जय देणारीहि तूंच आहेस, (म्हणून) मलाहि तूं विजय दे. ( कारण ) हल्लीं तूंच वर देणारी आहेस ( १६ ). कालि, कालि, महाकालि, मद्य, मांस, पशु, प्रिय असणारी, पर्वतांमध्यें जो श्रेष्ठ विंध्य तो तुझें नेहमींचें वसतिस्थान आहे ( १७ ). ब्रह्मादिक देव व सर्व लोक ( तुझ्या दर्शनाकरितां ) तेथें जात असून, इच्छेस वाटेल तिकडे संचार करणारी तूं, त्यांना वर देतेस. जे लोक तुझें स्मरण करतात त्यांचीं संकटें तूं नाश करितेस (१८). आणि पृथ्वीवरील जे पुरुष सकाळींच तुला वंदितात, त्यांना पुत्र, धन, किंवा इतर कोणतेंहि मिळण्यास कठिण नसतें ( १९ ). दुर्ग म्हणजे संकट, त्यापासून तूं तारितेस म्हणून तुला दुर्गा म्हणतात. मोठ्या अरण्यामध्यें संकटांत सांपडलेले, महासागरांत बुडणारे, किंवा चोरांनीं अडविलेले, अशा नरांना तूंच मोठा आधार आहेस. जलांतून तरून जावयाचें असल्यास, आणि बिकट मार्गांतून अथवा घोर अरण्यांतून जावयाचें असल्यास (२०–२१), जे पुरुष, महादेवि, तुझें स्मरण करितात, त्यांचा (कधींहि) नाश होत नाहीं. तूं कीर्ति, लक्ष्मी, धृति, सिद्धि, लज्जा, विद्या, संतति, मति (२२),

संध्या रात्रिः प्रभा निद्रा ज्योत्स्ना कान्तिः क्षमा दया ।
नृणां च बन्धनं मोहं पुत्रनाशं धनक्षयम् ॥ २३ ॥
व्याधिं मृत्युं भयं चैव पूजिता नाशयिष्यसि ।
सोऽहं राज्यात्परिभ्रष्टः शरणं त्वां प्रपन्नवान् ॥ २४ ॥
प्रणतश्च यथा मूर्ध्ना तव देवि सुरेश्वरि ।
त्राहि मां पद्मपत्राक्षि सत्ये सत्या भवस्व नः ॥ २५ ॥
शरणं भव मे दुर्गे शरण्ये भक्तवत्सले ।
एवं स्तुता हि सा देवी दर्शयामास पाण्डवम् ॥ २६ ॥
उपगम्य तु राजानमिदं वचनमब्रवीत् ।

शृणु राजन्महाबाहो मदीयं वचनं प्रभो ॥ २७ ॥
भविष्यत्यचिरादेव संग्रामे विजयस्तव ।
मम प्रसादान्निर्जित्य हत्वा कौरववाहिनीम् ॥ २८ ॥
राज्यं निष्कण्टकं कृत्वा भोक्ष्यसे मेदिनीं पुनः ।
भ्रातृभिः सहितो राजन्प्रीतिं प्राप्स्यसि पुष्कलाम् ॥ २९ ॥

संध्या, रात्रि, प्रभा, निद्रा, ज्योत्स्ना, कांति, क्षमा व दया आहेस. मनुष्यांचें बंधन, मोह, पुत्रनाश व धनाचा क्षय ( २३ ), व्याधि, मृत्यु आणि भय, या सर्वांचा तुझें पूजन केलें असतां तूं नाश करितेस; म्हणून राज्यास मुकलेला मी तुला शरण आलों आहें (२४). सुरेश्वरि देवि, मीं आपलें मस्तक तुझ्या चरणांवर ठेविलें आहे, तेव्हां कमलनयने देवि, माझें रक्षण कर. सत्ये, तूं आम्हांला सत्यस्वरूप हो ( २५ ). भक्तवत्सले, शरण्ये, दुर्गे, तूं मला आश्रय दे." याप्रमाणें स्तवन केलें असतां त्या देवीनें त्या पांडुपुत्रास दर्शन दिलें ( २६ ). राजाच्या समोर ( प्रत्यक्ष ) उभी असलेली देवी, त्याशीं बोलूं लागली. देवी म्हणाली:—"महाबाहो राजा, माझें बोलणें तूं ऐक ( २७ ). लवकरच जें युद्ध होणार आहे, त्यांत तुला जयप्राप्ति होईल. माझ्या कृपेनें तूं ( शत्रूंना ) जिंकून कौरवसेनेचा नाश करशील ( २८ ), व राज्य निष्कंटक करून, तूं पृथ्वीचा पुनः उपभोग घेशील. राजा, तूं बंधूंसह मोठ्या आनंदांत राहशील ( २९ ).

मत्प्रसादाच्च ते सौख्यमारोग्यं च भविष्यति ।
ये च संकीर्त्तयिष्यन्ति लोके विगतकल्मषाः ॥ ३० ॥
तेषां तुष्टा प्रदास्यामि राज्यमायुर्वपुः सुतम् ।
प्रवासे नगरे चापि संग्रामे शत्रुसंकटे ॥ ३१ ॥
अटव्यां दुर्गकान्तारे सागरे गहने गिरौ ।
ये स्मरिष्यन्ति मां राजन्यथाऽहं भवता स्मृता ॥ ३२ ॥
न तेषां दुर्लभं किंचिदस्मिँल्लोके भविष्यति ।
इदं स्तोत्रवरं भक्त्या शृणुयाद्वा पठेत वा ॥ ३३ ॥
तस्य सर्वाणि कार्याणि सिद्धिं यास्यन्ति पाण्डवाः ।
मत्प्रसादाच्च वः सर्वान्विराटनगरे स्थितान् ॥ ३४ ॥
न प्रज्ञास्यन्ति कुरवो नरा वा तन्निवासिनः ।
इत्युक्त्वा वरदा देवी युधिष्ठिरमरिंदमम् ॥
रक्षां कृत्वा च पाण्डूनां तत्रैवाऽन्तरधीयत ॥ ३५ ॥ [ २१२ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि दुर्गास्तवे षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

माझ्या कृपेनें तुला सौख्य व आरोग्य मिळेल. आणखी लोकांमध्यें जे कोणी पापरहित माझें स्मरण करितील (३०), त्यांच्यावर मी संतुष्ट होऊन त्यांस राज्य, आयुष्य, शरीरसामर्थ्य व पुत्रहि देईन. प्रवासांत, नगरांत, युद्धांत व शत्रूच्या संकटापासून देखील, (३१) अरण्यांत, दुर्गम मार्गांत, महासागरांत, घोरवनांत आणि गहन पर्वतावर, राजा, तुझ्याप्रमाणें जे माझें स्मरण करितील ( ३२ ), त्यांना इहलोकीं कोणतीहि गोष्ट दुर्लभ नाहीं. जो हें उत्तम स्तोत्र भक्तीनें श्रवण अथवा पठण करील ( ३३ ), त्याचीं सर्व कार्यें, पांडवांनो, सिद्धीस जातील. विराटाच्या नगरामध्यें तुम्ही सर्व राहत असतां माझ्या प्रसादानें तेथें राहणारे लोक किंवा कौरव तुम्हांस ओळखणार नाहींत." ह्याप्रमाणें शत्रूंचें दमन करणाऱ्या युधिष्ठिराशीं बोलून व पांडवांचें रक्षण करण्याचें त्याला आश्वासन देऊन ती वर देणारी देवी तेथेंच गुप्त झाली ( ३४–३५ ).

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांपैकीं सहावा अध्याय संपला.

## अध्याय ७

[ युधिष्ठिराचा ' कंक ' ब्राह्मणाच्या रूपानें विराटाच्या नगरींत प्रवेश. ]

**वैशंपायन उवाच—**

**ततो विराटं प्रथमं युधिष्ठिरो राजा सभायामुपविष्टमाव्रजत् ।**
**वैदूर्यरूपान्प्रतिमुच्य काञ्चनानक्षान्स कक्षे परिगृह्य वाससा ॥ १ ॥**
**नराधिपो राष्ट्रपतिं यशस्विनं महायशाः कौरववंशवर्द्धनः ।**
**महानुभावो नरराजसत्कृतो दुरासदस्तीक्ष्णविषो यथोरगः ॥ २ ॥**
**बलेन रूपेण नरर्षभो महानपूर्वरूपेण यथाऽमरस्तथा ।**
**महाभ्रजालैरिव संवृतो रविर्यथाऽनलो भस्मवृतश्च वीर्यवान् ॥ ३ ॥**
**तमापतन्तं प्रसमीक्ष्य पाण्डवं विराटराडिन्दुमिवाऽभ्रसंवृतम् ।**
**समागतं पूर्णशशिप्रभाननं महानुभावं न चिरेण दृष्टवान् ॥ ४ ॥**
**मन्त्रिद्विजान्सूतमुखान्विशस्तथा ये चापि केचित्परितः समासते ।**
**पप्रच्छ कोऽयं प्रथमं समेयिवान्नृपोपमोऽयं समवेक्षते सभाम् ॥ ५ ॥**

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर वस्त्रांत गुंडाळलेले वैदूर्यरत्नखचित सुवर्णाचे फासे काखेंत घेऊन प्रथम युधिष्ठिरराजा सभेंत बसलेल्या विराटापाशीं गेला (१). लोकांचें पालन करणारा, महान् यशाचा, कौरवांचा वंश वाढविणारा, महापराक्रमी, नृपतींनीं पूजिलेला, ज्याच्यापुढें जाण्यास लोकांना तीक्ष्ण विषयुक्त भुजंगापुढें जाण्याप्रमाणें भय वाटे, बलानें व रूपानें नरपुंगवाप्रमाणें भव्य, अपूर्व रूपामुळें देवासारखा, परंतु मोठमोठ्या ढगांनीं आच्छादिलेल्या सूर्यासारखा किंवा भस्माच्छादित अग्नीसारखा युधिष्ठिर राष्ट्रपति, यशस्वी विराटाकडे गेला ( २–३ ). तो महानुभाव पांडुपुत्र पाहतांच ढगांनीं झांकून गेलेला चंद्रच आपणाकडे येत आहे असें विराटराजास वाटलें; ( नंतर ) तो जवळ आल्यावर विराटानें त्याचें पूर्णचंद्रासारखें ( झळकणारें ) मुख तावडतोब पाहिलें ( आणि ) मंत्री, द्विज, ' पौराणिक, वैश्य व इतर लोक, जे त्याठिकाणीं बसले होते, त्यांस विचारिलें:—"या सभेंत प्रथम आलेला, एखाद्या राजाप्रमाणें दिसणारा, हा कोण आहे ? ( ४–५ )

न तु द्विजोऽयं भविता नरोत्तमः पतिः पृथिव्या इति मे मनोगतम् ।
न चाऽस्य दासो न रथो न कुञ्जरः समीपतो भ्राजति चाऽयमिन्द्रवत् ६
शरीरलिङ्गैरुपसूचितो ह्ययं मूर्धाभिषिक्त इति मे मनोगतम् ।
समीपमायाति च मे गतव्यथो यथा गजस्तामरसीं मदोत्कटः ॥ ७ ॥
वितर्कयन्तं तु नरर्षभस्तथा युधिष्ठिरोऽभ्येत्य विराटमब्रवीत् ।
सम्राड्विजानात्विह जीवनार्थिनं विनष्टसर्वस्वमुपागतं द्विजम् ॥ ८ ॥
इहाऽहमिच्छामि तवाऽनघाऽन्तिके वस्तुं यथा कामचरस्तथा विभो ।
तमब्रवीत्स्वागतमित्यनन्तरं राजा प्रहृष्टः प्रतिसंगृहाण[1] च ॥ ९ ॥
तं राजसिंहं प्रतिगृह्य राजा प्रीत्याऽऽत्मना चैवमिदं बभाषे ।
कामेन ताताऽभिवदाम्यहं त्वां कस्याऽसि राज्ञो विषयादिहाऽऽगतः १०
गोत्रं च नामापि च शंस तत्त्वतः किं चापि शिल्पं तव विद्यते कृतम् ११

हा ब्राह्मण नसून कोणीतरी नरश्रेष्ठ पृथ्वीपति असेल असें मला वाटतें. ( पण ) ह्याच्या समीप कोणीहि सेवक नाहीं, तसेंच रथ किंवा हत्तीहि नाहीं. तथापि हा इन्द्राप्रमाणें तेजस्वी दिसतो ( ६ ). ह्याच्या शरीरावर जीं चिन्हें दिसत आहेत त्यांवरून हा मूर्धाभिषिक्त राजाच असावा असें मला वाटतें, आणि जसा एखादा मदोन्मत्त गज ( निःशंकपणें ) कमलिनीकडे जातो, त्याचप्रमाणें ह्याची इकडे येण्याची गति आहे " (७). अशा रीतीनें विराट तर्कवितर्क करीत आहे तोंच युधिष्ठिर त्याच्याजवळ येऊन त्यास म्हणालाः—"राजाधिराज सर्वस्व नष्ट झाल्यामुळें उपजीविकेच्या साधनार्थ आपणापाशीं आलेला हा द्विज जाणावा(८). तुझ्या मर्जीनुरूप वागून येथें तुझ्या जवळ राहावें, अशी, विभो, माझी इच्छा आहे." नंतर विराट राजानें मोठ्या आनंदानें त्याचें स्वागत करून त्यास बसावयास सांगितलें ( ९ ). त्या राजसिंह युधिष्ठिराचा ( याप्रमाणें ) मोठ्या प्रेमानें आदरसत्कार केल्यावर विराटराजा म्हणालाः—" बाबा, मी तुला अंतःकरणपूर्वक विचारितों कीं, कोणत्या राजाच्या देशांतून तूं येथें आला आहेस ? ( १० ) तुझें गोत्र व नांव काय ? आणि कोणतें शिल्प तूं संपादन केलें आहेस ? खरें असेल तसें सांग " ( ११ ).

१ आसन हा शेष घेणें.

युधिष्ठिर उवाच—

युधिष्ठिरस्याऽऽसमहं पुरा सखा वैयाघ्रपद्यः पुनरस्मि विप्रः।
अक्षान्प्रयोक्तुं कुशलोऽस्मि देविनां कङ्केति नाम्नास्मि विराट विश्रुतः१२

विराट उवाच—

ददामि ते हन्त वरं यमिच्छसि प्रशाधि मत्स्यान्वशगो ह्यहं तव।
प्रियाश्च धूर्ता मम देविनः सदा भवांश्च देवोपम राज्यमर्हति॥ १३॥

युधिष्ठिर उवाच—

प्राप्तो विवादः प्रथमं[1] विशांपते न विद्यते कश्चन मत्स्य हीनतः।
न मे जितः कश्चन धारयेद्धनं वरो ममैषोऽस्तु तव प्रसादजः॥ १४॥

विराट उवाच—

हन्यामवश्यं यदि तेऽप्रियं चरेत्प्रव्राजयेयं विषयाद् द्विजांस्तथा।
शृण्वन्तु मे जानपदाः समागताः कङ्को यथाऽहं विषये प्रभुस्तथा १५

युधिष्ठिर म्हणाला:—"मी पूर्वी युधिष्ठिराचा सखा होतों. मी वैयाघ्रपद्य विप्र असून, फांसे खेळण्यांत मी प्रवीण आहें. खेळणारांमध्यें विराटा, 'कंक' या नांवानें मी प्रसिद्ध आहे" (१२).

विराट म्हणाला:—"तूं जो इच्छिशील तो वर माग; बाबा, मी देईन. मत्स्य-देशावर (पाहिजे असल्यास) राज्य कर, मी तुझ्या तंत्रानें चालेन. द्यूत खेळणारे धूर्त मला नेहमीं प्रिय वाटतात, आणि तूं तर देवासारखा दिसत असल्यामुळें राज्यालाहि योग्य आहेस" (१३).

युधिष्ठिर म्हणाला:—"द्यूत खेळणारांमध्यें (हीन) कमी पडलेला 'प्रथम (जिंकणारा) ठरविण्यास कोणाशींहि विवाद (तंटा) करणार नाहीं असें (कधीं) नाहीं. तेव्हां, मत्स्य राजा, (सत्यासत्याचा निवाडा करून) मला एवढीच देणगी दे कीं, ज्याला मी जिंकीन त्यानें माझें द्रव्य (जिंकलेलें) ठेऊं नये" (१४).

विराट म्हणाला:—"तुझ्या मर्जीविरुद्ध वागणारा जर कोणी (ब्राह्मणेतर) असेल तर त्याचा मी वध करीन, आणि ब्राह्मण असेल तर, त्यास हद्दपार करीन. येथें जमलेल्या सर्व लोकांनीं हें (माझें बोलणें) ऐकावें. ह्या राज्यांत जशी माझी सत्ता चालते, तशी कंकाचीहि चालेल" (१५).

[1] प्रथमशब्दः श्रेष्ठवाची (नी.) विवादः प्राप्तो विद्यते इति न.

समानयानो भविताऽसि मे सखा प्रभूतवस्त्रो बहुपानभोजनः ।
पश्येस्त्वमन्तश्च बहिश्च सर्वदा कृतं च ते द्वारमपावृतं मया ॥ १६ ॥
ये त्वाऽनुवादेऽयुरवृत्तिकर्शिता ब्रूयाश्च तेषां वचनेन मां सदा ।
दास्यामि सर्वं तदहं न संशयो न ते भयं विद्यति सन्निधौ मम ॥१७॥

वैशंपायन उवाच—
एवं स लब्ध्वा तु वरं समागमं विराटराजेन नरर्षभस्तदा ।
उवास धीरः परमार्चितः सुखी न चापि कश्चिच्चरितं बुबोध तत् ॥१८॥

इति श्रीमहाभारतेशतसा० वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि युधिष्ठिरप्रवेशो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥[ २३० ]

तूं माझा मित्र आहेस, मी ज्या वाहनांत बसेन त्यांतच तूं बसावेंस; अन्नवस्त्रादिकांची तुला विपुलता होईल. आंत (घरदार वगैरे) व बाहेर (सैन्य व आरामाचीं स्थानें) तूं पाहात जा—मी तुला द्वार मोकळें करून दिलें आहे ( १६ ). उपजीविकेच्या अभावानें वाईट स्थितीला पोंचलेले असे कोणी लोक तुजकडे आले असतां, तूं त्यांना माझेकडे पाठवीत जा, आणि मी त्यांना अमुक द्यावें असें तूं सांगितल्यानंतर मी तें सर्व निःसंशय त्यांना देईन. माझ्याजवळ असतांना तुला कोणतीहि भीति नाहीं " ( १७ ).

वैशम्पायन म्हणाला:—ह्याप्रमाणें विराटराजाशीं उत्तम प्रकारें सख्य जडून तो धैर्यशाली नरश्रेष्ठ मोठ्या आदर-सत्कारांत त्याच्या येथें आनंदानें राहिला; आणि त्याचे आचरणावरून ( हा धर्मराज असावा ) असें कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं ( १८ ).

याप्रमाणें महाभारतांतील विराटपर्वांच्या पांडव प्रवेशपर्वापैकीं हा सातवा अध्याय समाप्त झाला.

# अध्याय ८

[ भीमाचा आचाऱ्याच्या वेषानें विराटाच्या राज्यांत प्रवेश. ]

वैशम्पायन उवाच--

अथाऽपरो भीमबलः श्रिया ज्वलन्नुपाययौ सिंहविलासविक्रमः ।
खजां च दर्वी च करेण धारयन्नसिं च कालाङ्गमकोशमव्रणम् ॥ १ ॥
स सूदरूपः परमेण वर्चसा रविर्यथा लोकमिमं प्रकाशयन् ।
स कृष्णवासा गिरिराजसारवांस्तं मत्स्यराजं समुपेत्य तस्थिवान् ॥२॥
तं प्रेक्ष्य राजा रमयन्नुपागतं ततोऽब्रवीज्जानपदान्समागतान् ।
सिंहोन्नतांसोऽयमतीव रूपवान्प्रदृश्यते को नु नरर्षभो युवा ॥ ३ ॥
अदृष्टपूर्वः पुरुषो रविर्यथा वितर्कयन्नाऽस्य लभामि निश्चयम् ।
तथाऽस्य चित्तं ह्यपि संवितर्कयन्नरर्षभस्याऽस्य न यामि तत्त्वतः ॥४॥
दृष्ट्वैव चैनं तु विचारयाम्यहं गंधर्वराजो यदि वा पुरंदरः ।
जानीत कोऽयं मम दर्शने स्थितो यदीप्सितं तल्लभतां च मा चिरम् ॥५॥

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर दुसरा महाबलवान्, तेजानें जळणारा, सिंहाच्या गतीप्रमाणें पाऊलें टाकणारा, हातांत कालथा, पळी व काळ्या पातेचा तीक्ष्ण नग्न व डाग नसलेला खड्ग घेतलेला ( भीम ) आला (१). तो आपल्या तेजानें सूर्याप्रमाणें जगाला प्रकाशित करणारा, आचाऱ्याचें रूप घेतलेला, काळें वस्त्र नेसलेला, पर्वतराज हिमालयाप्रमाणें बलवान् भीमसेन मत्स्यराज विराटाकडे येऊन उभा राहिला ( २ ). तो येत असतां त्याच्याकडे पाहून आनंदित झालेला तो राजा नंतर आपल्याजवळ असलेल्या गांवकऱ्यांस म्हणाला:—"हा अतिशय रूपवान् तरुण मनुष्य असून ह्याचे खांदे सिंहाप्रमाणें उन्नत दिसत आहेत; हा कोण असावा? ( ३ ) सूर्याप्रमाणें तेजस्वी पुरुष ह्याच्यासारखा पूर्वी मी कधींच पाहिला नाहीं. मी ( नानाप्रकारें ) तर्क करीत आहें, परंतु निश्चित कल्पना होत नाहीं. त्याचप्रमाणें ह्या नरश्रेष्ठाचा ( इकडे येण्याचा ) हेतु काय असावा याविषयींहि कांहीं निश्चित अनुमान होत नाहीं ( ४ ). त्यास पाहून मी विचारांत पडलों कीं, हा गंधर्वराज किंवा इंद्र असावा. हा माझें दर्शन घेण्याच्या इच्छेनें उभा राहिला आहे, चौकशी करा, कोण आहे? कांहीं मागत असेल तर तें त्यास त्वरित द्या" ( ५ ).

विराटवाक्येन च तेन चोदिता नरा विराटस्य सुशीघ्रगामिनः ।
उपेत्य कौन्तेयमथाऽब्रुवंस्तदा यथा स राजाऽवदताऽच्युतानुजम् ॥६॥
ततो विराटं समुपेत्य पाण्डवस्त्वदीनरूपं वचनं महामनाः ।
उवाच सूदोऽस्मि नरेन्द्र बल्लवो भजस्व मां व्यञ्जनकारमुत्तमम् ॥७॥

**विराट उवाच—**

न सूदतां बल्लव श्रद्दधामि ते सहस्रनेत्रप्रतिमो विराजसे ।
श्रिया च रूपेण च विक्रमेण च प्रभाससे त्वं नृवरो नरेष्विव ॥ ८ ॥

**भीम उवाच—**

नरेन्द्र सूदः परिचारकोऽस्मि ते जानामि सूपान्प्रथमं च केवलान् ।
आस्वादिता ये नृपते पुराऽभवन्युधिष्ठिरेणाऽपि नृपेण सर्वशः ॥ ९ ॥
बलेन तुल्यश्च न विद्यते मया नियुद्धशीलश्च सदैव पार्थिव ।
गजैश्च सिंहैश्च समेयिवानहं सदा करिष्यामि तवाऽनघ प्रियम् ॥१०॥

ह्याप्रमाणें विराटाची आज्ञा होतांच, कांहीं चपल लोक झट्दिशीं त्या धर्मानुज कुंतीपुत्राजवळ जाऊन त्यास त्यांनीं राजाचें म्हणणें कळविलें ( ६ ). नंतर तो उदार मनाचा पांडुनंदन भीम विराट राजासमोर येऊन मोठ्या धीटपणानें म्हणाला:—"राजा, मी बल्लव नामक आचारी आहें. शाकपाक वगैरे पदार्थ उत्तम तयार करणाऱ्या मला आपल्याजवळ ठेवावें" ( ७ ).

**विराट** म्हणाला:—"बल्लवा, तूं आचारी आहेस, हें मला खरें वाटत नाहीं. तूं इंद्राप्रमाणें भासत आहेस. तुझें तेज, रूप व पराक्रम ह्यांवरून तूं कोणी लोकांचा राजा असावास असा भास होतो "( ८ ).

**भीम** म्हणाला:—"नरेंद्रा, खरोखर मी आचाऱ्याचाच धंदा करणारा सेवक आहें. शाकपाकादिक पदार्थ कसे करावेत हें मी उत्तम जाणतों. राजा, ते सर्व प्रकारचे पदार्थ पूर्वीं युधिष्ठिरराजानेंहि मोठ्या आवडीनें खाल्ले आहेत ( ९ ). बळांत माझी बरोबरी करणारा कोणीहि नाहीं. पार्थिवा, मी नेहमीं मल्लयुद्ध करणारा आहें. मी हत्तींशीं व सिंहांशींहि सामने केले आहेत. निष्पापा, मी सदोदित तुला प्रिय असेल तें करीन "( १० ).

**विराट उवाच—**

**ददामि ते हन्त वरान्महानसे तथा च कुर्याः कुशलं प्रभाषसे ।**
**न चैव मन्ये तव कर्म यत्समं समुद्रनेमिं पृथिवीं त्वमर्हसि ॥ ११ ॥**
**यथा हि कामो भवतस्तथा कृतं महानसे त्वं भव मे पुरस्कृतः ।**
**नराश्च ये तत्र समाहिताः पुरा भवांश्च तेषामधिपो मया कृतः ॥१२॥**

**वैशम्पायन उवाच—**

**तथा स भीमो विहितो महानसे विराटराज्ञो दयितोऽभवद्दृढम् ।**
**उवास राज्ये न च तं पृथग्जनो बुबोध तत्रानुचराश्च केचन ॥१३॥**

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि भीमप्रवेशोऽष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥**

**विराट** म्हणाला:—"माझ्या मुदपाकासंबंधीं सर्व अधिकार तुला दिले आहेत; मात्र तूं बोलत आहेस तसाच चांगला वाग. तुझ्यायोग्य जें काम आहे तें हें नव्हे असें वाटतें. समुद्रवलयांकित पृथ्वी मिळविण्यास तूं योग्य आहेस ( ११ ). तुझ्या इच्छेप्रमाणेंच मी करीत आहें; ( तर ) तूं मुदपाकामध्यें माझ्याकडून पुरस्कृत हो—तिकडे पूर्वीं नेमिलेले जे लोक आहेत त्यांच्यावर तुझी नेमणूक मीं केली आहे" ( १२ ).

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें तो भीम मुदपाकावर नेमिला गेला, व विराटराजाला अत्यंत प्रिय होऊन राहिला. त्या राज्यांत राहून तो त्याच्या बरोबरच्या लोकांच्या किंवा इतरहि जनांच्या ओळखण्यांत आला नाहीं ( १३ ).

**याप्रमाणें महाभारतांतील विराटपर्वाच्या पांडव-प्रवेशपर्वांतील ८ वा अध्याय समाप्त.**

---

## अध्याय ९

[ द्रौपदीचा व विराटपत्नीचा संवाद; द्रौपदी सैरंध्रीच्या ( दासीच्या ) रूपानें सुदेष्णा राणीकडे रहाते. ]

---

**वैशम्पायन उवाच— ततः केशान्समुत्क्षिप्य वेल्लिताग्राननिन्दितान् ।**
**कृष्णान्सूक्ष्मान्मृदून्दीर्घान्समुद्ग्रथ्य शुचिस्मिता ॥ १ ॥**

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर आपले कृष्णवर्ण, बारीक, मृदु, लांबसडक व कुरळे आणि निर्मळ केंस सावरून, त्यांची वेणी घालून सुहास्यवदना

पांडव प्रवेशपर्व



सैरंध्रीच्या वेषांत द्रौपदीचा प्रवेश

अध्याय ९.

जुगूहे दक्षिणे पार्श्वे मृदूनसितलोचना ।
वासश्च परिधायैकं कृष्णा सुमलिनं महत् ॥ २ ॥
कृत्वा वेषं च सैरन्ध्र्यास्ततोऽप्यचरदार्त्तवत् ।
तां नराः परिधावन्तीं स्त्रियश्च समुपाद्रवन् ॥ ३ ॥
अपृच्छंश्चैव तां दृष्ट्वा का त्वं किं च चिकीर्षसि ।
सा तानुवाच राजेन्द्र सैरन्ध्र्यहमिहाऽऽगता ॥ ४ ॥
कर्म चेच्छामि वै कर्त्तुं तस्य यो मां युयुक्षति[1] ।
तस्या रूपेण वेषेण श्लक्ष्णया च तथा गिरा ॥ ।
न श्रद्धत तां दासीमन्नहेतोरुपस्थिताम् ॥ ५ ॥
विराटस्य तु कैकेयी भार्या परमसंमता ।
आलोकयन्ती ददृशे प्रासादाद् द्रुपदात्मजाम् ॥ ६ ॥
सा समीक्ष्य तथारूपामनाथामेकवाससम् ।
समाहूयाऽब्रवीद्भद्रे का त्वं किं च चिकीर्षसि ॥ ७ ॥

कृष्णनयना कृष्णेनें ती वेणी ( आपल्या डोक्याच्या ) उजव्या बाजूस झांकिली, आणि मोठें ( लांब ) अतिशय मळकट एकच वस्त्र नेसून ( १–२ ) व सैरंध्रीचा वेष घेऊन एखाद्या वेड्या स्त्रीप्रमाणें ती ( त्या नगरांत ) इकडेतिकडे भटकूं लागली. ती भटकत असतां पुरुष व स्त्रियाहि तिच्यामागें लागत ( ३ ), आणि तिला पाहून विचारीत कीं, ' तूं कोण आहेस ? व काय करण्याची तुझी इच्छा आहे ? ' महाराज ! ती त्यांना म्हणे, ' मी सैरंध्री असून येथें आलें आहें ( ४ ). जो माझी योजना[1] करील त्याचें काम करण्याची माझी इच्छा आहे.' ( तथापि ) तिचें रूप, वेष आणि गोड वाणी, यांवरून ही अन्नाकरितां आलेली दासी असावी, असें कोणास वाटेना (५). केकयराजाची कन्या विराटाची अत्यंत प्रिय राणी, राजवाड्यांतून ( सज्जावरून रस्त्यांत चाललेला हा प्रकार ) पाहत असतां, द्रुपदाची कन्या द्रौपदी तिच्या दृष्टीस पडली ( ६ ). फक्त एकच वस्त्र नेसलेल्या त्या सुस्वरूपिणी अनाथ स्त्रीस पाहून, तिला हांक मारून तिनें तीस म्हटलें, " कल्याणि, तूं कोण आहेस ? आणि तुझी काय करण्याची इच्छा आहे ? " ( ७ )

1 पाठांतरः—पुपूषति ( नी. ) पोषण करील.

सा तामुवाच राजेन्द्र सैरन्ध्र्यहमुपागता।
कर्म चेच्छाम्यहं कर्तुं तस्य यो मां युयुक्षति ॥ ८ ॥
सुदेष्णोवाच— नैवंरूपा भवन्त्येव यथा वदसि भामिनि।
प्रेषयन्तीव वै दासीर्दासांश्च विविधान्बहून् ॥ ९ ॥
नोच्चगुल्फा संहतोरुस्त्रिगम्भीरा षडुन्नता।
रक्ता पञ्चसु रक्तेषु हंसगद्गदभाषिणी ॥ १० ॥
सुकेशी सुस्तनी श्यामा पीनश्रोणिपयोधरा।
तेन तेनैव संपन्ना काश्मीरीव तुरंगमी ॥ ११ ॥
अरालपक्ष्मनयना बिम्बोष्ठी तनुमध्यमा।
कम्बुग्रीवा गूढशिरा पूर्णचन्द्रनिभानना ॥ १२ ॥
शारदोत्पलपत्राक्ष्या शारदोत्पलगन्धया।
शारदोत्पलसेविन्या रूपेण सदृशी श्रिया ॥ १३ ॥

राजेंद्रा (जनमेजया), ती तिला म्हणाली:—"मी सैरंध्री असून (येथें) आलें आहें. जो मला आपल्या पदरीं ठेवील त्याची सेवा करण्याची माझी इच्छा आहे" (८).

**सुदेष्णा** म्हणाली:— "सुंदरी, तूं म्हणतेस त्याप्रमाणें दासी ह्या अशा रूपवती नसतात. तूं खरोखर पुष्कळ दास व दासींची स्वामिनी असावीस असें मला वाटतें ( ९ ). तुझे घोटे उठलेले नाहींत; तुझ्या मांड्या एकमेकींस चिकटलेल्या आहेत; तीन ठिकाणीं गंभीर, (नाक, डोळे, कान, नखें, स्तन व घाटी या ) सहास्थळीं उन्नत, पांच ठिकाणीं लाल, हंसाप्रमाणें गद्गद भाषण (१०), उत्तम केंस, सुंदर स्तन, वर्ण श्याम, जघनप्रदेश व स्तन पुष्ट, अशी काश्मीर देशांतील तुरंगमीप्रमाणें तूं त्या त्या ( उत्तम लक्षणांनीं ) संपन्न आहेस (११). तुझ्या डोळ्यांवरील पापण्या ( व भिवया ) कमानदार आणि काळ्याभोर असून ओंठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें व कंबर बारीक असून, कंठ शंखाप्रमाणें आहे. तुझ्या शरीरावरील शिरा दिसत नसून, तुझें मुख पूर्णचंद्राप्रमाणें आहे (१२). नेत्र शरत्कमलपत्राप्रमाणें असलेल्या, शरदृतूंतील कमलाप्रमाणें सुगंध असलेल्या कमलिनीवासिनी लक्ष्मीसारखी तूं रूपानें आहेस ( १३ ).

का त्वं ब्रूहि यथा भद्रे नासि दासी कथंचन ।
यक्षी वा यदि वा देवी गन्धर्वी यदि वाऽप्सराः ॥ १४ ॥
देवकन्या भुजंगी वा नगरस्याऽथ देवता ।
विद्याधरी किन्नरी वा यदि वा रोहिणी स्वयम् ॥ १५ ॥
अलम्बुषा मिश्रकेशी पुण्डरीकाऽथ मालिनी ।
इन्द्राणी वारुणी वा त्वं त्वष्टुर्धातुः प्रजापतेः ॥
देव्यो देवेषु विख्यातास्तासां त्वं कतमा शुभे ॥ १६ ॥
द्रौपद्युवाच— नाऽस्मि देवी न गंधर्वी नाऽसुरी न च राक्षसी ।
सैरन्ध्री तु भुजिष्याऽस्मि सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥ १७ ॥
केशाञ्जानाम्यहं कर्तुं पिंषे साधु विलेपनम् ।
मल्लिकोत्पलपद्मानां चम्पकानां तथा शुभे ॥ १८ ॥
ग्रथयिष्ये विचित्राश्च स्रजः परमशोभनाः ।
आराधयं सत्यभामां कृष्णस्य महिषीं प्रियाम् ॥ १९ ॥
कृष्णां च भार्यां पाण्डूनां कुरूणामेकसुन्दरीम् ।
तत्र तत्र चराम्येवं लभमाना सुभोजनम् ॥ २० ॥

(खरोखर,) तूं कोण आहेस ? तें सांग. कारण, कल्याणि, तूं कोणत्याहि प्रकारें दासी तर नाहींसच; मग यक्षिणी, देवता, गंधर्वी, किंवा अप्सरा ( १४ ), देवकन्या, नागकन्या, नगरदेवता, विद्याधरी, किन्नरी, किंवा प्रत्यक्ष ( चंद्राची ) रोहिणी (१५), अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका, मालिनी, इंद्राणी, वरुणपत्नी किंवा त्वष्टयाची अथवा प्रजापति विधात्याची भार्या, किंवा देवांमध्यें प्रख्यात ज्या देवी, यांपैकीं तूं कोण आहेस ?" ( १६ ).

द्रौपदी म्हणाली:—मी देवता, गंधर्वी, असुरी आणि राक्षसी, ह्यांपैकीं कोणीहि नाहीं. मी सैरंध्री दासी आहें, हें तुला खरोखर सांगतें (१७). केस विंचरून मला वेणी उत्तम घालतां येते. उटणें चांगलें वाटतां येतें; मालती, उत्पलें ( नील कमळें दिवसा फुलणारीं ) आणि चंपक ( १८ ) यांचे तऱ्हेतऱ्हेचे हार मला गुंफितां येतात. कृष्णाची प्रियराणी सत्यभामा हिची आराधना मीं केली आहे ( १९ ). त्यांचप्रमाणें कुरुकुलांत उत्पन्न झालेल्या पांडवांची भार्या जी अद्वितीय सुंदरी कृष्णा, हिच्यापाशींहि मी होत्यें. याप्रमाणें मी ठिकठिकाणीं सुग्रास भोजन मिळवीत फिरत असत्यें (२०).

वासांसि यावन्ति लभे तावत्तावद्रमे तथा ।
मालिनीत्येव मे नाम स्वयं देवी चकार सा ।
साऽहमद्याऽऽगता देवि सुदेष्णे त्वन्निवेशनम् ॥ २१ ॥

सुदेष्णोवाच--- मूर्ध्नि त्वां वासयेयं वै संशयो मे न विद्यते ।
न चेदिच्छति राजा त्वां गच्छेत्सर्वेण चेतसा ॥ २२ ॥
स्त्रियो राजकुले याश्च याश्चेमा मम वेश्मनि ।
प्रसक्तास्त्वां निरीक्षन्ते पुमांसं कं न मोहयेः ॥ २३ ॥
वृक्षांश्चाऽवस्थितान्पश्य य इमे मम वेश्मनि ।
तेऽपि त्वां सन्नमन्तीव पुमांसं कं न मोहयेः ॥ २४ ॥
राजा विराटः सुश्रोणि दृष्ट्वा वपुरमानुषम् ।
विहाय मां वरारोहे गच्छेत्सर्वेण चेतसा ॥ २५ ॥
यं हि त्वमनवद्याङ्गि तरलायतलोचने ।
प्रसक्तमभिवीक्षेथाः स कामवशगो भवेत् ॥ २६ ॥

"जितकीं वस्त्रें मिळतील तितकीं घेऊन मी आनंदांत रहात असत्यें. राजपत्नी द्रौपदी हिनें स्वत: 'मालिनी' असें माझें नांव ठेविलें. देवि सुदेष्णे, ती मी आज तुझ्या घरीं आल्यें आहें "( २१ ).

सुदेष्णा म्हणाली:—"तुला मी डोक्यावर ठेवीन, यांत कांहीं संशय नाहीं; पण जर राजा तुला इच्छिणार नाहीं तर; (कारण) त्याचें सर्व लक्ष तुझ्यावरच बसेल (अशी शंका वाटते) (२२). राजकुलांतील स्त्रिया व माझ्या घरांतील इतर स्त्रिया, ह्या (सुद्धां) आसक्त होऊन तुझ्याकडे टक लावून पाहात आहेत, मग कोणत्या पुरुषास तूं मोहविणार नाहींस? (२३) हे पहा, माझ्या घरीं जे हे वृक्ष आहेत, ते देखील तुला पाहून नम्र होत आहेत! तर तुला पाहून कोणता पुरुष भुलणार नाहीं? ( २४ ) सुश्रोणि, वरारोहे, हें तुझें अमानुष रूप पाहून विराटराजा मला सोडून तुझ्यावरच अनुरक्त होईल ( २५). सुंदरांगि, तरल विशालनयने, ज्याच्याकडे तूं आसक्तियुक्त नजरेनें पाहशील तो कामवश होईल ( २६ ).

यश्च त्वां सततं पश्येत्पुरुषश्चारुहासिनि ।
एवं सर्वानवद्याङ्गि स चाऽनङ्गवशो भवेत् ॥ २७ ॥
अध्यारोहेद्यथा वृक्षान्वधायैवाऽऽत्मनो नरः ।
राजवेश्मनि ते सुभ्रु गृहे तु स्यात्तथा मम ॥ २८ ॥
यथा च कर्कटी गर्भमाधत्ते मृत्युमात्मनः ।
तथाविधमहं मन्ये वासं तव शुचिस्मिते ॥ २९ ॥

द्रौपद्युवाच—नाऽस्मि लभ्या विराटेन न चाऽन्येन कदाचन ।
गन्धर्वाः पतयो मह्यं युवानः पञ्च भामिनि ॥ ३० ॥
पुत्रा गन्धर्वराजस्य महासत्त्वस्य कस्यचित् ।
रक्षन्ति ते च मां नित्यं दुःखाचारा तथा ह्यहम् ॥ ३१ ॥
यो मे न दद्यादुच्छिष्टं न च पादौ प्रधावयेत् ।
प्रीणेरंस्तेन वासेन गन्धर्वाः पतयो मम ॥ ३२ ॥
यो हि मां पुरुषो गृद्ध्येद्यथाऽन्याः प्राकृताः स्त्रियः ।
तामेव निवसेद्रात्रिं प्रविश्य च परां तनुम् ॥ ३३ ॥

सुहास्यवदने, अशी सुंदरसर्वांगे, ज्याच्या तूं सदोदित दृष्टीस पडशील तो पुरुष काममोहित होईलच होईल (२७). सुंदरि, स्वतःच्या नाशाकरितांच झाडावर चढणाऱ्या पुरुषाप्रमाणें, मी तुला राजगृहीं ठेऊन घेतलें आहे, असें होईल ( २८ ). अथवा ज्याप्रमाणें खेकडीचें गर्भधारण तिच्या मृत्यूचें कारण होतें, त्याप्रमाणें, सुहास्यवदने, तुझें येथें राहणें ( माझें मरणच ) आहे, असें मी समजतें " ( २९ ).

द्रौपदी म्हणाली:—" मी विराटराजाला किंवा इतर कोणालाहि प्राप्त होणें कधींहि शक्य नाहीं; ( कारण ) सुंदरस्त्रिये, माझे पांच तरुण गंधर्व पति आहेत ( ३० ). ते एका मोठ्या पराक्रमी गंधर्वराजाचे पुत्र असून, ते माझें नेहमीं रक्षण करितात; त्यामुळें मला दुःखानें पुढीलप्रमाणें व्रतस्थ रहावें लागतें; ( ३१ ). जो कोणी मला उच्छिष्ट अन्न देणार नाहीं व पाय धुण्यास सांगणार नाहीं, अशाच्या घरीं राहणें माझ्या गंधर्वपतींना पसंत आहे (३२). इतर प्राकृत स्त्रियांप्रमाणें जो कोणी माझा अभिलाष करील तो त्याचरात्रीं परकायाप्रवेश करील ( मरेल ) ( ३३ ).

न चाऽप्यहं चालयितुं शक्या केनचिदङ्गने ।
दुःखशीला हि गन्धर्वास्ते च मे बलवत्प्रियाः ॥ ३४ ॥
प्रच्छन्नाश्चाऽपि रक्षन्ति ते मां नित्यं शुचिस्मिते ॥
सुदेष्णोवाच—एवं त्वां वासयिष्यामि यथा त्वं नन्दिनीच्छसि॥३५॥
न च पादौ न चोच्छिष्टं स्प्रक्ष्यसि त्वं कथंचन ।
वैशम्पायन उवाच– एवं कृष्णा विराटस्य भार्यया परिसान्त्विता ॥३६॥
उवास नगरे तस्मिन्पतिधर्मवती सती ।
न चैनां वेद तत्राऽन्यस्तत्त्वेन जनमेजय ॥ ३७ ॥ [ २८० ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि द्रौपदीप्रवेशे नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

राणी, कोणाहि मनुष्यास माझें मन वळविणें शक्य नाहीं. ते बलवान् गंधर्वपति सुद्धां दुःखच सहन करीत, आहेत व ते मला फार प्रिय आहेत ( ३४ ). शुचिस्मिते, ते गुप्त राहूनच नेहमीं माझें रक्षण करितात."

**सुदेष्णा** म्हणाली:—"असें असेल तर, सुखदे, तुझ्या इच्छेप्रमाणें मी तुला ठेवून घेत्यें ( ३५ ). कोणाच्या पायाला किंवा उष्ट्याला कधीं स्पर्शसुद्धां करण्याचा प्रसंग तुला येणार नाहीं "( ३६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें विराटाच्या पत्नीनें द्रौपदीस समजावलें, आणि ती त्या नगरांत राहिली. ती सती पतीसंबंधीं धर्म पाळून होती. जनमेजया, त्याठिकाणीं कोणासहि तिचें खरें स्वरूप ओळखूं आलें नाहीं ( ३७ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराट पर्वांतील पांडवप्रवेशउपपर्वाचा हा ९ वा अध्याय समाप्त झाला.

---

# अध्याय १०

सहदेव गुराख्याच्या रूपानें विराटराजाकडे राहतो. ]

वैशम्पायन उवाच—सहदेवोऽपि गोपानां कृत्वा वेषमनुत्तमम् ।
भाषां चैषां समास्थाय विराटमुपयादथ ॥ १ ॥
गोष्ठमासाद्य तिष्ठन्तं भवनस्य समीपतः ।
राजाऽथ दृष्ट्वा पुरुषान्प्राहिणोज्जातविस्मयः ॥ २ ॥
तमायान्तमभिप्रेक्ष्य भ्राजमानं नरर्षभम् ।
समुपस्थाय वै राजा पप्रच्छ कुरुनन्दनम् ॥ ३ ॥
कस्य वा त्वं कुतो वा त्वं किं वा त्वं तु चिकीर्षसि ।
न हि मे दृष्टपूर्वस्त्वं तत्त्वं ब्रूहि नरर्षभ ॥ ४ ॥
संप्राप्य राजानममित्रतापनं ततोऽब्रवीन्मेघमहौघनिःस्वनः ।
वैश्योऽस्मि नाम्नाऽहमरिष्टनेमिर्गोसंख्य[1] आसं कुरुपुंगवानाम् ॥५॥

**वैशंपायन** म्हणाला:— सहदेवहि गोपाचा उत्तम वेष करून बोलीसुद्धां अगदीं गुराख्याप्रमाणें बोलत, विराटाकडे आला ( १ ). तो राजवाड्यासमीपच असणाऱ्या गोठ्याजवळ उभा राहिला. त्याला पाहून विस्मित झालेल्या राजानें ( कांहीं ) लोकांस त्याजकडे ( बोलविण्यास ) पाठविलें ( २ ). तो नरश्रेष्ठ कुरुनंदन आपल्या तेजानें झळकत त्याच्याजवळ आलेला पाहून राजानें त्यास विचारिलें–(३). " तूं कोणाचा ? कोठून आलास ? आणि तुझी इच्छा काय ? मी तुला कधींहि पाहिलें नाहीं; तेव्हां नरश्रेष्ठा, खरें काय असेल तें सांग (४)." राजाजवळ पोंचल्यावर सहदेव, मेघांच्या शब्दाप्रमाणें गंभीर आवाजानें शत्रूंस ताप देणाऱ्या राजास म्हणाला:–"मी वैश्य असून माझें नांव अरिष्टनेमि असें आहे. कुरुकुलोत्पन्न पांडवांच्या गाईंचा मी परीक्षक होतों " ( ५ ).

---

१ गोसंख्यः पंचमः (नी.) गो म्हणजे इंद्रियें ( हीं पांच असतात ) हा अर्थ पंडिताईचा आहे. गाईंची मोजदाद करणारा हा खरा अर्थ आहे.

वस्तुं त्वयीच्छामि विशां वरिष्ठ तान्राजसिंहान्न हि वेद्मि पार्थान् ।
न शक्यते जीवितुमप्यकर्मणा न च त्वदन्यो मम रोचते नृपः ॥६॥

विराट उवाच—

त्वं ब्राह्मणो यदि वा क्षत्रियोऽसि समुद्रनेमीश्वररूपवानसि ।
आचक्ष्व मे तत्त्वममित्रकर्शन न वैश्यकर्म त्वयि विद्यते क्षमम् ॥ ७ ॥
कस्यासि राज्ञो विषयादिहाऽऽगतः किं वापि शिल्पं तव विद्यते कृतम्।
कथं त्वमस्मासु निवत्स्यसे सदा वदस्व किं चापि तवेह वेतनम् ॥८॥

सहदेव उवाच— पञ्चानां पाण्डुपुत्राणां ज्येष्ठो भ्राता युधिष्ठिरः ।
तस्याऽष्टशतसाहस्रा गवां वर्गाः शतं शतम् ॥ ९ ॥
अपरे शतसाहस्रा द्विस्तावन्तस्तथाऽपरे ।
तेषां गोसंख्य आसं वै तन्तिपालेति मां विदुः ॥ १० ॥
भूतं भव्यं भविष्यं च यच्च संख्यागतं गवाम् ।
न मेऽस्त्यविदितं किंचित्समन्ताद्दशयोजनम् ॥ ११ ॥

हल्लीं ते राजसिंह पार्थ कोठें आहेत हें मला माहीत नसल्यामुळें मी तुजपाशीं राजश्रेष्ठा, राहण्यास आलों आहें. ज्या कामाचें मला ज्ञान नाहीं अशा इतर कामानें माझा निर्वाह व्हावयाचा नाहीं; आणि तुझ्याशिवाय दुसरा राजा मला पसंत नाहीं" ( ६ ).

**विराट** म्हणालाः—"तूं ब्राह्मण, किंवा क्षत्रिय आहेस; तूं समुद्रवलयांकित पृथ्वीच्या राजासारखा रूपानें दिसतोस. ( तेव्हां ) शत्रुनाशका, खरें काय तें सांग. तूं वैश्याचें काम करणारा आहेस असें मला वाटत नाहीं ( ७ ). कोणत्या राजाच्या मुलखांतून तूं येथें आलास ? तुला कोणती कला अवगत आहे ? आमच्याजवळ तूं काय काम करून राहणार ? आणि येथें तूं वेतन काय घेणार ? तें सांग" ( ८ ).

**सहदेव** म्हणालाः—"पांडूच्या पांच पुत्रांपैकीं वडील बंधु युधिष्ठिर याच्याजवळ शंभरशंभरांचा एक असे आठलक्ष ( ९ ), दोनदोनशांचा एक असे एकलक्ष, आणि इतरहि आणखी पुष्कळ गाईंचे कळप होते, त्यांची मी मोजदाद करणारा होतों; मला तंतिपाळ असें म्हणत (१०). सभोंवतीं दहा योजनेंपर्यंत ( गाईंच्यासंबंधानें ) भूत, वर्तमान व भविष्य याचें आणि संख्येसंबंधीं ज्ञान मला आहे ( ११ ).

गुणाः सुविदिता ह्यासन्मम तस्य महात्मनः ।
आसीच्च स मया दृष्टः कुरुराजो युधिष्ठिरः ॥ १२ ॥
क्षिप्रं च गावो बहुला भवन्ति न तासु रोगो भवतीह कश्चन ।
तैस्तैरुपायैर्विदितं ममैतदेतानि शिल्पानि मयि स्थितानि ॥ १३ ॥
वृषभांश्चापि जानामि राजन्पूजितलक्षणान् ।
येषां मूत्रमुपाघ्राय अपि वन्ध्या प्रसूयते ॥ १४ ॥

विराट उवाच—
शतं सहस्राणि समाहितानि सवर्णवर्णस्य विमिश्रितान् गुणैः ।
पशून्सपालान्भवते ददाम्यहं त्वदाश्रया मे पशवो भवन्त्विह ॥ १५ ॥

वैशम्पायन उवाच—
तथा स राज्ञो विदितो विशांपतेरुवास तत्रैव सुखं नरोत्तमः ।
न चैनमन्येऽपि विदुः कथंचन प्रादाच्च तस्मै भरणं यथेप्सितम्॥१६॥

इति श्रीमहाभारते० शतसा० संहितायां वैयासिक्या विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि सहदेवप्रवेशो दशमोऽध्यायः ॥ १० ॥

ह्या माझ्या गुणांची खात्री त्या महात्म्याला होती. तो कुरुराज युधिष्ठिर मी पाहिला होता (१२). गाईंची वृद्धि जलद होईल, व त्यांना कोणताहि रोग उत्पन्न होणार नाहीं, याचे सर्व उपाय मी जाणतों. ह्या कला माझ्यापाशीं आहेत ( १३ ). ज्यांचें मूत्र हुंगल्यानें वंध्या गाईलाहि गर्भ राहून ती प्रसूत होते, अशा बैलांचीं उत्तम लक्षणें मला माहित आहेत" (१४).

**विराट** म्हणाला:—"माझ्यापाशीं जे गाईंचे एक लक्ष कळप आहेत, व त्यांत कांहीं एकएका रंगाचे व कांहीं मिश्रवर्णाचे आहेत, ते सर्व पशु आणि त्यांचे गोपाळ ह्या सर्वांस मी तुझ्या स्वाधीन करितों; येथें तुझ्या आश्रयाखालीं माझे पशु राहोत" ( १५ ).

**वैशंपायन** म्हणाला:—ह्याप्रमाणें राजानें त्यास सांगितल्यावर तो नरश्रेष्ठ तेथेंच आनंदानें राहिला. त्याला विराटानें किंवा दुसऱ्या कोणींहि ओळखिलें नाहीं. राजानें त्यास वेतनहि मागितल्याप्रमाणें दिलें (१६).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील प्रवेशोपपर्वाचा १० वा अध्याय संपला.

---

# अध्याय ११

[ अर्जुन षंढाच्या रूपानें विराटकन्या उत्तरेस नृत्यगायन शिकविण्यास राहतो. ]

**वैशम्पायन उवाच—**

**अथापरोऽदृश्यत रूपसंपदा स्त्रीणामलंकारधरो बृहत्पुमान् ।**
**प्राकारवप्रे प्रतिमुच्य कुण्डले दीर्घे च कम्बू परिहाटके शुभे ॥ १ ॥**
**बाहू च दीर्घान्प्रविकीर्य मूर्धजान्महाभुजो वारणतुल्यविक्रमः ।**
**गतेन भूमिं प्रतिकम्पयंस्तदा विराटमासाद्य सभासमीपतः ॥ २ ॥**
**तं प्रेक्ष्य राजोपगतं सभातले व्याजात्प्रतिच्छन्नमरिप्रमाथिनम् ।**
**विराजमानं परमेण वर्चसा सुतं महेन्द्रस्य गजेन्द्रविक्रमम् ॥ ३ ॥**
**सर्वानपृच्छच्च सभानुचारिणः कुतोऽयमायाति पुरा न मे श्रुतः ।**
**न चैनमूचुर्विदितं तदा नराः सविस्मयं वाक्यमिदं नृपोऽब्रवीत् ॥४॥**
**सत्त्वोपपन्नः पुरुषोऽमरोपमः श्यामो युवा वारणयूथपोपमः ।**
**आमुच्य कम्बूपरि हाटके शुभे विमुच्य वेणीमपिनह्य कुण्डले ॥ ५ ॥**

**वैशंपायन** म्हणाला:— नंतर राजवाड्याच्या तटासमीप स्त्रियांप्रमाणें अलंकार घातलेला व स्वरूपानेंहि स्त्रियांप्रमाणेंच दिसणारा असा एक मोठाड पुरुष दिसला. त्याच्या कानांत सुवर्णाचीं मोठालीं कुंडलें असून हातांत शंखाचे सोन्यानें मढविलेले चुडे होते ( १ ). तो आपले लांब हात व सडक केंस पसरून सभेमध्यें बसलेल्या विराट राजाकडे जात असतां, ऐरावताप्रमाणें शोभणाऱ्या त्याच्या गतीमुळें जमीन हालत होती ( २ ). ऐरावताप्रमाणें ज्याचा पराक्रम आहे, व जो इंद्राचा पुत्र असल्यानें अतिशय तेजानें झळकत आहे, आणि शत्रूंचा नाश करण्याचें सामर्थ्य अंगीं असतांना ज्यानें ( वेष पालटून ) तें झांकून टाकिलें आहे, असा तो ( अर्जुन ) विराटराजानें सभेंत आलेला पाहिला ( ३ ). राजानें सभेमध्यें असणाऱ्या सर्व लोकांस विचारलें, " हा कोठून येत आहे ? पूर्वी मी यास ऐकिलें नाहीं. " तेव्हां लोकहि आह्मांस याच्यासंबंधानें मुळींच माहिती नाहीं असें म्हणाले. नंतर राजा विस्मयपूर्वक ( अर्जुनास ) म्हणाला:-(४) " तूं सत्वशील देवरूपी पुरुष दिसत आहेस. तूं श्यामवर्णाचा तरुण असून हत्तींच्या म्होरक्याप्रमाणें दिसतोस. तूं हे ( हातांतील ) शंखाचे सुवर्णालंकृत चुडे व कुंडलें काढून आणि वेणी सोडून ( ५ ),

स्रग्वी सुकेशः परिधाय चाऽन्यथा शुशोभ[1] धन्वी कवची शरी यथा ।
आरुह्य यानं परिधावतां भवान्सुतैः समो मे भव वा मया समः ॥६॥
वृद्धो ह्यहं वै परिहारकामः सर्वान्मत्स्यांस्तरसा पालयस्व ।
नैवंविधाः क्लीबरूपा भवन्ति कथंचनेति प्रतिभाति मे मनः ॥ ७ ॥

अर्जुन उवाच—

गायामि नृत्याम्यथ वादयामि भद्रोऽस्मि नृत्ये कुशलोऽस्मि गीते ।
त्वमुत्तरायै प्रदिशस्व मां स्वयं भवामि देव्या नरदेव नर्तकः ॥ ८ ॥
इदं तु रूपं मम येन किं तव प्रकीर्तयित्वा भृशशोकवर्द्धनम् ।
बृहन्नलां मां नरदेव विद्धि सुतं सुतां वा पितृमातृवर्जिताम् ॥ ९ ॥

विराट उवाच—

ददामि ते हन्त वरं बृहन्नले सुतां च मे नर्त्तय याश्च तादृशीः ।
इदं तु ते कर्म समं न मे मतं समुद्रनेमिं पृथिवीं त्वमर्हसि ॥ १० ॥

तुझे केस मोकळे कर; त्याऐवजीं फुलांच्या माळा घालून व धनुष्य, बाण आणि कवच हीं धारण करून तूं (एखाद्या योद्ध्याप्रमाणें) शोभशील. माझ्या मुलांप्रमाणें किंवा माझ्या स्वतःप्रमाणेंच तूं रथांत बसून इकडे फिरत जा. (६) मी वृद्ध झालों असल्यामुळें अमात्यांवर राज्यकारभार सोपवावा असा माझा हेतु आहे; तर तूंच आपल्या सामर्थ्यानें मत्स्यदेशांतील सर्व लोकांचें रक्षण कर. अशाप्रकारचे पुरुष षंढ असण्याचा संभव नाहीं असें मला वाटतें" (७).

अर्जुन म्हणाला:—"मी गातों, नृत्य करतों व वादनहि करतों. नृत्यामध्यें मी चांगला निपुण आहें व गाण्यांतहि कुशल आहें. तूं माझी नेमणूक उत्तरेकरितां कर; म्हणजे, राजा, मी तिला नृत्य शिकविणारा होईन (८). माझें हें रूप असें कशानें झालें आहे, हें ऐकून तुला काय करावयाचें आहे ? तें सांगतांना सर्वांनाच महादुःख होणार आहे. राजा, मला बृहन्नला (नांवाचा) आईबाप नसलेला एकादा मुलगा अथवा मुलगी समज" (९).

विराट म्हणाला:—"बृहन्नले, तुझें मागणें मी कबूल करितों. तूं माझ्या मुलीला व तिच्या बरोबरीच्या इतर मुलींनाहि नृत्य शिकव. पण हें काम तुला योग्य आहे असें मात्र मला वाटत नाहीं. समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करणें तुला योग्य आहे" (१०).

१ शुशोभ—हा प्रयोग अकल्पित आहे. (नी.) येथें मुग्ध आहे. हा अपपाठ असेल.

**वैशम्पायन उवाच—**

**बृहन्नलां तामभिवीक्ष्य मत्स्यराट् कलासु नृत्येषु तथैव वादिते ।**
**संमन्त्र्य राजा विविधैः स्वमन्त्रिभिः परीक्ष्य चैनं प्रमदाभिराशु वै॥ ११॥**
**अपुंस्त्वमप्यस्य निशम्य च स्थिरं ततः कुमारीपुरमुत्ससर्ज तम् ।**
**स शिक्षयामास च गीतवादितं सुतां विराटस्य धनंजयः प्रभुः ॥ १२॥**
**सखीश्च तस्याः परिचारिकास्तथा प्रियश्च तासां स बभूव पाण्डवः॥ १३॥**
**तथा स सत्रेण[1] धनंजयो वसन्प्रियाणि कुर्वन्सह ताभिरात्मवान् ।**
**तथा च तं तत्र न जज्ञिरे जना बहिश्चरा वाऽप्यथ चान्तरेचराः॥ १४॥**

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि अर्जुनप्रवेशो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ [ ३१० ]**

**वैशंपायन** म्हणाला:— ती बृहन्नला नृत्य-वादनादिक कलांत प्रवीण आहे, असें पाहून विराट राजानें आपल्या निरनिराळ्या मंत्र्यांचा विचार घेऊन तावडतोब तरुण स्त्रियांकडून त्याची परीक्षा करविली (११). आणि त्याचें कायमचें नपुंसकत्व ऐकून त्याला कन्यांतःपुरांत सोडलें. तो समर्थ धनंजय विराट राजाच्या कन्येला, तिच्या मैत्रिणींस व त्याप्रमाणें तिच्या दासींना गायन व वादन शिकवूं लागला; आणि तो पांडुपुत्र त्यांना प्रिय झाला ( १२-१३ ). ह्याप्रमाणें वेष पालटलेला व इंद्रियांचा संयम करणारा धनंजय कपटानें राहून त्यांच्या मर्जीप्रमाणें वागत असतां अंतःपुरांतील किंवा बाहेरील कोणासहि ओळखूं आला नाहीं ( १४ ).

याप्रमाणे विराटपर्वाचा ११ वा अध्याय समाप्त.

---

१ सत्रेण कैतवेन-विश्वकोशः ( नी. ) शब्द कूट आहे.

# अध्याय १२

[ नकुल विराट राजाकडे घोड्यांचा चाबूकस्वार बनून राहतो. ]

---

**वैशम्पायन उवाच—**

**अथाऽपरोऽदृश्यत पाण्डवः प्रभुर्विराटराजं तरसा समेयिवान् ।**
**तमापतन्तं ददृशे पृथग्जनो विमुक्तमभ्रादिव सूर्यमण्डलम् ॥ १ ॥**
**स वै हयानैक्षत तांस्ततस्ततः समीक्षमाणं स ददर्श मत्स्यराट् ।**
**ततोऽब्रवीत्ताननुगान्नरेश्वरः कुतोऽयमायाति नरोऽमरोपमः ॥ २ ॥**
**अयं हयानीक्षति मामकान्दृढं ध्रुवं हयज्ञो भविता विचक्षणः ।**
**प्रवेश्यतामेष समीपमाशु मे विभाति वीरो हि यथाऽमरस्तथा ॥ ३ ॥**
**अभ्येत्य राजानममित्रहाऽब्रवीज्जयोऽस्तु ते पार्थिव भद्रमस्तु वः ।**
**हयेषु युक्तो नृप संमतः सदा तवाऽश्वसूतो निपुणो भवाम्यहम् ॥४॥**

**विराट उवाच—**

**ददामि यानानि धनं निवेशनं ममाऽश्वसूतो भवितुं त्वमर्हसि ।**
**कुतोऽसि कस्याऽसि कथं त्वमागतः प्रब्रूहि शिल्पं तव विद्यते च यत् ॥५॥**

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर आणखी एक वीर पांडुपुत्र (नगरांत) दिसला. तो त्वरेनें विराट राजाकडे आला. त्यास येतांना साधारण लोकांनीं पाहिलें, तेव्हां मेघांपासून सुटून सूर्यमंडळच आपणांकडे येत आहे कीं काय, असा त्यांना भास झाला ( १ ). तो ठिकठिकाणीं ( असलेल्या ) अश्वांकडे दृष्टि टाकी. घोडयांकडे निरखून पाहतांना त्यास मत्स्यदेशाच्या राजानें पाहिलें. तेव्हां तो आपल्या सेवकांस म्हणाला—"हा देवतुल्य पुरुष कोठून आला आहे ? ( २ ) याची सर्व दृष्टि माझ्या घोडयांवर आहे, यावरून हा कोणी अश्वपरीक्षक असावा असें वाटतें. तर त्या देवतुल्य पुरुषाला मजकडे लवकर घेऊन या" ( ३ ). तो शत्रुघ्न नकुल राजाजवळ येऊन त्यास म्हणाला:—" राजा, तुझा जयजयकार असो, तुमचें सर्वांचें कल्याण असो. पृथ्वीपते, मी अश्वविद्येंत चांगला निपुण असल्यानें घोडयांचे कामावर माझी सदोदित नेमणूक होत आली आहे; तुझ्या घोडयांवरचा कुशल सूत मी होतों " ( ४ ).

**विराट** म्हणाला:—"तूं माझा अश्वसारथि होण्यास योग्य आहेस. तुला मीं वाहनें, द्रव्य व राहण्यास जागाहि देतों; तूं कोठून आलास? कोणाचा आहेस? कशाकरितां आलास? त्याचप्रमाणें तुझ्या अंगीं जें कसब असेल तें सांग " (५).

नकुल उवाच— पञ्चानां पाण्डुपुत्राणां ज्येष्ठो भ्राता युधिष्ठिरः।
तेनाऽहमश्वेषु पुरा नियुक्तः शत्रुकर्शन ॥ ६ ॥
अश्वानां प्रकृतिं वेद्मि विनयं चापि सर्वशः।
दुष्टानां प्रतिपत्तिं च कृत्स्नं चैव चिकित्सितम् ॥ ७ ॥
न कातरं स्यान्मम जातु वाहनं न मेऽस्ति दुष्टा वडवा कुतो हयाः।
जनस्तु मामाह स चापि पाण्डवो युधिष्ठिरो ग्रन्थिकमेव नामतः ॥८॥

विराट उवाच—
यदस्ति किंचिन्मम वाजिवाहनं तदस्तु सर्वं त्वदधीनमद्य वै।
ये चापि केचिन्मम वाजियोजकास्त्वदाश्रयाः सारथयश्च सन्तु मे ॥ ९
इदं तवेष्टं यदि वै सुरोपम ब्रवीहि यत्ते प्रसमीक्षितं वसु।
न तेऽनुरूपं हयकर्म विद्यते प्रभासि राजेव हि संमतो मम ॥ १० ॥
युधिष्ठिरस्येव हि दर्शनेन मे समं तवेदं प्रियमत्र दर्शनम्।
कथं तु भृत्यैः स विनाकृतो वने वसत्यनिन्द्यो रमते च पाण्डवः॥११॥

**नकुल** म्हणाला:—"पांडु राजाच्या पांच पुत्रांपैकीं सर्वांत वडील बंधु युधिष्ठिर यानें, शत्रुनाशका, माझी नेमणूक पूर्वीं घोड्यांवर केली होती (६). अश्वांचा स्वभाव मला माहित आहे, त्यांना कसें शिकवावें याचेंहि ज्ञान मला आहे. तसेंच त्याना कांहीं खोडी असल्यास त्याहि कशा नाहींशा कराव्या हेंहि मला माहित आहे. त्याचप्रमाणें घोडयांची सर्व रोगचिकित्सा मी जाणतों (७). माझ्याकडे असलेलें वाहन कधींहि भित्रें निघावयाचें नाहीं. घोडी देखील माझ्यापाशीं दुर्गुणी राहत नाहीं; मग घोडयांची ती कथा काय ? पांडुपुत्र युधिष्ठिर व इतर सर्व लोक मला 'ग्रंथिक' नांवानें हांक मारीत" (८).

**विराट** म्हणाला:—"मजपाशीं जे कांहीं घोडे व वाहनें आहेत ते सर्व आजपासून तुझ्या ताब्यांत दिले आहेत. त्यांजवर, आणि जे कांहीं त्यांचे मोतदार व सारथी आहेत त्यांवरहि तूं आपली हुकुमत चालव (९). देवतुल्य पुरुषा, हें काम करण्याची जर तुझी इच्छा असेल, तर तुला वेतन काय पाहिजे तें सांग. तुझ्या स्वरूपावरून तूं अश्वकर्म करण्यास योग्य आहेस असें मला दिसत नाहीं. तूं खरोखर राजपदाला योग्य आहेस, असें मला वाटतें (१०). तुझ्या दर्शनानें मला ( आज ) युधिष्ठिराचेंच दर्शन झाल्यासारखा आनंद होत आहे. ज्याची निंदा कोणीहि करीत नाहीं, असा तो पांडुपुत्र सेवकहीन होऊन वनांत कसा राहत असेल, व त्याला करमत तरी कसें असेल !" (११).

**वैशम्पायन उवाच—**

**तथा स गन्धर्ववरोपमो युवा विराटराज्ञा मुदितेन पूजितः ।**
**न चैनमन्येऽपि विदुः कथंचन प्रियाभिरामं विचरन्तमन्तरा ॥१२॥**
**एवं हि मत्स्ये न्यवसन्त पाण्डवा यथाप्रतिज्ञाभिरमोघदर्शनाः ।**
**अज्ञातचर्यां व्यचरन्समाहिताः समुद्रनेमीपतयोऽतिदुःखिताः ॥१३॥**

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि पाण्डवप्रवेशपर्वणि नकुलप्रवेशे द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ [ ३२३ ]**
**समाप्तं चेदं पाण्डवप्रवेशपर्व ।**

**वैशम्पायन** म्हणाला:—याप्रमाणें आनंदित झालेल्या विराट राजानें त्या थोर व गंधर्वश्रेष्ठासारख्या तरुण पुरुषास ठेवून घेतलें. शहरांत फिरत असतां तो सुंदर व प्रिय पुरुष कोणाच्याहि ओळखण्यांत आला नाहीं (१२). याप्रमाणें त्या समुद्रवलयांकितपृथ्वीपति अमोघदर्शन पांडवांनीं मत्स्यराजाच्या येथें प्रतिज्ञे-प्रमाणें मोठ्या दक्षतेनें राहून आपले अज्ञातवासाचे दिवस मोठ्या दुःखानें घालविले ( १३ ).

याप्रमाणें महाभारतांतील विराटपर्वापैकीं पांडवप्रवेश-उपपर्वांचा नकुलाच्या प्रवेशाविषयीं १२ वा अध्याय संपला.

---

**पांडवप्रवेशपर्व समाप्त झालें.**



# समयपालनपर्व

## अध्याय १३

[ विराटनगरांत पांडवांचें गुप्तपणें प्रतिज्ञापालन, परस्परांवरील प्रेम, आणि भीमानें केलेला जीमूतमल्लाचा वध. भीमावर विराटांची प्रसन्नता. ]

---

जनमेजय उवाच— एवं ते मत्स्यनगरे प्रच्छन्नाः कुरुनन्दनाः ।
अत ऊर्ध्वं महावीर्याः किमकुर्वत वै द्विज ॥ १ ॥
वैशम्पायन उवाच— एवं मत्स्यस्य नगरे प्रच्छन्नाः कुरुनन्दनाः ।
आराधयन्तो राजानं यदकुर्वत तच्छृणु ॥ २ ॥
तृणबिन्दुप्रसादाच्च धर्मस्य च महात्मनः ।
अज्ञातवासमेवं तु विराटनगरेऽवसन् ॥ ३ ॥
युधिष्ठिरः सभास्तारो मत्स्यानामभवत्प्रियः ।
तथैव च विराटस्य सपुत्रस्य विशांपते ॥ ४ ॥
स ह्यक्षहृदयज्ञस्तान्क्रीडयामास पाण्डवः ।
अक्षवत्यां यथाकामं सूत्रबद्धानिव द्विजान् ॥ ५ ॥
अज्ञातं च विराटस्य विजित्य वसु धर्मराट् ।
भ्रातृभ्यः पुरुषव्याघ्रो यथार्हं संप्रयच्छति ॥ ६ ॥

**जनमेजय** म्हणाला :—द्विजा, अशारीतीनें ते महावीर कुरुनंदन मत्स्यनगरांत गुप्तपणें राहिल्यानंतर त्यांनीं काय केलें ? ( १ )

**वैशंपायन** म्हणाला :—याप्रमाणें मत्स्यदेशाच्या राजधानींत ते कुरुनंदन गुप्तरीतीनें राहून विराटराजाची सेवा करीत असतां तेथें त्यांनीं काय केलें तें ऐक ( २ ). महात्म्या यमधर्माच्या आणि तृणबिंदूच्या प्रसादानें त्यांनीं विराट नगरांत राहून आपला अज्ञातवास अशा रीतीनें काढला ( ३ ). प्रजापालका, युधिष्ठिर सभासद झाल्यावर त्याजवर मत्स्यदेशांतील लोकांचें, विराटाचें व त्याच्या पुत्राचें चांगलें प्रेम बसलें ( ४ ). फांसे खेळण्यांत प्रवीण असल्यामुळें त्या पांडुपुत्रानें त्यांशीं खेळून त्यांच्या मनाचें चांगलें रंजन केलें. दोरी बांधलेल्या पक्ष्यांप्रमाणें युधिष्ठिरानें फांशाच्या खेळांत त्यांना रमविलें ( ५ ). तो नरव्याघ्र धर्मराजा धन जिंकून, विराटास नकळत, आपल्या भावांना जरुरीप्रमाणें देई (६).

भीमसेनोऽपि मांसानि भक्ष्याणि विविधानि च ।
अतिसृष्टानि मत्स्येन विक्रीणीते युधिष्ठिरे ॥ ७ ॥
वासांसि परिजीर्णानि लब्धान्यन्तःपुरेऽर्जुनः ।
विक्रीणानश्च सर्वेभ्यः पाण्डवेभ्यः प्रयच्छति ॥ ८ ॥
सहदेवोऽपि गोपानां वेषमास्थाय पाण्डवः ।
दधि क्षीरं घृतं चैव पाण्डवेभ्यः प्रयच्छति ॥ ९ ॥
नकुलोऽपि धनं लब्ध्वा कृते कर्मणि वाजिनाम् ।
तुष्टे तस्मिन्नरपतौ पाण्डवेभ्यः प्रयच्छति ॥ १० ॥
कृष्णा तु सर्वान्भर्तृस्ताभिरीक्षन्ती तपस्विनी ।
यथा पुनराविज्ञाता तथा चरति भामिनी ॥ ११ ॥
एवं संपादयन्तस्ते तदाऽन्योन्यं महारथाः ।
विराटनगरे चेरुः पुनर्गर्भधृता इव ॥ १२ ॥
साशङ्का धार्त्तराष्ट्रस्य भयात्पाण्डुसुतास्तदा ।
प्रेक्षमाणास्तदा कृष्णामूषुश्छन्ना नराधिप ॥ १३ ॥

भीमसेनहि मत्स्यराजानें दिलेलीं निरानिराळ्या प्रकारचीं पक्वान्नें व मांसें, धन घेऊन युधिष्ठिरास विकी ( ७ ). अर्जुनास अंतःपुरांत मिळालेलीं जुनीं वस्त्रें तो सर्वांस विकतांना पांडवांस देत असे (८). सहदेव देखील गवळ्याचा वेष घेऊन त्यास मिळालेलें दहीं, दूध व तूप ( इतर ) पांडवांना देत असे (९). तसेंच, घोड्यांच्या चाकरीनें राजा संतुष्ट होऊन नकुलास जें कांहीं द्रव्य देई, तें तोहि ( इतर ) पांडवांस देत असे ( १० ). द्रौपदी मात्र दुसऱ्यांच्या नजरेस न येई अशाप्रकारें आपल्या सर्व पतींवर लक्ष ठेवून तपोवृत्तीनें आचरण ठेवीत असे ( ११ ). ह्याप्रमाणें ते महारथी एकमेकांचा समाचार घेत, त्या नगरींत ( सेवाश्रमानें दुःखित होऊन ) पुनः मातृगर्भांत आल्याप्रमाणें ( गुप्तपणें ) वागत (१२). राजा, धृतराष्ट्राच्या पुत्रांपासून आपणांस भय आहे, अशी शंका बाळगून ते पांडुपुत्र द्रौपदीवर नीट लक्ष ठेवून गुप्तरीतीनें राहिले ( १३ ).

अथ मासे चतुर्थे तु ब्रह्मणः सुमहोत्सवः ।
आसीत्समृद्धो मत्स्येषु पुरुषाणां सुसंमतः ॥ १४ ॥

तत्र मल्लाः समापेतुर्दिग्भ्यो राजन्सहस्रशः ।
समाजे ब्रह्मणो राजन्यथा पशुपतेरिव ॥ १५ ॥

महाकाया महावीर्याः कालखञ्जा इवाऽसुराः ।
वीर्योन्मत्ता बलोदग्रा राज्ञा समभिपूजिताः ॥ १६ ॥

सिंहस्कन्धकटिग्रीवाः स्ववदाता मनस्विनः ।
असकृल्लब्धलक्षास्ते रङ्गे पार्थिवसन्निधौ ॥ १७ ॥

तेषामेको महानासीत्सर्वमल्लानथाऽऽह्वयत् ।
आवल्गमानं तं रङ्गे नोपतिष्ठति कश्चन ॥ १८ ॥

यदा सर्वे विमनसस्ते मल्ला हतचेतसः ।
अथ सूदेन तं मल्लं योधयामास मत्स्यराट् ॥ १९ ॥

अशाप्रकारें चार महिने गेल्यावर त्या नगरांत पुरुषांना आनंद-दायक असा मोठा ब्रह्मोत्सव झाला. (शरदृतुमध्यें) सर्वत्र धनधान्यादिकांची समृद्धि असल्यानें, हा उत्सव मत्स्यदेशांतील लोक मोठ्या समारंभानें पाळीत ( १४ ). राजा, जशी कैलासावर शंकराच्या, किंवा ब्रह्मलोकीं ब्रह्मदेवाच्या उत्सवाकरितां हजारों मंडळी जमा होते, तद्वत् त्या ठिकाणीं समाज जमून, देशोदेशाहून सहस्रावधि मल्ल तेथें आले (१५). त्यांचीं शरीरें धिप्पाड असून त्यांचा पराक्रमहि मोठा होता, म्हणून ते कालखंज असुरांप्रमाणें भासत होते. वीर्यानें उन्मत्त झालेल्या व बळानेंहि मुसमुसलेल्या त्या मल्लांचा राजानें आदरसत्कार केला ( १६ ). सिंहाप्रमाणें त्यांचीं गर्दनें, खांदे व कंबरा दिसत होत्या; तसेंच ते अत्यंत निर्मल व संतुष्ट मनाचे होते. शिवाय विराटराजाजवळ असलेल्या मल्लांच्या आखाड्यांत त्यांनीं पूर्वीं अनेक वेळां जय मिळविला होता ( १७ ). त्यांपैकीं एक महाबलाढ्य मल्ल होता; त्यानें आतां इतर मल्लांस आव्हान केलें; पण वल्गना करणाऱ्या त्याच्यासमोर रंगभूमीवर उभा राहण्यास कोणीच धजेना (१८). ते सर्व मल्ल खिन्न व हताश झाल्यामुळें मत्स्यराजानें ( नवीनच ठेवलेल्या ) आचाऱ्यास त्याजबरोबर युद्ध करावयास सांगितलें ( १९ ).

नोद्यमानस्तदा भीमो दुःखेनैवाऽकरोन्मतिम् ।
न हि शक्नोति विवृते प्रत्याख्यातुं नराधिपम् ॥ २० ॥
ततः स पुरुषव्याघ्रः शार्दूलशिथिलश्चरन् ।
प्रविवेश महारङ्गं विराटमभिपूजयन् ॥ २१ ॥
बबन्ध कक्षां कौन्तेयस्ततः संहर्षयञ्जनम् ।
ततस्तु वृत्रसंकाशं भीमो मल्लं समाह्वयत् ॥ २२ ॥
जीमूतं नाम तं तत्र मल्लं प्रख्यातविक्रमम् ।
तावुभौ सुमहोत्साहावुभौ भीमपराक्रमौ ॥ २३ ॥
मत्ताविव महाकायौ वारणौ षष्टिहायनौ ।
ततस्तौ नरशार्दूलौ बाहुयुद्धं समीयतुः ॥ २४ ॥
वीरौ परमसंहृष्टावन्योन्यजयकाङ्क्षिणौ ।
आसीत्सुभीमः संपातो वज्रपर्वतयोरिव ॥ २५ ॥
उभौ परमसंहृष्टौ बलेनाऽतिबलावुभौ ।
अन्योन्यस्याऽन्तरं प्रेप्सू परस्परजयैषिणौ ॥ २६ ॥

पण त्यावेळीं राजाज्ञा झाली असतांहि भीमाच्या मनांत युद्ध करावयाचें नव्हतें. तथापि दुःखानें त्यानें मान्य केलें. उघड रीतीनें राजाच्या आज्ञेचा भंग करणें हें त्यास युक्त वाटेना ( २० ). नंतर तो नरश्रेष्ठ एखाद्या वाघाप्रमाणें सावकाश पावलें टाकीत विराटाला मुजरा करीत त्या महारंगांत उतरला ( २१ ). त्या कुंतीपुत्रानें आपला काचा खोंवला तेव्हां लोकांस आनंद झाला. नंतर भीमानें त्या वृत्रासुरासारख्या जीमूत नांवाच्या प्रसिद्ध पराक्रमी मल्लास तेथें आव्हान केलें. त्या दोघांना अतिशय उत्साह वाटत होता, कारण दोघेहि साठ वर्षांच्या मत्त व प्रचंड हत्तींप्रमाणें भयंकर पराक्रमी होते. त्या दोघां नरव्याघ्रांनीं बाहुयुद्धास सुरवात केली ( २२–२४ ). अतिशय उल्लसित झालेले व एकमेकांस जिंकण्याची इच्छा करीत असलेले ते वीर, वज्र व पर्वत यांच्याप्रमाणें एकमेकांवर भयंकर रीतीनें आदळले ( २५ ). दोघेहि अत्यंत आनंदित झालेले आणि दोघेहि अतिशय बलवान् असल्यामुळें, एकमेकांवर जय मिळविण्याकरितां ते एकमेकांचीं व्यंगें शोधूं लागले ( २६ ).

उभौ परमसंहृष्टौ मत्ताविव महागजौ ।
कृतप्रतिकृतैश्चित्रैर्बाहुभिश्च सुसङ्कटैः ।
सन्निपातावधूतैश्च प्रमाथोन्मथनैस्तथा ॥ २७ ॥
क्षेपणैर्मुष्टिभिश्चैव वराहोद्धूतनिःस्वनैः ।
तलैर्वज्रनिपातैश्च प्रसृष्टाभिस्तथैव च ॥ २८ ॥
शलाकानखपातैश्च पादोद्धूतैश्च दारुणैः ।
जानुभिश्चाऽश्मनिर्घोषैः शिरोभिश्चाऽवघट्टनैः ॥ २९ ॥
तद्युद्धमभवद्धोरमशस्त्रं बाहुतेजसा ।
बलप्राणेन शूराणां समाजोत्सवसन्निधौ ॥ ३० ॥
अरज्यत जनः सर्वः सोत्कृष्टनिनदोत्थितः ।
बलिनोः संयुगे राजन्वृत्रवासवयोरिव ॥ ३१ ॥

उभयतां मदोन्मत्त गजांप्रमाणें आनंदांत आल्यामुळें त्यांनीं निरनिराळ्या प्रकारचे पेंच व उलट पेंच आरंभिले. एकानें दुसऱ्यास चित्रविचित्र ( कवा ) घालून मर्मस्थळीं धरून चीत करण्याचा प्रयत्न करावा, तर दुसऱ्यानें तो पेंच उकलून उलट त्यासच मर्मस्थळीं पुनः पकडावें. एकानें दुसऱ्याला दंडाचे किंवा मुठींचे ठोसे लगावयास जावें,तर दुसऱ्यानें ते चुकवून त्यासच तोंडघशीं पाडावें. एकानें दुसऱ्याला धडकी द्यावी, तर दुसऱ्यानें त्या धडकींतच उलट धडकी बसेल अशा रीतीनें प्रतिकार करावा. एकानें दुसऱ्यास जमिनीवर पाडून लोळवावें, तर दुसऱ्यानें पुनः उठून झोंबी करावी (२७). एकमेकांनीं एकमेकांस जाग्यावरून उचलून फेकून देण्याचा प्रयत्न करावा, किंवा छातीवर मुष्टिप्रहार करावा; खांद्यावर घेऊन गरगर फिरवून खालीं जमिनीवर पाडतांना एखाद्या डुकराप्रमाणें आवाज निघावा; तळहातांनीं चपराका दिल्यामुळें जसा कांहीं वज्राचा आघात व्हावा (२८). त्यांनीं बोटें व नखें पिरगाळावींत; टांग धरून खालीं पाडण्याचा भयंकर प्रयत्न करावा; गुडघ्यांनीं किंवा मस्तकांनीं टकरा देत असतां, जसा कांहीं दगडावर दगड आपटल्यामुळें मोठा आवाज निघावा ( २९ ). अशारीतीनें, शस्त्रें न घेतां केवळ शारीरिक बलावर व मानसबलावर,ह्या उत्सवानिमित्त जमलेल्या शूर लोकांसमक्ष, हें घोर युद्ध झालें (३०). राजा, महाबली वृत्र व इंद्र ह्यांमधील युद्धाप्रमाणें हें युद्ध चाललें असतां, सर्व लोक संतुष्ट झाले व ( शाबास ! वाहवा ! वगैरे ) उत्तेजनपर शब्द ओरडले ( ३१ ).

प्रकर्षणाकर्षणयोरभ्याकर्षविकर्षणैः ।
आकर्षतुरथाऽन्योन्यं जानुभिश्चापि जघ्नतुः ॥ ३२ ॥
ततः शब्देन महता भर्त्सयन्तौ परस्परम् ।
व्यूढोरस्कौ दीर्घभुजौ नियुद्धकुशलावुभौ ।
बाहुभिः समसज्जेतामायसैः परिघैरिव ॥ ३३ ॥
चकर्ष दोर्भ्यामुत्पात्य भीमो मल्लममित्रहा ।
निनदन्तमभिक्रोशन् शार्दूल इव वारणम् ॥ ३४ ॥
समुद्यम्य महाबाहुर्भ्रामयामास वीर्यवान् ।
ततो मल्लाश्च मत्स्याश्च विस्मयं चक्रिरे परम् ॥ ३५ ॥
भ्रामयित्वा शतगुणं गतसत्त्वमचेतनम् ।
प्रत्यपिंषन्महाबाहुर्मल्लं भुवि वृकोदरः ॥ ३६ ॥
तस्मिन्विनिहते वीरे जीमूते लोकविश्रुते ।
विराटः परमं हर्षमगच्छद्बान्धवैः सह ॥ ३७ ॥
प्रहर्षात्प्रददौ वित्तं बहु राजा महामनाः ।
बल्लवाय महारङ्गे यथा वैश्रवणस्तथा ॥ ३८ ॥
एवं स सुबहून्मल्लान्पुरुषांश्च महाबलान् ।
विनिघ्नन्मत्स्यराजस्य प्रीतिमाहरदुत्तमाम् ॥ ३९ ॥

ते एकमेकांस ढकलीत, ओढून घेत, अभ्याकर्ष, विकर्ष करीत, फिरवीत व गुडघेहि मारीत ( ३२ ). नंतर मोठ्या आवाजानें परस्परांस निंदीत, विशाल छातीचे, दीर्घ भुजांचे व मल्लयुद्धांत प्रवीण असलेले ते दोघे लोखंडी अडसरांसारख्या बाहूंनीं एकमेकांस भिडले ( ३३ ). शत्रुघातक भीमानें मोठ्यानें ओरडणाऱ्या त्या मल्लास, हत्तीवर गर्जणाऱ्या सिंहाप्रमाणें गर्जत, दंडांना धरून ओढिलें ( ३४ ), आणि वर उचलून त्या महाबाहु वीर्यवन्तानें त्यास गरगर फिरविलें. तेव्हां मल्लांनीं आणि मत्स्यदेशच्या लोकांनीं मोठें आश्चर्य प्रगट केलें ( ३५ ). शंभर वेळां गरगर फिरवून तो अगदीं बेशुद्ध व निचेष्ट झाला, तेव्हां भीमसेनानें त्यास भूमीवर आपटलें ( ३६ ). तो प्रख्यात जीमूत वीर मारला गेला तेव्हां बांधवांसह विराटराजास अतिशय आनंद झाला ( ३७ ). अत्यानंदामुळें उदार मनाच्या राजानें कुबेराप्रमाणें त्या महान् बल्लवास रंगभूमीवरच पुष्कळ धन दिलें ( ३८ ). ह्याप्रमाणें भीमानें पुष्कळ मल्लांचा व महाबलिष्ठ पुरुषांचा समाचार घेऊन मत्स्यराजाचें उत्तम प्रेम संपादिलें ( ३९ ). जेव्हां त्याच्याशीं लढण्यासारखा

यदाऽस्य तुल्यः पुरुषो न कश्चित्तत्र विद्यते ।
ततो व्याघ्रैश्च सिंहैश्च द्विरदैश्चाऽप्ययोधयत् ॥ ४० ॥
पुनरन्तःपुरगतः स्त्रीणां मध्ये वृकोदरः ।
योध्यते स विराटेन सिंहैर्मत्तैर्महाबलैः ॥ ४१ ॥
बीभत्सुरपि गीतेन स्वनृत्येन च पाण्डवः ।
विराटं तोषयामास सर्वाश्चाऽन्तःपुरस्त्रियः ॥ ४२ ॥
अश्वैर्विनीतैर्जवनैस्तत्र तत्र समागतैः ।
तोषयामास राजानं नकुलो नृपसत्तमम् ॥ ४३ ॥
तस्मै प्रदेयं प्रायच्छत्प्रीतो राजा धनं बहु ।
विनीतान्वृषभान्दृष्ट्वा सहदेवस्य चाऽभितः ।
धनं ददौ बहुविधं विराटः पुरुषर्षभः ॥ ४४ ॥
द्रौपदी प्रेक्ष्य तान्सर्वान्क्लिश्यमानान्महारथान् ।
नाऽतिप्रीतमना राजन्निःश्वासपरमाऽभवत् ॥ ४५ ॥
एवं ते न्यवसंस्तत्र प्रच्छन्नाः पुरुषर्षभाः ।
कर्माणि तस्य कुर्वाणा विराटनृपतेस्तदा ॥ ४६ ॥ [३६९]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि समयपालनपर्वणि जीमूतवधे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥
समाप्तं चेदं समयपालनपर्व ।

कोणी पुरुष तेथें नसे, तेव्हां विराटराजा सिंह, वाघ, हत्ती ह्यांशीं सुद्धां भीमाची झुंज लावी ( ४० ). अंतःपुरांतील स्त्रियांसमक्षहि विराट भीमाची महाबलिष्ठ व मत्त सिंहांबरोबर झुंज लावी (४१). पांडव अर्जुनानेंहि आपल्या नृत्यानें व गायनानें विराटास व सर्व अंतःपुरांतील स्त्रियांस तुष्ट केलें ( ४२ ). ठिकठिकाणीं ठेवलेल्या वेगवान् व उत्तम शिकविलेल्या घोड्यांस दाखवून नकुलानें विराट राजास संतुष्ट केलें ( ४३ ). प्रसन्न झालेल्या राजानें त्यास पुष्कळ धन दिलें. सहदेवानें शिकविलेले बैल पाहून नरश्रेष्ठ विराटानें त्यासहि पुष्कळ द्रव्य दिलें ( ४४ ). याप्रमाणें (नोकरीचे) क्लेश भोगणाऱ्या त्या सर्व महारथांस पाहून द्रौपदीचें मन अगदीं उद्विग्न होऊन ती (मात्र) एकसारखे दुःखाचे सुस्कारे टाकी (४५). ह्यारीतीनें ते पुरुषश्रेष्ठ त्या विराटराजाचीं कामें करीत गुप्त रीतीनें तेथें राहिले ( ४६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांत समयपालन-उपपर्वांत १३ वा अध्याय संपला.

समयपालनपर्व समाप्त.

# कीचकवधपर्व

## अध्याय १४

[ कीचक द्रौपदीस पाहतांच काममोहित होऊन तिची मनधरणी करतो; व पतिव्रता द्रौपदी त्याची निर्भर्त्सना करिते. ]

वैशम्पायन उवाच— वसमानेषु पार्थेषु मत्स्यस्य नगरे तदा ।
महारथेषु च्छन्नेषु मासा दश समाययुः ॥ १ ॥
याज्ञसेनी सुदेष्णां तु शुश्रूषन्ती विशांपते ।
आवसत्परिचारार्हा सुदुःखं जनमेजय ॥ २ ॥
तथा चरन्ती पाञ्चाली सुदेष्णाया निवेशने ।
तां देवीं तोषयामास तथा चाऽन्तःपुरस्त्रियः ॥ ३ ॥
तस्मिन्वर्षे गतप्राये कीचकस्तु महाबलः ।
सेनापतिर्विराटस्य ददर्श द्रुपदात्मजाम् ॥ ४ ॥
तां दृष्ट्वा देवगर्भाभां चरन्तीं देवतामिव ।
कीचकः कामयामास कामबाणप्रपीडितः ॥ ५ ॥
स तु कामाग्निसंतप्तः सुदेष्णामभिगम्य वै ।
प्रहसन्निव सेनानीरिदं वचनमब्रवीत् ॥ ६ ॥

वैशंपायन म्हणाला:— पांडव मत्स्यराजाचे नगरांत रहात असतां त्या गुप्त असलेल्या महारथांचे दहा महिने गेले (१). राजा जनमेजया, जिची इतरांकडून सेवा व्हावयाची ती द्रौपदी सुदेष्णेची सेवा करीत मोठ्या कष्टानें दिवस घालवीत होती. (२) सुदेष्णेच्या महालांत याप्रमाणें राहून तिनें त्या राजपत्नीला तसेंच अंतःपुरांतील स्त्रियांना संतुष्ट केलें ( ३ ). तें वर्ष संपत येण्याच्या सुमारास विराटाचा सेनापति महाबलिष्ठ कीचक यानें द्रौपदीस पाहिलें (४). देवांगनेप्रमाणें कांति असलेल्या तिला देवतेसारखी चमकतांना पाहून कीचक मदनशरांनीं विव्हळ झाला व तिच्या प्राप्तीची इच्छा करूं लागला ( ५ ). कामाग्नीनें होरपळून गेलेला तो सेनापति (कीचक) सुदेष्णेजवळ जाऊन तिला हंसत हंसत म्हणाला:—( ६ )

नेयं मया जातु पुरेह दृष्टा राज्ञो विराटस्य निवेशने शुभा ।
रूपेण चोन्मादयतीव मां भृशं गन्धेन जाता मदिरेवं भामिनी ॥ ७ ॥
का देवरूपा हृदयंगमा शुभे ह्याचक्ष्व मे कस्य कुतोऽत्र शोभने ।
चित्तं हि निर्मथ्य करोति मां वशे न चाऽन्यदत्रौषधमस्ति मे मतम् ॥८॥
अहो तवेयं परिचारिका शुभा प्रत्यग्ररूपा प्रतिभाति मामियम् ।
अयुक्तरूपं हि करोति कर्म ते प्रशास्तु मां यच्च ममाऽस्ति किंचन॥९॥
प्रभूतनागाश्वरथं महाजनं समृद्धियुक्तं बहुपानभोजनम् ।
मनोहरं काञ्चनचित्रभूषणं गृहं महच्छोभयतामियं मम ॥ १० ॥
ततः सुदेष्णामनुमन्त्र्य कीचकस्ततः समभ्येत्य नराधिपात्मजाम् ।
उवाच कृष्णामभिसान्त्वयंस्तदा मृगेन्द्रकन्यामिव जम्बुको वने ॥११॥

" येथें विराटाच्या राजवाड्यांत ही सुंदरी पूर्वी कधींच माझ्या दृष्टीस पडली नाहीं. ही स्त्री आपल्या अंगाच्या परिमलानें व मोहकरूपानें मला फारच उन्माद आणणारी मदिरेप्रमाणें झाली[1] आहे ( ७ ). ही देवांगनेसारखी सुंदर व हृदयंगम स्त्री कोणाची, व येथें कोठून आली ? तें कल्याणि ! मला सांग. माझ्या मनाची चलबिचल करून ही मला आपल्या अंकित करीत आहे. येथें मला दुसरें औषध नाहीं असें वाटतें ( ८ ). काय ? ही सुंदरी तुझी दासी आहे ? पण मला तर हिचें स्वरूप केवळ दिव्य भासत आहे ! तुझी सेवा करण्याचें कृत्य हें तिला योग्य नाहीं. हिनें मजवर, व जें जें माझ्या मालकीचें आहे त्या सर्वांवर, आपली सत्ता चालवावी ( ९ ). जेथें पुष्कळ हत्ती, घोडे व रथ आहेत, पुष्कळ लोक (सेवक) आहेत, समृद्धीनें जें युक्त आहे, नानाप्रकारचीं पेयें व भोज्य पदार्थ जेथें आहेत, आणि जें सुवर्णाच्या चित्रविचित्र भूषणांनीं शोभिवंत केलेलें आहे, असें माझें भव्य गृह हिनें सुशोभित करावें" (१०). नंतर सुदेष्णेजवळ कांहीं मसलत करून तो त्या राजकन्या द्रौपदीजवळ गेला; आणि वनांत कोल्ह्यानें सिंहकन्येचें मन वळविण्याचा प्रयत्न करावा त्याप्रमाणें तो द्रौपदीची मनधरणी करीत द्रौपदीस म्हणाला:—( ११ )

१ ' मदिरेव जाता ' असा संबंध घ्यावा.

का त्वं कस्यासि कल्याणि कुतो वा त्वं वरानने ।
प्राप्ता विराटनगरं तत्त्वमाचक्ष्व शोभने ॥ १२ ॥
रूपमग्र्यं तथा कान्तिः सौकुमार्यमनुत्तमम् ।
कान्त्या विभाति वक्त्रं ते शशाङ्क इव निर्मलम् ॥ १३ ॥
नेत्रे सुविपुले सुभ्रु पद्मपत्रनिभे शुभे ।
वाक्यं ते चारुसर्वाङ्गि परपुष्टरुतोपमम् ॥ १४ ॥
एवंरूपा मया नारी काचिदन्या महीतले ।
न दृष्टपूर्वा सुश्रोणि यादृशी त्वमनिन्दिते ॥ १५ ॥
लक्ष्मीः पद्मालया का त्वमथ भूतिः सुमध्यमे ।
ह्रीः श्रीः कीर्तिरथो कान्तिरासां का त्वं वरानने ॥ १६ ॥
अतीव रूपिणी किं त्वमनङ्गाङ्गविहारिणी ।
अतीव भ्राजसे सुभ्रु प्रभेवेन्दोरनुत्तमा ॥ १७ ॥
अपि चेक्षणलक्ष्माणं[1] स्मितज्योत्स्नोपमं शुभम् ।
दिव्यांशुरश्मिभिर्वृत्तं दिव्यकान्ति मनोरमम् ॥ १८ ॥

"कल्याणि, तूं कोण, व कोणाची आहेस? वरानने, या विराट नगरांत कोठून आलीस? हें मला खरेंखरें सांग (१२). तुझें हें उत्कृष्ट सौंदर्य, तशीच कांति व सुकुमारपणा अप्रतिम आहेत. कांतीमुळें तुझें मुख निर्मळ चंद्रासारखें शोभत आहे (१३). सुभ्रु, तुझे डोळे कमलपत्राप्रमाणें फार मोठाले आहेत. शुभांगि, तुझा स्वर कोकिळेच्या स्वराप्रमाणें (मधुर) आहे (१४). निर्दोष सुन्दर स्त्रिये, तुझ्यासारखी रूपवती स्त्री भूतलावर दुसरी कोणी पूर्वी कधींहि माझ्या पहाण्यांत आली नाहीं (१५). तूं कमलवासिनी लक्ष्मी आहेस, किंवा प्रत्यक्ष ईश्वरी ऐश्वर्याची देवता आहेस? अथवा सुमुखि, ह्री, श्री, कांति किंवा कीर्ति, यांपैकीं कोण आहेस? (१६) तूं मदनाच्या अंगावर लोळणारी अत्यंत रूपवती (रति) आहेस काय? सुभ्रु, चंद्राच्या उत्कृष्ट प्रभेप्रमाणें तूं अतिशय चमकत आहेस (१७). नेत्र हेच लक्ष्म[1] व स्मित हेंच जोत्स्ना याप्रमाणें मनास आनंद देणारा, दिव्यतेजाच्या किरणांनीं परिवेष्टिलेला आणि दिव्य

[1] 'पक्ष्माणां' हा पाठ चूक दिसतो. नी. वरील दुसरा पाठ देतो.

निरीक्ष्य वक्त्रचन्द्रं ते लक्ष्म्याऽनुपमया युतम् ।
कृत्स्ने जगति को नेह कामस्य वशगो भवेत् ॥ १९ ॥
हारालंकारयोग्यौ तु स्तनौ चोभौ सुशोभनौ ।
सुजातौ सहितौ लक्ष्म्या पीनौ वृत्तौ निरन्तरौ ॥ २० ॥
कुड्मलाम्बुरुहाकारौ तव सुभ्रु पयोधरौ ।
कामप्रतोदाविव मां तुदतश्चारुहासिनि ॥ २१ ॥
वलीविभङ्गचतुरं स्तनभारविनामितम् ।
कराग्रसंमितं मध्यं तवेदं तनुमध्यमे ॥ २२ ॥
दृष्ट्वैव चारु जघनं सरित्पुलिनसंनिभम् ।
कामव्याधिरसाध्यो मामप्याक्रामति भामिनि ॥ २३ ॥
जज्वाल चाऽग्निमदनो दावाग्निरिव निर्दयः ।
त्वत्संगमाभिसंकल्पविवृद्धो मां दहत्ययम् ॥ २४ ॥
आत्मप्रदानवर्षेण संगमाम्भोधरेण च ।
शमयस्व वरारोहे ज्वलन्तं मन्मथानलम् ॥ २५ ॥

कांतीमुळें मनोहर, व अनुपम लक्ष्मीनें युक्त, असा हा तुझा मुखचंद्र पाहून या संपूर्ण जगांतील कोणता पुरुष कामवश होणार नाहीं? (१८–१९). तुझे दोन स्तन अत्यंत सुंदर, उन्नत, शोभिवंत, पुष्ट, वर्तुल व एकमेकांस अगदीं लागलेले असून हार व अलंकार धारण करण्यास योग्य आहेत (२०). सुभ्रू, सुहास्यवदने, तुझे हे स्तन कमलाच्या कळ्यांप्रमाणें असून मदनाच्या चाबकांसारखे मला दुःख देत आहेत ( २१ ). तुझी कमर वीतभर बारीक आहे, आणि ती स्तनभारानें किंचित् वांकली असून, त्यामुळें तिजवर वळ्या पडल्या आहेत ( २२ ). नदीच्या पुलिनाप्रमाणें प्रशस्त असा हा तुझा कटिपश्चाद्भाग पाहून, भामिनि, असाध्य कामरोग मलासुद्धां ग्रासून टाकीत आहे ( २३ ). निर्दय मंदनाग्नीनें वणव्याप्रमाणें पेट घेतला आहे, आणि तुझ्या संगमाच्या इच्छेनें तो भडकून मला जाळून टाकीत आहे(२४).वरारोहे, तूं आत्मप्रदानरूप वृष्टीनें व संगमरूपी मेघानें पेटणारा कामाग्नि शांत कर (२५).

मच्चित्तोन्मादनकरा मन्मथस्य शरोत्कराः ।
त्वत्संगमाशानिशितास्तीव्राः शशिनिभानने ।
मह्यं विदार्य हृदयमिदं निर्दयवेगिताः ॥ २६ ॥
प्रविष्टा ह्यसितापाङ्गि प्रचण्डाश्चण्डदारुणाः ।
अत्युन्मादसमारंभाः प्रीत्युन्मादकरा मम ।
आत्मप्रदानसंभोगैर्मामुद्धर्तुमिहाऽर्हसि ॥ २७ ॥
चित्रमाल्याम्बरधरा सर्वाभरणभूषिता ।
कामं प्रकामं सेव त्वं मया सह विलासिनि ॥ २८ ॥
नाऽर्हसीहाऽसुखं वस्तुं सुखार्हा सुखवर्जिता ।
प्राप्नुह्यनुत्तमं सौख्यं मत्तस्त्वं मत्तगामिनि ॥ २९ ॥
स्वादून्यमृतकल्पानि पेयानि विविधानि च ।
पिबमाना मनोज्ञानि रममाणा यथासुखम् ॥ ३० ॥
भोगोपचारान्विविधान्सौभाग्यं चाऽप्यनुत्तमम् ।
पानं पिब महाभागे भोगैश्चाऽनुत्तमैः शुभैः ॥ ३१ ॥

चंद्रानने, माझ्या मनास उन्माद आणणारे व तुझ्या संगमाच्या आशारूपी दगडावर घासून तीक्ष्ण केलेले मदनाचे शरसमुदाय अतिशय वेगानें माझें शरीर विदारून हृदयांत शिरले आहेत ( २६ ). हे फार प्रचंड, प्रखर व दारुण असून, अत्यंत उन्माद उत्पन्न करणारे आणि ( माझ्या अंतःकरणांत ) प्रीतिक्षोभ उत्पन्न करणारे आहेत ! ( केव्हां ) आत्मदानाच्या व संभोगाच्या योगानें मला (या दुःस्थितींतून) वर काढणें तुला योग्य आहे(२७). विलासिनि, चित्रविचित्र फुलें व वस्त्रें धारण करून व सर्व अलंकारांनीं विभूषित होऊन तूं मजसमागमें मनमुराद कामोपभोग घे (२८). येथें दुःखांत राहणें तुला उचित नाहीं. तूं सुख भोगण्यास योग्य आहेस; तुला येथें कर्तेंच सुख मिळत नाहीं; मत्तगजासारखें चालणाऱ्या स्त्रिये, तूं मजपासून अनुपम सौख्य प्राप्त करून घे ( २९ ). नानाप्रकारचीं स्वादिष्ट, मनोहर व अमृततुल्य पेयें प्राशन करून तूं मनसोक्त रममाण हो (३०). महाभाग्यवंते, नानाप्रकारचे भोगोपचार व अत्युत्तम ऐश्वर्य (यांचा तूं उपभोग घे), आणि सर्वोत्कृष्ट व सुंदर भोगाबरोबरच मद्य प्राशन कर ( ३१ ).

इदं हि रूपं प्रथमं तवाऽनघे निरर्थकं केवलमद्य भामिनि ।
अधार्यमाणा स्रगिवोत्तमा शुभा न शोभसे सुन्दरि शोभना सती॥३२॥
त्यजामि दारान्मम ये पुरातना भवन्तु दास्यस्तव चारुहासिनि ।
अहं च ते सुन्दरि दासवत्स्थितः सदा भविष्ये वशगो वरानने॥३३॥
द्रौपद्युवाच— अप्रार्थनीयामिह मां सूतपुत्राऽभिमन्यसे ।
निहीनवर्णां सैरन्ध्रीं बीभत्सां केशकारिणीम् ॥ ३४ ॥
परदाराऽस्मि भद्रं ते न युक्तं तव साम्प्रतम् ।
दयिताः प्राणिनां दारा धर्मं समनुचिन्तय ॥ ३५ ॥
परदारे न ते बुद्धिर्जातु कार्या कथंचन ।
विवर्जनं ह्यकार्याणामेतत्सुपुरुषव्रतम् ॥ ३६ ॥
मिथ्याभिगृध्नो हि नरः पापात्मा मोहमास्थितः ।
अयशः प्राप्नुयाद्धोरं महद्वा प्राप्नुयाद्भयम् ॥ ३७ ॥

भामिनि, तुझें हें अलौकिक सौंदर्य आज केवळ व्यर्थ झालेलें आहे. तूं स्वतः रूपवती असतांहि, सुंदरी, ( अनाथ असल्यामुळें, ) ज्याप्रमाणें स्वच्छ उत्कृष्ट पुष्पमाला वापरण्यांत नसलेली शोभत नाहीं, त्याप्रमाणें तूं शोभत नाहींस (३२). चारुहासिनी, माझ्या ज्या पूर्वींच्या बायका आहेत त्या सर्व मी टाकून देईन; त्या तुझ्या दासी होतील. सुमुखी, सुंदरी, मीहि तुझा दास होऊन नेहमीं तुझ्या आज्ञेंत राहीन" ( ३३ ).

द्रौपदी म्हणाली:—"सूतपुत्रा, इच्छा करण्यास अयोग्य अशा माझी तूं इच्छा करीत आहेस; ( कारण ) मी सैरन्ध्री, अगदीं हलक्या जातीची, व ( केवळ ) वेणीफणी करणारी बीभत्स कामकरीण दासी आहें ( ३४ ). ( तशांत ) मी दुसऱ्यांची स्त्री आहें; तुझें कल्याण होवो. सांप्रत हें तुला योग्य नाहीं. प्राणिमात्रास आपल्या बायका प्रिय असतात. तूं कांहीं धर्माचा विचार कर ( ३५ ). परस्त्रीवर तूं कदापि वासना ठेवूं नयेस. अकार्यें वर्ज्य करणें हें सत्पुरुषाचें व्रत होय (३६). जो पापी मनुष्य मोहित होऊन अप्राप्य वस्तुविषयीं व्यर्थ इच्छा करितो, त्याची फार अपकीर्ति होते, अथवा तो (मृत्युरूपी) महद्भय पावतो " ( ३७ ).

वैशम्पायन उवाच— एवमुक्तस्तु सैरन्ध्र्या कीचकः काममोहितः ।
जानन्नपि सुदुर्बुद्धिः परदाराभिमर्शने ॥ ३८ ॥
दोषान्बहून्प्राणहरान्सर्वलोकविगर्हितान् ।
प्रोवाचेदं सुदुर्बुद्धिर्द्रौपदीमजितेन्द्रियः ॥ ३९ ॥
नाऽर्हस्येवं वरारोहे प्रत्याख्यातुं वरानने ।
मां मन्मथसमाविष्टं त्वत्कृते चारुहासिनि ॥ ४० ॥
प्रत्याख्याय च मां भीरु वशगं प्रियवादिनम् ।
नूनं त्वमसितापाङ्गि पश्चात्तापं करिष्यसि ॥ ४१ ॥
अहं हि सुभ्रु राज्यस्य कृत्स्नस्याऽस्य सुमध्यमे ।
प्रभुर्वासयिता चैव वीर्ये चाऽप्रतिमः क्षितौ ॥ ४२ ॥
पृथिव्यां मत्समो नास्ति कश्चिदन्यः पुमानिह ।
रूपयौवनसौभाग्यैर्भोगैश्चाऽनुत्तमैः शुभैः ॥ ४३ ॥
सर्वकामसमृद्धेषु भोगेष्वनुपमेष्विह ।
भोक्तव्येषु च कल्याणि कस्माद्दास्ये रता ह्यसि ॥ ४४ ॥

**वैशंपायन म्हणाला:—** याप्रमाणें सैरंध्री म्हणाली, तेव्हां कामानें मोहित झालेला व अति नीचबुद्धीचा कीचक, परस्त्रीचा अभिलाष करण्यांत प्राण हरण करणारे व सर्व लोकांनीं निंदिलेले पुष्कळ दोष आहेत हें जाणत असूनहि, मन स्वाधीन नसल्यानें तो दुष्टबुद्धि द्रौपदीस म्हणाला:–" वरारोहे, सुमुखि, तुझ्यासाठीं मी कामातुर झालों आहें, सुहास्यवदने, माझा असा अव्हेर करणें तुला योग्य नाहीं ( ३८–४० ). अगे भित्रे, मी तुझ्या अंकित होऊन अगदीं प्रिय गोष्ट बोलत असतां तूं माझा धिःक्कार करीत आहेस. सुलोचने, तूं पुढें खात्रीनें पश्चात्ताप करशील ( ४१ ). सुभ्रु, मी या संपूर्ण राज्याचा स्वामी आहें; या राज्याचें अस्तित्व मजवर अवलंबून आहे. सुमध्यमे, पराक्रमामध्यें मी पृथ्वींत अप्रतिम आहें ( ४२ )..रूप, तारुण्य, सुभगता आणि उत्तमोत्तम भोग, यांत माझी बरोबरी करणारा पुरुष या पृथ्वीवर दुसरा कोणीच नाहीं ( ४३ ). कल्याणि, सर्व मनोरथ पूर्ण करणारे अनुपम भोग भोगावयाचे सोडून तूं दासीपणांत कशी गुंग झाली आहेस ? ( ४४ ).

मया दत्तमिदं राज्यं स्वामिन्यसि शुभानने ।
भजस्व मां वरारोहे भुङ्क्ष्व भोगाननुत्तमान् ॥ ४५ ॥
एवमुक्ता तु सा साध्वी कीचकेनाऽशुभं वचः ।
कीचकं प्रत्युवाचेदं गर्हयन्त्यस्य तद्वचः ॥ ४६ ॥
सैरन्ध्र्युवाच— मा सूतपुत्र मुह्यस्व माऽद्य त्यक्ष्यस्व जीवितम् ।
जानीहि पञ्चभिर्घोरैर्नित्यं माममिरक्षिताम् ॥ ४७ ॥
न चाप्यहं त्वया लभ्या गन्धर्वाः पतयो मम ।
ते त्वां निहन्युः कुपिताः साऽलं मा व्यनीनशः ॥ ४८ ॥
अशक्यरूपं पुरुषैरध्वानं गन्तुमिच्छसि ।
यथा निश्चेतनो बालः कूलस्थः कूलमुत्तरम् ।
तर्तुमिच्छति मन्दात्मा तथा त्वं कर्तुमिच्छसि ॥ ४९ ॥
अन्तर्महीं वा यदि वोर्ध्वमुत्पतेः समुद्रपारं यदि वा प्रधावसि ।
तथापि तेषां न विमोक्षमर्हसि प्रमाथिनो देवसुता हि खेचराः ॥५०॥

सुमुखी, मी हें राज्य तुला दिलें आहे; तूं याची मालकीण आहेस. वरारोहे, तूं माझा स्वीकार कर, व उत्तम विलास भोग" (४५). याप्रमाणें कीचक त्या साध्वीला अशुभ भाषण बोलला; तेव्हां त्या भाषणाची निंदा करून तिनें त्याला प्रत्युत्तर दिलें:-(४६).

सैरंध्री म्हणाली:—"सूतपुत्रा, तूं असा बहकून जाऊं नकोस. आज आपल्या जिवास मुकूं नको. कारण, पांच थोर पुरुष माझें नित्य रक्षण करतात समजलास? (४७). मी तुला कधींहि प्राप्त होणार नाहीं; (कारण) माझे पति गंधर्व आहेत. ते रागावले असतां तुला ते ठार करतील. (हा मूर्खपणा) पुरे कर. तूं नाश पावूं नकोस ! ( ४८ ). पुरुषमात्रास केवळ अगम्य अशा मार्गानें जाण्याचें तूं मनांत आणीत आहेस. ज्याप्रमाणें चलनवलन करण्यासहि असमर्थ असा एखादा मूर्ख मुलगा नदीच्या एका तीरावर बसला असतां पलीकडच्या तीरावर पोहून जाण्याचें मनांत आणितो, त्याप्रमाणें करण्याचें तूं इच्छीत आहेस (४९). पृथ्वीच्या पोटांत दडून बसलास, अथवा आकाशांत उडालास, किंवा समुद्राच्या पार पळालास, तरी त्यांच्या हातून सुटणें तुला शक्य नाहीं. ते देवांचे पुत्र मोठे बलाढ्य आकाशांतून संचार करणारे आहेत ( ५० ).

त्वं कालरात्रीमिव कश्चिदातुरः किं मां दृढं प्रार्थयसेऽद्य कीचक ।
किं मातुरङ्के शयितो यथा शिशुश्चन्द्रं जिघृक्षुरिव मन्यसे हि माम्॥५१॥
तेषां प्रियां प्रार्थयतो न ते भुवि गत्वा दिवं वा शरणं भविष्यति ।
न वर्तते कीचक ते दृशा[1] शुभं या तेन संजीवनमर्थयेत सा ॥ ५२॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि कीचककृष्णासंवादे चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ [ ४२१ ]

कीचका, एखादा मरणोन्मुख मनुष्य कालरात्रीची मार्गप्रतीक्षा करतो, त्याप्रमाणें आज तूं माझी इतकी प्रार्थना कां करीत आहेस? मातेच्या अंकावर पडलेला बालक चंद्र घेण्याची इच्छा करितो, त्याप्रमाणें तूं मला (प्राप्य) मानीत आहेस! (५१) त्यांच्या प्रियेचा अभिलाष करणाऱ्या तुला या पृथ्वीवर किंवा स्वर्गांत जाऊनहि थारा मिळणार नाहीं. कीचका, तुला बुद्धिच[1] ( अक्कलच ) नाहीं, जी शुभ इच्छील व तेणेंकरून तूं जिवंत राहशील" ( ५२ ).

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील कीचकवध–उपपर्वांत कीचक–द्रौपदी संवादाविषयीं १४ वा अध्याय संपला.

## अध्याय १५

[ सत्तेच्या जोरावर सुदेष्णा द्रौपदीस कीचकाकडे पाठविते, द्रौपदीच्या सत्व-रक्षणार्थ सूर्य राक्षसास पाठवितो. विराटसभेंत कीचकाची फजिती. ]

वैशम्पायन उवाच—प्रत्याख्यातो राजपुत्र्या सुदेष्णां कीचकोऽब्रवीत् ।
अमर्यादेन कामेन घोरेणाऽभिपरिप्लुतः ॥ १ ॥

यथा कैकेयि सैरन्ध्री समेयात्तद्विधीयताम् ।
येनोपायेन सैरन्ध्री भजेन्मां गजगामिनी ॥
तं सुदेष्णे परीप्सस्व प्राणान्मोहात्प्रहासिषम् ॥ २ ॥

वैशंपायन म्हणाला:—राजपुत्री द्रौपदीनें असा धिःकार केल्यावर, अमर्याद व घोर कामवासनेनें घेरलेला तो कीचक सुदेष्णेस म्हणाला:–(१) "कैकेयी, जेणेंकरून सैरंध्री मला प्राप्त होईल अशी कांहीं तजवीज कर. सुदेष्णे, ती गजगामिनी मला लाभेल अशी युक्ति तूं योज. नाहींपेक्षां मला वेड लागून मी प्राणत्यागहि करीन" ( २ ).

[1] या श्लोकांत अपपाठ दिसतो. नी. दोन आणखी पाठ देतो. अन्वय या पाठाचा दृशा दृष्टिर्बुद्धिः या शुभं अर्थयेत तेन संजीवनं भवतीति शेषः ( नी. )

वैशम्पायन उवाच— तस्य सा बहुशः श्रुत्वा वाचं विलपतस्तदा ।
विराटमहिषी देवी कृपां चक्रे मनस्विनी ॥ ३ ॥
स्वमन्त्रमभिसंधाय तस्यार्थमनुचिन्त्य च ।
उद्योगं चैव कृष्णायाः सुदेष्णा सूतमब्रवीत् ॥ ४ ॥
पर्वाणि त्वं समुद्दिश्य सुरामन्नं च कारय ।
तत्रैनां प्रेषयिष्यामि सुराहारीं तवाऽन्तिकम् ॥ ५ ॥
तत्र संप्रेषितामेनां विजने निरवग्रहे ।
सान्त्वयेथा यथाकामं सान्त्वमाना रमेद्यदि ॥ ६ ॥
वैशम्पायन उवाच— इत्युक्तः स विनिष्क्रम्य भगिन्या वचनात्तदा ।
सुरामाहारयामास राजार्हां सुपरिष्कृताम् ॥ ७ ॥
भक्ष्यांश्च विविधाकारान्बहूंश्चोच्चावचांस्तदा ।
कारयामास कुशलैरन्नं पानं सुशोभनम् ॥ ८ ॥
तस्मिन्कृते तदा देवी कीचकेनोपमन्त्रिता ।
सुदेष्णा प्रेषयामास सैरन्ध्रीं कीचकालयम् ॥ ९ ॥

**वैशंपायन** म्हणाले:— याप्रमाणें त्यानें नानाप्रकारें केलेली विनवणी ऐकून विराटाच्या मनस्विनी राणीला त्याची दया आली ( ३ ). आपण कीचकास पूर्वी दिलेली सल्ला मनांत आणून, आणि त्याच्या कार्यसिद्धीसाठीं द्रौपदीकडे कोणती कामगिरी सोंपवावी याची योजना मनांत आणून सुदेष्णा कीचकाला म्हणाली:—( ४ ) "पर्वणीच्या (उत्सवाच्या) दिवशीं तूं ( मुद्दाम मजकरितां म्हणून ) मद्य व अन्न तयार करीव, म्हणजे त्या प्रसंगीं हिला मी तुझ्याजवळ सुरा आणण्यासाठीं पाठवीन ( ५ ). याप्रमाणें हिला तुजकडे पाठविल्यावर जेथें कशाचाहि अडथळा नाहीं, अशा एकांतांत तूं पाहिजे तसें हिचें मन वळव, आणि सुखासमाधानानें वश झाली तर पहा" ( ६ ).

**वैशंपायन** म्हणाले:— असें ती म्हणाल्यावर कीचक तेथून निघून गेला; आणि त्यानें बहिणीच्या सांगण्याप्रमाणें, त्याचवेळीं राजांनीं सेवन करण्यास योग्य अशा प्रकारचें उत्तम बनविलेलें मद्य आणविलें ( ७ ); आणि कुशल आचाऱ्यांकडून नानाप्रकारचीं लहान मोठीं पक्कान्नें, उत्तम अन्नें व सुंदर पेयें तयार करविलीं ( ८ ). याप्रमाणें सर्व सिद्धता केल्यावर त्यानें सुदेष्णेस वर्दी दिली. व देवी सुदेष्णेनें सैरंध्रीस कीचकाच्या घरीं पाठविलें ( ९ ).

सुदेष्णोवाच— उत्तिष्ठ गच्छ सैरन्ध्रि कीचकस्य निवेशनम् ।
पानमानय कल्याणि पिपासा मां प्रबाधते ॥ १० ॥
सैरन्ध्र्युवाच— न गच्छेयमहं तस्य राजपुत्रि निवेशनम् ।
त्वमेव राज्ञि जानासि यथा स निरपत्रपः ॥ ११ ॥
न चाऽहमनवद्याङ्गि तव वेश्मनि भामिनि ।
कामवृत्ता भविष्यामि पतीनां व्यभिचारिणी ॥ १२ ॥
त्वं चैव देवि जानासि यथा स समयः कृतः ।
प्रविशन्त्या मया पूर्वं तव वेश्मनि भामिनि ॥ १३ ॥
कीचकस्तु सुकेशान्ते मूढो मदनदर्पितः ।
सोऽवमंस्यति मां दृष्ट्वा न यास्ये तत्र शोभने ॥ १४ ॥
सन्ति बह्व्यस्तव प्रेष्या राजपुत्रि वशानुगाः ।
अन्यां प्रेषय भद्रं ते स हि मामवमंस्यते ॥ १५ ॥
सुदेष्णोवाच—नैव त्वां जातु हिंस्यात्स इतः संप्रेषितां मया ।
इत्युक्त्वा प्रददौ पात्रं सपिधानं हिरण्मयम् ॥ १६ ॥

**सुदेष्णा** म्हणालीः—"सैरंध्री ऊठ, कीचकाच्या घरीं जा, आणि मद्य घेऊन ये. कल्याणि, मद्य पिण्याच्या इच्छेनें मी फारच व्याकुळ झाल्यें आहें" (१०).

**सैरंध्री** म्हणालीः—"राजपुत्री, मी त्याच्या घरीं जाणार नाहीं. राज्ञि, तो किती निर्लज्ज आहे, हें तूं जाणतेसच ( ११ ). सुंदरी, भामिनी, तुझ्या घरीं राहिल्यें असलें तथापि येथें मी मनसोक्त वर्तन करून आपल्या पतीसंबंधानें दुष्ट आचार करणार नाहीं ( १२ ). भामिनी, पूर्वी मी तुझ्या घरांत पाय ठेवतांनाच याविषयीं कशी प्रतिज्ञा केलेली आहे, हें तुला माहीत आहेच (१३). सुकेशी, कीचक तर धुंद व काममदानें चढून गेलेला आहे. तो मला पाहतांच माझी कांहीं खोडी करील, यास्तव शोभने, मी तिकडे जाणार नाहीं ( १४ ). राजपुत्री, पुष्कळ आज्ञापालक दासी तुझ्या आज्ञेंत आहेत; त्यांपैकीं एखाद्या दुसरीस पाठीव. कारण, तुझें कल्याण असो, तो माझा अपमान करील" (१५).

**सुदेष्णा** म्हणालीः—"मी तुला येथून पाठविल्यावर तो तुला कांहीं खाणार नाहीं," असें म्हणून तिनें एक झांकणासह सुवर्णपात्र दिलें ( १६ )

सा शङ्कमाना रुदती दैवं शरणमीयुषी ।
प्रातिष्ठत सुराहारी कीचकस्य निवेशनम् ॥ १७ ॥
सैरन्ध्र्युवाच— यथाऽहमन्यं भर्तृभ्यो नाऽभिजानामि कंचन ।
तेन सत्येन मां प्राप्तां मा कुर्यात्कीचको वशे ॥ १८ ॥
वैशम्पायन उवाच— उपातिष्ठत सा सूर्यं मुहूर्तमबला ततः ।
स तस्यास्तनुमध्यायाः सर्वं सूर्योऽवबुद्धवान् ॥ १९ ॥
अन्तर्हितं ततस्तस्या रक्षो रक्षार्थमादिशत् ।
तच्चैनां नाऽजहात्तत्र सर्वावस्थास्वनिन्दिताम् ॥ २० ॥
तां मृगीमिव संत्रस्तां दृष्ट्वा कृष्णां समीपगाम् ।
उदतिष्ठन्मुदा सूतो नावं लब्ध्वेव पारगः ॥ २१ ॥ [४४२]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
कीचकवधपर्वणि द्रौपदीसुराहरणे पञ्चदशोऽध्यायः ॥ १५ ॥

(तेव्हां) भीतभीत व रडत रडत ती ( द्रौपदी ) दैवावर हवाला ठेवून मद्य आणण्यासाठीं कीचकाच्या घराकडे जाण्यास निघाली ( १७ ).

सैरंध्री म्हणाली:—"ज्याअर्थी मी पतींवांचून दुसऱ्या कोणालाहि मी ओळखीत नाहीं, त्याअर्थी त्या पुण्याईच्या जोरावर मी तेथें गेल्यें असतां कीचक मला कबज्यांत न घेवो" ( १८ ).

वैशंपायन म्हणाले:—मग त्या अबलेनें मुहूर्तमात्र सूर्याची प्रार्थना केली, तेव्हां त्या तनुमध्यमेचा सर्व अभिप्राय सूर्यानें जाणला ( १९ ). नंतर तिच्या रक्षणासाठीं एका गुप्त राक्षसास त्यानें आज्ञा केली. तेव्हां त्या ठिकाणीं कोणत्याहि अवस्थेंत तो राक्षस त्या अनिंदितेला सोडून दूर गेला नाहीं ( २० ). मग बावरलेल्या मृगीप्रमाणें द्रौपदी जवळ येत आहे असें पाहून, नदीपार होऊं इच्छिणारास नांव सांपडावी, त्याप्रमाणें तो सूतपुत्र कीचक हर्षानें उठून उभा राहिला ( २१ ).

याप्रमाणें महाभारतांत विराटपर्वांत कीचकवध-उपपर्वांत द्रौपदीचें सुरा आणणें
याविषयीं १५ वा अध्याय संपला.



सैरंध्री धांवत असतां कीचकानें तिची वेणी धरली.

# अध्याय १६

[ कीचकाचे द्रौपदीस वश करण्याचे प्रयत्न व कीचकाची फजिती. ]

कीचक उवाच— स्वागतं ते सुकेशान्ते सुव्युष्टा रजनी मम ।
स्वामिनी त्वमनुप्राप्ता प्रकुरुष्व मम प्रियम् ॥ १ ॥
सुवर्णमालाः कम्बूश्च कुण्डले परिहाटके ।
नानापत्तनजे शुभ्रे मणिरत्नं च शोभनम् ॥ २ ॥
आहरन्तु च वस्त्राणि कौशिकान्यजिनानि च ।
अस्ति मे शयनं दिव्यं त्वदर्थमुपकल्पितम् ।
एहि तत्र मया सार्द्धं पिबस्व मधुमाधवीम् ॥ ३ ॥
द्रौपद्युवाच— अप्रैषीद्राजपुत्री मां सुराहारीं तवाऽन्तिकम् ।
पानमाहर मे क्षिप्रं पिपासा मेऽति चाऽब्रवीत् ॥ ४ ॥
कीचक उवाच—अन्या भद्रे नयिष्यन्ति राजपुत्र्याः प्रतिश्रुतम् ।
इत्येनां दक्षिणे पाणौ सूतपुत्रः परामृशत् ॥ ५ ॥

**कीचक** म्हणाला:—"सुकेशी, तुझें स्वागत असो. आज माझी रात्र चांगलीच उगवली[1] ( सुरू झाली ). तूं माझी मालकीण घरीं येऊन पोचलीस; माझे मनोरथ पूर्ण कर ( १ ). सोन्याच्या माळा, शंखाचे चुडे, निरनिराळ्या नगरांतून आणलेलीं शुभ्र सोन्यानें मढवलेलीं कुंडलें, आणि सुंदर हिरे व रत्नें (२), ( तसेंच ) रेशमी वस्त्रें व मृगचर्में तुझ्या करितां ( नोकर ) आणून देतील; माझी दिव्य शय्या तुझ्यासाठीं तयार करून ठेविली आहे. त्याठिकाणीं चल, आणि माझ्याबरोबर मधुमालती पुष्पांपासून केलेली मधुर मदिरा प्राशन कर "( ३).

**द्रौपदी** म्हणाली:—"राजपुत्रीनें सुरा आणण्याकरितां मला तुझ्याकडे पाठविलें आहे. ' मला तहान लागली आहे; लवकर सुरा आणून दे ' असें तिनें मला सांगितलें आहे " ( ४ ).

**कीचक** म्हणाला:—"कल्याणि, तूं राजपुत्रीला (आणून देण्याचें) कबूल केलेलें पेय दुसऱ्या ( दासी ) घेऊन जातील. " असें म्हणून त्या सूतपुत्रानें तिचा उजवा हात धरला ( ५ ).

१ 'व्युष्टं प्रभातं'. पण ही वेळ सकाळची असणें शक्य नाहीं. (नी.) मुख्य आहे.

द्रौपद्युवाच—
यथैवाऽहं नाऽभिचरे कदाचित्पतीन्मदाद्वै मनसाऽपि जातु ।
तेनैव सत्येन वशीकृतं त्वां द्रष्टास्मि पापं परिकृष्यमाणम् ॥ ६ ॥
वैशम्पायन उवाच—
स तामभिप्रेक्ष्य विशालनेत्रां जिघृक्षमाणः परिभर्त्सयन्तीम् ।
जग्राह तामुत्तरवस्त्रदेशे स कीचकस्तां सहसाऽऽक्षिपन्तीम् ॥ ७ ॥
प्रगृह्यमाणा तु महाजवेन मुहुर्विनिःश्वस्य च राजपुत्री ।
तया समाक्षिप्ततनुः स पापः पपात शाखीव निकृत्तमूलः ॥८॥
सा गृहीता विधुन्वाना भूमावाक्षिप्य कीचकम् ।
सभां शरणमागच्छद्यत्र राजा युधिष्ठिरः ॥ ९ ॥
तां कीचकः प्रधावन्तीं केशपाशे परामृशत् ।
अथैना पश्यतो राज्ञः पातयित्वा पदाऽवधीत् ॥ १० ॥
तस्या योऽसौ तदाऽर्केण राक्षसः संनियोजितः ।
स कीचकमपोवाह वातवेगेन भारत ॥ ११ ॥

**द्रौपदी** म्हणाली:—"ज्याअर्थी मी उन्मत्तपणें कधीं मनानेंहि पतींचें अतिक्रमण केलें नाहीं, त्याअर्थी तें सत्याचरणच तुज पाप्याला स्ववश करून ( फरफर ) ओढीत आहे हें मी पाहीन" ( ६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—द्रौपदी याप्रमाणें डोळे वटारून त्याची निर्भर्त्सना करीत असतां, तिला धरूं इच्छिणाऱ्या त्या कीचकानें तिजकडे पहात, द्रौपदी एकदम हिसडा मारून आपला हात सोडवीत असतां तिचा पदर पकडला आणि तो तिला मोठ्या जोरानें ओढूं लागला (७); परंतु वरचेवर सुस्कारे टाकीत त्या राजपुत्रीनें त्याला जो धक्का मारला, त्यासरसा मुळाशीं तोडलेल्या वृक्षाप्रमाणें तो पापी कीचक खालीं पडला ( ८ ). ( याप्रमाणें ) कीचक पकडीत असतां ( थरथर ) कांपणाऱ्या द्रौपदीनें त्यास भूमीवर आदळून, जेथें युधिष्ठिर सभेंत बसला होता, तेथें रक्षणाकरितां धांव घेतली (९).ती धांवत असतां कीचकानें तिची वेणी धरली, आणि राजाच्या देखत तिला खालीं पाडून तिला लाथ मारली (१०). तेव्हां भारता, सूर्यानें तिजबरोबर (जाण्यास) ज्याची योजना केली होती, त्या राक्षसानें वायुवेगानें कीचकास दूर उडविलें(११).

स पपात तदा भूमौ रक्षोबलसमाहतः ।
विघूर्णमानो निश्चेष्टश्छिन्नमूल इव द्रुमः ॥ १२ ॥
तां चाऽऽसीनौ ददृशतुर्भीमसेनयुधिष्ठिरौ ।
अमृष्यमाणौ कृष्णायाः कीचकेन पराभवम् ॥ १३ ॥
तस्य भीमो वधं प्रेप्सुः कीचकस्य दुरात्मनः ।
दन्तैर्दन्तांस्तदा रोषान्निष्पिपेष महामनाः ॥ १४ ॥
धूमच्छाया ह्यभजतां नेत्रे चोच्छ्रितपक्ष्मणी ।
सस्वेदा भ्रुकुटी चोग्रा ललाटे समवर्तत ॥ १५ ॥
हस्तेन ममृदे चैव ललाटं परवीरहा ।
भूयश्च त्वरितः क्रुद्धः सहसोत्थातुमैच्छत ॥ १६ ॥
अथाऽवमृद्नादङ्गुष्ठमङ्गुष्ठेन युधिष्ठिरः ।
प्रबोधनभयाद्राजा भीमं तं प्रत्यषेधयत् ॥ १७ ॥
तं मत्तमिव मातङ्गं वीक्षमाणं वनस्पतिम् ।
स तमावारयामास भीमसेनं युधिष्ठिरः ॥ १८ ॥

त्याबरोबर त्या राक्षसाच्या बलानें जर्जर होऊन कीचक भुईवर छिन्नमूल वृक्षाप्रमाणें निश्चेष्ट पडला ( १२ ). तेथें बसलेल्या भीमसेनानें व युधिष्ठिरानें हा सर्व प्रकार पाहिला. कीचकानें द्रौपदीची केलेली विटंबना त्यांस सहन झाली नाहीं ( १३ ). भीमसेनास ( तर ) 'त्या दुष्ट कीचकास केव्हां ठार करीन ' असें होऊन गेलें. तो महामना रागानें दांतांनीं दांत घासूं लागला ( १४ ). त्याचे डोळे वटारले जाऊन त्यावर धूर चढला, आणि घामानें भिजलेल्या भिंवया कपाळावर भयंकर भासूं लागल्या ( १५ ). शत्रूंच्या वीरांस मारणारा तो भीम आपलें कपाळ हातानें चोळूं लागला आणि लागलीच रागारागानें एकदम उठण्याची इच्छा करूं लागला. ( १६ ). आतां, आपण ओळखले जाऊं या भीतीनें लागेच युधिष्ठिरानें ( हाताच्या ) अंगठ्यानें त्याचा ( पायाचा ) आंगठा दाबून ( खुणेनें ) भीमसेनाचा निषेध केला ( १७ ). महावृक्षाकडे पाहणाऱ्या मत्तगजाप्रमाणें दिसणाऱ्या त्या भीमास युधिष्ठिरानें आवरून धरीत म्हटलें:—( १८ )

आलोकयसि किं वृक्षं सूद दारुकृतेन वै ।
यदि ते दारुभिः कृत्यं बहिर्वृक्षान्निगृह्यताम् ॥ १९ ॥

सा सभाद्वारमासाद्य रुदती मत्स्यमब्रवीत् ।
अवेक्षमाणा सुश्रोणी पतींस्तान्दीनचेतसः ॥ २० ॥

आकारमभिरक्षन्ती प्रतिज्ञाधर्मसंहिता ।
दह्यमानेव रौद्रेण चक्षुषा द्रुपदात्मजा ॥ २१ ॥

द्रौपद्युवाच—येषां वैरी न स्वपिति षष्ठेऽपि विषये वसन् ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २२ ॥

ये दद्युर्न च याचेयुर्ब्रह्मण्याः सत्यवादिनः ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २३ ॥

येषां दुन्दुभिनिर्घोषो ज्याघोषः श्रूयतेऽनिशम् ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २४ ॥

"बल्लवा, तुला लांकडें पाहिजेत म्हणून तूं वृक्षाकडे पाहतोस कीं काय ? तुला लांकडांची जरूरी असेल तर बाहेर जाऊन वृक्ष तोड" ( १९ ). सभाद्वारीं रडत असलेली ती सुश्रोणी द्रौपदी मनांत खिन्न झालेल्या आपल्या पतींकडे पहात मत्स्यपति विराटास म्हणाली ( २० ). अज्ञातवासाची प्रतिज्ञा शेवटास जाण्यासाठीं आपलें खरें स्वरूप प्रगट होऊं नये म्हणून, त्या द्रुपदाच्या कन्येनें फार सावधगिरी बाळगिली, तरी पण तिची घोर दृष्टि ( जणूं काय ) दग्ध करीतच होती ( २१ ).

**द्रौपदी** म्हणाली:—"ज्यांचा वैरी ( पांच देश मध्यें टाकून ) सहाव्या देशांत रहात असला तरी त्यास ( भयामुळें ) झोंप येत नाहीं, त्यांच्या मज मानिनी भार्येला सूतपुत्रानें लाथ मारली ! ( २२ ) जे कधींहि याचना करणार नाहींत, ( उलट ) दान देतील, अशा ब्रह्मनिष्ठ व सत्य भाषण करणारांची मी सन्माननीय भार्या असतां, मला या सूतपुत्रानें पायानें तुडविलें ! ( २३ ) ज्यांच्या दुंदुभीचा ( युद्ध-नगाऱ्याचा ) घोष व प्रत्यंचेचा टणत्कार रात्रंदिवस ऐकूं येतो, त्यांच्या मानी स्त्रियेला सारथ्याच्या पुत्रानें लाथ मारली ! ( २४ )

ये च तेजस्विनो दान्ता बलवन्तोऽतिमानिनः ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २५ ॥
सर्वलोकमिमं हन्युर्धर्मपाशसितास्तु ये ।
तेषां मां मानिनीं भार्यां सूतपुत्रः पदाऽवधीत् ॥ २६ ॥
शरणं ये प्रपन्नानां भवन्ति शरणार्थिनाम् ।
चरन्ति लोके प्रच्छन्नाः क्व नु तेऽद्य महारथाः ॥ २७ ॥
कथं ते सूतपुत्रेण वध्यमानां प्रियां सतीम् ।
मर्षयन्ति यथा क्लीबा बलवन्तोऽमितौजसः ॥ २८ ॥
क्व नु तेषाममर्षश्च वीर्यं तेजश्च वर्तते ।
न परीप्सन्ति ये भार्यां वध्यमानां दुरात्मना ॥ २९ ॥
मयाऽत्र शक्यं किं कर्तुं विराटे धर्मदूषके ।
यः पश्यन्मां मर्षयति वध्यमानामनागसम् ॥ ३० ॥
न राजा राजवत्किञ्चित्समाचरति कीचके ।
दस्यूनामिव धर्मस्ते न हि संसदि शोभते ॥ ३१ ॥

जे मोठे तेजस्वी, मनोनिग्रही, बलवान् व अतिशय मानी आहेत, त्यांच्या या अभिमानी पत्नीला सूताच्या पोरानें लत्ताप्रहार केला अं ! ( २५ ) माझे पति सर्व जगाचा नाश करतील, पण केवळ ते धर्माच्या पाशानें बद्ध झालेले आहेत. त्यांच्या भार्येला—मज मानिनीला—सूतपुत्रानें लत्ताप्रहार केला ! ( २६ ) कोणी रक्षणाविषयीं प्रार्थना करण्यास आले असतां, त्याचें जे रक्षण करितात, ते महारथी आज गुप्तपणें जगांत कोठें आहेत ? ( २७ ) ते बलाढ्य व अमित तेजाचे असतांना, त्यांच्या प्रिय धर्मनिष्ठ पत्नीला सूतपुत्रानें केलेला पादप्रहार षंढाप्रमाणें कसा सहन करीत आहेत ? (२८) दुरात्मा कीचक (प्रत्यक्ष) आपल्या भार्येची अमर्यादा करीत असतां तिचें रक्षण करण्याचें ज्यांच्या मनांत येत नाहीं त्यांची असहिष्णुता, पराक्रम, आणि तेज कोठें आहे ? ( २९ ) मी निरपराधी असतां माझा असा अपमान झालेला जो सहन करीतो, तो विराटराजा धर्मानें दुर्बल झाला ! त्याला मी काय करावें ? ( ३० ) हा राजा कीचकाविषयीं राजकर्तृत्वास अनुसरून वागत नाहीं ! हा तुझा अनार्यासारखा धर्म, सभेंत शोभत नाहीं ( ३१

नाहमेतेन युक्तं वै हन्तुं मत्स्य तवाऽन्तिके ।
सभासदोऽत्र पश्यन्तु कीचकस्य व्यतिक्रमम् ॥ ३२ ॥
कीचको न च धर्मज्ञो न च मत्स्यः कथञ्चन ।
सभासदोऽप्यधर्मज्ञा य एनं पर्युपासते ॥ ३३ ॥
वैशम्पायन उवाच—एवंविधैर्वचोभिः सा तदा कृष्णाऽश्रुलोचना ।
उपालभत राजानं मत्स्यानां वरवर्णिनी ॥ ३४ ॥
विराट उवाच—परोक्षं नाऽभिजानामि विग्रहं युवयोरहम् ।
अर्थतत्त्वमविज्ञाय किं नु स्यात्कौशलं मम ॥ ३५ ॥
वैशम्पायन उवाच—ततस्तु सभ्या विज्ञाय कृष्णां भूयोऽभ्यपूजयन् ।
साधु साध्विति चाऽप्याहुः कीचकं च व्यगर्हयन् ॥ ३६ ॥
सभ्या ऊचुः—यस्येयं चारुसर्वाङ्गी भार्या स्यादायतेक्षणा ।
परो लाभस्तु तस्य स्यान्न च शोचेत्कथञ्चन ॥ ३७ ॥

मत्स्यराजा, तुझ्या सन्निध यानें मला मारावें हें बरोबर नाहीं. कीचकाच्या या उच्छृंखलपणाकडे निदान सभासदांनीं तरी लक्ष पुरवावें ( ३२ ). कीचक तर धर्मज्ञ नाहींच, परंतु मत्स्यराजालाहि धर्म दिसत नाहीं, आणि त्याच्याभोंवतीं सभासद बसतात त्यांनाहि धर्म कळत नाहीं ! " ( ३३ )

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें बोलून त्यावेळीं त्या सुंदरीनें डोळ्यांत पाणी आणून मत्स्याधिपति विराटराजाची निंदा केली ( ३४ ).

**विराट** म्हणाला:—" तुम्हां दोघांचें भांडण माझ्या परोक्ष झाल्यानें त्याची मला माहिती नाहीं. ( तेव्हां ) यांतील तथ्य काय आहे हें समजल्याशिवाय मी काय कुशलतेनें करावें ? " ( ३५ )

**वैशंपायन** म्हणाला:—मग द्रौपदीचें म्हणणें काय आहे हें समजून घेतल्यावर सभासद तिची अत्यंत प्रशंसा करूं लागले. तिला " शाबास, शाबास" असें म्हणून त्यांनीं कीचकाची निंदा केली ( ३६ ).

**सभासद** म्हणाले:—"ही दीर्घनयना चारुसर्वांगी ज्याची भार्या असेल त्याचा मोठा लाभ होईल व तो केव्हांहि दुःख पावणार नाहीं ( ३७ ).

न हीदृशी मनुष्येषु सुलभा वरवर्णिनी ।
नारी सर्वानवद्याङ्गी देवीं मन्यामहे वयम् ॥ ३८ ॥
वैशम्पायन उवाच— एवं सम्पूजयन्तस्ते कृष्णां प्रेक्ष्य सभासदः ।
युधिष्ठिरस्य कोपात्तु ललाटे स्वेद आगमत् ॥ ३९ ॥
अथाऽब्रवीद्राजपुत्रीं कौरव्यो महिषीं प्रियाम् ।
गच्छ सैरन्ध्रि माऽत्र स्थाः सुदेष्णाया निवेशनम् ॥ ४० ॥
भर्त्तारमनुरुन्धन्त्यः क्लिश्यन्ते वीरपत्नयः ।
शुश्रूषया क्लिश्यमानाः पतिलोकं जयन्त्युत ॥ ४१ ॥
मन्ये न कालं क्रोधस्य पश्यन्ति पतयस्तव ।
तेन त्वां नाभिधावन्ति गन्धर्वाः सूर्यवर्चसः ॥ ४२ ॥
अकालज्ञाऽसि सैरन्ध्रि शैलूषीव विरोदिषि ।
विघ्नं करोषि मत्स्यानां दीव्यतां राजसंसदि ॥ ४३ ॥

खरोखर अशाप्रकारची सुन्दरी—सर्वांगांनीं निर्दोष स्त्री—मनुष्यांत सांपडणार नाहीं. ही कोणी तरी देवताच असावी, असें आम्हांस वाटतें " ( ३८ ).

**वैशंपायन** म्हणाले:—याप्रमाणें ते सभासद कृष्णेकडे पाहून तिची प्रशंसा करूं लागले; पण युधिष्ठिराच्या कपाळावर रागामुळें घाम आला (३९). मग तो कुरुराजा आपल्या प्रिय राणी राजपुत्री द्रौपदीला म्हणाला:— " सैरंध्रि, जा, येथें उभी राहूं नको. सुदेष्णेच्या महालांत जा ( ४० ). पतीच्या मनाप्रमाणें वागणाऱ्या वीरपत्नींना असेच क्लेश होत असतात. ( परंतु ) पतिसेवा करण्यांत शरीर झिजविणाऱ्या (साध्वी स्त्रिया) शेवटीं पतिलोक मिळवीत असतात ( ४१ ). मला वाटतें कीं, हा क्रोधाचा समय नाहीं असें तुझ्या पतींस वाटत आहे, आणि त्यामुळेंच ते सूर्यासारखे तेजस्वी गंधर्व तुझ्या रक्षणार्थ धांवून येत नाहींत ( ४२ ). सैरंध्री, तुला काळवेळ समजत नाहीं, आणि म्हणून एखाद्या नटीसारखी तूं येथें रडत आहेस. तूं या राजसभेंत द्यूत खेळणाऱ्या मत्स्यदेशच्या पुरुषांनां विघ्न मात्र करीत आहेस ( ४३ ).

गच्छ सैरन्ध्रि गन्धर्वाः करिष्यन्ति तव प्रियम् ।
व्यपनेष्यन्ति ते [1]दुःखं येन ते विप्रियं कृतम् ॥ ४४ ॥
सैरन्ध्र्युवाच—अतीव तेषां घृणिनामर्थेऽहं धर्मचारिणी ।
तस्य तस्यैव ते वध्या येषां ज्येष्ठोऽक्षदेविता ॥ ४५ ॥
वैशम्पायन उवाच—इत्युक्त्वा प्राद्रवत्कृष्णा सुदेष्णाया निवेशनम् ।
केशान्मुक्त्वा च सुश्रोणी संरम्भाल्लोहितेक्षणा ॥ ४६ ॥
शुशुभे वदनं तस्या रुदत्याः सुचिरं तदा ।
मेघलेखाविनिर्मुक्तं दिवीव शशिमण्डलम् ॥ ४७ ॥
सुदेष्णा उवाच—कस्त्वाऽवधीद्वरारोहे कस्माद्रोदिषि शोभने ।
कस्याऽद्य न सुखं भद्रे केन ते विप्रियं कृतम् ॥ ४८ ॥
द्रौपद्युवाच— कीचको माऽवधीत्तत्र सुराहारीं गतां तव ।
सभायां पश्यतो राज्ञो यथैव विजने वने ॥ ४९ ॥

सैरंध्री, जा, गंधर्व तुझें प्रिय करतील. ज्यानें तुजशीं वाईट वर्तन केलें, त्या दुःख देणाऱ्यास[1] दूर करतील" ( ४४ ).

**सैरंध्री** म्हणाली:—"त्या दयावंत पतींमुळें मज धर्मचारिणीला फारच दुःख सोसावें लागत आहे; ज्यांच्यांतील वडील जुगारी बनला आहे, त्यांची वाटेल त्या माणसानें अप्रतिष्ठा करावी" ( ४५ ).

**वैशंपायन** म्हणाला:—असें म्हणत केश मोकळे सोडलेली व डोळे लाल झालेली सुंदरी द्रौपदी सुदेष्णेच्या मंदिराकडे धांवत निघून गेली (४६). फार वेळ रडत असल्यामुळें ( रडें संपल्यावर ) तिचें तोंड मेघपटल निघून गेल्यावर आकाशांतील चंद्रमंडलाप्रमाणें शोभत होतें ( ४७ ).

**सुदेष्णा** म्हणाली:—"वरारोहे, तुला कोणीं दुखविलें बरें ? सुंदरी, तूं रडतेस कां ? कल्याणि, आज कोणीं आपल्या सुखाचें वाटोळें करून घेतलें ? तुझा अपराध कोणी केला ?" ( ४८ )

**द्रौपदी** म्हणाली:—" तुजकरितां सुरा आणण्याकरितां मी गेलें असतां कीचकानें सभेमध्यें राजा पहात असतां, जसें निर्जन वनांत (एकाद्यानें) मारावें तसें मला मारलें" ( ४९ ).

---

१ दुःखं दुःखयितारं ( नी. ). व्यपनेष्यन्ति जीविताद्दिति शेषः ( नी. ) पण याची जरूरी नाहीं.



सैरंध्री–माझ्या मनांतील कोड पुरविणारा भीमावांचून दुसरा कोणी नाहीं

सुदेष्णोवाच—घातयामि सुकेशान्ते कीचकं यदि मन्यसे ।
योऽसौ त्वां कामसंमत्तो दुर्लभामवमन्यते ॥ ५० ॥
सैरन्ध्र्युवाच—अन्ये चैनं वधिष्यन्ति येषामागः करोति सः ।
मन्ये चैवाद्य सुव्यक्तं यमलोकं गमिष्यति ॥ ५१ ॥ [४९३]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
कीचकवधोपपर्वणि द्रौपदीपरिभवे षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

सुदेष्णा म्हणाली:—"सुकेशी, तूं सांगत असशील तर काममोहित होऊन, ज्यानें दुष्प्राप्य अशा तुझा अपमान केला त्या कीचकाला मी ठार करवीन" (५०).

सैरंध्री म्हणाली:—"ज्यांचा त्यानें अपराध केला आहे, ते दुसरे गंधर्व त्याचा वध करतील. मला असें वाटतें कीं, तो आजच खात्रीनें यमलोकीं जाईल" (५१).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वापैकीं कीचकवधोपपर्वांतील
द्रौपदीच्या अपमानाविषयीं १६ वा अध्याय संपला.

## अध्याय १७

[ शुद्धि केल्यावर द्रौपदीचे कर्तव्यविचार; ती रात्रौ एकांतात
भीमास भेटून आपलें हृद्गत दुःख सांगते. ]

वैशम्पायन उवाच—सा हता सूतपुत्रेण राजपत्नी यशस्विनी ।
वधं कृष्णा परीप्सन्ती सेनावाहस्य भामिनी ॥ १ ॥
जगामाऽऽवासमेवाऽऽथ सा तदा द्रुपदात्मजा ।
कृत्वा शौचं यथान्यायं कृष्णा सा तनुमध्यमा ॥ २ ॥
गात्राणि वाससी चैव प्रक्षाल्य सलिलेन सा ।
चिन्तयामास रुदती तस्य दुःखस्य निर्णयम् ॥ ३ ॥

वैशंपायन म्हणाला:—त्या यशस्वी राजपुत्रीला सूतपुत्रानें ताडन केल्यामुळें, ती भामिनी त्या सेनापतीचा वध करण्याची इच्छा करीत आपल्या रहाण्याच्याच ठिकाणीं गेली. आणि त्या कृशोदरी द्रुपदकन्येनें यथायोग्य रीतीनें शरीरशुद्धि करून ( १–२ ), सर्व अवयव व वस्त्रें पाण्यानें धुवून, मग ती रुदन करीत, त्या दुःखाचा शेवट कसा करावा याचें चिंतन करीत बसली (३).

किं करोमि क्व गच्छामि कथं कार्यं भवेन्मम ।
इत्येवं चिन्तयित्वा सा भीमं वै मनसाऽगमत् ॥ ४ ॥
नाऽन्यः कर्त्ता ऋते भीमान्ममाऽद्य मनसः प्रियम् ।
तत उत्थाय रात्रौ सा विहाय शयनं स्वकम् ॥ ५ ॥
प्राद्रवन्नाथमिच्छन्ती कृष्णा नाथवती सती ।
भवनं भीमसेनस्य क्षिप्रमायतलोचना ॥ ६ ॥
दुःखेन महता युक्ता मानसेन मनस्विनी ।
सैरन्ध्र्युवाच—तस्मिञ्जीवति पापिष्ठे सेनावाहे मम द्विषि ॥ ७ ॥
तत्कर्म कृतवानद्य कथं निद्रां निषेवसे ।
वैशम्पायन उवाच—एवमुक्त्वाऽथ तां शालां प्रविवेश मनस्विनी ॥८॥
यस्यां भीमस्तथा शेते मृगराज इव श्वसन् ।
तस्या रूपेण सा शाला भीमस्य च महात्मनः ॥ ९ ॥
संमूर्छितेव[1] कौरव्य प्रजज्वाल च तेजसा ।
सा वै महानसं प्राप्य भीमसेनं शुचिस्मिता ॥ १० ॥

'मी आतां काय करूं ? कोठें जाऊं ? माझें कार्य कसें सिद्धीस जाणार ?' असा विचार करतां करतां तिच्या मनानें भीमाचें स्मरण केलें (४). 'माझ्या मनांतील कोड पुरविणारा आज भीमावांचून दुसरा कोणीहि नाहीं' असें मनांत म्हणून ती रात्रीं आपल्या अंथरूणावरून उठली ( ५ ). नंतर ती सनाथ पतिव्रता विशालाक्षी द्रौपदी, नाथाचें चिंतन करीत भीमसेन निजला होता त्या घराकडे त्वरेनें धांवत गेली ( ६ ). मोठ्या मानासिक दुःखानें ग्रस्त झालेली ती मनस्विनी द्रौपदी ( मनांत भीमास म्हणाली, ) 'माझा द्वेष्टा तो पापी सेनापति (अद्याप) जिवंत असतांना (७) आणि त्यानें आज तें कर्म ( लाथ मारण्याचें ) केलें असतां तुला कशी झोंप येते ?'

**वैशंपायन** म्हणाला:—असें म्हणून त्या मनस्विनीनें त्या पाकशाळेंत प्रवेश केला ( ८ ). भीमसेन तेथें सिंहाप्रमाणें घोरत पडला होता. तिच्या रूपानें व महात्म्या भीमाच्या कांतीनें ती पाकशाळा प्रकाशानें इतकी वाढली कीं, जनमेजया, ती शाळा तेजानें जणूं काय तळपूं लागली. मुदपाकखान्यांत आल्यावर ती शुचिस्मिता द्रौपदी भीमसेनाजवळ गेली ( ९–१० ).

१ संमूर्छितेव-वृद्धिं शोभारूपां प्राप्तेव ( नी. )

सर्वश्वेतेव माहेयी वने जाता त्रिहायणी ।
उपातिष्ठत पाञ्चाली वासितेव वरर्षभम् ॥ ११ ॥
सा लतेव महाशालं फुल्लं गोमतितीरजम् ।
परिष्वजत पाञ्चाली मध्यमं पाण्डुनन्दनम् ॥ १२ ॥
बाहुभ्यां परिरभ्यैनं प्राबोधयदनिन्दिता ।
सिंहं सुप्तं वने दुर्गे मृगराजवधूरिव ॥ १३ ॥
भीमसेनमुपाश्लिष्यद्धस्तिनीव महागजम् ।
वीणेव मधुरालापा गान्धारं[2] साधु मूर्छती ।
अभ्यभाषत पाञ्चाली भीमसेनमनिन्दिता ॥ १४ ॥
उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे भीमसेन यथा मृतः ।
नाऽमृतस्य हि पापीयान्भार्यामालभ्य जीवति ॥ १५ ॥
स सम्प्रहाय शयनं राजपुत्र्या प्रबोधितः ।
उपातिष्ठत मेघाभः पर्यङ्के सोपसंग्रहे ॥ १६ ॥

तीन वर्षांची व बगळीप्रमाणें पांढरीशुभ्र कालवड फळण्यास आलेली जशी मोठ्या वृषभाजवळ उभी राहते, तद्वत् द्रौपदी श्रेष्ठ भीमसेनासन्निध उभी राहिली ( ११ ). ( आणि ) गोमतीतीरावर वाढलेल्या मोठ्या प्रफुल्ल शालवृक्षास लता कवटाळिते त्याप्रमाणें पांचालीनें त्या मध्यम पांडुपुत्राला आलिंगन दिलें (१२). सिंहिणीनें बिकट अरण्यांत निजलेल्या सिंहास जागें करावें, त्याप्रमाणें त्या साध्वीनें आपल्या बाहूंनीं कवटाळून त्यास जागें केलें ( १३ ). महागजास आलिंगन देणाऱ्या हत्तिणीप्रमाणें तिनें भीमसेनास मिठी मारली. गांधारस्वर मूर्छनेनें उत्तम देणाऱ्या वीणेप्रमाणें मधुर आवाजाची निर्दोष पांचाली भीमसेनास म्हणाली ( १४ ), "भीमसेना, ऊठ ऊठ; मेल्यासारखा निजलास काय ? कारण, जिवंत मनुष्याच्या भार्येचा अपमान करणारा पापी जिवंत राहत नाहीं" ( १५ ). राजपुत्रीनें त्यास उठविल्यावर तो घननीळ निद्रा सोडून, गाद्या हंतरलेल्या त्या

१ सर्वश्वेता बकी, माहेयी गौः (नी.) २ येथें गांधार म्हणजे युद्ध असा कित्येक अर्थश्लेष करतात; परंतु (नी.) कांहीं लिहित नाहीं, आणि महाभारतांतहि श्लेष नाहीं.

अथाऽब्रवीद्राजपुत्रीं कौरव्यो महिषीं प्रियाम् ।
केनाऽस्यर्थेन सम्प्राप्ता त्वरितेव ममाऽन्तिकम् ॥ १७ ॥
न ते प्रकृतिमान्वर्णः कृशा पाण्डुश्च लक्ष्यसे ।
आचक्ष्व परिशेषेण सर्वं विद्यामहं यथा ॥ १८ ॥
सुखं वा यदि वा दुःखं द्वेष्यं वा यदि वा प्रियम् ।
यथावत्सर्वमाचक्ष्व श्रुत्वा ज्ञास्यामि यत्क्षमम् ॥ १९ ॥
अहमेव हि ते कृष्णे विश्वास्यः सर्वकर्मसु ।
अहमापत्सु चापि त्वां मोक्षयामि पुनः पुनः ॥ २० ॥
शीघ्रमुक्त्वा यथाकामं यत्ते कार्यं विवक्षितम् ।
गच्छ वै शयनायैव पुरा नाऽन्येन बुध्यते ॥ २१ ॥ [५१४]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधोपपर्वणि द्रौपदीभीमसंवादे सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

पर्यंकावर उठून बसला ( १६ ). नंतर आपली प्रिय पट्टराणी राजपुत्री द्रौपदी हिला तो कौरव्य म्हणाला:—" तूं कोणत्या कामासाठीं इतक्या घाईघाईनें माझ्याजवळ आली आहेस ? ( १७ ) तुझी कांति नेहमींप्रमाणें दिसत नाहीं. तूं कृश व फिकट दिसत आहेस. जें काय सांगावयाचें असेल तें सर्व मला नीट समजावून सांग ( १८ ). सुखाचें वा दुःखाचें, प्रिय वा अप्रिय, जें असेल तें सर्व जसेंच्यातसें सांग, म्हणजे तें ऐकून पुढें काय करतां येईल हें मला समजेल ( १९ ). कृष्णे, तूं सर्व कार्यांमध्यें मजवरच विश्वास टाकीत जा. मी सर्व संकटांतूनहि तुझी पुन्हा पुन्हा सुटका करीन ( २० ). तुझें जें इच्छित कार्य असेल तें इच्छेनुरूप लवकर सांग, आणि तूं आपल्या अंथरुणावर जाऊन पड, म्हणजे दुसऱ्यास कळणार नाहीं" ( २१ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांपैकीं कीचकवधोपपर्वांतील द्रौपदी व भीम यांच्या संवादाविषयीं १७ वा अध्यायं संपला.

---

# अध्याय १८

[ द्रौपदी भीमसेनाला एकांतांत आपल्या दुःखाचें कारण सांगते. ]

द्रौपद्युवाच—अशोच्यत्वं कुतस्तस्या यस्या भर्ता युधिष्ठिरः ।
जानन्सर्वाणि दुःखानि किं मां त्वं परिपृच्छसि ॥ १ ॥
यन्मां दासीप्रवादेन प्रातिकामी तदाऽनयत् ।
सभापरिषदो मध्ये तन्मां दहति भारत ॥ २ ॥
पार्थिवस्य सुता नाम का नु जीवति मादृशी ।
अनुभूयेदृशं दुःखमन्यत्र द्रौपदीं प्रभो ॥ ३ ॥
वनवासगतायाश्च सैन्धवेन दुरात्मना ।
परामर्शो द्वितीयो वै सोढुमुत्सहते नु का ॥ ४ ॥
मत्स्यराज्ञः समक्षं तु तस्य धूर्तस्य पश्यतः ।
कीचकेन परामृष्टा का नु जीवति मादृशी ॥ ५ ॥
एवं बहुविधैः क्लेशैः क्लिश्यमानां च भारत ।
न मां जानासि कौन्तेय किं फलं जीवितेन मे ॥ ६ ॥
योऽयं राज्ञो विराटस्य कीचको नाम भारत ।
सेनानीः पुरुषव्याघ्र श्यालः परमदुर्मतिः ॥ ७ ॥

**द्रौपदी** म्हणाली:—"जिचा युधिष्ठिर भर्ता आहे, ती शोकरहित कशी असणार? तूं माझीं सर्व दुःखें जाणत असतांना मला (उगीच) कां विचारतोस? (१) प्रातिकामी (दुर्योधनाचा दूत) त्यावेळीं मला दासी म्हणून भरसभेंत घेऊन गेला, ती गोष्ट भारता, मला जाळीत आहे (२). प्रभो, अशा प्रकारचें दुःख झालें असतां मज द्रौपदीशिवाय दुसरी माझ्यासारखी कोणती राजाची कन्या जिवंत राहील? (३) वनवासांत गेल्यावर दुष्ट जयद्रथानें मला स्पर्श केला, हा दुसरा प्रसंग तरी सहन कोण करूं शकेल? (४) आणि (आतां तिसऱ्यानें) मत्स्यराजासमक्ष व त्या द्यूतकाराच्या (युधिष्ठिराच्या) डोळ्यांदेखत कीचकानें अपमान केला असतां माझ्यासारखी कोण जिवंत राहील? (५) भारता, अशा पुष्कळ प्रकारच्या क्लेशांनीं मी क्लिजत असतां, कौंतेया, त्याची तुला दादहि नाहीं, तर आतां मला जगून तरी काय फळ? (६). भारता, कीचक म्हणून जो विराटराजाचा श्यालक व सेनापति आहे, त्याची बुद्धि फारच दुष्ट आहे (७).

स मां सैरन्ध्रिवेषेण वसन्तीं राजवेश्मनि ।
नित्यमेवाऽऽह दुष्टात्मा भार्या मम भवेति वै ॥ ८ ॥
तेनोपमन्त्र्यमाणाया वधार्हेण सपत्नहन् ।
कालेनेव फलं पक्वं हृदयं मे विदीर्यते ॥ ९ ॥
भ्रातरं च विगर्हस्व ज्येष्ठं दुर्द्यूतदेविनम् ।
यस्याऽस्मि कर्मणा प्राप्ता दुःखमेतदनन्तकम् ॥ १० ॥
को हि राज्यं परित्यज्य सर्वस्वं चाऽऽत्मना सह ।
प्रव्रज्यायैव दीव्येत विना दुर्द्यूतदेविनम् ॥ ११ ॥
यदि निष्कसहस्रेण यच्चाऽन्यत्सारवद्धनम् ।
सायंप्रातरदेविष्यदपि संवत्सरान्बहून् ॥ १२ ॥
रुक्मं हिरण्यं वासांसि यानं युग्यमजाविकम् ।
अश्वाश्वतरसङ्घांश्च न जातु क्षयमावहेत् ॥ १३ ॥
सोऽयं द्यूतप्रवादेन श्रियः प्रत्यवरोपितः ।
तूष्णीमास्ते यथा मूढः स्वानि कर्माणि चिन्तयन् ॥ १४ ॥

सैरन्ध्रीवेषानें राजवाड्यांत राहिलेल्या मला तो दुरात्मा 'माझी बायको हो' असें नित्य म्हणत असतो. तो असें बोलूं लागला म्हणजे काळानें पिकलेल्या फळाप्रमाणें माझें हृदय विदीर्ण होऊन जातें. तूं शत्रूंस ठार मारणारा आहेस आणि तो ( दुष्ट खरोखर ) वधास योग्य आहे (८–९). वाईट प्रकारचा जुगार खेळणाऱ्या आपल्या वडील भावास दोष दे. त्याच्या कर्मामुळें मला हें सततचें दुःख झालें आहे ( १० ). आपलें राज्य व सर्वस्व घालवून कफल्लक झाल्यावर या वाईट द्यूत खेळणाऱ्या वांचून दुसरा कोण प्रव्रज्याचा (वनवासाचा) पण लावील ? ( ११ ) यानें जरी रोज सकाळसंध्याकाळ हजार हजार मोहोरांचा जुगार खेळण्याचा नेम पुष्कळ वर्षें चालविला असता व आणखी पुष्कळ द्रव्य उधळलें असतें (१२), तरीहि याचें सोनें, रुपें, वस्त्रें, गाड्या, वाहनें, शेळ्यामेंढया आणि अश्वांचे व खेचरांचे समुदाय संपले नसते ( १३ ). तो हा द्यूत खेळण्यांत सर्वस्वी नागवल्यामुळें आपल्या कर्माचा पश्चात्ताप करीत वेड्यासारखा गप्प बसला आहे ( १४ ).

दश नागसहस्राणि हयानां हेममालिनाम् ।
यं यान्तमनुयान्तीह सोऽयं द्यूतेन जीवति ॥ १५ ॥
रथाः शतसहस्राणि नृपाणाममितौजसाम् ।
उपासन्त महाराजमिन्द्रप्रस्थे युधिष्ठिरम् ॥ १६ ॥
शतं दासीसहस्राणां यस्य नित्यं महानसे ।
पात्रीहस्तं दिवारात्रमतिथीन्भोजयत्युत ॥ १७ ॥
एष निष्कसहस्राणि प्रदाय ददतां वरः ।
द्यूतजेन ह्यनर्थेन महता समुपाश्रितः ॥ १८ ॥
एनं हि स्वरसम्पन्ना बहवः सूतमागधाः ।
सायं प्रातरुपातिष्ठन्सुमृष्टमणिकुण्डलाः ॥ १९ ॥
सहस्रमृषयो यस्य नित्यमासन्सभासदः ।
तपःश्रुतोपसम्पन्नाः सर्वकामैरुपस्थिताः ॥ २० ॥
अष्टाशीतिसहस्राणि स्नातका गृहमेधिनः ।
त्रिंशद्दासीक एकैको यान्बिभर्ति युधिष्ठिरः ॥ २१ ॥

ज्याच्या स्वारीबरोबर सुवर्णानें श्रृंगारलेले दहा हजार घोडे व हत्ती चालत असत, तो हा द्यूत खेळून चरितार्थ चालवीत आहे ( १५ ). इंद्रप्रस्थामध्यें युधिष्ठिर महाराज असतां त्याचे येथें अतिपराक्रमी राजांचे शेकडों हजारों रथ खडे असत ( १६ ). त्याच्या मुदपाकखान्यांत एक लाख दासी हातांत भांडीं घेऊन रात्रंदिवस अतिथींना वाढीत असत (१७). याच दानशूरानें हजारों मोहरांचा दानधर्म केला असून, त्याला द्यूतामुळें झालेल्या महा अनर्थानें घेरलें आहे ( १८ ). याच्याच सेवेला उज्ज्वल व रत्नजडित कुंडलें धारण करणारे व मधुर आवाजाचे पुष्कळ सूत व मागध सकाळ संध्याकाळ हजर असत ( १९ ). तपश्चर्या व ज्ञान यांनीं सुसंपन्न, असे हजार ऋषि सर्व इच्छित पदार्थ मिळत असलेले याच्या सभेंत असत (२०). गृहमेध करणारे अठ्यायशीं हजार स्नातक याच्या पदरीं असून, यानें त्यांतील प्रत्येकाच्या सेवेला तीस तीस दासी दिल्या होत्या ( २१ ).

अप्रतिग्राहिणां चैव यतानामूर्ध्वरेतसाम् ।
दश चापि सहस्राणि[1] सोऽयमास्ते नरेश्वरः ॥ २२ ॥
आनृशंस्यमनुक्रोशं संविभागस्तथैव च ।
यस्मिन्नेतानि सर्वाणि सोऽयमास्ते नरेश्वरः ॥ २३ ॥
अन्धान्वृद्धांस्तथाऽनाथान्बालान्राष्ट्रेषु दुर्गतान् ।
बिभर्ति विविधान्राजा धृतिमान्सत्यविक्रमः ।
संविभागमना नित्यमानृशंस्याद्युधिष्ठिरः ॥ २४ ॥
स एष निरयं प्राप्तो मत्स्यस्य परिचारकः ।
सभायां देविता राज्ञः कङ्को ब्रूते युधिष्ठिरः ॥ २५ ॥
इन्द्रप्रस्थे निवसतः समये यस्य पार्थिवाः ।
आसन्बलिभृतः सर्वे सोऽद्याऽन्यैर्भृतिमिच्छति ॥ २६ ॥
पार्थिवाः पृथिवीपाला यस्याऽऽसन्वशवर्तिनः ।
स वशे विवशो राजा परेषामद्य वर्तते ॥ २७ ॥

प्रतिग्रह न करणाऱ्या दहा हजार ऊर्ध्वरेत्या ऋषींचें जो आणखी पोषणं करीत असे, तोच हा जनेश्वर ( आज ) स्वस्थ बसला आहे ( २२ ). ज्याच्या ठिकाणीं निष्ठुरपणाचा अभाव, दया आणि ( आपणाजवळ असेल तें सर्वांस वांटून देण्याची ) संविभाग-बुद्धि, असे सर्व सद्गुण वसत आहेत, तोच हा युधिष्ठिर राजा बसला आहे ( २३ ). अंध, वृद्ध, अनाथ, बालक व राष्ट्रांमधील दुर्दशेस जाऊन पोंचलेले दुसरे अनेक प्रकारचे लोक या सर्वांचा हा सत्यपराक्रमी व धैर्यशाली राजा सांभाळ करी. युधिष्ठिर विलक्षण कनवाळू असल्यामुळें असेल तें सर्वांत वाटून द्यावें अशी याची नित्य वासना असे (२४). तोच हा युधिष्ठिर ( पारतंत्र्य ) नरकांत पडून मत्स्यराजाचा सेवक बनला आहे ! तो सभेंत राजाबरोबर द्यूत खेळत असतो, आणि आपणास 'कंक' म्हणवितो (२५). इंद्रप्रस्थांत राहत असतां सर्व राजे ज्याच्या आज्ञेंत वागून ज्याला खंडणी देत तो आज पोषणासाठीं दुसऱ्यांच्या तोंडांकडे पाहत आहे ( २६ ). ( पूर्वी ) पृथ्वीचें पालन करणारे भूपाल ज्याच्या आज्ञेंत वागत होते, तोच राजा आज आज्ञाधारक होऊन दुसऱ्यांचा गुलाम बनला आहे ( २७ ).

1 बिभर्तीति पूर्वेणान्वयः ( नी. )

प्रताप्य पृथिवीं सर्वां रश्मिमानिव तेजसा ।
सोऽयं राज्ञो विराटस्य सभास्तारो युधिष्ठिरः ॥ २८ ॥
यमुपासन्त राजानः सभायामृषिभिः सह ।
तमुपासीनमद्याऽन्यं पश्य पाण्डव पाण्डवम् ॥ २९ ॥
सदस्यं समुपासीनं परस्य प्रियवादिनम् ।
दृष्ट्वा युधिष्ठिरं कोपो वर्द्धते मामसंशयम् ॥ ३० ॥
अतदर्हं महाप्राज्ञं जीवितार्थेऽभिसंस्थितम् ।
दृष्ट्वा कस्य न दुःखं स्याद्धर्मात्मानं युधिष्ठिरम् ॥ ३१ ॥
उपास्ते स्म सभायां यं कृत्स्ना वीर वसुन्धरा ।
तमुपासीनमप्यन्यं पश्य भारत भारतम् ॥ ३२ ॥
एवं बहुविधैर्दुःखैः पीड्यमानामनाथवत् ।
शोकसागरमध्यस्थां किं मां भीम न पश्यसि ॥३३॥ [५४७]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि द्रौपदीभीमसंवादेऽष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

सूर्याप्रमाणें ज्यानें एकदां आपल्या तेजानें सर्व पृथ्वी तप्त करून सोडली होती, तोच युधिष्ठिर आज विराटाच्या सभेंतील सभासद होऊन राहिला आहे ! (२८). पांडुपुत्रा, सभेमध्यें राजे व ऋषि ज्याच्या सभोंवतीं सेवा करीत बसत, तोच हा पांडुपुत्र ( युधिष्ठिर ) दुसऱ्याची सेवा करीत आहे पहा ! ( २९ ). युधिष्ठिर दुसऱ्याचा सभासद होऊन त्याची 'हांजीहांजी' करीत आहे असें पाहून मला खरोखर अतिशय संताप येतो ( ३० ). महाज्ञानी धर्मनिष्ठ युधिष्ठिर केवळ जीवितासाठीं आपल्या योग्यतेस न शोभणारें अयोग्य काम करीत आहे असें पाहून कोणाला बरें दुःख होणार नाहीं ? ( ३१ ) वीरा भारता, सभेमध्यें संपूर्ण जग ज्याची सेवा करीत होतें, तोच भारत आज दुसऱ्याची सेवा करीत आहे पहा ( ३२ ). अशा पुष्कळ प्रकारच्या दुःखांनीं मी गांजलेली आहें, व अनाथाप्रमाणें शोकसागरांत गटंगळ्या खात पडलें आहें ! भीमसेना, तुला हें दिसत नाहीं काय ?" ( ३३ )

याप्रमाणें श्रीमहाभारताच्या विराटपर्वांपैकीं कीचकवध उपपर्वांतील द्रौपदी व भीम यांच्या संवादाविषयीं १८ वा अध्याय संपला.

# अध्याय १९

[ द्रौपदीचें हृदयद्रावक भाषण पुढें चालू ]

द्रौपद्युवाच—इदं तु ते महद्दुःखं यत्प्रवक्ष्यामि भारत ।
न मेऽभ्यसूया कर्तव्या दुःखादेतद्ब्रवीम्यहम् ॥ १ ॥
सूदकर्मणि हीने त्वमसमे भरतर्षभ ।
ब्रुवन्बल्लवजातीयः कस्य शोकं न वर्द्धयेः ॥ २ ॥
सूपकारं विराटस्य बल्लवं त्वां विदुर्जनाः ।
प्रेष्यत्वं समनुप्राप्तं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३ ॥
यदा महानसे सिद्धे विराटमुपतिष्ठसि ।
ब्रुवाणो बल्लवः सूदस्तदा सीदति मे मनः ॥ ४ ॥
यदा प्रहृष्टः सम्राट् त्वां संयोधयति कुञ्जरैः ।
हसन्त्यन्तःपुरे नार्यो मम तूद्विजते मनः ॥ ५ ॥
शार्दूलैर्महिषैः सिंहैरागारे योध्यसे यदा ।
कैकेय्याः प्रेक्षमाणायास्तदा मे कश्मलं भवेत् ॥ ६ ॥

**द्रौपदी** म्हणाली:—"भारता, मला विशेष दुःख होण्याचें कारण मी तुला सांगत्यें. दुःखानें मी असें बोलत आहें, त्याबद्दल मजवर रोष करूं नये ( १ ). भरतश्रेष्ठा, तूं आपल्या इभ्रतीस न शोभणारें आचाऱ्याचें नीच काम करीत आहेस आणि 'मी बल्लव जातीचा आहें' म्हणून सांगतोस, हें पाहून कोणाला वाईट वाटणार नाहीं? ( २ ) तुला विराटाचा हा स्वयंपाकी बल्लव आहे असें लोक समजतात. ( अशा रीतीनें ) तुला केवळ दासपणा आला आहे, याहून अधिक दुःखदायक तें काय असणार? ( ३ ) पाकनिष्पत्ति झाल्यावर जेव्हां 'मी बल्लव' म्हणत तूं विराटाच्या सेवेस सादर होतोस, तेव्हां माझ्या मनाला फार दुःख होतें ( ४ ). जेव्हां राजा खुषींत येऊन हत्तींबरोबर तुझी झुंज लावितो आणि अंतःपुरांतील स्त्रिया तुझ्याकडे पाहून हंसूं लागतात तेव्हां माझें मन उदास होऊन जातें ( ५ ). जेव्हां वाघ, रेडे, सिंह यांजबरोबर हौद्यांत तूं झोंबी खेळूं लागतोस, आणि ती कैकेयी सुदेष्णा ( ती झोंबी ) पहावयास बसते तेव्हां मला घेरीच येते ( ६ ).

तत उत्थाय कैकेयी सर्वास्ताः प्रत्यभाषत ।
प्रेष्याः समुत्थिताश्चापि कैकेयीं ताः स्त्रियोऽब्रुवन् ॥ ७ ॥
प्रेक्ष्य मामनवद्याङ्गीं कश्मलोपहतामिव ।
स्नेहात्संवासजाद्धर्मात्सूदमेषा शुचिस्मिता ॥ ८ ॥
योध्यमानं महावीर्यमियं समनुशोचति ।
कल्याणरूपा सैरन्ध्री बल्लवश्चापि सुन्दरः ॥ ९ ॥
स्त्रीणां चित्तं च दुर्ज्ञेयं युक्तरूपौ च मे मतौ ।
सैरन्ध्री प्रियसंवासान्नित्यं करुणवादिनी ॥ १० ॥
अस्मिन्राजकुले चेमौ तुल्यकालनिवासिनौ ।
इति ब्रुवाणा वाक्यानि सा मां नित्यमतर्जयत् ॥ ११ ॥
क्रुध्यन्तीं मां च सम्प्रेक्ष्य समशङ्कत मां त्वयि ।
तस्यां तथा ब्रुवत्यां तु दुःखं मां महदाविशत् ॥ १२ ॥
त्वय्येवं निरयं प्राप्ते भीमे भीमपराक्रमे ।
शोके यौधिष्ठिरे मग्ना नाऽहं जीवितुमुत्सहे ॥ १३ ॥

नंतर ती कैकेयी उठून त्या सर्वांशीं कुजबुजूं लागते, आणि त्याहि सर्वजणी उभ्या राहून तिच्याशीं कुजबुज करूं लागतात ( ७ ). मला अनवद्यांगीला* चिंताग्रस्त पाहून ती म्हणते, ' ही शुचिस्मिता सैरंध्री, सहवासानें उत्पन्न होणाऱ्या प्रेमामुळें व ( कांहीं अंशीं ) मानसिक धर्मामुळेंहि, हा महावीर्यशाली आचारी लढूं लागला म्हणजे दुःखित होते. सैरंध्रीचें रूप मनोहर आहे, आणि हा बल्लवहि सुंदर आहे (८–९). स्त्रियांच्या अंतःकरणाचा थांग लागत नसतो ! मला हीं दोघें परस्परांस अनुरूपशीं भासतात. सैरंध्रीचा आवडत्या माणसांशीं नित्य सहवास असल्यामुळें ती त्याची अतिशय कींव करित्ये ( १० ). या राजवाड्यामध्यें हीं दोघेजणें एकाच वेळीं आलेलीं आहेत.' अशा प्रकारचीं भाषणें करून ती मला टांचीत असेत (११). मी चिडलें असें पाहून तिला माझा तुमच्यासंबंधें संशय येतो. ती तसें बोलूं लागली म्हणजे मला भारी वाईट वाटतें ( १२ ). तूं भीम भीमपराक्रमी असा दुःस्थितीला पोंचल्यावर युधिष्ठिराच्या चिंतेंत मग्न झालेल्या मला जिवंत

* जिच्या रूपाला नांवें ठेवण्यास मुळींच जागा नाहीं अशी.

यः स देवान्मनुष्यांश्च सर्वांश्चैकरथोऽजयत् ।
सोऽयं राज्ञो विराटस्य कन्यानां नर्तको युवा ॥ १४ ॥
योऽतर्पयदमेयात्मा खाण्डवे जातवेदसम् ।
सोऽन्तःपुरगतः पार्थ कूपेऽग्निरिव संवृतः ॥ १५ ॥
यस्माद्भयममित्राणां सदैव पुरुषर्षभात् ।
स लोकपरिभूतेन वेषेणाऽऽस्ते धनञ्जयः ॥ १६ ॥
यस्य ज्याक्षेपकठिनौ बाहू परिघसन्निभौ ।
स शङ्खपरिपूर्णाभ्यां शोचन्नास्ते धनंजयः ॥ १७ ॥
यस्य ज्यातलनिर्घोषात्समकम्पन्त शत्रवः ।
स्त्रियो गीतस्वनं तस्य मुदिताः पर्युपासते ॥ १८ ॥
किरीटं सूर्यसङ्काशं यस्य मूर्द्धन्यशोभत ।
वेणीविकृतकेशान्तः सोऽयमद्य धनञ्जयः ॥ १९ ॥
तं वेणीकृतकेशान्तं भीमधन्वानमर्जुनम् ।
कन्यापरिवृतं दृष्ट्वा भीम सीदति मे मनः ॥ २० ॥

राहण्याचा हुरूप राहत नाहीं ( १३ ). ज्यानें एका रथानें देवांसह सर्व मानवांस जिंकिलें तो तरुण, विराटराजाच्या मुलींचा नर्तक बनला आहे ! ( १४ ) ज्या महात्म्यानें खांडववनांत अग्नीस तृप्त केलें, तो विहीरींत सांठवलेल्या अग्नीप्रमाणें शांत होऊन पृथापुत्रा, अंतःपुरांत राहिला आहे ( १५ ). ज्या नरश्रेष्ठाचा शत्रूंस सदोदित धाक वाटे, तो धनंजय लोकनिंदित वेषानें रहात आहे ( १६ ). ज्याचे परिघतुल्य बाहू प्रत्यंचेच्या घर्षणानें घट्ट झालेले आहेत, तो धनंजय आज शंखाच्या चुड्यांनीं भरलेल्या बाहूंनीं शोक करीत आहे ( १७ ). ज्याच्या प्रत्यंचेचा व तळहाताचा प्रचंड घोष ऐकून शत्रु थरथर कांपत, त्याच्याच गायनाचे आलाप स्त्रिया मोठ्या हर्षानें ऐकत बसतात ( १८ ). ज्याच्या मस्तकावर सूर्यासारखा देदीप्यमान मुकुट झळकत असावयाचा, त्याच धनंजयानें आज केसांची वेणी घातली आहे ! (१९) भीमा, ज्याचें धनुष्य भयंकर, त्या अर्जुनानें वेणी घातली असून त्याच्या सभोंवती मुली बसल्या आहेत असें पाहून माझें मन फार खिन्न होतें (२०).

यस्मिन्नस्त्राणि दिव्यानि समस्तानि महात्मनि ।
आधारः सर्वविद्यानां स धारयति कुण्डले ॥ २१ ॥
स्म्रष्टुं राजसहस्राणि तेजसाऽप्रतिमानि वै ।
समरे नाऽभ्यवर्तन्त वेलामिव महार्णवः ॥ २२ ॥
सोऽयं राज्ञो विराटस्य कन्यानां नर्तको युवा ।
आस्ते वेषप्रतिच्छन्नः कन्यानां परिचारकः ॥ २३ ॥
यस्य स्म रथघोषेण समकम्पत मेदिनी ।
सपर्वतवना भीम सहस्थावरजङ्गमा ॥ २४ ॥
यस्मिञ्जाते महाभागे कुन्त्याः शोको व्यनश्यत ।
स शोचयति मामद्य भीमसेन तवाऽनुजः ॥ २५ ॥
भूषितं तमलङ्कारैः कुण्डलैः परिहाटकैः ।
कम्बुपाणिनमायान्तं दृष्ट्वा सीदति मे मनः ॥ २६ ॥
यस्य नास्ति समो वीर्ये कश्चिदुर्व्यां धनुर्धरः ।
सोऽद्य कन्यापरिवृतो गायन्नास्ते धनञ्जयः ॥ २७ ॥

ज्या महात्म्याचे ठिकाणीं सर्व दिव्य अस्त्रें वास करितात, आणि जो सर्व विद्यांचा आधार, त्यानें (हिजड्यांचीं) कुंडलें घातलीं आहेत ! ( २१ ). ज्याप्रमाणें महासागर आपल्या मर्यादेचें उल्लंघन करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें तेजानें झळकणारे हजारों राजे रणांगणावर ज्यास उल्लंघन करूं शकले नाहींत, ( २२ ) तोच हा तरुण, वेष पालटून विराटराजाच्या पोरींचा नृत्यशिक्षक होऊन मुलींचा सेवक झाला आहे ! ( २३ ) ज्याच्या रथाच्या घोषानें पर्वत, वनें व सर्व स्थावरजंगम पदार्थ यांसह पृथ्वी भीमसेना, कांपत असे ( २४ ), जो महाभाग्यशाली जन्मल्याबरोबर कुंतीचा शोक नाहींसा झाला, तो भीमसेना, तुझा पाठचा भाऊ मला आज (आपल्या स्थितीनें) शोक देत आहे ( २५ ). तो सोन्यानें मढविलेलीं कुंडलें व दुसरे अलंकार घालून नटलेला व हातांत बांगड्या भरलेला असा येऊं लागला म्हणजे माझें मन दुःखित होतें ( २६ ). पराक्रमांत ज्याची बरोबरी करणारा पृथ्वीवर कोणीहि धनुर्धर नाहीं, तो धनंजय आज मुलींच्या मध्यभागीं गात बसला आहे (२७).

धर्मे शौर्ये च सत्ये च जीवलोकस्य सम्मतम् ।
स्त्रीवेषविकृतं पार्थं दृष्ट्वा सीदति मे मनः ॥ २८ ॥
यदा ह्येनं परिवृतं कन्याभिर्देवरूपिणम् ।
प्रभिन्नमिव मातङ्गं परिकीर्णं करेणुभिः ॥ २९ ॥
मत्स्यमर्थपतिं पार्थं विराटं समुपस्थितम् ।
पश्यामि तूर्यमध्यस्थं दिशो नश्यन्ति मे तदा ॥ ३० ॥
नूनमार्या न जानाति कृच्छ्रं प्राप्तं धनञ्जयम् ।
अजातशत्रुं कौरव्यं मग्नं दुर्द्यूतदेविनम् ॥ ३१ ॥
तथा दृष्ट्वा यवीयांसं सहदेवं गवाम्पतिम् ।
गोषु गोवेषमायान्तं पाण्डुभूताऽस्मि भारत ॥ ३२ ॥
सहदेवस्य वृत्तानि चिन्तयन्ती पुनः पुनः ।
न निद्रामभिगच्छामि भीमसेन कुतो रतिम् ॥ ३३ ॥
न विन्दामि महाबाहो सहदेवस्य दुष्कृतम् ।
यस्मिन्नेवंविधं दुःखं प्राप्नुयात्सत्यविक्रमः ॥ ३४ ॥

ज्याचें धैर्य, शौर्य व सत्य सर्व जग मान्य करतें, त्या पार्थाला स्त्रीच्या वेषांत पाहून माझ्या मनाला कसेसेंच होऊन जातें ( २८ ). ज्याप्रमाणें मदोन्मत्त गजाभोंवती हत्तिणी जमतात, त्याप्रमाणें या देवासारख्या सुंदरास मुलींनीं गराडा दिला आहे ( २९ ); आणि त्यांच्यासह वाद्यें वाजवून हा पार्थ श्रीमान् मत्स्यराज विराटाला खुष करीत आहे, असें जेव्हां माझ्या नजरेस पडतें, तेव्हां तर मला दिशांचें भान राहत नाहीं ( ३० ). धनंजयाला हें असें संकट प्राप्त झालें आहे, व घातक द्यूत खेळणारा अजातशत्रु धर्मराजहि तसाच दुःखसागरांत मग्न झाला आहे, ही गोष्ट खरोखर आर्येला ( कुंतीला— सासूबाईला ) ठाऊक नसावी ( ३१ ). भारता, त्याचप्रमाणें गुराखी बनलेला धाकटा सहदेव गुरांच्या मागून गुराख्याच्या वेषानें चालूं लागला म्हणजे मी पांढरी फटफटीत होऊन जातें ( ३२ ). भीमसेना, सहदेवाचीं कृत्यें एकसारखीं माझ्या मनांत उभीं राहून मला झोंप येत नाहीं, मग सौख्य कोठचें ? ( ३३ ) महाबाहो, ज्याला एवढें दुःख प्राप्त झालें आहे, त्या सत्यपराक्रमी सहदेवाच्या हातून तसें कांहीं दुराचरण घडल्याचें मला ठाऊक नाहीं ( ३४ ).

दूयामि भरतश्रेष्ठ दृष्ट्वा ते भ्रातरं प्रियम् ।
गोषु गोवृषसङ्काशं मत्स्येनाऽभिनिवेशितम् ॥ ३५ ॥
संरब्धं रक्तनेपथ्यं गोपालानां पुरोगमम् ।
विराटमभिनन्दन्तमथ मे भवति ज्वरः ॥ ३६ ॥
सहदेवं हि मे वीरं नित्यमार्या प्रशंसति ।
महाभिजनसम्पन्नः शीलवान्वृत्तवानिति ॥ ३७ ॥
ह्रीनिषेवो मधुरवाग्धार्मिकश्च प्रियश्च मे ।
स तेऽरण्येषु वोढव्यो याज्ञसेनि क्षपास्वपि ॥ ३८ ॥
सुकुमारश्च शूरश्च राजानं चाऽप्यनुव्रतः ।
ज्येष्ठापचायिनं वीरं स्वयं पाञ्चालि भोजयेः ॥ ३९ ॥
इत्युवाच हि मां कुन्ती रुदती पुत्रगृद्धिनी ।
प्रव्रजन्तं महारण्यं तं परिष्वज्य तिष्ठती ॥ ४० ॥
तं दृष्ट्वा व्यापृतं गोषु वत्सचर्मक्षपाशयम् ।
सहदेवं युधां श्रेष्ठं किं नु जीवामि पाण्डव ॥ ४१ ॥

भरतश्रेष्ठा, तुझ्या गोवृषासारख्या पराक्रमी व प्रिय बंधूला मत्स्यराजानें गाई राखण्यास नेमलें, हें पाहून मला खेद होत आहे ( ३५ ). तो गवळ्यांचा नायक लाल पोषाख करून लगबगीनें विराटाचें अभिनंदन करूं लागला म्हणजे मला ज्वर भरतो ( ३६ ). आर्येनें ( कुंतीनें ) सहदेव वीराची नित्य स्तुति करावी की, 'तो मोठा कुलीन, सुशील व सदाचरणी आहे ( ३७ ), आणि तो भिडस्त मधुरभाषणी व धार्मिकहि आहे. तो माझा फार लाडका, यासाठीं याज्ञसेनि, अरण्यांमध्यें तूं रात्रींहि त्याला जपत जा ( ३८ ). हा सुकुमार असूनहि शूर व धर्मराजाच्या तंत्रानें वागणारा आहे; यासाठीं, पांचालि, वडिलांच्या आज्ञेत वागणाऱ्या या वीराला तूं स्वतः जेवावयास वाढीत जा' ( ३९ ). पुत्रवत्सल कुंतीनें रडतरडत मला असें सांगितलें; आणि महारण्यांत जावयास निघालेल्या त्या सहदेवाला कवटाळून ती उभी राहिली ( ४० ). तोच योधवर सहदेव सध्या गुरांमध्यें काम करीत रात्रीं वासरांच्या कातड्यावरच पडत असतो ! हें पाहून पांडवा, मी कसे प्राण ठेवावे ? ( ४१ ).

त्रिभिर्नित्यसम्पन्नो रूपेणाऽस्त्रेण मेधया ।
सोऽश्वबन्धो विराटस्य पश्य कालस्य पर्ययम् ॥ ४२ ॥
अभ्यकीर्यन्त वृन्दानि [1]दामग्रन्थिमुदीक्ष्य तम् ।
विनयन्तं जवेनाऽश्वान्महाराजस्य पश्यतः ॥ ४३ ॥
अपश्यमेनं श्रीमन्तं मत्स्यं भ्राजिष्णुमुत्तमम् ।
विराटमुपतिष्ठन्तं दर्शयन्तं च वाजिनः ॥ ४४ ॥
किं नु मां मन्यसे पार्थ सुखिनीति परन्तप ।
एवं दुःखशताविष्टा युधिष्ठिरनिमित्ततः ॥ ४५ ॥
अतः प्रतिविशिष्टानि दुःखान्यन्यानि भारत ।
वर्तन्ते मयि कौन्तेय वक्ष्यामि शृणु तान्यपि ॥ ४६ ॥
युष्मासु ध्रियमाणेषु दुःखानि विविधान्युत ।
शोषयन्ति शरीरं मे किं नु दुःखमतः परम् ॥ ४७ ॥[५९४]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि द्रौपदीभीमसंवादे एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

सौंदर्य, अस्त्रकुशलता आणि बुद्धि, या तिन्ही गुणांनीं जो सदा संपन्न आहे, तो नकुल विराटाचा चाबुकस्वार बनला आहे ! काळाचा फेरा कसा आहे पहा ! ( ४२ ). ज्यानें ( हल्लीं ) ग्रंथिक हें नांव घेतलें आहे, त्या नकुलाला पाहतांच ( पूर्वी शत्रूंच्या ) टोळ्या ( रानोमाळ ) उधळून जात; तोच नकुल ( सांप्रत ) महाराजा ( युधिष्ठिरा- ) समक्ष झपाट्यानें घोडे शिकविण्याचें काम करीत आहे ! ( ४३ ) तो सुंदर, तेजस्वी व थोर नकुल घोडे दाखवीत विराटाची सेवा करीत असतानां मी त्यास ( अनेकदां ) पाहिलें ( ४४ ). युधिष्ठिराच्या निमित्तानें अशा शेंकडों दुःखांनीं मी ग्रस्त झाल्यें आहें, तरी पण मी सुखांतच आहें असें परंतपा पार्था, तूं समजतोस काय ? ( ४५ ) भारता, याशिवाय जीं विशेष दुःखें मला सोसावीं लागत आहेत, तीं कुंतीपुत्रा, मी सांगत्यें, ऐक ( ४६ ). तुम्ही जिवंत असतांना नानाप्रकारचीं दुःखें माझें शरीर शुष्क करीत आहेत, याहून अधिक दुःखप्रद तें काय !" ( ४७ )

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील कीचकवधोपपर्वांत द्रौपदी व भीम यांच्या संवादाविषयीं १९ वा अध्याय समाप्त झाला.

---

१ दामग्रंथि-ग्रंथिक ( नी. ) पण याचा अर्थ निराळा असावा. किंवा दामच्या ऐवजीं वाम असून हा अपपाठ आहे.

## अध्याय २०

[ द्रौपदी आपली हृदयद्रावक दैन्यस्थिति भीमसेनास आपली सांगते.

द्रौपद्युवाच—अहं सैरन्ध्रिवेषेण चरन्ती राजवेश्मनि ।
शौचदाऽस्मि सुदेष्णाया अक्षधूर्तस्य कारणात् ॥ १ ॥
विक्रियां पश्य मे तीव्रां राजपुत्र्याः परन्तप ।
आत्मकालमुदीक्षन्ति सर्वे दुःखं किलाऽन्तवत् ॥ २ ॥
अनित्या किल मर्त्यानामर्थसिद्धिर्जयाजयौ ।
इति कृत्वा प्रतीक्षामि भर्तॄणामुदयं पुनः ॥ ३ ॥
चक्रवत्परिवर्तन्ते ह्यर्थाश्च व्यसनानि च ।
इतिकृत्वा प्रतीक्षामि भर्तॄणामुदयं पुनः ॥ ४ ॥
य एव हेतुर्भवति पुरुषस्य जयावहः ।
पराजये च हेतुश्च स इति प्रतिपालये ॥
किं मां न प्रतिजानीषे भीमसेन मृतामिव ॥ ५ ॥

द्रौपदी म्हणाली:—"मला सैरंध्रीच्या वेषानें राजवाड्यांत राहावें लागत असून सुदेष्णेला ( माती, पाणी वगैरे ) शौचाचीं साधनें द्यावीं लागत आहेत, तें तरी या फासे खेळणाऱ्यामुळेंच! ( १ ). शत्रुतापन भीमसेना, माझ्या राजपुत्रीच्या स्थितींत किती भयंकर पालट झाला आहे पहा. सर्व लोक आपल्या ( भाग्योदय- ) कालाची मार्गप्रतीक्षा करीत असतात; दुःखा-सहि खरोखर अंत आहेच ( २ ). मनुष्यांचा द्रव्यलाभ किंवा जयापजय हे खरोखर अनित्य आहेत, असा विचार करून मी पतींच्या उदयाची वाट पहात आहें ( ३ ). धनें व दुःखें चक्राप्रमाणें फिरत असतात, असा विचार करून मी पतींचा पुनः भाग्योदय होण्याची वाट पाहत आहें ( ४ ). ज्या कारणानें मनुष्यांचा जय होत असतो, त्याच कारणानें त्यांचा पराजयहि घडून येतो, अशा विचारानें मी प्रतीक्षा करीत आहें. भीमसेना, मी अगदीं मृतप्राय झालें आहें हें तूं जाणत नाहीं काय? ( ५ ).

दत्त्वा याचन्ति पुरुषा हत्वा वध्यन्ति चाऽपरे ।
पातयित्वा च पात्यन्ते परैरिति च मे श्रुतम् ॥ ६ ॥
न दैवस्याऽतिभारोऽस्ति न चैवाऽस्याऽतिवर्त्तनम् ।
इति चाप्यागमं भूयो दैवस्य प्रतिपालये ॥ ७ ॥
स्थितं पूर्वं जलं यत्र पुनस्तत्रैव गच्छति ।
इति पर्यायमिच्छन्ती प्रतीक्षे उदयं पुनः ॥ ८ ॥
दैवेन किल यस्याऽर्थः सुनीतोऽपि विपद्यते ।
दैवस्य चाऽऽगमे यत्नस्तेन कार्यो विजानता ॥ ९ ॥
यत्तु मे वचनस्याऽस्य कथितस्य प्रयोजनम् ।
पृच्छ मां दुःखिता तत्त्वं पृष्टा चाऽत्र ब्रवीमि ते ॥ १० ॥
महिषी पाण्डुपुत्राणां दुहिता द्रुपदस्य च ।
इमामवस्थां सम्प्राप्ता मदन्या का जिजीविषेत् ॥ ११ ॥
कुरून्परिभवेत्सर्वान्पाञ्चालानपि भारत ।
पाण्डवेयांश्च सम्प्राप्तो मम क्लेशो ह्यरिन्दम ॥ १२ ॥

जे देतात, त्यांनांच पुढें याचना करण्याचा प्रसंग येतो; जे दुसऱ्याचा नाश करतात, ते दुसऱ्याकडून वध पावतात; आणि ज्यांनीं ( पूर्वीं अनेकांस ) दडपलें, ते खालीं दडपले जातात, असें मीं ऐकिलें आहे ( ६ ). दैवाला दुष्कर असें कांहीं नाहीं व त्याच्या विरुद्धहि कोणी जाऊं शकत नाहीं. म्हणून सुदैव पुन्हा येण्याची मीं वाट पाहात आहें ( ७ ). जेथें पूर्वीं जल असतें तेथेंच तें पुनः जातें, यासाठीं पुनः भाग्योदय होईल अशी आशा धरून मी त्या कालाची मार्गप्रतीक्षा करीत आहें ( ८ ). नीतीनें वागणाऱ्याचें कार्य केवळ दैवयोगानें बिघडलेलें असतें; तो शहाणा असेल तर त्यानें दैवाचें आनुकूल्य संपादण्याचा प्रयत्न करावा ( ९ ). मी हें जें बोललें त्याचें खरें कारण काय हें पाहिजे तर, मी दुःखी-कष्टी आहे तथापि मला विचार; विचारल्यास आतां मी तें तुला सांगेन ( १० ). पांडवांची पट्टराणी व द्रुपदाची कन्या असतां, अशा स्थितीस येऊन मी पोंचलें आहें, (तेव्हां) मजशिवाय दुसरी कोणती स्त्री जगण्याची इच्छा करील? (११). शत्रुमर्दक भीमसेना, माझ्या छळानें पाण्डुपत्नी कुन्ती हिचे पुत्र तुम्ही, त्याचप्रमाणें ( भीष्मादिक ) कौरव आणि ( द्रुपदादिक ) पांचाळ, या सर्वांचा नाश होईल ( १२ ).

भ्रातृभिः श्वशुरैः पुत्रैर्बहुभिः परिवारिता ।
एवं समुदिता नारी का त्वन्या दुःखिता भवेत् ॥ १३ ॥
नूनं हि बालया धातुर्मया वै विप्रियं कृतम् ।
यस्य प्रसादाद्दुर्नीतं प्राप्ताऽस्मि भरतर्षभ ॥ १४ ॥
वर्णावकाशमपि मे पश्य पाण्डव यादृशम् ।
तादृशो मे न तत्राऽऽसीद्दुःखे परमके तदा ॥ १५ ॥
त्वमेव भीम जानीषे यन्मे पार्थ सुखं पुरा ।
साऽहं दासीत्वमापन्ना न शान्तिमवशा लभे ॥ १६ ॥
नाऽदैविकमहं मन्ये यत्र पार्थो धनञ्जयः ।
भीमधन्वा महाबाहुरास्ते च्छन्न इवाऽनलः ॥ १७ ॥
अशक्या वेदितुं पार्थ प्राणिनां वै गतिर्नरैः ।
विनिपातमिमं मन्ये युष्माकं ह्यविचिन्तितम् ॥ १८ ॥

भाऊ, सासरे, पुत्र वगैरे पुष्कळ परिवार मला आहे. अशा ऐश्वर्यानें वेढलेल्या दुसऱ्या कोणत्या स्त्रीला दुःख करण्याचा प्रसंग येणार आहे? ( १३ ). भरतश्रेष्ठा, खरोखर मी लहानपणीं ब्रह्मदेवाचा मोठा अपराध केला असला पाहिजे, त्याच्या अवकृपेनेंच मला अशी दुःस्थिति प्राप्त झाली आहे ! ( १४ ) पांडुपुत्रा, माझी कांति तरी किती उतरून गेली आहे तें पहा. वनवासांत परमदुःखांत असतांनाहि त्यावेळीं तेथें माझी इतकी दुर्दशा झाली नव्हती ( १५ ). पृथानंदना भीमा, पूर्वी मला किती सुख होतें, हें तुला माहीतच आहे. ती मी दासीपणा भोगीत आहें ! ! या पराधीनतेमुळें ( माझे मनास ) शांति मिळत नाहीं ( १६ ). ज्याअर्थी महाबाहु व महाधनुर्धर धनंजय पार्थाला ( राखेंत ) झाकलेल्या अग्नीप्रमाणें ( वेष पालटून ) रहावें लागत आहे, त्याअर्थी येथें दैवावांचून इतर कांहीं कारण आहे असें मी समजत नाहीं ( १७ ). पार्था, प्राण्यांची पुढें काय गति व्हायची, आहे हें मानवांस समजणें अशक्य आहे; तुमची ही अवनति ध्यानीं मनींहि न येणारी वाटते ( १८ ).

यस्या मम मुखप्रेक्षा यूयमिन्द्रसमाः सदा ।
सा प्रेक्षे मुखमन्यासामवराणां वरा सती ॥ १९ ॥
पश्य पाण्डव मेऽवस्थां यथा नाऽर्हामि वै तथा ।
युष्मासु ध्रियमाणेषु पश्य कालस्य पर्ययम् ॥ २० ॥
यस्याः सागरपर्यन्ता पृथिवी वशवर्तिनी ।
आसीत्साऽद्य सुदेष्णाया भीताऽहं वशवर्तिनी ॥ २१ ॥
यस्याः पुरस्सरा आसन्पृष्ठतश्चाऽनुगामिनः ।
साऽहमद्य सुदेष्णायाः पुरः पश्चाच्च गामिनी ॥ २२ ॥
इदं तु दुःखं कौन्तेय ममाऽसह्यं निबोध तत् ।
या न जातु स्वयं पिंषे गात्रोद्वर्तनमात्मनः ॥
अन्यत्र कुन्त्या भद्रं ते सा पिनष्म्यद्य चन्दनम् ॥ २३ ॥
पश्य कौन्तेय पाणी मे नैवाऽभूतां हि यौ पुरा ।
इत्यस्य दर्शयामास किणवन्तौ करावुभौ ॥ २४ ॥
बिभेमि कुन्त्या या नाऽहं युष्माकं वा कदाचन ।
साऽद्याऽग्रतो विराटस्य भीता तिष्ठामि किङ्करी ॥ २५ ॥

इंद्रासारखे (पराक्रमी) तुम्ही पति, ज्या माझ्या मुखाकडे (काळजीनें) पाहात असा, त्या मला आज कमीप्रतीच्या स्त्रियांच्या तोंडाकडे—स्वतः मी त्यांच्याहून श्रेष्ठ असतां—पाहावें लागत आहे ( १९ ). पांडुपुत्रा, तुम्ही जिवंत असतां मला, प्राप्त होऊं नये अशी स्थिति आली, हें योग्य आहे का ? कालदशेचा फेरा कसा विचित्र आहे, पहा ! ( २० ) समुद्रवलयांकित पृथ्वी जिच्या आज्ञेंत होती, तीच मी आज सुदेष्णेच्या आज्ञेंत वागत असून तिच्या धाकांत असत्ये ( २१ ). जिच्या मागें व पुढें पुष्कळ अनुचर चालत, तीच मी आज सुदेष्णेच्या मागें व पुढें धावत असतें (२२). कुंतीपुत्रा, पण याशिवाय माझें आणखीहि असह्य दुःख आहे त्याकडे लक्ष दे. तुझें कल्याण असो. जी एका कुंतीशिवाय कोणाची— आपल्या स्वतःच्या अंगास लावावयाचीहि उटी उगाळीत नसे, तीच मी आज चंदन ( सुदेष्णेचें ) घाशीत असतें ! ( २३ ) कुंतीपुत्रा, हे पहा माझे हात—हे मागें असे कधींच नव्हते, " असें म्हणून तिनें आपले घट्टे पडलेले हात त्यास दाखविले ( २४ ). " जिला कुंतीची किंवा प्रत्यक्ष तुमचीहि धास्ती वाटत नसे, तीच मी आज विराटाच्या

किं नु वक्ष्यति सम्राण्मां वर्णकः[1] सुकृतो न वा ।
नाऽन्यपिष्टं हि मत्स्यस्य चन्दनं किल रोचते ॥ २६ ॥

वैशम्पायन उवाच—

सा कीर्तयन्ती दुःखानि भीमसेनस्य भामिनी ।
रुरोद शनकैः कृष्णा भीमसेनमुदीक्षती ॥ २७ ॥
सा बाष्पकलया वाचा निश्श्वसन्ती पुनः पुनः ।
हृदयं भीमसेनस्य घट्टयन्तीदमब्रवीत्[2] ॥ २८ ॥
नाल्पं कृतं मया भीम देवानां किल्बिषं पुरा ।
अभाग्या यत्र जीवामि कर्तव्ये सति पाण्डव ॥ २९ ॥

वैशम्पायन उवाच— ततस्तस्याः करौ सूक्ष्मौ किणबद्धौ वृकोदरः ।
मुखमानीय वै पत्न्या रुरोद परवीरहा ॥ ३० ॥

समोर दासी म्हणून भीत भीत उभी असतें. 'हा सम्राट् मला काय बरें म्हणेल ? ही चंदनउटी चांगली बनली आहे कीं नाहीं ? मत्स्यराजाला दुसऱ्या कोणी उगाळिलेलें चंदन मुळींच आवडत नाहीं,' ( असें मी मनांत म्हणत असतें )" ( २५–२६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—ती भामिनी भीमसेनास आपलीं दुःखें सांगत असतां भीमाकडे पाहून हळूहळू रडूं लागली ( २७ ). कंठ दाटून आल्यामुळें तिचा आवाज गद्गदित होऊन ती वरचेवर हुंदके देऊं लागली; आणि भीमसेनाचें हृदय कांपवीत असें म्हणाली ( २८ ), "भीमसेना, अशा प्रसंगीं प्राणत्याग करणें हेंच कर्तव्य असतांना मी अभागिनी अद्यापि जिवंत आहे; त्या अर्थी पांडुपुत्रा, असें होण्यासारखा पूर्वीं मी देवाचा फारच मोठा अपराध केलेला असला पाहिजे" ( २९ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर आपल्या पत्नीचे ते बारीक झालेले व घट्टे पडलेले हात तोंडाशीं नेऊन तो परवीरांतक भीमसेनहि रडूं लागला ( ३० ).

---

१ वर्णकश्चंदने इति मेदिनी ( नी. ). २ घट्टयन्ती कंपयंती ( नी. )

तौ गृहीत्वा च कौन्तेयो बाष्पमुत्सृज्य वीर्यवान् ।
ततः परमदुःखार्त्त इदं वचनमब्रवीत् ॥ ३१ ॥ [ ६२५ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि द्रौपदीभीमसंवादे विंशोऽध्यायः ॥ २० ॥

ते तिचे हात घट्ट धरून त्या वीर्यवंतानें डोळ्यांतून टिपें गाळलीं; आणि नंतर त्यानें मोठ्या आर्तस्वरानें तिला पुढीलप्रमाणें म्हटलें ( ३१ ).

याप्रमाणें महाभारतांतील विराटपर्वांच्या कीचकवधउपपर्वांपैकीं द्रौपदी व भीम यांच्या संवादाविषयीं २० वा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय २१

[ भीम द्रौपदीचें सांत्वन करितो; कीचकास मारण्याबद्दल द्रौपदीची विनंति. ]

भीमसेन उवाच—धिगस्तु मे बाहुबलं गाण्डीवं फाल्गुनस्य च ।
यत्ते रक्तौ पुरा भूत्वा पाणी कृतकिणाविमौ ॥ १ ॥
सभायां तु विराटस्य करोमि कदनं महत् ।
तत्र मे कारणं भाति कौन्तेयो यत्प्रतीक्षते ॥ २ ॥
अथवा कीचकस्याऽहं पोथयामि पदा शिरः ।
ऐश्वर्यमदमत्तस्य क्रीडन्निव महाद्विपः ॥ ३ ॥
अपश्यं त्वां यदा कृष्णे कीचकेन पदा हताम् ।
तदैवाऽहं चिकीर्षामि मत्स्यानां कदनं महत् ॥ ४ ॥

भीमसेन म्हणाला:—"ज्याअर्थी पूर्वी आरक्त असलेल्या तुझ्या या हातांस घट्टे पडले आहेत, त्याअर्थी माझ्या बाहुबळास आणि अर्जुनाच्या गांडीवास धिःकार असो (१). विराटाच्या सभेंतच मी भयंकर कत्तल केली असती, परंतु कौन्तेय युधिष्ठिर (योग्य काळाची) वाट पाहत आहे हें (ती न करण्याचें) कारण आहे (२). अथवा, ऐश्वर्यमदानें धुंद झालेल्या त्या कीचकाचें मस्तक मी क्रीडा करणाऱ्या महागजाप्रमाणें ( तेथेंच ) पायाखालीं तुडविलें असतें ( ३ ). कृष्णे, जेव्हां कीचकानें तुला लाथ मारलेली मी पाहिली, तेव्हांच मी मत्स्यांची भयंकर कत्तल करण्यास तयार झालों होतों ( ४ ).

तत्र मां धर्मराजस्तु कटाक्षेण न्यवारयत् ।
तदहं तस्य विज्ञाय स्थित एवाऽस्मि भामिनि ॥ ५ ॥
यच्च राष्ट्रात्प्रच्यवनं कुरूणामवधश्च यः ।
सुयोधनस्य कर्णस्य शकुनेः सौबलस्य च ॥ ६ ॥
दुश्शासनस्य पापस्य यन्मया नाऽहृतं शिरः ।
तन्मे दहति गात्राणि हृदि शल्यमिवाऽर्पितम् ।
मा धर्मं जहि सुश्रोणि क्रोधं जहि महामते ॥ ७ ॥
इमं तु समुपालम्भं त्वत्तो राजा युधिष्ठिरः ।
शृणुयाद्वाऽपि कल्याणि कृत्स्नं जह्यात्स जीवितम् ॥ ८ ॥
धनञ्जयो वा सुश्रोणि यमौ वा तनुमध्यमे ।
लोकान्तरगतेष्वेषु नाऽहं शक्ष्यामि जीवितुम् ॥ ९ ॥
पुरा सुकन्या भार्या च भार्गवं च्यवनं वने ।
वल्मीकभूतं शाम्यन्तमन्वपद्यत भामिनी ॥ १० ॥
नारायणी चेन्द्रसेना रूपेण यदि ते श्रुता ।
पतिमन्वचरद्वृद्धं पुरा वर्षसहस्रिणम् ॥ ११ ॥

त्यावेळीं धर्मराजानें डोळ्यानें खुणावून माझें निवारण केलें. भामिनि, त्याचा तसा अभिप्राय जाणून मी स्वस्थच बसलों (५). राष्ट्रापासून आम्ही जे च्युत झालों, कौरवांचा वध आम्ही जो केला नाहीं, दुर्योधन, कर्ण व सुबलपुत्र शकुनि यांचा वध जो केला नाहीं, पापी दुःशासनाचें मस्तक मी जें उडविलें नाहीं, तें हृदयांत बोंचलेल्या शल्याप्रमाणें माझ्या अंगाचा भडका करीत आहे. ( तथापि ) सुंदरि, तूं नीति सोडूं नको. तूं महाविचारी आहेस, राग आवर कल्याणि, तुझ्या तोंडून असें त्याच्याविषयीं निंदात्मक भाषण जर युधिष्ठिरानें ऐकिलें, तर तो खात्रीनें प्राणत्याग करील (६–८). ( त्याचप्रमाणें ) सुश्रोणि, अर्जुन किंवा नकुलसहदेवही ( त्यांच्या कानीं अशी निंदा पडली तर, ) प्राण ठेवणार नाहींत; ते परलोकीं गेल्यावर मी जिवंत राहूं शकणार नाहीं ( ९ ). पूर्वी भृगुवंशांत उत्पन्न झालेल्या च्यवनाची स्त्री सुकन्या ही वनांत आपल्या वारुळरूप झालेल्या पतीचें सांत्वन करीत त्याबरोबर राहिली होती ( १० ). नारायणी इंद्रसेना—रूपवती ह्मणून तुझ्या कानावर आली असेल—आपल्या हजार वर्षे ( आयुष्य ) असलेल्या पतीची सेवा करीत राहिली ( ११ ).

दुहिता जनकस्यापि वैदेही यदि ते श्रुता ।
पतिमन्वचरत्सीता महारण्यनिवासिनम् ॥ १२ ॥
रक्षसा निग्रहं प्राप्य रामस्य महिषी प्रिया ।
क्लिश्यमानाऽपि सुश्रोणी राममेवाऽन्वपद्यत ॥ १३ ॥
लोपामुद्रा तथा भीरु वयोरूपसमन्विता ।
अगस्तिमन्वयाद्धित्वा कामान्सर्वानमानुषान् ॥ १४ ॥
द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवन्तमनिन्दिता ।
सावित्र्यनुचचारैका यमलोकं मनस्विनी ॥ १५ ॥
यथैताः कीर्त्तिता नार्यो रूपवत्यः पतिव्रताः ।
तथा त्वमपि कल्याणि सर्वैः समुदिता गुणैः ॥ १६ ॥
मादीर्घं[1] क्षम कालं त्वं मासमर्द्धं च सम्मितम् ।
पूर्णे त्रयोदशे वर्षे राज्ञां राज्ञी भविष्यसि ॥ १७ ॥

द्रौपद्युवाच—आर्त्तयैतन्मया भीम कृतं बाष्पप्रमोचनम् ।
अपारयन्त्या दुःखानि न राजानमुपालभे ॥ १८ ॥

जनकपुत्री वैदेही सीता जर तुझ्या ऐकण्यांत आली असेल, तर तीहि महारण्यांत राहणाऱ्या आपल्या पतीच्या मागोमाग गेली (१२). रामाच्या त्या प्रिय महिषीला राक्षसानें ( रावणानें ) हरण करून नेल्यावर तिला फार क्लेश भोगावे लागले; तथापि ती सुंदरी रामासच अनुसरून राहिली (१३). त्याचप्रमाणें, भीरु, लोपामुद्रा तरुण व सौंदर्यसंपन्न असतांहि सर्व दिव्य कामोपभोग सोडून अगस्तीच्या समागमें राहिली ( १४ ). तेजस्वी व निर्दोषी सावित्री तर द्युमत्सेनपुत्र वीर सत्यवानामागोमाग एकटी यमलोकापर्यंत गेली ( १५ ). कल्याणि, मी सांगितलेल्या या स्त्रिया जशा रूपवती व पतिव्रता होत्या, तशी तूंहि सर्व गुणांनीं संपन्न आहेस ( १६ ). तूं थोडा काळ मला क्षमा कर, एक महिना किंवा अर्धा (अवधि उरला आहे.) तेरावें वर्ष पूर्ण झालें कीं तूं राजांची राणी होशील " ( १७ ).

द्रौपदी म्हणाली:—" भीमा, दुःखें सहन न झाल्यामुळें मी विव्हळ होऊन आपणापाशीं अश्रु ढाळले. मी राजाची निंदा करीत नाहीं ( १८ ).

[1] 'मादीर्घं' एक शब्द असून 'अदीर्घं' असा पदच्छेद ( नी. )

किमुक्तेन व्यतीतेन भीमसेन महाबल ।
प्रत्युपस्थितकालस्य कार्यस्याऽनन्तरो भव ॥ १९ ॥
ममेह भीम कैकेयी रूपाभिभवशङ्कया ।
नित्यमुद्विजते राजा कथं नेयादिमामिति ॥ २० ॥
तस्या विदित्वा तं भावं स्वयं चाऽनृतदर्शनः ।
कीचकोऽयं सुदुष्टात्मा सदा प्रार्थयते हि माम् ॥ २१ ॥
तमहं कुपिता भीम पुनः कोपं नियम्य च ।
अब्रुवं कामसम्मूढमात्मानं रक्ष कीचक ॥ २२ ॥
गन्धर्वाणामहं भार्या पञ्चानां महिषी प्रिया ।
ते त्वां निहन्युः कुपिताः शूराः साहसकारिणः ॥ २३ ॥
एवमुक्तः सुदुष्टात्मा कीचकः प्रत्युवाच ह ।
नाऽहं बिभेमि सैरन्ध्रि गन्धर्वाणां शुचिस्मिते ॥ २४ ॥
शतं शतसहस्राणि गन्धर्वाणामहं रणे ।
समागतं हनिष्यामि त्वं भीरु कुरु मे क्षणम्[1] ॥ २५ ॥

महाबलवान् भीमसेना, गतगोष्टींबद्दल चर्चा करण्यांत काय अर्थ आहे? सांप्रत जी गोष्ट येऊन ठेपली आहे, तिजकडे तूं लक्ष दे ( १९ ). भीमसेना, ही सैरंध्री आपल्या रूपानें आपणास पराभूत करील अशी सुदेष्णेला शंका वाटत असते; आणि राजाचें मन हिजवर कसें न जाईल ह्या विचारानें ती नेहमीं खिन्न असते ( २० ). तिच्या मनांतील तो अभिप्राय जाणून व स्वतःहि पापदृष्टीचा असल्यामुळें, नराधम कीचक नित्य माझी प्रार्थना करीत असतो ( २१ ). भीमा, त्याचा मला फार संताप आला होता, तथापि तो आवरून मी त्या काममोहितास म्हटलें, 'कीचका, तूं आपल्याला संभाळ (२२). मी पांच गंधर्वांची भार्या आहें, त्यांची प्रिय पट्टराणी आहें. ते मोठे साहसी व शूर आहेत. ते संतापले तर तुला ठार मारतील' ( २३ ). मी असें बोलल्यावर त्या महादुष्ट कीचकानें प्रत्युत्तर दिलें, ' सुहास्यवदने सैरंध्रि, मी गंधर्वांना मुळींच भीत नाहीं ( २४ ). कोट्यवधि गंधर्व रणांत एकवटून आले तरी त्यांना मी ठार करीन. भित्रे, तूं माझा स्वीकार कर' ( २५ ).

१ क्षणं स्वीकारम् ( नी. ) आह्मांत क्षण घेतात.

इत्युक्ते चाऽब्रुवं मत्तं कामातुरमहं पुनः ।
न त्वं प्रतिबलस्तेषां गन्धर्वाणां यशस्विनाम् ॥ २६ ॥
धर्मे स्थिताऽस्मि सततं कुलशीलसमन्विता ।
नेच्छामि कश्चिद्वध्यन्तं तेन जीवसि कीचक ॥ २७ ॥
एवमुक्तः स दुष्टात्मा प्राहसत्स्वनवत्तदा ।
अथ मां तत्र कैकेयी प्रेषयत्प्रणयेन तु ॥ २८ ॥
तेनैव देशिता पूर्वं भ्रातृप्रियचिकीर्षया ।
सुरामानय कल्याणि कीचकस्य निवेशनात् ॥ २९ ॥
सूतपुत्रस्तु मां दृष्ट्वा महत्सान्त्वमवर्तयत् ।
सान्त्वे प्रतिहते क्रुद्धः परामर्शमनाऽभवत् ॥ ३० ॥
विदित्वा तस्य सङ्कल्पं कीचकस्य दुरात्मनः ।
तथाऽहं राजशरणं जवेनैव प्रधाविता ॥ ३१ ॥
संदर्शने तु मां राज्ञः सूतपुत्रः परामृशत् ।
पातयित्वा तु दुष्टात्मा पदाऽहं तेन ताडिता ॥ ३२ ॥

याप्रमाणें त्यानें उत्तर केल्यावर त्या धुंद कामातुरास मी पुनः म्हटलें:—'तुझें बल त्या यशस्वी गंधर्वांच्या बलाशीं तुल्य नाहीं (२६). मी कुलीन व सुशील असून नित्य (पतिव्रता-) धर्मानें वागत आलें आहें. कोणाचा घात व्हावा अशी माझी इच्छा नाहीं; म्हणून कीचका, तूं अजून जिवंत आहेस' (२७). मी असें म्हटलें तेव्हां तो दुष्ट, आवाज करीत मोठ्यानें हंसला मात्र ! नंतर सुदेष्णेनें मला मोठ्या काकुळतीनें तेथें (त्याच्याकडे) पाठविलें (२८). यापूर्वीच त्यानें त्यासंबंधें तिच्याशीं खलबत केलें होतें, म्हणून भावाचें प्रिय करण्यासाठीं ती मला म्हणाली, 'कल्याणि, कीचकाच्या घरून मद्य आण' (२९). सूतपुत्र कीचकानें मला पाहून पुष्कळ लाडीगोडी लावली. लाडीगोडी फुकट गेल्यावर संतापून बलात्कार करण्याचें त्यानें मनांत आणिलें (३०). त्या दुष्ट कीचकाचा तसा बेत जाणून मी वेगानेंच राजसभेकडे धांवलें (३१). राजाच्या समक्षहि त्या सारथ्याच्या पोरानें मजवर हात टाकला. त्या दुष्टानें मला खालीं पाडून लाथहि मारली ! (३२)

प्रेक्षते स्म विराटस्तु कङ्कस्तु बहवो जनाः ।
रथिनः पीठमर्दाश्च हस्त्यारोहाश्च नैगमाः ॥ ३३ ॥
उपालब्धो मया राजा कङ्कश्चापि पुनः पुनः ।
ततो न वारितो राज्ञा न तस्याऽविनयः कृतः ॥ ३४ ॥
योऽयं राज्ञो विराटस्य कीचको नाम सारथिः ।
त्यक्तधर्मा नृशंसश्च नरस्त्रीसम्मतः प्रियः ॥ ३५ ॥
शूरोऽभिमानी पापात्मा सर्वार्थेषु च मुग्धवान्[1] ।
दारामर्शी महाभाग लभतेऽर्थान्बहूनपि ॥ ३६ ॥
आहरेदपि वित्तानि परेषां क्रोशतामपि ।
न तिष्ठते स्म सन्मार्गे न च धर्मं बुभूषति ॥ ३७ ॥
पापात्मा पापभावश्च कामबाणवशानुगः ।
अविनीतश्च दुष्टात्मा प्रत्याख्यातः पुनः पुनः ॥ ३८ ॥
दर्शने दर्शने हन्याद्यदि जह्यां च जीवितम् ।
तद्धर्मे यतमानानां महान्धर्मो नशिष्यति ॥ ३९ ॥

त्यावेळीं विराट, कंक, राजाचे प्रियजन, हत्तींवर व रथांत बसलेले लोक, व्यापारी आणि दुसरे पुष्कळ लोक नुसते पहात राहिले (३३). मी त्यावेळीं राजाची व कंकाची पुन्हापुन्हा निर्भर्त्सना केली; ( परंतु ) त्याचें कोणीहि निवारण केलें नाहीं, किंवा त्याचें शासन केलें नाहीं ( ३४ ). जो हा विराटराजाचा कीचक नांवाचा सारथि आहे, तो धर्मास सोडून वागणारा आणि क्रूर आहे ( ३५ ). तो शूर व अभिमानी पण आहे; त्याचें अंतःकरण पापी आहे; तो सर्व विषयांमध्यें मूढ ( वाटेल तें करणारा ) आहे. परदारांची अब्रू घेणारा आहे. महाभागा, त्यास अनेक अर्थ मिळतात ( ३६ ). दुसऱ्यांस रडत ठेवूनहि तो त्यांचें द्रव्य हरण करतो. सन्मार्गानें कधींच वागत नाहीं आणि धर्म साधूं इच्छित नाहीं ( ३७ ). हा अंतःकरणाचा पापी असल्यानें याच्या भावनाहि पापी असतात. कामशरांच्या स्वाधीन होऊन पाहिजे तसें वर्तन करणाऱ्या त्या उच्छृंखल दुष्टाचा मी वारंवार धिक्कार केला आहे ( ३८ ). जेव्हां जेव्हां मी त्याच्या दृष्टीस पडेन, तेव्हां तेव्हां तो जर असें मला मारूं लागला, तर मी जिवंत राहणार नाहीं. आणि मग धर्म पाळण्यासाठीं झटणाऱ्या तुमचा महान् धर्म नष्ट होईल ( ३९ ).

१ मुग्धवान् मौढ्यं गतवान् (नी.) मोह पावणारा असाहि अर्थ होईल.

समयं रक्षमाणानां भार्या वो न भविष्यति ।
भार्यायां रक्ष्यमाणायां प्रजा भवति रक्षिता ॥ ४० ॥
प्रजायां रक्ष्यमाणायामात्मा भवति रक्षितः ।
आत्मा हि जायते तस्यां तेन जायां विदुर्बुधाः ॥ ४१ ॥
भर्त्ता तु भार्यया रक्ष्यः कथं जायान्ममोदरे ।
वदतां वर्णधर्मश्च ब्राह्मणानामिति श्रुतः ॥ ४२ ॥
क्षत्रियस्य सदा धर्मो नाऽन्यः शत्रुनिबर्हणात् ।
पश्यतो धर्मराजस्य कीचको मां पदाऽवधीत् ॥ ४३ ॥
तव चैव समक्षे वै भीमसेन महाबल ।
त्वया ह्यहं परित्राता तस्माद्घोराज्जटासुरात् ॥ ४४ ॥
जयद्रथं तथैव त्वमजैषीर्भ्रातृभिः सह ।
जहीममपि पापिष्ठं योऽयं मामवमन्यते ॥ ४५ ॥
कीचको राजवाल्लभ्याच्छोककृन्मम भारत ।
तमेवं कामसम्मत्तं भिन्धि कुम्भमिवाऽश्मनि ॥ ४६ ॥

तुम्ही जर तेरा वर्षांची मर्यादा पाळूं म्हणाल, तर तुमची भार्याच नष्ट होईल. भार्येचें रक्षण केलें असतां प्रजेचें रक्षण केल्याप्रमाणें होत असतें ( ४० ). आणि प्रजेचें ह्मणजे संततीचें रक्षण केलें असतां आपल्या आत्म्याचें रक्षण केलें असें होतें. कारण आत्माच तिच्या उदरांत ( पुत्ररूपानें ) जन्म पावतो, म्हणूनच पत्नीला ज्ञाते 'जाया' असें नांव देतात ( ४१ ). पत्नीनेंहि पति आपल्या उदरीं यावा याकरितां त्याला जपत असलें पाहिजे. हा वर्णधर्म ब्राह्मणांनीं सांगितलेला मी ऐकिला आहे (४२ ). शत्रूंचा संहार करणें याहून क्षत्रियाचा निराळा धर्म नाहीं. धर्मराज पहात असतां कीचकानें मला लाथ मारली (४३), आणि तीहि महाबलिष्ठ भीमसेना, तुझ्याहि समक्ष मारली. त्या घोर जटासुरापासून तूंच माझें रक्षण केलें ( ४४ ). जयद्रथास त्याचप्रमाणें तूं बंधूंसह जिंकलें; हा जो महापातकी माझा उपमर्द करीत असतो, यालाहि तूं ठार कर ( ४५ ). भारता, कीचक राजाचा प्रिय असल्यानें मला छळतो. अशी मदनाची धुंदी चढलेल्या त्याला मातीच्या घड्याप्रमाणें दगडावर आपटून फोड ( ४६ ).

योनिमित्तमनर्थानां बहूनां मम भारत ।
तं चेज्जीवन्तमादित्यः प्रातरभ्युदयिष्यति ॥ ४७ ॥
विषमालोड्य पास्यामि मा कीचकवशं गमम् ।
श्रेयो हि मरणं मह्यं भीमसेन तवाऽग्रतः ॥ ४८ ॥

**वैशम्पायन उवाच-**

इत्युक्त्वा प्रारुदत्कृष्णा भीमस्योरस्समाश्रिता ।
भीमश्च तां परिष्वज्य महत्सान्त्वं प्रयुज्य च ॥ ४९ ॥
आश्वासयित्वा बहुशो भृशमार्त्तां सुमध्यमाम् ।
हेतुतत्त्वार्थसंयुक्तैर्वचोभिर्द्रुपदात्मजाम् ॥ ५० ॥
प्रमृज्य वदनं तस्याः पाणिनाऽश्रुसमाकुलम् ।
कीचकं मनसाऽगच्छत्सृक्किणी परिसँल्लिहन् ॥
उवाच चैनां दुःखार्तां भीमः क्रोधसमन्वितः ॥५१॥[६७६]

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि द्रौपदीसान्त्वने एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥**

भारता, मजवर अनेक अनर्थ कोसळण्यास जो कारण आहे, तो कीचक जिवंत राहून जर सूर्य ( उद्यां ) सकाळीं उगवेल ( ४७ ), तर मी त्या कीचकाच्या तावडींत सांपडूं नये म्हणून विष कालवून पिईन. भीमसेना, तुझ्या समोर मला मरण आलेलें श्रेयस्करच आहे" ( ४८ ).

**वैशंपायन** म्हणाला:—असें बोलून द्रौपदी भीमाच्या उरावर मान टाकून रडूं लागली. मग भीमसेनानेंहि तिला आलिंगन देऊन तिची पुष्कळ समजूत घातली ( ४९ ). अतिशय दु:खित झालेल्या त्या सुंदर द्रुपदकन्येला सहेतुक व तत्त्वार्थयुक्त भाषणांनीं त्यानें धीर दिला ( ५० ). तिचें आंसवांनीं भिजून गेलेलें तोंड त्यानें आपल्या हातांनीं पुसलें; आणि मनांत कीचकाचें स्मरण करून दांतओठ खात रागारागानें तो त्या दु:खार्त झालेल्या द्रौपदीस म्हणाला(५१).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील कीचकवध-उपपर्वांत द्रौपदीच्या सान्त्वनाविषयीं २१ वा अध्याय संपला.

---

# अध्याय २२

[ भीम द्रौपदीस युक्ती सांगतो; व कीचकाचा वध करितो. ]

भीमसेन उवाच— तथा भद्रे करिष्यामि यथा त्वं भीरु भाषसे ।
अद्य तं सूदयिष्यामि कीचकं सहबान्धवम् ॥ १ ॥
अस्याः प्रदोषे[1] शर्वर्याः कुरुष्वाऽनेन सङ्गतम् ।
दुःखं शोकं च निर्धूय याज्ञसेनि शुचिस्मिते ॥ २ ॥
यैषा नर्तनशालेह मत्स्यराजेन कारिता ।
दिवाऽत्र कन्या नृत्यन्ति रात्रौ यान्ति यथागृहम् ॥ ३ ॥
तत्राऽस्ति शयनं दिव्यं दृढाङ्गं सुप्रतिष्ठितम् ।
तत्राऽस्य दर्शयिष्यामि पूर्वप्रेतान्पितामहान् ॥ ४ ॥
यथा च त्वां न पश्येयुः कुर्वाणां तेन संविदम् ।
कुर्यास्तथा त्वं कल्याणि यथा सन्निहितो भवेत् ॥ ५ ॥
वैशम्पायन उवाच—तथा तौ कथयित्वा तु बाष्पमुत्सृज्य दुःखितौ ।
रात्रिशेषं तमस्युग्रं धारयामासतुर्हृदि ॥ ६ ॥

**भीमसेन** म्हणाला:—"भित्रे, तूं म्हणत्येस त्याप्रमाणें मी करीन. कल्याणि, आजच मी त्या कीचकास, त्याच्या बांधवांसह ठार करीन (१). ह्या रात्रीच्या प्रदोषवेळीं शुचिस्मिते याज्ञसेनि, दुःख व शोक दूर सारून तूं त्यास भेट (२). ही जी विराटानें येथें नृत्यशाला बांधविली आहे, तींत मुली दिवसा नृत्य करीत असतात; परंतु रात्रीं त्या आपापल्या घरीं जातात (३). त्या ठिकाणीं चांगला बसविलेला, बळकट व दिव्य पलंग आहे; त्यावरच मी त्याला त्याचे पूर्वी मेलेले पितर दाखवीन! (४) (परंतु) कल्याणि, त्याच्याशीं ठराव करताना जेणेंकरून तुला कोणी पाहणार नाहीं, आणि तो तयार राहील असें कर"(५).

**वैशंपायन** म्हणाला:— याप्रमाणें ठरवून त्या दोघांनीं ती राहिलेली अत्यंत घोर रात्र दुःखानें अश्रु ढाळींत निमुटपणें घालविली (६).

---

१ येथें 'सकाळीं' असा अर्थ दिसतो. प्रदोषः=रजनीमुखम् । व्युष्ट = सकाळ (१६)१. दोहोंचे उलटे अर्थ घेतलेले दिसतात.



यज्ञीय पशूस मारतात त्याप्रमाणें कीचकास ठार केलें

तस्यां रात्र्यां व्यतीतायां प्रातरुत्थाय कीचकः ।
गत्वा राजकुलायैव द्रौपदीमिदमब्रवीत् ॥ ७ ॥
सभायां पश्यतो राज्ञः पातयित्वा पदाऽहनम् ।
न चैवाऽलभसे त्राणमभिपन्ना बलीयसा ॥ ८ ॥
प्रवादेनेह मत्स्यानां राजा नाम्नाऽयमुच्यते ।
अहमेव हि मत्स्यानां राजा वै वाहिनीपतिः ॥ ९ ॥
मां सुखं प्रतिपद्यस्व दासो भीरु भवामि ते ।
अह्नाय तव सुश्रोणि शतं निष्कान्ददाम्यहम् ॥ १० ॥
दासीशतं च ते दद्यां दासानामपि चाऽपरम् ।
रथं चाऽश्वतरीयुक्तमस्तु नौ भीरु सङ्गमः ॥ ११ ॥

द्रौपद्युवाच— एवं मे समयं त्वद्य प्रतिपद्यस्व कीचक ।
न त्वां सखा वा भ्राता वा जानीयात्सङ्गतं मया ॥ १२ ॥
अनुप्रवादाद्भीताऽस्मि गन्धर्वाणां यशस्विनाम् ।
एवं मे प्रतिजानीहि ततोऽहं वशगा तव ॥ १३ ॥

ती रात्र गेल्यावर सकाळींच उठून कीचक तडक राजवाड्यांत गेला, व द्रौपदीस म्हणाला:–( ७ ). " सभेंत राजासमक्ष मी तुला खालीं पाडून लाथ मारली; परंतु तुजवर हल्ला केला असतांही माझ्या सामर्थ्यामुळें तुला (कोणा-कडूनहि) आश्रय मिळाला नाहीं (८). केवळ प्रवादामुळें 'विराट' हा मत्स्यांचा नांवाचा राजा आहे; खरोखर मी सेनापतिच मत्स्यांचा राजा आहें (९). माझा सुखानें स्वीकार कर, म्हणजे भित्रे, मी तुझा दास होऊन राहीन. सुंदरी, तुला मी ताबडतोब शंभर मोहरा देतों ( १० ). शंभर दासी व तितकेच दासहि देईन, आणि खेचरी जोडलेला रथहि देईन. भित्रे, आपला समागम होऊं दे" ( ११ ).

**द्रौपदी** म्हणाली:—"कीचका, माझ्या शर्तीला तूं आधीं कबूल झालें पाहिजे. तुझा व माझा समागम झाल्याची गोष्ट तुझ्या जिवलग मित्राला किंवा भावालाहि कळतां कामा नये(१२). हें (वर्तमान) यशस्वी गंधर्वांना कर्णोपकर्णी कळेल कीं काय अशी मला भीति वाटते. म्हणून मला अगोदर असें वचन दे, (कीं, याची वाच्यता होणार नाहीं); म्हणजे मग मी तुला वश होईन"(१३).

कीचक उवाच— एवमेतत्करिष्यामि यथा सुश्रोणि भाषसे ।
एको भद्रे गमिष्यामि शून्यमावसथं तव ॥ १४ ॥
समागमार्थं रम्भोरु त्वया मदनमोहितः ।
यथा त्वां नैव पश्येयुर्गन्धर्वाः सूर्यवर्चसः ॥ १५ ॥
द्रौपद्युवाच—यदेतन्नर्तनागारं मत्स्यराजेन कारितम् ।
दिवाऽत्र कन्या नृत्यन्ति रात्रौ यान्ति यथागृहम् ॥ १६ ॥
तमिस्रे तत्र गच्छेथा गन्धर्वास्तन्न जानते ।
तत्र दोषः परिहृतो भविष्यति न संशयः ॥ १७ ॥
वैशम्पायन उवाच— तमर्थमपि जल्पन्त्याः कृष्णायाः कीचकेन ह ।
दिवसार्द्धं[1] समभवन्मासेनैव समं नृप ॥ १८ ॥
कीचकोऽथ गृहं गत्वा भृशं हर्षपरिप्लुतः ।
सैरन्ध्रीरूपिणं मूढो मृत्युं तं नाऽवबुद्धवान् ॥ १९ ॥

**कीचक** म्हणाला:— "सुंदरी, तूं म्हणतेस त्याचप्रमाणें मी करीन. तुझ्या घरीं दुसरें कोणी नसेल अशाच वेळीं एकटा, कल्याणि, रंभोरु, तुझ्याशीं समागमार्थ काममोहित झालेला मी येईन, म्हणजे ते सूर्याप्रमाणें तेजस्वी गंधर्व तुला पाहणारच नाहींत" ( १४-१५ ).

**द्रौपदी** म्हणाली:—" ही जी नृत्यशाळा मत्स्यराजानें करविली आहे तीमध्यें दिवसा मुली नृत्य करितात, व रात्रीं त्या आपापल्या घरीं जातात(१६). तूं अंधारांत त्याठिकाणीं जा, ( म्हणजे ) तें गंधर्वांस समजणार नाहीं; त्या योगानें निःसंशय सर्व दोष टळेल" ( १७ ).

**वैशम्पायन** म्हणाला:—राजा, द्रौपदी कीचकाशीं ती गोष्ट बोलत असतां, ( कीचकाचा वध कधीं होतो या उत्कंठेमुळें ) तो संध्याकाळपर्यंतचा दिवस तिला महिन्यासारखा होऊन गेला ( १८ ). इकडे कीचक अत्यंत हर्षभरित होऊन आपल्या घरीं गेला. पण सैरंध्रीच्या रूपानें आपला मृत्यूच आला आहे हें त्या मूर्खास समजलें नाहीं ( १९ ).

१ दिवसार्धम् अहोरात्रार्धम् (नी०)

गन्धाभरणमाल्येषु व्यासक्तः स विशेषतः ।
अलञ्चक्रे तदाऽऽत्मानं सत्वरः काममोहितः ॥ २० ॥
तस्य तत्कुर्वतः कर्म कालो दीर्घ इवाऽभवत् ।
अनुचिन्तयतश्चापि तामेवाऽऽयतलोचनाम् ॥ २१ ॥
आसीदभ्यधिका चापि श्रीः श्रियं प्रमुमुक्षतः ।
निर्वाणकाले दीपस्य वर्तीमिव दिधक्षतः ॥ २२ ॥
कृतसम्प्रत्ययस्तस्याः कीचकः काममोहितः ।
नाऽज्ञानाद्दिवसं यान्तं चिन्तयानः समागमम् ॥ २३ ॥
ततस्तु द्रौपदी गत्वा तदा भीमं महानसे ।
उपातिष्ठत कल्याणी कौरव्यं पतिमन्तिकम् ॥ २४ ॥
तमुवाच सुकेशान्ता कीचकस्य मया कृतः ।
सङ्गमो नर्तनागारे यथाऽवोचः परन्तप ॥ २५ ॥
शून्यं स नर्तनागारमागमिष्यति कीचकः ।
एको निशि महाबाहो कीचकं तं निषूदय ॥ २६ ॥

तो काममोहित विशेषेंकरून उटण्यानटण्यांत गर्क झाला. अलंकार व फुलें यांनीं त्यानें आपलें शरीर सुशोभित केलें (२०). त्या विशालाक्षीचेंच चिंतन करीत असल्यामुळें नटण्यांत त्याचा पुष्कळच वेळ निघून गेला ( २१ ). त्याचें तेज कायमचेंच त्याला सोडून जाणार असल्यामुळें, जातांजातां दिव्याची ज्योत जशी मोठी होत असते तशी, त्यावेळीं त्याची मुखश्री विशेष टवटवीत झाली होती (२२). त्या काममोहित कीचकाला तिचा विश्वास वाटला होता, त्यामुळें तिच्या समागमाचा विचार करीत दिवस केव्हां मावळला याचें त्याला भान राहिलें नाहीं (२३). द्रौपदी पाकशाळेंत भीमसेनाकडे गेली आणि ती कल्याणी आपल्या कुरुवंशज पतीजवळ उभी राहिली (२४). नंतर ती सुकेशी त्यास म्हणाली:–" शत्रुतापना, तूं सांगितल्याप्रमाणें नृत्यशाळेंत मी कीचकाशीं संगताचें ठरविलें आहे ( २५ ). रात्रीं त्या शून्य नृत्यशाळेंत तो कीचक एकटाच येईल, तेव्हां तूं त्या कीचकास ठार कर ( २६ ).

तं सूतपुत्रं कौन्तेय कीचकं मददर्पितम् ।
गत्वा त्वं नर्तनागारं निर्जीवं कुरु पाण्डव ॥ २७ ॥
दर्पाच्च सूतपुत्रोऽसौ गन्धर्वानवमन्यते ।
तं त्वं प्रहरतां श्रेष्ठ ह्रदान्नागमिवोद्धर ॥ २८ ॥
अश्रु दुःखाभिभूताया मम मार्जस्व भारत ।
आत्मनश्चैव भद्रं ते कुरु मानं कुलस्य च ॥ २९ ॥

भीमसेन उवाच— स्वागतं ते वरारोहे यन्मां वेदयसे प्रियम् ।
न ह्यन्यं कञ्चिदिच्छामि सहायं वरवर्णिनि ॥ ३० ॥
या मे प्रीतिस्त्वयाऽऽख्याता कीचकस्य समागमे ।
हत्वा हिडिम्बं सा प्रीतिर्ममाऽऽसीद्वरवर्णिनि ॥ ३१ ॥
सत्यं भ्रातॄंश्च धर्मं च पुरस्कृत्य ब्रवीमि ते ।
कीचकं निहनिष्यामि वृत्रं देवपतिर्यथा ॥ ३२ ॥
तं गह्वरे प्रकाशे वा पोथयिष्यामि कीचकम् ।
अथ चेदपि योत्स्यन्ति हिंसे मत्स्यानपि ध्रुवम् ॥ ३३ ॥

कुंतिपुत्रा, तो सारथ्याचा पोर गर्वानें उन्मत्त झाला आहे, तूं नृत्यशाळेंत जाऊन त्यास गतासु करून टाक ( २७ ). गर्वामुळें तो सूतपुत्र गंधर्वांसहि तुच्छ मानतो, यासाठीं योधश्रेष्ठा, डोहांतून सर्पास बाहेर काढावें तसें याला ( जीवलोकांतून ) वर पाठवून दे ( २८ ). मी दुःखांनीं गांजून गेल्यें आहें, भारता, माझे अश्रु पूस आणि आपला व कुळाचा लौकिक राख. तुझें कल्याण असो" ( २९ ).

**भीमसेन** म्हणालाः—" वरारोहे, तुझें येणें शुभकारक आहे. मला आवडती गोष्टच तूं सांगत आहेस. वरवर्णिनी, मी दुसऱ्या कोणाच्याच साहाय्याची इच्छा करीत नाहीं ( ३० ). सुंदरी, कीचकाची व माझी गांठ घालण्यांत तूं मला जो आनंद दिला आहेस, तसा आनंद एक हिडिंबासुराला मी मारिलें तेंव्हांच फक्त मला झाला होता (३१). सत्य, बंधू व धर्म यांची शपथ घेऊन मी तुला सांगतों कीं, इंद्रानें वृत्रासुरास मारलें त्याप्रमाणें मी कीचकाला ठार करीन ( ३२ ). अंधाराच्या जागीं किंवा उजेडांत-( राजरोसपणें ) हि मी त्या कीचकाशीं युद्ध करीन; (मग त्याचा कड घेऊन) जरी मत्स्यवीर लढूं लागले तरी त्यांचाहि मी खास फडशा उडवीन ( ३३ ).

ततो दुर्योधनं हत्वा प्रतिपत्स्ये वसुन्धराम् ।
कामं मत्स्यमुपास्तां हि कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ॥ ३४ ॥
द्रौपद्युवाच—यथा न सन्त्यजेथास्त्वं सत्यं वै मत्कृते विभो ।
निगूढस्त्वं तथा पार्थ कीचकं तं निषूदय ॥ ३५ ॥
भीमसेन उवाच— एवमेतत्करिष्यामि यथा त्वं भीरु भाषसे ।
अद्य तं सूदयिष्यामि कीचकं सह बान्धवैः ॥ ३६ ॥
अदृश्यमानस्तस्याऽथ तमस्विन्यामनिन्दिते ।
नागो बिल्वमिवाऽऽक्रम्य पोथयिष्याम्यहं शिरः ।
अलभ्यामिच्छतस्तस्य कीचकस्य दुरात्मनः ॥ ३७ ॥
वैशंपायन उवाच—भीमोऽथ प्रथमं गत्वा रात्रौ च्छन्न उपाविशत् ।
मृगं हरिरिवाऽदृश्यः प्रत्याकाङ्क्षत कीचकम् ॥ ३८ ॥
कीचकश्चाऽप्यलंकृत्य यथाकाममुपागमत् ।
तां वेलां नर्त्तनागारं पाञ्चालीसङ्गमाशया ॥ ३९ ॥

त्यानंतर मी दुर्योधनासहि ठार करून पृथ्वी ताब्यांत आणीन. कुंतीपुत्र युधिष्ठिर खुशाल विराटाची सेवा करीत बसो !" ( ३४ ).

**द्रौपदी** म्हणाली:—"समर्था, माझ्याकरितां तुला जेणेंकरून सत्याचा त्याग करावा लागणार नाहीं, अशा गुप्तपणानेंच, पृथानंदना, तूं त्या कीचकाला मार" ( ३५ ).

**भीमसेन** म्हणाला:—"( बरें, ) भित्रे, तूं म्हणत्येस तसेंच मी करीन. आजच मी त्या कीचकाला त्याच्या बांधवांसह ठार करीन ( ३६ ). अनिंदिते, अंधाऱ्या रात्रींत त्याच्या दृष्टीस न पडतां मी त्याचें मस्तक, हत्ती बेलफळ जसें पायाखालीं चिरडतो, तसें चिरडून टाकीन. तो दुरात्मा कीचक अलभ्य वस्तूची इच्छा करीत आहे" ( ३७ ).

**वैशम्पायन** म्हणाला:—नंतर रात्रीं भीमसेन आधींच जाऊन (नृत्यशाळेंत) दडून बसला; आणि मृगाची वाट पहात छपून बसलेल्या सिंहाप्रमाणें कीचकाची मार्गप्रतीक्षा करूं लागला ( ३८ ). कीचकहि त्या ठरलेल्या वेळीं इच्छेनुसार नटून द्रौपदीच्या समागमाच्या आशेनें नृत्यशाळेशीं आला(३९).

मन्यमानः स सङ्केतमागारं प्राविशच्च तत् ।
प्रविश्य च स तद्वेश्म तमसा संवृतं महत् ॥ ४० ॥
पूर्वागतं ततस्तत्र भीममप्रतिमौजसम् ।
एकान्तावस्थितं चैनमाससाद स दुर्मतिः ॥ ४१ ॥
शयानं शयने तत्र सूतपुत्रः परामृशत् ।
जाज्वल्यमानं कोपेन कृष्णाधर्षणजेन ह ॥ ४२ ॥
उपसङ्गम्य चैवैनं कीचकः काममोहितः ।
हर्षोन्मथितचित्तात्मा स्मयमानोऽभ्यभाषत ॥ ४३ ॥
प्रापितं ते मया वित्तं बहुरूपमनन्तकम् ।
यत्कृतं धनरत्नाढ्यं दासीशतपरिच्छदम् ॥ ४४ ॥
रूपलावण्ययुक्ताभिर्युवतीभिरलंकृतम् ।
गृहं चाऽन्तःपुरं सुभ्रु क्रीडारतिविराजितम् ।
तत्सर्वं त्वां समुद्दिश्य सहसाऽऽहमुपागतः ॥ ४५ ॥

ठरलेला बेत मनांत आणीत तो त्या घरांत शिरला. त्यांत अगदीं कुट्ट काळोख पसरला होता, यामुळें दुर्मति कीचकाच्या हातीं आधींच तेथें, येऊन एकांतांत बसलेला अप्रतिम तेजाचा भीमसेन लागला ( ४०–४१ ). तेथें द्रौपदीवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केल्यामुळें (आंतल्या आंत) क्रोधाग्नीनें धुमसत असलेल्या, पलंगावर निजलेल्या भीमसेनास कीचकानें हात लावला ( ४२ ). मदनानें धुंद झालेल्या त्या कीचकाचें चित्त हर्षानें उचंबळूं लागलें आणि तो भीमाजवळ जाऊन हंसत हंसत म्हणाला:– (४३) " मी संपादन केलेली नानाप्रकारची अपार संपत्ती मी तुला अर्पण केली आहे. सुंदरी, मी जें ( मंदिर ) द्रव्यानें व रत्नांनीं भरून टाकलें आहे, जेथें शेंकडों दासी वावरत आहेत ( ४४ ), आणि रूपलावण्यसंपन्न युवतींनीं जें अलंकृत झालेलें आहे, असें माझें मंदिर व रतिक्रीडेस शोभायमान अंतःपुर, हें सर्व तुला अर्पण करून मी घाईघाईनें येथें आलों आहें ( ४५ ).

[1]अकस्मान्मां प्रशंसन्ति सदा गृहगताः स्त्रियः ।
सुवासा दर्शनीयश्च नान्योऽस्ति त्वादृशः पुमान् ॥ ४६ ॥
भीमसेन उवाच—दिष्ट्या त्वं दर्शनीयोऽथ दिष्ट्याऽऽत्मानं प्रशंससि ।
ईदृशस्तु त्वया स्पर्शः स्पृष्टपूर्वो न कर्हिचित् ॥ ४७ ॥
स्पर्शं वेत्सि विदग्धस्त्वं कामधर्मविचक्षणः ।
स्त्रीणां प्रीतिकरो नाऽन्यस्त्वत्समः पुरुषस्त्विह ॥ ४८ ॥
वैशम्पायन उवाच—इत्युक्त्वा तं महाबाहुर्भीमो भीमपराक्रमः ।
सहसोत्पत्य कौन्तेयः प्रहस्येदमुवाच ह ॥ ४९ ॥
अद्य त्वां भगिनी पापं कृष्यमाणं मया भुवि ।
द्रक्ष्यतेऽद्रिप्रतीकाशं सिंहेनेव महागजम् ॥ ५० ॥
निराबाधा त्वयि हते सैरन्ध्री विचरिष्यति ।
सुखमेव चरिष्यन्ति सैरन्ध्र्याः पतयः सदा ॥ ५१ ॥

घरच्या स्त्रिया 'आपल्यासारखा उत्तम वस्त्रें धारण करणारा सुंदर पुरुष दुसरा कोणीच नाहीं,' अशी माझी नित्य प्रशंसा उगीच करितील" ( ४६ ).

**भीमसेन** म्हणाला:—"तूं सुंदर आहेस हें भाग्य आहे, आपणच आपली प्रशंसा करीत आहेस हेंहि उत्तम आहे. पण तुला ( हल्लीं ) माझ्या शरीराचा जो स्पर्श होत आहे तसा स्पर्श तूं कधींहि अनुभविला नाहींस ( ४७ ). तूं मोठा विद्वान् ( व विशेषेंकरून ) कामशास्त्रांतनिपुण असल्यामुळें तुला स्पर्शज्ञान उत्तम झालेलें आहे; आणि तुझ्यासारखा स्त्रियांस आनंदित करणारा पुरुष या जगांत दुसरा कोणीच नाहीं" ( ४८ ).

**वैशंपायन** म्हणाले:— असें बोलून तो महाबलाढ्य व मोठा पराक्रमी कुंतीपुत्र भीम एकदम उठून मोठ्यानें हंसला आणि म्हणाला:–(४९) "सिंह ज्याप्रमाणें महागजाला ओढतो, तसा आज तुझा हा पर्वतप्राय पापी देह मी जमीनीवरून फरफर ओढीत आहें असें तुझ्या बहिणीच्या दृष्टीस पडेल (५०). तूं एकदां मेलास म्हणजे सैरंध्री निर्विघ्नपणें फिरूं लागेल आणि तिचे पतिहि सदोदित आनंदांत राहतील" ( ५१ ).

---

१ अकस्मात् । त्वयाऽहं वृत इति हेतोरित्यभिप्रायः ( नी. )

ततो जग्राह केशेषु माल्यवत्सु महाबलः ।
स केशेषु परामृष्टो बलेन बलिनां वरः ॥ ५२ ॥
आक्षिप्य केशान्वेगेन बाह्वोर्जग्राह पाण्डवम् ।
बाहुयुद्धं तयोरासीत्क्रुद्धयोर्नरसिंहयोः ॥ ५३ ॥
वसन्ते वासिताहेतोर्बलवद्गजयोरिव ।
कीचकानां तु मुख्यस्य नराणामुत्तमस्य च ॥ ५४ ॥
वालिसुग्रीवयोर्भ्रात्रोः पुरेव कपिसिंहयोः ।
अन्योन्यमभिसंरब्धौ परस्परजयैषिणौ ॥ ५५ ॥
ततः समुद्यम्य भुजौ पञ्चशीर्षाविवोरगौ ।
नखदंष्ट्राभिरन्योन्यं घ्नतः क्रोधविषोद्धतौ ॥ ५६ ॥
वेगेनाऽभिहतो भीमः कीचकेन बलीयसा ।
स्थिरप्रातिज्ञः स रणे पदान्न चलितः पदम् ॥ ५७ ॥
तावन्योन्यं समाश्लिष्य प्रकर्षन्तौ परस्परम् ।
उभावपि प्रकाशेते प्रवृद्धौ वृषभाविव ॥ ५८ ॥

नंतर त्या महाबलवंतानें त्याचे फुलांनीं सुशोभित केलेले केंस धरले. केंस धरतांच बलवंतांत श्रेष्ठ असलेल्या कीचकानें ( आपले ) केंस वेगानें हिसडून सोडविले, आणि आपल्या बाहूंत भीमास पकडलें. तेव्हां त्या खवळलेल्या दोघांचें, वसंत ऋतूंत फळावयास आलेल्या हत्तिणीच्या निमित्तानें जसें दोन बलिष्ठ गजांमध्यें युद्ध जुंपतें तसें बाहुयुद्ध जुंपलें. एक कीचकांचा अग्रणी होता, तर दुसरा मनुष्यांत बलिष्ठ होता ( ५२–५४ ). वालि व सुग्रीव ह्या कपिश्रेष्ठ भावांप्रमाणें ते एकमेकांवर खवळून परस्परांस जिंकण्यासाठीं धडपड करूं लागले ( ५५ ). नंतर क्रोधरूपी विषानें भरलेल्या त्या वीरांनीं आपलें पंचमुखी भुजंगांप्रमाणें भासणारे हात वर उचलून नखांनीं व दांतांनीं परस्परांवर प्रहार चालविले ( ५६ ). बलाढ्य कीचकानें भीमावर मोठ्या जोरानें प्रहार केला, परंतु तो दृढनिश्चयाचा ( वीर ) एक पाऊलभरहि मागें सरला नाहीं ( ५७ ). ते एकमेकांशीं भिडून जेव्हां परस्परांस ओढूं लागले तेव्हां ते दोघेहि माजलेल्या पोळांसारखे दिसूं लागले ( ५८ ).

तयोर्ह्यासीत्सुतुमुलः संप्रहारः सुदारुणः ।
नखदन्तायुधवतोर्व्याघ्रयोरिव दृप्तयोः ॥ ५९ ॥
अभिपत्याऽथ बाहुभ्यां प्रत्यगृह्णादमर्षितः ।
मातङ्ग इव मातङ्गं प्रभिन्नकरटामुखम् ॥ ६० ॥
स चाप्येनं तदा भीमः प्रतिजग्राह वीर्यवान् ।
तमाक्षिपत्कीचकोऽथ बलेन बलिनां वरः ॥ ६१ ॥
तयोर्भुजविनिष्पेषादुभयोर्बलिनोस्तदा ।
शब्दः समभवद्घोरो वेणुस्फोटसमो युधि ॥ ६२ ॥
अथैनमाक्षिप्य बलाद्गृहमध्ये वृकोदरः ।
धूनयामास वेगेन वायुश्चण्ड इव द्रुमम् ॥ ६३ ॥
भीमेन च परामृष्टो दुर्बलो बलिना रणे ।
प्रास्पन्दत यथाप्राणं विचकर्ष च पाण्डवम् ॥ ६४ ॥
ईषदाकलितं चापि क्रोधाद् [1]द्रुतपदं स्थितम् ।
कीचको बलवान्भीमं जानुभ्यामाक्षिपद्भुवि ॥ ६५ ॥

नखें व दांत हींच ज्यांचीं हत्यारें आहेत अशा दोन वाघांच्या लढाईप्रमाणें त्या दोघांचा अतितुंबळ व मोठा दारुण संग्राम झाला ( ५९ ). आतां हत्ती जसा गंडस्थलांतून मद वाहणाऱ्या हत्तीवर चालून जातो, त्याप्रमाणें (कीचकानें) त्वेषानें भीमावर घसरून दोन्ही हातांनीं त्यास पकडलें ( ६० ). लगेच त्या वीर्यशाली भीमानेंहि त्यास धरलें. बलाढ्यांत श्रेष्ठ अशा कीचकानें त्यास जोरानें हांसडलें ( ६१ ). त्या युद्धांत त्या दोघां बलवंतांच्या दंड थोपटण्यामुळें, बांबू फुटूं लागले असतां जसा शब्द होतो तसा भयंकर शब्द होऊं लागला (६२). नंतर भीमसेनानें त्यास त्या घराच्या मध्यभागीं खालीं ( फरशीवर ) जोरानें पाडून, प्रचंडवायु वृक्षास हालवितो त्याप्रमाणें त्यास तो घोळूं लागला ( ६३ ). त्या बलाढ्य भीमसेनानें युद्धांत त्या दुर्बळास घुसळलें, तेव्हां त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें दम धरला, आणि पांडुपुत्र भीमसेनास ओढलें ( ६४). त्यानें भीमास थोडेंसें वांकविलें, तेव्हां तो पुनः त्वेषानें सत्वर उभा राहिला, परंतु बलाढ्य कीचकानें त्यास गुडघ्यांवर खालीं पाडलें ( ६५ ).

१ द्रुतपदं—चलितस्थानं यथा स्यात्तथा स्थितं ( नी. ). अर्थ स्पष्ट होत नाहीं.

पातितो भुवि भीमस्तु कीचकेन बलीयसा ।
उत्पपाताऽथ वेगेन दण्डपाणिरिवान्तकः ॥ ६६ ॥
स्पर्द्धया च बलोन्मत्तौ तावुभौ सूतपाण्डवौ ।
निशीथे पर्यकर्षेतां बलिनौ निर्जने स्थले ॥ ६७ ॥
ततस्तद्भवनं श्रेष्ठं प्राकम्पत मुहुर्मुहुः ।
बलवच्चापि सङ्क्रुद्धावन्योन्यं प्रतिगर्जतः ॥ ६८ ॥
तलाभ्यां स तु भीमेन वक्षस्यभिहतो बली ।
कीचको रोषसन्तप्तः पदान्न चलितः पदम् ॥ ६९ ॥
मुहूर्तं तु स तं वेगं सहित्वा भुवि दुस्सहम् ।
बलादहीयत तदा सूतो भीमबलार्दितः ॥ ७० ॥
तं हीयमानं विज्ञाय भीमसेनो महाबलः ।
वक्षस्यानीय[1] वेगेन ममर्दैनं विचेतसम् ॥ ७१ ॥
क्रोधाविष्टो विनिश्श्वस्य पुनश्चैनं वृकोदरः ।
जग्राह जयतां श्रेष्ठः केशेष्वेव तदा भृशम् ॥ ७२ ॥

पण बलाढ्य कीचकानें भूमीवर पाडलेला भीम दंडधारी यमासारखा ताड्कन् उडी मारून उभा राहिला (६६). ते शक्तीनें उन्मत्त झालेले बलाढय कीचक व भीम मध्यरात्रीं त्या निर्जन स्थळीं मोठ्या स्पर्धेनें एकमेकांस ओढूं लागले ( ६७ ). त्या योगानें तें मजबूत गृह वारंवार हादरूं लागलें, आणि ते संतप्त झालेले वीर एकमेकांवर ओरडूं लागले ( ६८ ). भीमानें कीचकाच्या छातीवर दोन्ही हातांनीं चपराक लगावली; परंतु रागानें संतप्त झालेला कीचक जाग्यावरून पाऊलभरहि हटला नाहीं ( ६९ ). या जगांत सहन करण्यास कठीण असलेला भीमाचा वेग कीचकानें दोन घटकांपर्यंत सहन केल्यावर, भीमाच्या जोराच्या प्रहारांनीं त्याची शक्ति क्षीण होऊं लागली ( ७० ). तो बलहीन झाला आहे असें पाहून, बलाढय भीमसेनानें त्यास छातीवर मुरडून, तो बेशुद्ध झाला असतां त्याचें मर्दन केलें ( ७१ ). त्या विजयिश्रेष्ठ भीमसेनानें रागाच्या भरांत सुस्कारा टाकीत त्याची शेंडी पुन्हां घट्ट धरली ( ७२ ).

---

१ वक्षस्यानीय आनतं भुग्नं कृत्वा ( नी. ).

गृहीत्वा कीचकं भीमो विरराज महाबलः ।
शार्दूलः पिशिताकाङ्क्षी गृहीत्वेव महामृगम् ॥ ७३ ॥
तत एनं परिश्रान्तमुपलभ्य वृकोदरः ।
योक्त्रयामास बाहुभ्यां पशुं रशनया यथा ॥ ७४ ॥
नदन्तं च महानादं भिन्नभेरीसमस्वनम् ।
भ्रामयामास सुचिरं विस्फुरन्तमचेतसम् ॥ ७५ ॥
प्रगृह्य तरसा दोर्भ्यां कण्ठं तस्य वृकोदरः ।
अपीडयत कृष्णायास्तदा कोपोपशान्तये ॥ ७६ ॥
अथ तं भग्नसर्वाङ्गं व्याविद्धनयनाम्बरम् ।
आक्रम्य च कटीदेशे जानुना कीचकाधमम् ।
अपीडयत बाहुभ्यां पशुमारममारयत् ॥ ७७ ॥
तं विषीदन्तमाज्ञाय कीचकं पाण्डुनन्दनः ।
भूतले भ्रामयामास वाक्यं चेदमुवाच ह ॥ ७८ ॥

महाबलिष्ठ भीमसेनानें जेव्हां कीचकाला उचललें, तेव्हां मांस खाण्याच्या इच्छेनें मोठें सावज पकडलें असतां वाघ जसा शोभतो तसा तो बलवान् भीम शोभूं लागला ( ७३ ). नंतर हा अगदीं थकून गेला आहे असें जाणून, दोरीनें पशु घट्ट बांधावा त्याप्रमाणें भीमानें त्यास आपल्या बाहूंनीं जखडून टाकिलें (७४), आणि तो त्याला पुष्कळ वेळ गरगर फिरवीत राहिला. त्या वेळीं कीचक फुटलेल्या नगाऱ्यासारख्या आवाजानें फारच मोठ्यानें ओरडत होता, आणि बेभान झाला होता तरी धडपड करीत होता ( ७५ ). द्रौपदीचा कोप शांत करण्यासाठीं भीमानें दोन्ही हातांनीं एकदम त्याचा गळा धरून जोरानें दाबला ( ७६ ). नंतर, ज्याचें सर्व शरीर भग्न होऊन डोळे बाहेर आले आहेत व वस्त्रेंहि गळालीं आहेत अशा त्या अधम कीचकाच्या कमरेवर गुडघा देऊन, ( यज्ञिय ) पशूस मारतात त्याप्रमाणें दोन्ही हातांनीं दाबून त्यानें त्यास ठार केलें ( ७७ ). कीचक मूर्च्छित होत आहेसें पाहून पांडुपुत्रानें त्यास भुईवर गडबडां फिरविलें व हें वाक्य उच्चारलें:—(७८)" (दुसऱ्याच्या) भार्येचा अपहार करणाऱ्या व सैरंध्रीस कांट्याप्रमाणें सलणाऱ्या या कीचकाला ठार

अद्याऽहमनृणो भूत्वा भ्रातुर्भार्यापहारिणम् ।
शान्तिं लब्धास्मि परमां हत्वा सैरन्ध्रिकण्टकम् ॥ ७९ ॥

इत्येवमुक्त्वा पुरुषप्रवीरस्तं कीचकं क्रोधसरागनेत्रः ।
आस्रस्तवस्त्राभरणं स्फुरन्तमुद्भ्रान्तनेत्रं व्यसुमुत्ससर्ज ॥८०॥

निष्पिष्य पाणिना पाणिं सन्दष्टौष्ठपुटं बली ।
समाक्रम्य च संक्रुद्धो बलेन बलिनां वरः ॥ ८१ ॥

तस्य पादौ च पाणी च शिरो ग्रीवां च सर्वशः ।
काये प्रवेशयामास पशोरिव पिनाकधृक् ॥ ८२ ॥

तं सम्माथितसर्वाङ्गं मांसपिण्डोपमं कृतम् ।
कृष्णाया दर्शयामास भीमसेनो महाबलः ॥ ८३ ॥

उवाच च महातेजा द्रौपदीं योषितां वराम् ।
पश्यैनमेहि पाञ्चालि कामुकोऽयं यथा कृतः ॥ ८४ ॥

एवमुक्त्वा महाराज भीमो भीमपराक्रमः ।
पादेन पीडयामास तस्य कायं दुरात्मनः ॥ ८५ ॥

मारून व आज भावाच्या ऋणांतून मुक्त होऊन मी शान्त झालों" ( ७९ ). याप्रमाणें बोलून क्रोधानें डोळे लाल झालेल्या पुरुषश्रेष्ठ भीमानें त्यास गतप्राण करून सोडलें. त्यावेळीं कीचकानें डोळे फिरविले होते, त्याचीं वस्त्रें व अलंकार अस्ताव्यस्त झालेले होते व तो तडफडत होता ( ८० ). ( मग ) त्या संतप्त झालेल्या अतिबलाढ्य भीमसेनानें हातावर हात चोळून, दांत ओठ खाऊन आणि त्याच्या छातीवर बसून, पिनाकपाणि ( शंकर ) ज्याप्रमाणें पशूचें मर्दन करतो, त्याप्रमाणें कीचकाचे पाय, हात, मान, मस्तक वगैरे सर्व अवयव जोरानें त्याच्या पोटांत चिणून टाकले ( ८१–८२ ). महाबलाढ्य भीमसेनानें त्याचें सर्व शरीर घुसळून त्याचा केवळ मांसाचा गोळा करून टाकलेला द्रौपदीला दाखविला ( ८३ ). आणि तो अतिशय तेजस्वी भीम स्त्रियांत वरिष्ठ असलेल्या द्रौपदीस म्हणाला:– "पांचालि, ये, ह्या विषयलंपटाची कशी अवस्था केली आहे पहा" ( ८४ ). महाराजा, असें म्हणून त्या भीमपराक्रमी भीमसेनानें त्या दुष्टाचें शरीर पायांनीं तुडविलें (८५).

ततोऽग्निं तत्र प्रज्वाल्य दर्शयित्वा तु कीचकम् ।
पाञ्चालीं स तदा वीर इदं वचनमब्रवीत् ॥ ८६ ॥
प्रार्थयन्ति सुकेशान्ते ये त्वां शीलगुणान्विताम् ।
एवं ते भीरु वध्यन्ते कीचकः शोभते यथा ॥ ८७ ॥
तत्कृत्वा दुष्करं कर्म कृष्णायाः प्रियमुत्तमम् ।
तथा स कीचकं हत्वा गत्वा रोषस्य वै शमम् ॥ ८८ ॥
आमन्त्र्य द्रौपदीं कृष्णां क्षिप्रमायान्महानसम् ।
कीचकं घातयित्वा तु द्रौपदी योषितां वरा ।
प्रहृष्टा गतसन्तापा सभापालानुवाच ह ॥ ८९ ॥
कीचकोऽयं हतः शेते गन्धर्वैः पतिभिर्मम ।
परस्त्रीकामसम्मत्तस्तत्राऽऽगच्छत पश्यत ॥ ९० ॥
तच्छ्रुत्वा भाषितं तस्या नर्तनागाररक्षिणः ।
सहसैव समाजग्मुरादायोल्काः सहस्रशः ॥ ९१ ॥
ततो गत्वाऽथ तद्वेश्म कीचकं विनिपातितम् ।
गतासुं ददृशुर्भूमौ रुधिरेण समुक्षितम् ॥ ९२ ॥

मग तेथें विस्तव पेटवून ( त्याच्या उजेडांत ) कीचकाकडे बोट दाखवून तो वीर द्रौपदीस त्यावेळीं म्हणालाः-८६). "सुंदरी, सुशील व गुणवती अशा तुझा जे अभिलाष धरतील, ते सर्व, भीरु, हा कीचक हल्लीं शोभत आहे तसे मारले जातील" (८७). असें तें दुर्घट काम करून त्यानें कृष्णेचा उत्कृष्ट मनोरथ परिपूर्ण केला आणि याप्रमाणें कीचकाला ठार केल्यावर ( कांहीं वेळानें ) त्याचा राग शांत झाला ( ८८ ). नंतर द्रौपदीचा निरोप घेऊन तो त्वरेनें पाकशाळेंत निघून गेला. स्त्रियांत श्रेष्ठ असलेल्या द्रौपदीच्या अंगाची जी आग झाली होती, ती कीचकाचा घात करविल्यावर शांत झाली, तेव्हां ती हर्षभरित होऊन त्या नृत्यशाळेच्या रखवालदारांस ( हांक मारून ) म्हणालीः-( ८९ ). "माझे पति गंधर्व यांनीं परस्त्रीविषयीं कामातुर झालेला हा कीचक मारून टाकिला आहे. तेथें या आणि पाहा!" ( ९० ). तिचें तें भाषण ऐकून नृत्यशाळेचे रक्षक खडबडून जागे होऊन हजारों मशाली घेऊन गोळा झाले ( ९१ ). मग ते त्या नृत्यशाळेंत गेले, तों कीचकाचें सर्व अंग रक्तानें माखलें असून तो तेथें गतप्राण होऊन भुईवर पडला आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें ( ९२ ).

पाणिपादविहीनं तु दृष्ट्वा च व्यथिताऽभवन् ।
निरीक्षन्ति ततः सर्वे परं विस्मयमागताः ॥ ९३ ॥
अमानुषं कृतं कर्म तं दृष्ट्वा विनिपातितम् ।
क्वाऽस्य ग्रीवा क्व चरणौ क्व पाणी क्व शिरस्तथा ।
इति स्म तं परीक्षन्ते गन्धर्वेण हतं तदा ॥ ९४ ॥ [ ७७० ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
कीचकवधपर्वणि कीचकवधे द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥

पण त्याचे हात व पाय नाहींसे झालेले पाहून त्यांस मोठी भीति वाटली. ते सर्वजण त्यामुळें आश्चर्य चकित होऊन त्याकडे निरखून पाहूं लागले ( ९३ ). अस्ताव्यस्त पडलेल्या कीचकास पाहून "हें कर्म तर मनुष्यानें केलेलें दिसत नाहीं–याची मान कोठें आहे ? हात कोठें आहेत ? आणि पाय व मस्तक तरी कोठें आहे ? ( खरोखर ) याला गंधर्वांनींच ठार केलें असावें, " असें ते त्यावेळीं म्हणूं लागले ( ९४ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील कीचकवध–उपपर्वांत कीचकाच्या
वधाविषयीं २२ वा अध्याय संपला.

## अध्याय २३

[ उपकीचक कीचकास द्रौपदीसह जाळण्यास घेऊन जातात. द्रौपदी पतीचा धांवा करते; भीम उपकीचकासहि मारून द्रौपदीस सोडवितो. ]

वैशम्पायन उवाच— तस्मिन्काले समागम्य सर्वे तत्राऽस्य बान्धवाः ।
रुरुदुः कीचकं दृष्ट्वा परिवार्य समन्ततः ॥ १ ॥
सर्वे संहृष्टरोमाणः सन्त्रस्ताः प्रेक्ष्य कीचकम् ।
तथा सम्भिन्नसर्वाङ्गं कूर्मं स्थल इवोद्धृतम् ॥ २ ॥

**वैशंपायन म्हणाले:**—इतक्या अवधींत कीचकाचे सर्व भाऊ तेथें येऊन कीचकाला गराडा घालून त्याकडे पाहून रडूं लागले ( १ ). स्थलावर ओढलेल्या कांसवाचे अवयव जसे त्याच्या पोटांत लुप्त व्हावेत, तसे कीचकाचे अवयव आंतल्याआंत चिणलेले पाहून भीतीनें सर्वांचे अंगास कांटा उभा राहिला (२).

विराटपर्व

कीचकवधपर्व



भीम—कृष्णे तूं लवकर नगरांत जा

अध्याय २३

पोथितं भीमसेनेन तमिन्द्रेणेव दानवम् ।
संस्कारयितुमिच्छन्तो बहिर्नेतुं प्रचक्रमुः ॥ ३ ॥
ददृशुस्ते ततः कृष्णां सूतपुत्राः समागताः ।
अदूराच्चाऽनवद्याङ्गीं स्तम्भमालिङ्गय तिष्ठतीम् ॥ ४ ॥
समवेतेषु सर्वेषु तामूचुरुपकीचकाः ।
हन्यतां शीघ्रमसती यत्कृते कीचको हतः ॥ ५ ॥
अथवा नैव हन्तव्या दह्यतां कामिना सह ।
मृतस्याऽपि प्रियं कार्यं सूतपुत्रस्य सर्वथा ॥ ६ ॥
ततो विराटमूचुस्ते कीचकोऽस्याः कृते हतः ।
सहाऽनेनाऽद्य दह्येम तदनुज्ञातुमर्हसि ॥ ७ ॥
पराक्रमं तु सूतानां मत्वा राजाऽन्वमोदत ।
सैरन्ध्र्याः सूतपुत्रेण सह दाहं विशाम्पतिः ॥ ८ ॥
तां समासाद्य वित्रस्तां कृष्णां कमललोचनाम् ।
मोमुह्यमानां ते तत्र जगृहुः कीचका भृशम् ॥ ९ ॥

इंद्र दानवाला तुडवतो त्याप्रमाणें तुडविलेल्या त्या कीचकाला, दहन-संस्कार करण्यासाठीं ते बाहेर काढूं लागले ( ३ ). इतक्यांत तेथें जवळच एका खांबास टेंकून उभी असलेली सुंदरी द्रौपदी त्यांच्या दृष्टीस पडली ( ४ ). त्या जमलेल्या कीचकाच्या भावांपैकीं कोणी म्हणाले:—" या पापिणीस लवकर मारून टाका. कारण हिच्यामुळेंच कीचकाचा वध झाला " ( ५ ). ( दुसरे म्हणाले:— ) " हिला मारूं नये. कीचक हिज-वर लुब्ध झाला होता, तेव्हां त्याच्याबरोबर हिलाहि जाळून टाका; ( कारण ) मृत झालेल्या सूतपुत्राचे मनोरथ सर्व प्रकारें पूर्ण करणें हें आपलें कर्तव्य आहे" ( ६ ). नंतर ते विराटास म्हणाले:—"हिजमुळें कीचक मारला गेला, तेव्हां आम्ही आज हिलाहि त्याच्याबरोबरच जाळून टा तों; तरी आम्हांस परवानगी असावी" ( ७ ). ( त्या ) सूतांचा पराक्रम ध्यानांत आणून कीच-काबरोबर सैरंध्रीचें दहन करण्यास प्रजेचा पालक विराटराजा यानें अनुमोदन दिलें ( ८ ). ( यावेळीं ) कमलनयना द्रौपदी भयभीत होऊन तिला मूर्छेनें ( अर्धवट ) घेरलें असतां, सूतांनीं तिला घट्ट धरलें ( ९ ).

ततस्तु तां समारोप्य निबद्ध्य च सुमध्यमाम् ।
जग्मुरुद्यम्य ते सर्वे श्मशानाभिमुखास्तदा ॥ १० ॥
ह्रियमाणा तु सा राजन्सूतपुत्रैरनिन्दिता ।
प्राक्रोशन्नाथमिच्छन्ती कृष्णा नाथवती सती ॥ ११ ॥
द्रौपद्युवाच— जयो जयन्तो विजयो जयत्सेनो जयद्बलः ।
ते मे वाचं विजानन्तु सूतपुत्रा नयन्ति माम् ॥ १२ ॥
येषां ज्यातलनिर्घोषो विस्फूर्जितमिवाऽशनेः ।
व्यश्रूयत महायुद्धे भीमघोषस्तरस्विनाम् ॥ १३ ॥
रथघोषश्च बलवान्गन्धर्वाणां तरस्विनाम् ।
ते मे वाचं विजानन्तु सूतपुत्रा नयन्ति माम् ॥ १४ ॥
वैशम्पायन उवाच— तस्यास्ताः कृपणा वाचः कृष्णायाः परिदेवितम् ।
श्रुत्वैवाऽभ्यापतद्भीमः शयनादविचारयन् ॥ १५ ॥
भीमसेन उवाच—अहं शृणोमि ते वाचं त्वया सैरन्ध्रि भाषिताम् ।
तस्मात्ते सूतपुत्रेभ्यो भयं भीरु न विद्यते ॥ १६ ॥

नंतर त्या सुंदरीस तिरडीवर घालून व नीट बांधून तिला उचलून घेऊन ते सर्वजण स्मशानाकडे जाऊं लागले ( १० ). राजा, याप्रमाणें त्या निरापराधी द्रौपदीला ते बळेंच नेऊं लागले तेव्हां, ती पतिव्रता सनाथ असून नाथाचा धांवा करीत मोठ्यानें आक्रोश करूं लागली ( ११ ).

द्रौपदी म्हणाली:—"जय, जयंत, विजय, जयत्सेन व जयद्बल हे माझ्या बोलण्याकडे लक्ष देवोत. हे सूतपुत्र मला नेत आहेत ( १२ ). ज्या बलवान् गंधर्वांची भयंकर गर्जना, मेघांच्या गडगडाटाप्रमाणें तल ( शब्द ) व प्रत्यंचेचा ( टणत्कार ) महायुद्धामध्यें ऐकूं येत असे (१३), आणि ज्या वेगवान् गंधर्वांचा प्रचंड रथघोष ऐकूं येत असे, त्यांनीं माझ्या ह्या आरोळ्यांकडे लक्ष पुरवावें. सूतपुत्र मला (जाळण्यास) नेत आहेत !" ( १४ ).

वैशंपायन म्हणाला:— द्रौपदीचें तें दीन भाषण व विव्हळणें ऐकतांच भीमसेन अंथरुणावरून उठून विचार न करतां तिच्याकडे धांवला ( १५ ).

भीमसेन म्हणाला:—" सैरंध्री, तुझें बोलणें मला ऐकूं येत आहे, तेव्हां, भित्रे, ( आतां ) तुला सूतपुत्रांपासून भीति नाहीं" ( १६ ).

वैशंपायन उवाच·

इत्युक्त्वा स महाबाहुर्विजजृम्भे जिघांसया।
ततः स व्यायतं कृत्वा वेषं विपरिवर्त्य च ॥ १७ ॥
अद्वारेणाऽभ्यवस्कन्द्य निर्जगाम बहिस्तदा।
स भीमसेनः प्राकारादारुह्य तरसा द्रुमम् ॥ १८ ॥
श्मशानाभिमुखः प्रायाद्यत्र ते कीचका गताः ।
स लङ्घयित्वा प्राकारं निस्सृत्य च पुरोत्तमात् ।
जवेन पतितो भीमः सूतानामग्रतस्तदा ॥ १९ ॥
चितासमीपे गत्वा स तत्राऽपश्यद्वनस्पतिम् ।
तालमात्रं महास्कन्धं मूर्धशुष्कं विशाम्पते ॥ २० ॥
तं नागवदुपक्रम्य बाहुभ्यां परिरभ्य च ।
स्कन्धमारोपयामास दशव्यामं परन्तपः ॥ २१ ॥
स तं वृक्षं दशव्यामं सस्कन्धविटपं बली ।
प्रगृह्याऽभ्यद्रवत्सूतान्दण्डपाणिरिवाऽन्तकः ॥ २२ ॥
ऊरुवेगेन तस्याऽथ न्यग्रोधाश्वत्थकिंशुकाः ।
भूमौ निपतिता वृक्षाः सङ्घशस्तत्र शेरते ॥ २३ ॥

वैशंपायन म्हणाला:— असें बोलून त्या महाबलिष्ठानें त्यांना ठार मारण्याच्या इच्छेनें जांभई दिली, आणि जरा आळेपिळे देऊन वेष पालटला. ( गंधर्वासारखा केला ) ( १७ ). नंतर अद्वारानें खालीं उडी मारून तो बाहेर पडला. नंतर तटावरून वेगानें एका वृक्षावर चढून (सर्व अवलोकन करून) (१८), तो स्मशानाकडे तोंड करून चालूं लागला. जिकडे ते कीचक गेले होते तिकडे, तट ओलांडून आणि त्या उत्कृष्ट नगरांतून निसटून तो भीम वेगानें सूतांच्या पुढें चितेच्या जवळ जाऊन उभा राहिला. तेथें एक वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. राजा, तो ताडाएवढा उंच असून, त्यास मोठमोठ्या खांद्या होत्या व त्याचा शेंडा वाळून गेला होता ( १९–२० ). त्या परंतपानें हत्तीप्रमाणें त्याच्याजवळ जाऊन व हातांनीं त्याला विळखा मारून तो दहा वांवां उंचीचा वृक्ष ( उपटून ) खांद्यावर टाकला (२१). तो दहावांवां लांबीचा वृक्ष खोडा व शाखांसह ( खांद्यावर ) घेऊन तो बलवंत भीमसेन दंडधारी यमासमान सूतांवर धांवला ( २२ ). त्यावेळीं त्याच्या भयंकर मांड्यांच्या वेगानें ( आजूबाजूचे ) वड, पिंपळ, पळस मोडून भूमीवर पडले आणि तेथें त्यांचे ढीग बनले (२३).

तं सिंहमिव सङ्क्रुद्धं दृष्ट्वा गन्धर्वमागतम् ।
वित्रेसुः सर्वशः सूता विषादभयकम्पिताः ॥ २४ ॥
गन्धर्वो बलवानेति क्रुद्ध उद्यम्य पादपम् ।
सैरन्ध्री मुच्यतां शीघ्रं यतो नो भयमागतम् ॥ २५ ॥
ते तु दृष्ट्वा तदाऽऽविद्धं भीमसेनेन पादपम् ।
विमुच्य द्रौपदीं तत्र प्राद्रवन्नगरं प्रति ॥ २६ ॥
द्रवतस्तांस्तु सम्प्रेक्ष्य स वज्री दानवानिव ।
शतं पञ्चाधिकं भीमः प्राहिणोद्यमसादनम् ॥ २७ ॥
वृक्षेणैतेन राजेन्द्र प्रभञ्जनसुतो बली ।
तत आश्वासयत्कृष्णां स विमुच्य विशाम्पते ॥ २८ ॥
उवाच च महाबाहुः पाञ्चालीं तत्र द्रौपदीम् ।
अश्रुपूर्णमुखीं दीनां दुर्धर्षः स वृकोदरः ॥ २९ ॥
एवं ते भीरु वध्यन्ते ये त्वां क्लिश्यन्त्यनागसम् ।
प्रेहि त्वं नगरं कृष्णे न भयं विद्यते तव ॥ ३० ॥
अन्येनाऽहं गमिष्यामि विराटस्य महानसम् ॥ ३१ ॥

तो सिंहासारखा चवताळून येत असतां त्यास पाहून हा गंधर्वच आला असें सूतांस वाटलें. ते भयानें व पश्चात्तापानें थरथर कांपूं लागले आणि सर्व तऱ्हेनें त्रस्त झाले ( २४ ). ( ते म्हणूं लागले ):–"हा बलाढ्य गंधर्व संतापून वृक्ष उगारून येत आहे. जिच्यामुळें आपणांवर हें मोठेंच संकट आलें आहे त्या सैरंध्रीस लवकर सोडा" ( २५ ). भीमानें वृक्ष उगारलेला पाहून ते द्रौपदीस तेथेंच सोडून शहराकडे पळूं लागले (२६). परंतु, ते पळत आहेत असें पाहतांच, वज्रधारी ( इंद्र ) दानवांची कत्तल करतो त्याप्रमाणें त्या भीमसेनानें त्या एकशेंपांच सूतांना यमसदनास पाठविलें ( २७ ). राजेंद्रा, बलाढ्य वायुपुत्र भीमानें त्या वृक्षानें त्यांना झोडपून ठार केलें. नंतर, राजा, त्यानें कृष्णेस मोकळी करून तिचें सांत्वन केलें ( २८ ). आणि डोळे पाण्यानें भरून येऊन अगदीं दीनवदन झालेल्या द्रौपदीस तो आजिंक्य महाबाहु वृकोदर म्हणाला:–( २९ ), "भीरु, तूं निर्दोष असतांना तुला जे क्लेश देतात ते असे ठार केले जातात. कृष्णे, तूं लवकर नगरांत जा. तुला आतां भय नाहीं ( ३० ). मी दुसऱ्या वाटेनें विराटाच्या पाकशाळेस जातों" ( ३१ ).

वैशम्पायन उवाच--पञ्चाधिकं शतं तच्च निहतं तेन भारत ।
महावनमिव च्छिन्नं शिश्ये विगलितद्रुमम् ॥ ३२ ॥
एवं ते निहता राजञ्छतं पञ्च च कीचकाः ।
स च सेनापतिः पूर्वमित्येतत्सूतषट्शतम् ॥ ३३ ॥
तद्दृष्ट्वा महदाश्चर्यं नरा नार्यश्च सङ्गताः ।
विस्मयं परमं गत्वा नोचुः किञ्चन भारत ॥ ३४ ॥
इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
कीचकवधपर्वणि त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—राजा, रानाची तोड झाली असतां त्यांतील झाडें आडवीं पडतात, त्याप्रमाणें ते एकशेंपांच सूतपुत्र तेथें त्यानें मारून पाडले (३२). राजा, अशा प्रकारें मारलेले ते एकशें पांच कीचक आणि पूर्वी ठार केलेला तो सेनापति मिळून (एकंदर) एकशें सहा सूत झाले (३३). तें मोठें आश्चर्य पाहून, तेथें जमलेल्या स्त्रिया व पुरुष अत्यंत विस्मयचकित झाल्यामुळें, भारता, कांहींच बोलले नाहींत (३४).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतर्गत कीचकवध-उपपर्वांतील
२३ वा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय २४

[ कीचकाची उत्तरक्रिया; द्रौपदीस राजवाड्यांतून निघून जाण्याचा निरोप;
बृहन्नलेचा व द्रौपदीचा संवाद. ]

वैशम्पायन उवाच- ते दृष्ट्वा निहतान्सूतान्राज्ञे गत्वा न्यवेदयन् ।
गन्धर्वैर्निहता राजन्सूतपुत्रा महाबलाः ॥ १ ॥
यथा वज्रेण वै दीर्णं पर्वतस्य महच्छिरः ।
व्यतिकीर्णाः प्रदृश्यन्ते तथा सूता महीतले ॥ २ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— सूत मारले गेलेले पाहून त्या लोकांनीं राजाकडे जाऊन कळविलें:—" राजा, महाबलाढ्य सूतपुत्र (कीचक) गंधर्वांनीं ठार केले आहेत (१). ज्याप्रमाणें वज्राच्या प्रहारानें पर्वताचें प्रचंड शिखर तुटून पडलेलें असतें, त्याप्रमाणें (१०६) सूत जमिनीवर चोहोंकडे पडलेले दिसत आहेत (२).

सैरन्ध्री च विमुक्ताऽसौ पुनरायाति ते गृहम् ।
सर्वं संशयितं राजन्नगरं ते भविष्यति ॥ ३ ॥

यथारूपा च सैरन्ध्री गन्धर्वाश्च महाबलाः ।
पुंसामिष्टश्च विषयो मैथुनाय न संशयः ॥ ४ ॥

यथा सैरन्ध्रिदोषेण न ते राजन्निदं पुरम् ।
विनाशमेति वै क्षिप्रं तथा नीतिर्विधीयताम् ॥ ५ ॥

तेषां तद्वचनं श्रुत्वा विराटो वाहिनीपतिः[1] ।
अब्रवीत्क्रियतामेषां सूतानां परमक्रिया ॥ ६ ॥

एकस्मिन्नेव ते सर्वे सुसमिद्धे हुताशने ।
दह्यन्तां कीचकाः शीघ्रं रत्नैर्गन्धैश्च सर्वशः ॥ ७ ॥

सुदेष्णामब्रवीद्राजा महिषीं जातसाध्वसः ।
सैरन्ध्रीमागतां ब्रूया ममैव वचनादिदम् ॥ ८ ॥

गच्छ सैरन्ध्रि भद्रं ते यथाकामं वरानने ।
बिभेति राजा सुश्रोणि गन्धर्वेभ्यः पराभवात् ॥ ९ ॥

आणि ती सैरंध्री मुक्त होऊन पुनः तुझ्या गृहाकडे येत आहे. पण राजा, तुझें सर्व नगर संकटांत पडेल ( ३ ). सैरंध्री मोठी रूपवती आहे आणि गंधर्व महाबलाढ्य आहेत. तसेंच पुरुषांना विषय हा इष्ट असून स्त्रीसंभोगाकडे त्यांच्या मनाचा ओढा असतो, यांत संशय नाहीं (४). तेव्हां, राजा, सैरंध्रीच्या दोषामुळें तुझ्या या शहराचा नाश होणार नाहीं अशी तजवीज लवकरच कर " (५). त्यांचें तें भाषण ऐकून सैन्याचा मालक विराट यानें त्यांना सांगितलें कीं, "प्रथम या सूतांची उत्तरक्रिया करा (६). एकच मोठी चिता चांगली पेटवून त्यांत सर्व कीचकांचें लवकर दहन करा आणि त्यांच्या बरोबर रत्नें व सुगंधि द्रव्येंहि तींत घाला" ( ७ ). ( नंतर ) तो भयभीत झालेला राजा सुदेष्णा राणीस म्हणाला:—" सैरंध्री आली म्हणजे तिला माझा असा निरोप सांग कीं 'सैरंध्री, तुझें कल्याण असो. सुंदरी, तुला वाटेल तिकडे तूं जा. ( कारण ) सुंदरी, गंधर्व आपला नाश करतील अशी राजाला भीति वाटते ( ८–९ ).

1 वाहिनीपति शब्द येथें सेनापति या अर्थानें घेणें योग्य नाहीं. सेनेचा अधिपति राजा असल्यानें त्याचें कर्तव्य सेनानायकाची क्रिया करविण्याचें होतें.

न हित्वां[1]मुत्सहे वक्तुं स्वयं गन्धर्वरक्षिताम् ।
स्त्रियास्त्वदोषस्तां वक्तुमतस्त्वां प्रब्रवीम्यहम् ॥ १० ॥

वैशंपायन उवाच— अथ मुक्ता भयात्कृष्णा सूतपुत्राभिरस्य च ।
मोक्षिता भीमसेनेन जगाम नगरं प्रति ॥ ११ ॥

त्रासितेव मृगी बाला शार्दूलेन मनस्विनी ।
गात्राणि वाससी चैव प्रक्षाल्य सलिलेन सा ॥ १२ ॥

तां दृष्ट्वा पुरुषा राजन्प्राद्रवन्त दिशो दश ।
गन्धर्वाणां भयत्रस्ताः केचिद्दृष्ट्वा न्यमीलयन् ॥ १३ ॥

ततो महानसद्वारि भीमसेनमवस्थितम् ।
ददर्श राजन्पाञ्चाली यथा मत्तं महाद्विपम् ॥ १४ ॥
तं विस्मयन्ती शनकैः संज्ञाभिरिदमब्रवीत् ।
गन्धर्वराजाय नमो येनाऽस्मि परिमोचिता ॥ १५ ॥

सैरंध्री टाकण्यास योग्य असतांहि, मी (राजा) तिला ('जा' असें) सांगण्यास धजत नाहीं, कारण गंधर्व तिचें रक्षण करीत आहेत; (तुला) स्त्रीला (सुदेष्णेला) मात्र तिला (असें) सांगण्यास हरकत नाहीं;—असें राजानें सांगितल्यावरून मी तुला सांगत आहें' (१०)."

**वैशंपायन** म्हणालाः—आतां भीमसेनानें सूतपुत्रांचा संहार करून सोड-विल्यामुळें भयमुक्त झालेली द्रौपदी नगरांत गेली (११). वाघापासून भय पावलेल्या हरिणीप्रमाणें त्रस्त झालेल्या त्या शाहाण्या द्रौपदीनें पाण्यानें आपलीं दोन्हीं वस्त्रें धुऊन अंगधुणें केलें (१२). राजा, तिला पाहतांच (गांवांतील) लोक गंधर्वांच्या भीतीनें दाही दिशांस पळत सुटले आणि कित्येकांनीं तर पाहून डोळेच मिटले (१३). राजा, पुढें पाकशाळेच्या दरवाज्यांत भीमसेन मस्त महागजा-प्रमाणें उभा असलेला द्रौपदीनें पाहिला (१४). त्याला विस्मयानें व हळूच संज्ञेनें ती म्हणालीः—"ज्यानें मला सोडविलें त्या गंधर्वराजाला नमस्कार असो" (१५).

---

1 हित्वां हातुं योग्याम् "कृत्यार्थे तवैकेन्केन्यत्वनः" इति स्मर. । इ० (नी.)

भीमसेन उवाच— ये पुरा विचरन्तीह पुरुषा वशवर्तिनः ।
तस्यास्ते वचनं श्रुत्वा ह्यनृणा विहरन्त्वतः ॥ १६ ॥
वैशम्पायन उवाच— ततः सा नर्त्तनागारे धनञ्जयमपश्यत ।
राज्ञः कन्या विराटस्य नर्त्तयानं महाभुजम् ॥ १७ ॥
ततस्ता नर्त्तनागाराद्विनिष्क्रम्य सहार्जुनाः ।
कन्या ददृशुरायान्तीं क्लिष्टां कृष्णामनागसम् ॥ १८ ॥
कन्या ऊचुः—दिष्ट्या सैरन्ध्रि मुक्ताऽसि दिष्ट्याऽसि पुनरागता ।
दिष्ट्या विनिहताः सूता ये त्वां क्लिश्यन्त्यनागसम् ॥ १९ ॥
बृहन्नलोवाच—कथं सैरन्ध्रि मुक्तासि कथं पापाश्च ते हताः ।
इच्छामि वै तव श्रोतुं सर्वमेव यथातथम् ॥ २० ॥
सैरन्ध्र्युवाच—बृहन्नले किं नु तव सैरन्ध्र्या कार्यमद्य वै ।
या त्वं वससि कल्याणि सदा कन्यापुरे सुखम् ॥ २१ ॥

**भीमसेन** म्हणाला:—" जे पुरुष येथें ( विराटनगरांत ) वर्षभर ( ज्या तुझ्या ) मर्जीप्रमाणें वागत आले, त्यांनीं त्या तुझें हें भाषण ऐकून आतां पुढें अनृणी ( कृतकृत्य ) म्हणून खुशाल असावें " ( १६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर नृत्यशाळेंत अर्जुन तिच्या दृष्टीस पडला. तो महाबाहु विराट राजाच्या मुलींस नृत्य शिकवीत होता ( १७ ). द्रौपदी येतांच त्या मुली अर्जुनासह नृत्यशाळेच्या बाहेर आल्या; आणि निरपराधी असतांहि जिला क्लेश भोगावे लागले, त्या द्रौपदीस त्यांनीं पाहिलें ( १८ ).

**मुली** म्हणाल्या:—" सैरंध्रि, सुदैवानेंच तूं सुटलीस; तूं परत आलीस हें सुदैव आहे; आणि तुझा अपराध नसतांना तुला ज्यांनीं छळिलें ते सूत मारले गेले हेंहि सुदैवच " ( १९ ).

**बृहन्नला** म्हणाली:—" सैरंध्री, तूं मुक्त कशी झालीस आणि ते पापी कसे मारले गेले, हें सर्व मी तुझ्या तोंडून अगदीं जसेंच्या तसें ऐकूं इच्छितें " ( २० ).

**सैरंध्री** म्हणाली:—"बृहन्नले, आजच तुला सैरंध्रीशीं काय करावयाचें आहे? कल्याणि, तूं तर कन्यांच्या अंतःपुरांत सदोदित सुखानें रहात आहेस ! ( २१ )

न हि दुःखं समाप्नोषि सैरन्ध्री यदुपाश्नुते ।
तेन मां दुःखितामेवं पृच्छसे प्रहसन्निव ॥ २२ ॥
बृहन्नलोवाच— बृहन्नलाऽपि कल्याणि दुःखमाप्नोत्यनुत्तमम् ।
तिर्यग्योनिगता बाले न चैनामवबुद्ध्यसे ॥ २३ ॥
त्वया सहोषिता चाऽस्मि त्वं च सर्वैः सहोषिता ।
क्लिश्यन्त्यां त्वयि सुश्रोणि को नु दुःखं न चिन्तयेत् ॥ २४॥
न तु केनचिदत्यन्तं कस्यचिद्धृदयं क्वचित् ।
वेदितुं शक्यते नूनं तेन मां नाऽवबुद्ध्यसे ॥ २५ ॥
वैशम्पायन उवाच— ततः सहैव कन्याभिर्द्रौपदी राजवेश्म तत् ।
प्रविवेश सुदेष्णायाः समीपमुपगामिनी ॥ २६ ॥
तामब्रवीद्राजपुत्री विराटवचनादिदम् ।
सैरन्ध्रि गम्यतां शीघ्रं यत्र कामयसे गतिम् ॥ २७ ॥

सैरंध्रीला जें दुःख भोगावें लागतें तसें कांहीं तुला होत नाहीं. यामुळें, मला दुःख झालें असतां तूं असें हंसत हंसतच मला विचारीत आहेस!" (२२)

**बृहन्नला** म्हणाली:—"कल्याणि, बृहन्नलाहि विलक्षण दुःख भोगीत आहे. वेडे, तिला नीचयोनि मिळाली आहे; त्या तिला तूं जाणत नाहींस ( २३ ). तुझ्याबरोबर मी नेहमीं राहिलेली आहें आणि तूंहि आम्हां सर्वांबरोबर राहिलेली आहेस; सुश्रोणि, तुला क्लेश होत असतां कोणाला बरें दुःख वाटणार नाहीं? ( २४ ) कोणाचें मन कसें आहे हें कोणास पूर्णपणें कळणें केव्हांहि शक्य नाहीं. म्हणून माझ्या मनाची स्थिति तुला बरोबर समजत नाहीं" ( २५ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर त्या मुलींबरोबरच द्रौपदी त्या राजवाड्यांत शिरली आणि सुदेष्णेच्या जवळ गेली ( २६ ). तिला राजपुत्री ( सुदेष्णा ) विराटाच्या सांगण्यावरून हें म्हणाली:–"सैरंध्री, जेथें तुला जावेंसें वाटेल तेथें लवकर जा ( २७ ).

राजा बिभेति ते भद्रे गन्धर्वेभ्यः पराभवात् ।
त्वं चापि तरुणी सुभ्रु रूपेणाऽप्रतिमा भुवि ।
पुंसामिष्टश्च विषयो गन्धर्वाश्चाऽतिकोपनाः ॥ २८ ॥
सैरन्ध्र्युवाच—त्रयोदशाहमात्रं मे राजा क्षम्यतु भामिनी ।
कृतकृत्या भविष्यन्ति गन्धर्वास्ते न संशयः ॥ २९ ॥
ततो मामुपनेष्यन्ति करिष्यन्ति च ते प्रियम् ।
ध्रुवं च श्रेयसा राजा योक्ष्यते सह बान्धवैः ॥ ३० ॥[८३४]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि कीचकवधपर्वणि कीचकदाहे चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

---

समाप्तं चेदं कीचकवधपर्व ।

कल्याणि, गंधर्वांच्या हातून आपला नाश होईल म्हणून राजा तुला भीत आहे. सुभ्रु, तूंहि तरुणी असून पृथ्वीवर रूपानें अद्वितीय आहेस. पुरुषांना विषय प्रिय असतो, आणि गंधर्व तर अति रागीट आहेत " ( २८ ).

**सैरंध्री** म्हणाली:—" महाराज्ञि, फक्त तेरा दिवस राजानें मला क्षमा करावी; ( तोंपर्यंत ) ते गंधर्व निःसंशय कृतकृत्य होतील ( २९ ). त्यानंतर ते मला घेऊन जातील आणि तुझेंहि प्रिय करतील; तसेंच खात्रीनें बांधवांसह ( विराट ) राजाचेंहि ते कल्याण करतील " ( ३० ).

याप्रमाणें महाभारतांतील विराटपर्वांतर्गत कीचकवध-उपपर्वांत कीचकाच्या दहनाविषयीं २४ वा अध्याय संपला.

**कीचकवधपर्व समाप्त.**



# गोहरणपर्व

## अध्याय २५

[ दुर्योधनानें पांडवांच्या अज्ञातवासाच्या शोधास पाठविलेले हेर परत येऊन पांडव बेपत्ता झाल्याचें सांगतात. ]

वैशम्पायन उवाच— कीचकस्य तु घातेन सानुजस्य विशाम्पते ।
अत्याहितं चिन्तयित्वा व्यस्मयन्त पृथग्जनाः ॥ १ ॥
तस्मिन्पुरे जनपदे सञ्जल्पोऽभूच्च सङ्घशः ।
शौर्याद्धि वल्लभो राज्ञो महासत्त्वः स कीचकः ॥ २ ॥
आसीत्प्रहर्ता सैन्यानां दारामर्षी च दुर्मतिः ।
स हतः खलु पापात्मा गन्धर्वैर्दुष्टपूरुषः ॥ ३ ॥
इत्यजल्पन्महाराज परानीकविनाशनम् ।
देशे देशे मनुष्याश्च कीचकं दुष्प्रधर्षणम् ॥ ४ ॥
अथ वै धार्त्तराष्ट्रेण प्रयुक्ता ये बहिश्चराः ।
मृगयित्वा बहून्ग्रामान्राष्ट्राणि नगराणि च ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—राजा ( जनमेजया ), बांधवांसह कीचकाच्या नाशानें सामान्य लोकांस मोठी भीति वाटून ते आश्चर्य करूं लागले ( १ ). त्या नगरांत व देशांत संघ जमून हीच गोष्ट बोलूं लागले. ( ते म्हणतः—) " त्या कीचकाचें सामर्थ्य मोठें असून शौर्यामुळें तो राजाचा अगदीं प्रीतींतला झाला होता ( २ ). शत्रूच्या सैन्याचा तो केवळ काळच होता. ( परंतु ) त्या दुष्ट दुरात्म्याची दुसऱ्यांच्या स्त्रियांवर वांकडी नजर असल्यामुळें त्या अधमाला शेवटीं गंधर्वांचे हस्तें मृत्युमुखीं पडावें लागलें " ( ३ ). याप्रमाणें, महाराजा, शत्रुसैन्याचा नाश करणाऱ्या अजिंक्य कीचकासंबंधानें देशोदेशीं सर्व लोक बोलूं लागले (४). आतां (पांडवांचा शोध लावण्याकरितां) दुर्योधनानें जे हेर पाठविले होते, त्यांनीं पुष्कळ गांवें, राष्ट्रें आणि नगरें धुंडाळिलीं ( ५ ).

संविधाय यथादृष्टं यथादेशप्रदर्शनम् ।
कृतकृत्या न्यवर्तन्त ते चरा नगरं प्रति ॥ ६ ॥
तत्र दृष्ट्वा तु राजानं कौरव्यं धृतराष्ट्रजम् ।
द्रोणकर्णकृपैः सार्द्धं भीष्मेण च महात्मना ॥ ७ ॥
सङ्गतं भ्रातृभिश्चापि त्रिगर्तैश्च महारथैः ।
दुर्योधनं सभामध्ये आसीनमिदमब्रुवन् ॥ ८ ॥
चरा ऊचुः—कृतोऽस्माभिः परो यत्नस्तेषामन्वेषणे सदा ।
पाण्डवानां मनुष्येन्द्र तस्मिन्महति कानने ॥ ९ ॥
निर्जने मृगसङ्कीर्णे नानाद्रुमलताकुले ।
लताप्रतानबहुले नानागुल्मसमावृते ॥ १० ॥
न च विद्मो गता येन पार्थाः सुदृढविक्रमाः ।
मार्गमाणाः पदन्यासं तेषु तेषु तथा तथा ॥ ११ ॥
गिरिकूटेषु तुङ्गेषु नानाजनपदेषु च ।
जनाकीर्णेषु देशेषु खर्वटेषु पुरेषु च ॥ १२ ॥

आणि आपणांस जें जें आढळलें व आपण जें जें कांहीं पाहिलें त्या सर्वांची नीट आठवण ठेवून आपलें कार्य संपवून ते हेर राजधानीस परत आले ( ६ ). तेथें धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन राजास भेटल्यावर, द्रोण, कर्ण, कृप, महात्मा भीष्म ( ७ ), ( दुःशासनादिक ) बंधू, महारथ त्रिगर्त, इत्यादिकांसह दुर्योधन सभेमध्यें बसला असतां त्याला ते याप्रमाणें बोलले ( ८ ).

हेर म्हणाले:—"राजा, त्या मोठ्या ( द्वैतवन ) अरण्यामध्यें पांडवांचा पत्ता काढण्यासाठीं आम्हीं एकसारखा अत्यंत प्रयत्न केला ( ९ ). तें अरण्य निर्जन असून चोहींकडे श्वापदांनीं भरलेलें आहे. त्यांत नानाप्रकारच्या वृक्ष-वेलींचीं एकच झुंबाडें व ( लहानमोठ्या झाडझुडपांच्या ) निबिड जाळ्या आहेत ( १० ). यास्तव आम्हांस पावलांचा माग काढतां आला नाहीं, आणि त्या अरण्यांतून कोणत्या मार्गानें ते महापराक्रमी पांडव निघून गेले याचा आम्हांस थांग लागला नाहीं ( ११ ). पर्वतांचीं उंच उंच शिखरें, अनेक देश, भरवस्तीचे प्रदेश, खेडींपाडीं, नगरें ( १२ ),

१ खर्वटेषु (नी.) अर्थ देत नाहीं. खर्वट ( पु. न. ) = पर्वताजवळचें खेडें [कोश]

नरेन्द्र बहुशोऽन्विष्टा नैव विद्मश्च पाण्डवान् ।
अत्यन्तं वा विनष्टास्ते भद्रं तुभ्यं नरर्षभ ॥ १३ ॥
वर्त्मन्यन्वेष्यमाणा वै रथिनां रथिसत्तम ।
नहि विद्मो गतिं तेषां वासं हि नरसत्तम ॥ १४ ॥
किंचित्कालं मनुष्येन्द्र सूतानामनुगा वयम् ।
मृगयित्वा यथान्यायं वेदितार्थाः स्म तत्त्वतः ॥ १५ ॥
प्राप्ता द्वारवतीं सूता विना पार्थैः परन्तप ।
न तत्र कृष्णा राजेन्द्र पाण्डवाश्च महाव्रताः ॥ १६ ॥
सर्वथा विप्रनष्टास्ते नमस्ते भरतर्षभ ।
नहि विद्मो गतिं तेषां वासं वापि महात्मनाम् ॥ १७ ॥
पाण्डवानां प्रवृत्तिं च विद्मः कर्मापि वा कृतम् ।
स नः शाधि मनुष्येन्द्र अत ऊर्ध्वं विशाम्पते ॥ १८ ॥
अन्वेषणे पाण्डवानां भूयः किं करवामहे ।
इमां च नः प्रियां वीर वाचं भद्रवतीं शृणु ॥ १९ ॥

राजा, या सर्व ठिकाणीं आम्हीं शोध केला, परंतु पांडवांचा आम्हांस कोठेंहि शोध लागला नाहीं. आतां त्यांचा बहुधा नाश झाला आहे. राजा, तुझें कल्याण आहे ( १३ ). रथगामी लोकांच्या मार्गांनेंहि आम्हीं फिरलों; परंतु त्यांचा मार्ग किंवा वसतिस्थान आम्हांस सांपडलें नाहीं ( १४ ). राजा, कांहीं काळ आम्ही (पांडवांच्या) सारथ्यांच्या शोधावर होतों व त्यांचा ( सारथ्यांचा ) ठावठिकाण आम्हांस बरोबर लागला (१५). परंतपा, (पांडवांचे) सारथि पांडवांशिवाय द्वारकेस गेले; महाव्रत पांडव व द्रौपदी हीं मात्र त्यांच्याबरोबर गेलीं नाहींत ( १६ ). ते सर्वस्वीं नष्ट झाले आहेत. भरतश्रेष्ठा ( दुर्योधनराजा ), आम्हीं तुला नमस्कार करतों. आम्हांला त्या महात्म्यांची काय वाट झाली किंवा वास्तव्य कोठें आहे हें मुळींच कळलें नाहीं ( १७ ). त्या महात्म्यांची वार्ता किंवा त्यांनीं केलेलें कर्म हींहि कळलीं नाहींत. तेव्हां यापुढें नरश्रेष्ठा, राजा, पांडवांच्या शोधाकरितां आम्हीं आणखी काय करावें ह्याची आम्हांस आज्ञा कर. पण वीरा, आम्हांस एक शुभ व प्रिय वार्ता कळली, ती ऐक (१८-१९).

येन त्रिगर्ता निहता बलेन महता नृप ।
सूतेन राज्ञो मत्स्यस्य कीचकेन बलीयसा ॥ २० ॥
स हतः पतितः शेते गन्धर्वैर्निशि भारत ।
अदृश्यमानैर्दुष्टात्मा भ्रातृभिः सह सोदरैः ॥ २१ ॥
प्रियमेतदुपश्रुत्य शत्रूणां च पराभवम् ।
कृतकृत्यश्च कौरव्य विधत्स्व यदनन्तरम् ॥ २२ ॥ [८२६]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि चारप्रत्यागमने पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥

राजा, मत्स्य देशाच्या राजाच्या ज्या बलाढ्य कीचक सूतानें मोठ्या सैन्यानिशीं त्रिगर्तांस मारिलें (२०), तो दुष्ट कीचक आपल्या सख्या बंधूंसह रात्रीं अदृश्य गंधर्वांकडून ठार होऊन पडला आहे (२१). (ह्यास्तव) राजा, ह्या शत्रूचा पराभव झाल्याची प्रिय बातमी ऐकून तूं कृतकृत्य हो, व ह्यापुढें जें कांहीं करणें असेल तें कर" (२२).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत 'हेरांचें परत येणें' याविषयीं २५ वा अध्याय संपला.

## अध्याय २६

[हेरांच्या तोंडून पांडव बेपत्ता झाल्याचें ऐकून दुर्योधनाचे दुःखोद्गार; कर्ण व दुःशासन यांच्या युक्त्या.]

वैशम्पायन उवाच— ततो दुर्योधनो राजा ज्ञात्वा तेषां वचस्तदा ।
चिरमन्तर्मना भूत्वा प्रत्युवाच सभासदः ॥ १ ॥
सुदुःखा खलु कार्याणां गतिर्विज्ञातुमन्ततः ।
तस्मात्सर्वे निरीक्षध्वं क्व नु ते पाण्डवा गताः ॥ २ ॥

वैशंपायन म्हणाला:— नंतर दुर्योधन राजा त्यांचें भाषण ऐकल्यावर बराच वेळ मनांतल्या मनांत विचार करून सभासदांस म्हणाला:—(१) "कोणत्याहि कार्याचा अखेरीस परिणाम कसा होईल हें जाणणें फार कठिण आहे. ह्यास्तव, ते पांडव कोठें गेले आहेत ह्याविषयीं सर्वांनीं खोल विचार करावा (२).

अल्पावशिष्टं कालस्य गतभूयिष्ठमन्ततः ।
तेषामज्ञातचर्यायामस्मिन्वर्षे त्रयोदशे ॥ ३ ॥
अस्य वर्षस्य शेषं चेद्व्यतीयुरिह पाण्डवाः ।
निवृत्तसमयास्ते हि सत्यव्रतपरायणाः ॥ ४ ॥
क्षरन्त इव नागेन्द्राः सर्वे ह्याशीविषोपमाः ।
दुःखा भवेयुः संरब्धाः कौरवान्प्रति ते ध्रुवम् ॥ ५ ॥
सर्वे कालस्य वेत्तारः कृच्छ्ररूपधराः स्थिताः ।
प्रविशेयुर्जितक्रोधास्तावदेव पुनर्वनम् ॥ ६ ॥
तस्मात्क्षिप्रं बुभूषध्वं यथा तेऽत्यन्तमव्ययम् ।
राज्यं निर्द्वन्द्वमव्यग्रं निस्सपत्नं चिरं भवेत् ॥ ७ ॥
अथाऽब्रवीत्ततः कर्णः क्षिप्रं गच्छन्तु भारत ।
अन्ये धूर्ता नरा दक्षा निभृताः साधुकारिणः ॥ ८ ॥
चरन्तु देशान्संवीता स्फीताञ्जनपदाकुलान् ।
तत्र गोष्ठीषु रम्यासु सिद्धप्रव्रजितेषु[2] च ॥ ९ ॥

त्यांच्या ह्या तेराव्या वर्षाचा म्हणजे अज्ञातवासाचा बहुतेक काळ निघून गेला आहे; अगदीं थोडा काळ (आतां) उरला आहे ( ३ ). जर ह्या वर्षाचे उरलेले दिवस पांडवांनीं काढिले, तर त्या सत्यव्रतपरायणांची प्रतिज्ञा पार पडली असें होईल ( ४ ). ( मग ) मदोन्मत्त हत्तींप्रमाणें किंवा अत्यंत विषारी सर्पांप्रमाणें ते सर्वजण चवताळून कौरवांस खात्रीनें दुःख देऊं लागतील ( ५ ). ते सर्व प्रसंग ओळखून वागणारे आहेत, गूढरूपानें[1] ते राहिले असतील. ते क्रोध आवरून धरणारे असल्यानें ( सांपडले तर ) फिरून तितकाच वनवास करतील. यासाठीं तुम्हीं त्यांस लवकर शोधून काढा. म्हणजे मग त्यांचा पूर्ण नाश होऊन, (आपलें) राज्य निष्कलह, स्वस्थ व निष्कंटक चिरकाल राहील"(६–७).

कर्ण म्हणाला:—" राजा, विश्वासू, धूर्त, दक्ष व हुषार अशा दुसऱ्या लोकांनीं लवकर निघावें ( ८ ). त्यांनीं वेषांतर करून मनुष्यांनीं भरलेल्या ( व धनधान्यानें ) समृद्ध असलेल्या देशांमध्यें फिरावें. तेथें विद्वानांच्या सभा आणि सिद्ध व संन्याशी ह्यांचे जे आश्रम[2] असतील त्याठिकाणीं ( ९ ),

१ अर्थ स्पष्ट नाहीं; ( नी. ) मुग्ध आहे. २ सिद्धानां प्रव्रजितं गमनं येषु तेषु मुनीनामाश्रमेषु (नी.)

परिचारेषु तीर्थेषु विविधेष्वाकरेषु च ।
विज्ञातव्या मनुष्यैस्तैस्तर्कया सुविनीतया ॥ १० ॥
विविधैस्तत्परैः सम्यक्तज्ज्ञैर्निपुणसंवृतैः ।
अन्वेष्टव्याः सुनिपुणैः पाण्डवाश्छन्नवासिनः ॥ ११ ॥
नदीकुञ्जेषु तीर्थेषु ग्रामेषु नगरेषु च ।
आश्रमेषु च रम्येषु पर्वतेषु गुहासु च ॥ १२ ॥
अथाऽग्रजानन्तरजः पापभावानुरागवान् ।
ज्येष्ठं दुश्शासनस्तत्र भ्राता भ्रातरमब्रवीत् ॥ १३ ॥
येषु नः प्रत्ययो राजंश्चारेषु मनुजाधिप ।
ते यान्तु दत्तदेया वै भूयस्तान्परिमार्गितुम् ॥ १४ ॥
एतच्च कर्णो यत्प्राह सर्वमीहामहे तथा ।
यथोद्दिष्टं चराः सर्वे मृगयन्तु ततस्ततः ॥ १५ ॥
एते चाऽन्ये च भूयांसो देशाद्देशं यथाविधि ।
न तु तेषां गतिर्वासः प्रवृत्तिश्चोपलभ्यते ॥ १६ ॥

तसेंच राजधान्या, तीर्थें, नानाप्रकारच्या खाणीच्या जागा ह्या ठिकाणीं त्यांनीं आपली तर्कशक्ति यथाशास्त्र चालवून पांडवांना ओळखावें (१०). गूढ गोष्टींचा शोध लावण्यांत तत्पर, तज्ज्ञ व धूर्त अशा निरनिराळ्या हेरांनीं, (स्वतः) युक्तीनें गुप्त राहून, गुप्त राहिलेल्या पांडवांचा शोध लावावा ( ११ ). नदीच्या तीरांवरील कुंजांत, तीर्थांत, गांवांत, शहरांत, रमणीय आश्रमांत, किंवा पर्वतांवर आणि गुहांत त्यांनीं पांडवांस शोधावें " ( १२ ). आतां ज्येष्ठानंतरचा भाऊ दुष्ट पण अनुरक्त दुःशासन ज्येष्ठ भावास ( दुर्योधनास ) म्हणालाः—( १३ ). " राजा, नराधिपा, ज्या हेरांवर आपला विश्वास आहे त्यांचें वेतन त्यांना आधीं देऊन त्यांना पुनः पांडवांच्या शोधाकरितां पाठवावें ( १४ ). कर्णानें हें जें सांगितलें तें सर्व व्हावें, असें आम्हीहि इच्छितों. सर्व हेरांनीं मुख्य उद्देशावर लक्ष ठेवून वाटेल तिकडे जाऊन शोध करावा(१५). ह्या व दुसऱ्या पुष्कळ हेरांनीं देशोदेशीं फिरून योग्य रीतीनें शोध करावा. पण पांडवांची वाट, वस्ती वा वार्ता कळत नाहीं (१६);

अत्यन्तं वा निगूढास्ते पारं चोर्मिमतो गताः ।
व्यालैश्चापि महारण्ये भक्षिताः शूरमानिनः ॥ १७ ॥
अथवा विषमं प्राप्य विनष्टाः शाश्वतीः समाः ।
तस्मान्मानसमव्यग्रं कृत्वा त्वं कुरुनन्दन ।
कुरु कार्यं महोत्साहं मन्यसे यन्नराधिप ॥ १८ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि कर्णदुःशासनवाक्ये षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥ [८७४]

त्याअर्थी त्यांनीं फारच गुप्तपणें वास्तव्य केलें असलें पाहिजे, किंवा ते समुद्राच्या परतीरासहि गेले असले पाहिजेत. ते शूर व मानी पुरुष कदाचित् महान् अरण्यांत राहिले असतां तेथें त्यांना श्वापदांनींहि खाऊन टाकिलें असेल (१७). अथवा पुष्कळ वर्षेंपर्यंत संकटें भोगावीं लागल्यामुळें त्यांचा नाशहि झाला असेल. म्हणून मनाची तळमळ अगदीं नाहींशी करून तूं कुरुनंदना, नराधिपा, तुला जें कांहीं कर्तव्य करावेंसें वाटत असेल तें मोठ्या उत्साहानें कर" (१८).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण–उपपर्वांत कर्ण व दुःशासन ह्यांच्या भाषणांविषयीं २६ वा अध्याय संपला.

---

## अध्याय २७

[ पांडवांच्या शोधाविषयीं द्रोण आपलें मत सांगतो. ]

वैशम्पायन उवाच—अथाऽब्रवीन्महावीर्यो द्रोणस्तत्त्वार्थदर्शिवान् ।
न तादृशा विनश्यन्ति न प्रयान्ति पराभवम् ॥ १ ॥
शूराश्च कृतविद्याश्च बुद्धिमन्तो जितेन्द्रियाः ।
धर्मज्ञाश्च कृतज्ञाश्च धर्मराजमनुव्रताः ॥ २ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— त्यानंतर महापराक्रमी व तत्त्वार्थज्ञानी द्रोण म्हणाला:—"त्यांच्यासारख्यांचा नाश होत नाहीं किंवा पराभवहि होत नाहीं (१). ते शूर, विद्वान्, बुद्धिमान्, जितेंद्रिय, धर्मवेत्ते व कृतज्ञ असून धर्मराजाच्या

नीतिधर्मार्थतत्त्वज्ञं पितृवच्च समाहितम् ।
धर्मे स्थितं सत्यधृतिं ज्येष्ठं ज्येष्ठानुयायिनः ॥ ३ ॥
अनुव्रता महात्मानं भ्रातरो भ्रातरं नृप ।
अजातशत्रुं श्रीमन्तं सर्वभ्रातॄननुव्रतम् ॥ ४ ॥
तेषां तथा विधेयानां निभृतानां महात्मनाम् ।
किमर्थं नीतिमान्पार्थः श्रेयो नैषां करिष्यति ॥ ५ ॥
तस्माद्यत्नात्प्रतीक्षन्ते कालस्योदयमागतम् ।
न हि ते नाशमृच्छेयुरिति पश्याम्यहं धिया ॥ ६ ॥
साम्प्रतं चैव यत्कार्यं तच्च क्षिप्रमकालिकम् ।
क्रियतां साधु सञ्चिन्त्य वासश्चैषां प्रचिन्त्यताम् ॥ ७ ॥
यथावत्पाण्डुपुत्राणां सर्वार्थेषु धृतात्मनाम् ।
दुर्ज्ञेयाः खलु शूरास्ते दुरापास्तपसा वृताः ॥ ८ ॥

आज्ञेंत वागतात ( २ ). नीति, धर्म व अर्थ ह्यांचें तत्त्व जाणणारा, (भावांची) पित्याप्रमाणें काळजी घेणारा, धर्माप्रमाणें वागणारा आणि सत्यधृति अशा ज्येष्ठ बंधूचे ते ज्येष्ठ ( उत्कृष्ट ) अनुयायी आहेत ( ३ ). ज्याला शत्रु झाला नाहीं अशा त्या वैभवशाली तसेंच सर्व भावांच्या मताप्रमाणेंच वागणाऱ्या महात्म्या भावाच्या आज्ञेंत ते बंधु वागत असतात ( ४ ). अशा अत्यंत काळजीपूर्वक आपली सेवा करणाऱ्या बंधूंचें कल्याण तो नीतिमान् युधिष्ठिर काय म्हणून करणार नाहीं ? ( ५ ). तेव्हां ते मोठ्या सावधगिरीनें अनुकूल कालाची वाट पहात आहेत; कारण त्यांचा नाश होणार नाहीं असें माझ्या बुद्धीला वाटतें (६). तरी जें कांहीं करावयाचें तें पूर्ण विचार करून करा. आतां विलंब अगदीं करूं नका. सर्व गोष्टींत धैर्ययुक्त मनाच्या पांडवांचें वास्तव्य कोठें आहे ह्याचें बरोबर चिन्तन करून अनुमान काढा. त्या शूरांचा शोध लावण्याचें काम मोठें कठिण आहे. त्यांच्या ठिकाणीं तपाचें तेज ( जागृत ) असल्यामुळें त्यांस गांठणें कठिण आहे ( ७–८ ).

१ ज्येष्ठ शब्द पुन्हां आलेला क्लिष्ट आहे. ( नी. ) मुग्ध आहे.

शुद्धात्मा गुणवान्पार्थः सत्यवान्नीतिमाञ्छुचिः ।
तेजोराशिरसङ्ख्येयो गृह्णीयादपि चक्षुषा ॥ ९ ॥
विज्ञाय क्रियतां तस्माद्भूयश्च मृगयामहे ।
ब्राह्मणैश्चारकैः सिद्धैर्ये चाऽन्ये तद्विदो जनाः ॥१०॥(८८४)

इति श्रीमहाभारते विराटपर्वणि गोहरणपर्वणि द्रोणवाक्ये चारप्रत्याचारे सप्तविंशोऽध्यायाः ॥ २७ ॥

शुद्धात्मा, गुणवान्, सत्यशील, नीतिमान्, निर्मल, अमित तेजोराशि, पृथापुत्र युधिष्ठिर (पाहणाऱ्यास) आपल्या दृष्टींनेंहि मोह पाडील ( ९ ). तेव्हां हें सर्व जाणून काम करा. त्यांचा पुनः शोध आपण ब्राह्मण, हेर, सिद्ध, किंवा जे दुसरे त्यांच्यासारखे पांडवांस ओळखणारे असतील त्यांच्या करवीं लावूं" (१०).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत हेर पुन्हां पाठविण्याबद्दल द्रोणाच्या भाषणाविषयीं २७ वा अध्याय संपला.

## अध्याय २८

[ पांडवांच्या शोधाविषयीं भीष्माचा अभिप्राय. ]

वैशम्पायन उवाच— ततः शान्तनवो भीष्मो भरतानां पितामहः ।
श्रुतवान्देशकालज्ञस्तत्त्वज्ञः सर्वधर्मवित् ॥ १ ॥
आचार्यवाक्योपरमे तद्वाक्यमभिसन्दधत् ।
हितार्थं समुवाचैनां भारतीं भारतान्प्रति ॥ २ ॥
युधिष्ठिरे समासक्तां धर्मज्ञे धर्मसंवृताम् ।
असत्सु दुर्लभां नित्यं सतां चाऽभिमतां सदा ॥ ३ ॥

**वैशंपायन** म्हणालाः— नंतर शंतनुपुत्र भीष्म, भारतांचा आजा, वेदवेत्ता, देशकाल जाणणारा, तत्त्वज्ञानी व सर्व धर्म जाणणारा ( १ ), द्रोणाचार्यांचें भाषण संपल्यावर त्यास आपली मान्यता देत (कौरवांचें ) हित व्हावें म्हणून भारतांना पुढील भाषण बोलला ( २ ). धर्म जाणणाऱ्या युधिष्ठिरास उद्देशून धर्मयुक्त, सदोदित दुर्जनांना दुर्लभ, सज्जनांना प्रिय, साधूंना मान्य, ( ३ )

भीष्मः समं वदत्तत्र गिरं साधुभिरर्चिताम् ।
यश्चैष ब्राह्मणः प्राह द्रोणः सर्वार्थतत्त्ववित् ॥ ४ ॥
सर्वलक्षणसम्पन्नाः साधुव्रतसमन्विताः ।
श्रुतव्रतोपपन्नाश्च नानाश्रुतिसमन्विताः ॥ ५ ॥
वृद्धानुशासने युक्ताः सत्यव्रतपरायणाः ।
समयं समयज्ञास्ते पालयन्तः शुचिव्रताः ॥ ६ ॥
क्षत्रधर्मरता नित्यं केशवानुगताः सदा ।
प्रवीरपुरुषास्ते वै महात्मानो महाबलाः ।
नाऽवसीदितुमर्हन्ति उद्वहन्तः सतां धुरम् ॥ ७ ॥
धर्मतश्चैव गुप्तास्ते सुवीर्येण च पाण्डवाः ।
न नाशमधिगच्छेयुरिति मे धीयते मतिः ॥ ८ ॥
तत्र बुद्धिं प्रवक्ष्यामि पाण्डवान्प्रति भारत ।
न तु नीतिः सुनीतस्य शक्यतेऽन्वेषितुं परैः ॥ ९ ॥
यत्तु शक्यमिहाऽस्माभिस्तान्वै सञ्चित्य पाण्डवान् ।
बुद्ध्या प्रयुक्तं न द्रोहात्प्रवक्ष्यामि निबोध तत् ॥ १० ॥

आणि पक्षपातरहित अशी वाणी भीष्म बोलला:- "हा ब्राह्मण सर्व वस्तुस्थिति यथार्थ जाणणारा द्रोण, जें बोलला तें खरें आहे ( ४ ). पांडव सर्व लक्षणांनीं संपन्न आणि सदाचरणानें युक्त आहेत. शास्त्रें व व्रतें यांनीं ते पूर्ण असून, नाना श्रुति ( आख्यायिका ) त्यांस अवगत आहेत ( ५ ). ते वृद्धजनांची आज्ञा पाळण्यांत दक्ष, आणि सत्यरूप व्रत पाळण्यांत तत्पर आहेत. ते समय जाणणारे असून, आपला करार पाळणारे आहेत. त्यांचें वर्तन नेहमीं शुद्ध असतें (६). क्षत्रियांचीं कर्तव्यें करण्यांत ते नेहमीं रत असून, श्रीकृष्णाला नेहमीं अनुसरणारे आहेत. ते महात्मे मोठे वीर व मोठे बलवान् आहेत. सत्पुरुषांची ( कर्तव्य ) धुरा वाहणारे ते ( पांडव ) कधींहि नाश पावणार नाहींत ( ७ ). धर्मानें व वीर्यानें रक्षिलेले पांडव नाश पावणें अशक्य आहे, असें माझें मत आहे ( ८ ). अशा स्थितींत पांडवांसंबंधीं माझे विचार भारता, मी सांगतों. सुनीतिमान् पुरुषाच्या नीतीचा अंत दुसऱ्यांना (अनीतिमानांना) लागणें शक्य नाहीं (९). पण त्या पांडवांचा विचार करतां आपणांस येथें जें शक्य आहे तें बुद्धीनें विचार करून--(तुमचा) द्रोह करून

१ समं पक्षपातशून्यं वदत् वदन् । तुमभाव आर्षः ( नी. )

न त्वियं मादृशैर्नीतिस्तस्य[1] वाच्या कथञ्चन ।
सा त्वियं साधु वक्तव्या न त्वनीतिः कथञ्चन ॥ ११ ॥
वृद्धानुशासने तात तिष्ठता सत्यशीलिना ।
अवश्यं त्विह धीरेण सतां मध्ये विवक्षता ॥ १२ ॥
यथार्हमिह वक्तव्यं सर्वथा धर्मलिप्सया ।
तत्र नाऽहं तथा मन्ये यथाऽयमितरो जनः ॥ १३ ॥
निवासं[2] धर्मराजस्य वर्षेऽस्मिन्वै त्रयोदशे ।
तत्र तात न तेषां हि राज्ञां भाव्यमसाम्प्रतम् ॥१४॥
पुरे जनपदे चापि यत्र राजा युधिष्ठिरः ।
दानशीलो वदान्यश्च निभृतो ह्रीनिषेवकः ।
जनो जनपदे भाव्यो यत्र राजा युधिष्ठिरः ॥ १५ ॥
प्रियवादी सदा दान्तो भव्यः सत्यपरो जनः ।
हृष्टः पुष्टः शुचिर्दक्षो यत्र राजा युधिष्ठिरः ॥ १६ ॥

नव्हे—मी सांगतों, नीट समजून घे ( १० ). माझ्यासारख्यांनीं वाटेल त्याला ही नीति मुळींच सांगूं नये. पण ती या वेळीं सांगणें बरें. अनीति तर कोणत्याहि प्रसंगीं सांगूं नये ( ११ ). बाबा दुर्योधना, वृद्धांच्या उपदेशाप्रमाणें वागणाऱ्या, सत्यशील, आणि सज्जनांमध्यें भाषण करण्याची आवड धरणाऱ्या धीर ( ज्ञानी ) पुरुषानें धर्म साधण्याच्या इच्छेनें अगदीं यथायोग्य भाषण करावें. या संबंधांत इतर लोकांचें जसें मत आहे, तसें माझें मत नाहीं ( १२–१३ ). ह्या तेराव्या वर्षीं धर्मराजाचें वास्तव्य ज्यांच्या राज्यांत असेल त्या राजांचें, बाबा, अकल्याण होणार नाहीं ( १४ ). ज्या नगरांत वा देशांत राजा युधिष्ठिर रहात असेल त्या देशांतील लोक दानशील, प्रिय भाषण करणारे, जितेंद्रिय आणि विनयशील असतील ( १५ ). जेथें राजा युधिष्ठिर असेल, तेथील लोक नेहमीं गोड बोलणारे, सदा जितेंद्रिय, सत्यपरायण, तुष्ट, पुष्ट, निष्पाप व दक्ष असतील ( १६ ).

१ तस्य दुर्जनस्य त्वादृशस्येति गूढोऽभिसन्धिः ( नी. ). पण असा हेतु भीष्मांचा दुर्योधनास उद्देशून बोलण्याचा नसावा. 'तस्य' पदाचा अर्थ बरोबर लागत नाहीं, तसाच 'साधु' शब्द नी. चुकीचा लावतो.

२ 'निवासो' पाहिजे. ( नी. ) मुग्ध आहे.

नाऽसूयको न चाऽपीर्षुर्नाऽभिमानी न मत्सरी ।
भविष्यति जनस्तत्र स्वयं धर्ममनुव्रतः ॥ १७ ॥
ब्रह्मघोषाश्च भूयासः पूर्णाहुत्यस्तथैव च ।
क्रतवश्च भविष्यन्ति भूयांसो भूरिदक्षिणाः ॥ १८ ॥
सदा च तत्र पर्जन्यः सम्यग्वर्षी न संशयः ।
सम्पन्नसस्या च मही निरातङ्का भविष्यति ॥ १९ ॥
गुणवन्ति च धान्यानि रसवन्ति फलानि च ।
गन्धवन्ति च माल्यानि शुभशब्दा च भारती ॥२०॥
वायुश्च सुखसंस्पर्शो निष्प्रतीपं च दर्शनम् ।
न भयं त्वाविशेत्तत्र यत्र राजा युधिष्ठिरः ॥ २१ ॥
गावश्च बहुलास्तत्र न कृशा न च दुर्बलाः ।
पयांसि दधिसर्पींषि रसवन्ति हितानि च ॥ २२ ॥
गुणवन्ति च पेयानि भोज्यानि रसवन्ति च ।
तत्र देशे भविष्यन्ति यत्र राजा युधिष्ठिरः ॥ २३ ॥

तेथील लोक स्वतः धर्मास अनुसरून वागणारे, दुसऱ्याच्या गुणांवर दोषारोप न करणारे, दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून न तळमळणारे, 'आपणच काय ते मोठे आहोंत' असें न समजणारे व दुसऱ्याचा मत्सर न करणारे असतील ( १७ ). तेथें वेदवाणीचा घोष पुष्कळ चालू राहील, त्याचप्रमाणें पूर्णाहुतिहि चालू होतील. त्या ठिकाणीं नानाविध यज्ञयाग होऊन त्यांत विपुल दक्षिणा वाटली जाईल ( १८ ). तेथें नित्य निःसंशयपणें पर्जन्याची उत्तम वृष्टि होईल; पृथ्वी धनधान्यादिकांनीं समृद्ध होईल; कोठेंहि रोगराई राहणार नाहीं ( १९ ). धान्याच्या ठिकाणीं उत्तम गुण येतील; फळें स्वादिष्ट बनतील; पुष्पांस उत्तम सुगंध येईल; व लोकांच्या तोंडून नेहमीं शुभ शब्द निघतील ( २० ). वायु सुखकारक चालेल, लोकांत शास्त्रादि ( दर्शनें ) पाखंडरहित होतील, आणि जेथें युधिष्ठिर राजा असेल, तेथें भय राहणार नाहीं ( २१ ). तेथें गाईंची समृद्धि होईल; त्या कृश किंवा दुर्बल राहणार नाहींत; त्या ठिकाणीं दुधें, दहीं व तुपें रसयुक्त आणि हितकारी होतील ( २२ ). जेथें युधिष्ठिर राजा असेल त्या देशांत पेय पदार्थ गुणकारी होतील, व भोज्य पदार्थहि सुरस बनतील ( २३ ).

दर्शनं धर्मब्रह्मस्वरूपावेक्षणं निष्प्रतीपं पाखण्डमार्गवर्जितम् ( नी. ) प्रतीपः=शत्रुः

रसाः स्पर्शाश्च गन्धाश्च शब्दाश्चापि गुणान्विताः ।
दृश्यानि च प्रसन्नानि यत्र राजा युधिष्ठिरः ॥ २४ ॥
धर्माश्च तत्र सर्वैस्तु सेविताश्च द्विजातिभिः ।
स्वैः स्वैर्गुणैश्च संयुक्ता अस्मिन्वर्षे त्रयोदशे ॥ २५ ॥
देशे तस्मिन्भविष्यन्ति तात पाण्डवसंयुते ।
सम्प्रीतिमाञ्जनस्तत्र सन्तुष्टः शुचिरव्ययः ॥ २६ ॥
देवतातिथिपूजासु सर्वभावानुरागवान् ।
इष्टदानो महोत्साहः स्वस्वधर्मपरायणः ॥ २७ ॥
अशुभाद्धि शुभप्रेप्सुरिष्टयज्ञः शुभव्रतः ।
भविष्यति जनस्तत्र यत्र राजा युधिष्ठिरः ॥ २८ ॥
त्यक्तवाक्यानृतस्तात शुभकल्याणमङ्गलः ।
शुभार्थेप्सुः शुभमतिर्यत्र राजा युधिष्ठिरः ॥ २९ ॥
भविष्यति जनस्तत्र नित्यं चेष्टप्रियव्रतः ।
धर्मात्मा शक्यते ज्ञातुं नापि तात द्विजातिभिः ॥ ३० ॥

जेथें धर्मराजाचें वास्तव्य असेल तेथें शब्द, स्पर्श, रस व गंध हे गुणयुक्त होऊन दृश्य पदार्थ मोठे रमणीय भासतील ( २४ ). ह्या तेराव्या वर्षी तेथील सर्व द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) धर्मकृत्यांत निमग्न असतील व आपआपल्या गुणांनीं युक्त होतील (२५). बाबा, पांडव ज्या देशांत असतील तेथील जनता आनंदी, संतुष्ट व निर्मल असून तेथें हानिहि होणार नाहीं ( २६ ). देवता व अतिथि ह्यांची पूजा करण्याविषयीं त्यांस अत्यंत आवड असेल; दानधर्म करण्याची त्यांना मोठी हौस वाटेल; त्यांच्या मनांत मोठा उत्साह असेल, व आपापल्या धर्मांप्रमाणें वागण्यास ते फार झटतील ( २७ ). जेथें युधिष्ठिर राजा असेल तेथील लोक अशुभ कर्मे करण्याचें सोडून देतील व शुभ कर्मा-विषयीं त्यांच्यांत अत्यंत लालसा उत्पन्न होईल; ते यज्ञयाग करण्याविषयीं प्रेम बाळगितील; व चांगलीं व्रतें आचरतील ( २८ ). युधिष्ठिर राजा जेथें असेल तेथील लोक बाबा, खोटें भाषण सोडून देतील; त्यांचें शुभ, कल्याण व मंगल वृत्त होईल. ते शुभ अर्थाची इच्छा करणारे होऊन त्यांची वासनाहि चांगली होईल ( २९ ). तेथील लोक नेहमीं यज्ञादि व लोकप्रिय कृत्यें करण्यांत तत्पर होतील. याहिशिवाय धर्मात्मा युधिष्ठिर ब्राह्मणांनाहि ओळखतां

किं पुनः प्राकृतैस्तात पार्थो विज्ञायते क्वचित् ।
यस्मिन्सत्यं धृतिर्दानं परा शान्तिर्ध्रुवा क्षमा ॥ ३१ ॥
ह्रीः श्रीः कीर्तिः परं तेज आनृशंस्यमथाऽऽर्जवम् ।
तस्मात्तत्र निवासं[1] तु च्छन्नं यत्नेन धीमतः ।
गतिं च परमां तत्र नोत्सहे वक्तुमन्यथा ॥ ३२ ॥
एवमेतत्तु सञ्चिन्त्य यत्कृते मन्यसे हितम् ।
तत्क्षिप्रं कुरु कौरव्य यद्येवं श्रद्दधासि मे ॥ ३३ ॥ [ ९१७ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि चारप्रत्याचारे भीष्मवाक्ये अष्टाविंशोऽध्यायः ॥ २८ ॥

येणार नाहीं ( ३० ). मग, बाबा सामान्य जनांना तो कसा ओळखतां येईल ? सत्य, धैर्य, दान, परम शांति, अक्षय क्षमा (३१), विनय, ऐश्वर्य, कीर्ति, उत्कृष्ट तेज, सौजन्य, तसेंच सरळपणा, हे गुण त्याच्या ठिकाणीं आहेत. तेव्हां तेथें तो महाबुद्धिवान् धर्मराजा गुप्तपणें राहिला आहे असें जाण व त्या स्थलाकडे आपली परमगति कर. याव्यतिरिक्त मी बोलूं इच्छित नाहीं(३२). या गोष्टीचा नीट विचार करून जें कांहीं करणें तुला हिताचें वाटेल तें–माझ्या भाषणावर जर तुझा पूर्ण भरंवसा असेल तर–लवकर कर" (३३ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांपैकीं गोहरणउपपर्वांत हेर पुन्हां पाठविण्या-संबंधीं भीष्माच्या भाषणाविषयीं २८ वा अध्याय संपला.

## अध्याय २९

[ पांडवांच्या अज्ञातवासाविषयीं कृपाचार्यांचा अभिप्राय. ]

वैशम्पायन उवाच–ततः शारद्वतो वाक्यमित्युवाच कृपस्तदा ।
युक्तं प्राप्तं च वृद्धेन पाण्डवान्प्रति भाषितम् ॥ १ ॥

वैशंपायन म्हणाला :—नंतर शारद्वत कृप त्यावेळीं असें भाषण बोलला " वृद्ध भीष्मानें पांडवांस उद्देशून जें म्हटलें तें युक्त व समयोचित आहे (१).

[1] विद्धीति शेषः। परमां गतिं गमनं च तत्रैव स्वकीयं कुरु(नी.) हा अर्थ ठीक नाहीं.

धर्मार्थसहितं श्लक्ष्णं तत्त्वतश्च सहेतुकम् ।
तत्राऽनुरूपं भीष्मेण ममाऽप्यत्र गिरं शृणु ॥ २ ॥
तेषां चैव गतिस्तीर्थैर्वासश्चैषां प्रचिन्त्यताम् ।
नीतिर्विधीयतां चापि साम्प्रतं या हिता भवेत् ॥ ३ ॥
नाऽवज्ञेयो रिपुस्तात प्राकृतोऽपि बुभूषता ।
किं पुनः पाण्डवास्तात सर्वास्त्रकुशला रणे ॥ ४ ॥
तस्मात्सत्रं[1] प्रविष्टेषु पाण्डवेषु महात्मसु ।
गूढभावेषु च्छन्नेषु काले चोदयमागते ॥ ५ ॥
स्वराष्ट्रे परराष्ट्रे च ज्ञातव्यं बलमात्मनः ।
उदयः पाण्डवानां च प्राप्ते काले न संशयः ॥ ६ ॥
निवृत्तसमयाः पार्था महात्मानो महाबलाः ।
महोत्साहा भविष्यन्ति पाण्डवा ह्यमितौजसः ॥ ७ ॥
तस्माद्बलं च कोशश्च नीतिश्चापि विधीयताम् ।
यथा कालोदये प्राप्ते सम्यक्तैः सन्दधामहे ॥ ८ ॥

त्याचा आशय धर्म व अर्थ ह्यांस अनुकूल आहे. तें भाषण गोड, तत्त्वतः हेतुयुक्त व योग्य असेंच भीष्मानें केलें आहे. आतां माझेंहि बोलणें ऐक ( २ ). पांडवांची काय स्थिति व त्यांचें वास्तव्य कोठें आहे, हें हेरांकरवीं निश्चित कर. तसेंच या कालास अनुसरून जी हितावह नीति असेल तीहि करण्यास उद्युक्त हो ( ३ ). अभ्युदयाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें यःकश्चित् शत्रूचीहि उपेक्षा करूं नये. मग युद्धांत सर्व अस्त्रांत निपुण अशा पांडवांची उपेक्षा करून कसें चालेल? ( ४ ) यास्तव महात्मे पांडव कपटाचा आश्रय करून आपलें मनोगत गुप्त ठेऊन छपले असतां व (प्रतिज्ञेचा) काळ संपत आला असतां ( ५ ), स्वराज्यांत व परराज्यांत आपलें सामर्थ्य किती आहे ह्याचा तूं तपास कर; कारण योग्य कालीं पांडव प्रकट होतील यांत शंका नाहीं ( ६ ). आपला पण पूर्ण केल्यावर ते महात्मे बलवान् पांडव अतोनात सामर्थ्यवान् व उत्साहयुक्त होतील ( ७ ). यास्तव सैन्य व धन यांची आगाऊ तरतूद ठेऊन नीतिचीहि नीट विचार कर. ( पांडवांचा ) यथाकाल उदय झाला म्हणजे त्यांच्याशीं उत्तम रीतीनें संधि करूं ( ८ ).

१ सत्रं कपटं (नी.) हा कूटशब्द पूर्वी आलाच आहे.

तात बुद्ध्याऽपि तत्सर्वं बुद्ध्यस्व बलमात्मनः ।
नियतं सर्वमित्रेषु बलवत्स्वबलेषु च ॥ ९ ॥
उच्चावचं बलं ज्ञात्वा मध्यस्थं चापि भारत ।
प्रहृष्टमप्रहृष्टं च सन्दधाम तथा परैः ॥ १० ॥
साम्ना भेदेन दानेन दण्डेन बलिकर्मणा ।
न्यायेनाऽऽक्रम्य च परान्बलाच्चाऽऽनम्य दुर्बलान् ॥ ११ ॥
सान्त्वयित्वा तु मित्राणि बलं चाऽऽभाष्यतां सुखम् ।
सुकोशबलसंवृद्धः सम्यक् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १२ ॥
योत्स्यसे चापि बलिभिररिभिः प्रत्युपस्थितैः ।
अन्यैस्त्वं पाण्डवैर्वाऽपि हीनैः स्वबलवाहनैः ॥ १३ ॥
एवं सर्वं विनिश्चित्य व्यवसायं स्वधर्मतः ।
यथाकालं मनुष्येन्द्र चिरं सुखमवाप्स्यसि ॥ १४ ॥ [ ९३१ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां विराटपर्वणि गोहरणपर्वणि चारप्रत्याचारे कृपवाक्ये एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥

तुझ्या पक्षास अनुकूल असणाऱ्या सबल व दुर्बल अशा मित्रांजवळ व स्वतः तुझ्यापाशीं सैन्याचा पुरवठा किती आहे, ह्याचा राजा, बुद्धीनें नक्की अंदाज काढ (९). उत्तम सैन्य किती, मध्यम सैन्य किती व कनिष्ठ सैन्य किती, त्याचप्रमाणें त्यापैकीं संतुष्ट किती व असंतुष्ट किती, ह्याचा नीट अंदाज करून, मग आपण शत्रूशीं तशी वाटाघाट करूं (१० ). साम, भेद, दान व दंड (किंवा) खंडणी या नीतीच्या उपायांनीं शत्रूंना हस्तगत करावें. दुर्बळ शत्रूंना जबरदस्तीनेंच चेपावें (११).मित्र राजांस संतुष्ट करावें. सैन्याशीं गोड व गौरवाचें भाषण करावें. आणि धनभांडागार व सेनाहि वाढवावी, म्हणजे मग तुला जय चांगला मिळेल (१२). ( इतकी तयारी केल्यावर ) आणखी कोणी बलिष्ठ शत्रु जरी तुझ्याशीं लढावयास आले, तरी तूं त्यांच्याशीं लढशील! मग ज्यांपाशीं स्वतःचें सैन्य नाहीं किंवा वाहनेंहि नाहींत, अशा पांडवांशीं तर लढशीलच ( १३ ). याप्रमाणें सर्व गोष्टींचा नीट विचार करून स्वधर्माप्रमाणें कालास अनुरूप असें आपलें कर्तव्य कर, म्हणजे राजा, तुला चिरकाल सुख मिळेल " (१४ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांत गोहरण उपपर्वांतील हेर पुन्हां पाठविण्यासंबंधीं कृपाच्या भाषणाविषयीं २९ वा अध्याय संपला.

# अध्याय ३०

[ विराटाचा सूड घेण्याविषयीं सुशर्मा संमति देतो. ]

वैशंपायन उवाच–अथ राजा त्रिगर्तानां सुशर्मा रथयूथपः ।
प्राप्तकालमिदं वाक्यमुवाच त्वरितो बली ॥ १ ॥
असकृन्निकृताः पूर्वं मत्स्यशाल्वेयकैः प्रभो ।
सूतेनैव च मत्स्यस्य कीचकेन पुनः पुनः ॥ २ ॥
बाधितो बन्धुभिः सार्द्धं बलाद्बलवतां विभौ[1] ।
स कर्णमभ्युदीक्ष्याऽथ दुर्योधनमभाषत ॥ ३ ॥
असकृन्मत्स्यराज्ञा मे राष्ट्रं बाधितमोजसा ।
प्रणेता कीचकस्तस्य बलवानभवत्पुरा ॥ ४ ॥
क्रूरोऽमर्षी स दुष्टात्मा भुवि प्रख्यातविक्रमः ।
निहतः स तु गन्धर्वैः पापकर्मा नृशंसवान् ॥ ५ ॥
तस्मिन्विनिहते राजा हतदर्पो निराश्रयः ।
भविष्यति निरुत्साहो विराट इति मे मतिः ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणालाः— आतां रथसमुदायाचें रक्षण करणारा त्रिगर्तांचा राजा बलिष्ठ सुशर्मा बोलण्याची वेळ प्राप्त पाहून पुढील प्रमाणें मोठ्या त्वरेनें म्हणाला ( १ ). प्रभो, मत्स्यांनीं व शाल्वांनीं अनेक वेळां पीडा दिलेला, त्याचप्रमाणें मत्स्य देशाच्या राजाचा सारथि कीचक यानें वारंवार (२), बंधूंसह बळानें संकटांत घातलेला तो सुशर्मा बलाढ्य कौरवांच्या स्वामी–( भीष्मा )–समीप कर्णाच्या तोंडाकडे पाहून दुर्योधनास म्हणालाः–(३) “ विराटाधिपतीनें अनेक वेळां आपल्या तेजानें माझ्या राष्ट्रास पीडा दिली. पूर्वीं त्याच्या सैन्याचा नायक बलवान् कीचक होता (४). क्रूर व कोपिष्ठ असलेल्या त्या दुरात्म्याचा पराक्रम जगतांत प्रसिद्ध आहे, पण तो पापकर्मा घातकी, गंधर्वांकडून मारला गेला आहे ( ५ ). तो मारला गेल्यामुळें विराट राजाला कोणाचा आश्रय न राहिल्यानें गर्व उतरून तो निरुत्साह होईल असें मला वाटतें ( ६ ).

---

१ बलवतां कौरवाणां विभौ स्वामिनि भीष्मे समीपे सति । ( नी. )

तत्र यात्रा मम मता यदि ते रोचतेऽनघ ।
कौरवाणां च सर्वेषां कर्णस्य च महात्मनः ॥ ७ ॥
एतत्प्राप्तमहं मन्ये कार्यमात्यायिकं हि नः ।
राष्ट्रं तस्याऽभियास्यामो बहुधान्यसमाकुलम् ॥ ८ ॥
आददामोऽस्य रत्नानि विविधानि वसूनि च ।
ग्रामान्राष्ट्राणि वा तस्य हरिष्यामो विभागशः ॥ ९ ॥
अथवा गोसहस्राणि शुभानि च बहूनि च ।
विविधानि हरिष्यामः प्रतिपीड्य पुरं बलात् ॥ १० ॥
कौरवैः सह सङ्गत्य त्रिगर्तैश्च विशाम्पते ।
गास्तस्याऽपहरामोऽद्य सर्वैश्चैव सुसंहताः ॥ ११ ॥
संविभागेन कृत्वा तु निबध्नीमोऽस्य पौरुषम् ।
हत्वा चाऽस्य चमूं कृत्स्नां वशमेवाऽऽनयामहे ॥ १२ ॥
तं वशे न्यायतः कृत्वा सुखं वत्स्यामहे वयम् ।
भवतां बलवृद्धिश्च भविष्यति न संशयः ॥ १३ ॥

तुझ्या, सर्व कौरवांच्या व महात्म्या कर्णाच्या विचारास येईल तर, विराटावर स्वारी करावी, असें माझें अनघा, मत आहे (७). प्रस्तुतकाळीं हें कृत्य अगदीं अवश्य व इष्ट आहे असें मला वाटतें. विपुल धान्यानें समृद्ध असलेल्या त्याच्या राष्ट्रावर आपण स्वारी करूं ( ८ ). त्याचीं नानाप्रकारचीं रत्नें व धनें लुटून आणूं किंवा त्याचीं गांवें किंवा राष्ट्रें वांटून घेऊं ( ९ ). अथवा विराटनगराला अतिशय पीडा देऊन त्यांतील नानाजातीच्या हजारों उत्तम गाई बलानें हरण करूं ( १० ). राजा, त्रिगर्त, कौरव व इतर सर्व वीर यांशीं एकी करून आपण सर्वांनीं आज त्याच्या धेनु हरण करूं ( ११ ). पण भागा—भागानें हल्ला करून आपण त्याच्या सामर्थ्यास बांधून टाकावें. त्याची सर्व सेना ठार करून त्याला ताब्यांतच आणूं (१२). याप्रमाणें त्यास न्यायानें वश केलें म्हणजे मग आपण सुखानें राहूं, व तुमचें बलहि निःसंशय वाढेल " (१३).

तच्छ्रुत्वा वचनं तस्य कर्णो राजानमब्रवीत् ।
सूक्तं सुशर्मणा वाक्यं प्राप्तकालं हितं च नः ॥ १४ ॥
तस्मात्क्षिप्रं विनिर्यामो योजयित्वा वरूथिनीम् ।
विभज्य चाप्यनीकानि यथा वा मन्यसेऽनघ ॥ १५ ॥
प्राज्ञो वा कुरुवृद्धोऽयं सर्वेषां नः पितामहः ।
आचार्यश्च यथा द्रोणः कृपः शारद्वतस्तथा ।
मन्यन्ते ते यथा सर्वे तथा यात्रा विधीयताम् ॥ १६ ॥
सम्मन्त्र्य चाऽऽशु गच्छामः साधनार्थं महीपतेः ।
किं च नः पाण्डवैः कार्यं हीनार्थबलपौरुषैः ॥ १७ ॥
अत्यन्तं वा प्रनष्टास्ते प्राप्ता वापि यमक्षयम् ।
यामो राजन्निरुद्विग्ना विराटनगरं वयम् ।
आदास्यामो हि गास्तस्य विविधानि वसूनि च ॥ १८ ॥
वैशंपायन उवाच–ततो दुर्योधनो राजा वाक्यमादाय तस्य तत् ।
वैकर्त्तनस्य कर्णस्य क्षिप्रमाज्ञापयत्स्वयम् ॥ १९ ॥

सुशर्म्याचें भाषण ऐकून कर्ण दुर्योधनास म्हणाला:-" सुशर्म्यानें आपणांस हितकर होणारें, व समयास उचित असें भाषण उत्तम रीतीनें केलें आहे (१४). तेव्हां सैन्य एकत्र करून किंवा वेगवेगळ्या टोळ्यांनिशीं अथवा निष्पापा, जसें तुझ्या मर्जीस येईल त्याप्रमाणें करून लवकर बाहेर पडूं (१५). आपणां सर्व कौरवांचा पितामह महाज्ञानी व वृद्ध भीष्म, त्याचप्रमाणें द्रोणाचार्य व शारद्वत कृप या सर्वांचे मर्जीस येईल त्याप्रमाणें निघण्याची तयारी करावी. ( १६ ). विराटराजावर हल्ला करण्यासाठीं विचारविनिमय करून आपण लवकर निघावें. द्रव्य, सेना आणि शौर्य ज्यांचें हीन झालें आहे, त्या पांडवांशीं आपणास काय कर्तव्य आहे? ( १७ ) ते समूळ नाश पावले असतील, किंवा यमसदनासहि गेले असतील. तेव्हां राजा, आपण निश्चिंत मनानें विराटनगरावर चाल करूं आणि त्याच्या गाई व विविध धनें हरण करूं "( १८ ).

**वैशंपायन म्हणाला :**—त्यानंतर सूर्यपुत्र कर्णाची सूचना मान्य करून दुर्योधनराजानें स्वतः लागलीच ( १९ ),

शासने नित्यसंयुक्तं दुःशासनमनन्तरम् ।
सह वृद्धैस्तु सम्मन्त्र्य क्षिप्रं योजय वाहिनीम् ॥ २० ॥
यथोद्देशं च गच्छामः सहितास्तत्र कौरवैः ।
सुशर्मा च यथोद्दिष्टं देशं यातु महारथः ।
त्रिगर्तैः सहितो राजा समग्रबलवाहनः ॥ २१ ॥
प्रागेव हि सुसंवीतो मत्स्यस्य विषयं प्रति ।
जघन्यतो वयं तत्र यास्यामो दिवसान्तरे ।
विषयं मत्स्यराजस्य सुसमृद्धं सुसंहताः ॥ २२ ॥
ते यान्तु सहितास्तत्र विराटनगरं प्रति ।
क्षिप्रं गोपान्समासाद्य गृह्णन्तु विपुलं धनम् ॥ २३ ॥
गवां शतसहस्राणि श्रीमन्ति गुणवन्ति च।
वयमप्यनुगृह्णीमो द्विधा कृत्वा वरूथिनीम् ॥ २४ ॥
वैशम्पायन उवाच— ते स्म गत्वा यथोद्दिष्टां दिशं वह्नेर्महीपते ।
सन्नद्धा रथिनः सर्वे सपदाता बलोत्कटाः ॥ २५ ॥

आज्ञा पाळण्याविषयीं नेहमीं तत्पर असलेल्या दुःशासनास आज्ञा केली कीं, "वृद्धांशीं खलबत करून लवकर सैन्याची जुळवाजुळव कर ( २० ). आपण सर्व कौरवांसहित आपल्या उद्देशानुरूप ( त्या नगरावर ) चाल करून जाऊं, आणि महारथी सुशर्म्यानेंहि सर्व सैन्य व वाहनें घेऊन त्रिगर्तांसह स्वतःच्या इच्छेनुरूप त्या प्रदेशावर हल्ला करावा ( २१ ). अगोदर त्यानें चांगली तयारी करून मत्स्यदेशाकडे जावें आणि मागाहून दुसरे दिवशीं आपण सुसंघटित होऊन त्या धनधान्यानें समृद्ध असलेल्या मत्स्यराजाच्या देशावर चाल करून जाऊं (२२). त्यांनीं (सुशर्मा वगैरेनीं) तेथें संघटित होऊन विराटनगरास जावें आणि लागलेंच गोपाळांस गांठून त्यांपासून पुष्कळ गोधन लुटून घ्यावें (२३). आम्हींहि सैन्याच्या दोन टोळ्या करून सुंदर व गुणी अशा लाखो गाई हरण करूं" ( २४ ).

**वैशंपायन** म्हणालाः—राजा, ते सर्व बलानें मस्त झालेले रथी वीर पायदळासह सज्ज होऊन ठरल्याप्रमाणें आग्नेय दिशेस ( २५ ).

प्रतिवैरं चिकीर्षन्तो गोषु गृद्धा महाबलाः ।
आदातुं गाः सुशर्माऽथ कृष्णपक्षस्य सप्तमीम् ॥ २६ ॥
अपरे दिवसे सर्वे राजन्सम्भूय कौरवाः ।
अष्टम्यां ते न्यगृह्णन्त गोकुलानि सहस्रशः ॥ २७ ॥ [९५८]

इति श्रीमहाभारते. विराटपर्वणि गोहरणपर्वणि दक्षिणगोग्रहे
सुशर्मादियाने त्रिंशोऽध्यायः ॥ ३० ॥

विराटाचा सूड उगविण्यासाठीं, व गाईंच्या लोभानें गेले. सुशर्मा गाई लुटण्यास कृष्णपक्षाच्या सप्तमीस गेला ( २५-२६ ). राजा, त्याच्या दुसऱ्या दिवशीं सर्व कौरव एकत्र जमून त्यांनीं ( वद्य ) अष्टमीस हजारों गाईंचे कळप धरले ( २७ ).

याप्रमाणें श्रीमहाभारताच्या विराटपर्वांत गोहरण—उपपर्वांत दक्षिणगोहरणा-
करितां सुशर्मा वगैरेंच्या स्वारीविषयीं ३० वा अध्याय संपला.

---

## अध्याय ३१

[ गाई सोडविण्यास, अर्जुनाशिवाय चौघां पांडवांस घेऊन विराट जातो. ]

वैशम्पायन उवाच-ततस्तेषां महाराज तत्रैवाऽमिततेजसाम् ।
छन्नलिङ्गप्रविष्टानां पाण्डवानां महात्मनाम् ॥ १ ॥
व्यतीतः समयः सम्यग्वसतां वै पुरोत्तमे ।
कुर्वतां तस्य कर्माणि विराटस्य महीपतेः ॥ २ ॥
कीचके तु हते राजा विराटः परवीरहा ।
परां सम्भावनां चक्रे कुन्तीपुत्रे युधिष्ठिरे ॥ ३ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—त्यानंतर, राजा, कपट वेषानें शिरलेले ते अमित तेजाचे महात्मे पांडव विराटराजाचीं कामें करीत त्याच उत्तम नगरांत राहात असतां, त्यांचा तो ( अज्ञातवासाचा ) काल उत्तम प्रकारें संपला ( १-२ ). कीचकाचा वध झाल्यावर शत्रुवीरघातक विराटराजानें कुंतीपुत्र युधिष्ठिराचा फार मान ठेविला ( ३ ).

ततस्त्रयोदशस्याऽन्ते तस्य वर्षस्य भारत ।
सुशर्मणा गृहीतं तद्गोधनं तरसा बहु ॥ ४ ॥
ततो जवेन महता गोपः पुरमथाऽव्रजत् ।
स दृष्ट्वा मत्स्यराजं च रथात्प्रस्कन्द्य कुण्डली ॥ ५ ॥
शूरैः परिवृतं योधैः कुण्डलाङ्गदधारिभिः ।
संवृतं मन्त्रिभिः सार्द्धं पाण्डवैश्च महात्मभिः ॥ ६ ॥
तं सभायां महाराजमासीनं राष्ट्रवर्द्धनम् ।
सोऽब्रवीदुपसङ्गम्य विराटं प्रणतस्तदा ॥ ७ ॥
अस्मान्युधि विनिर्जित्य परिभूय सबान्धवान् ।
गवां शतसहस्राणि त्रिगर्त्ताः कालयन्ति ते ॥ ८ ॥
तान्परीप्सस्व राजेन्द्र मा नेशुः पशवस्तव ।
तच्छ्रुत्वा नृपतिः सेनां मत्स्यानां समयोजयत् ॥ ९ ॥
रथनागाश्वकलिलां पत्तिध्वजसमाकुलाम् ।
राजानो राजपुत्राश्च तनुत्राण्यथ भेजिरे ॥ १० ॥
भानुमन्ति विचित्राणि शूरसेव्यानि भागशः ।
सवज्रायसगर्भं तु कवचं तत्र काञ्चनम् ॥ ११ ॥

जनमेजया, पुढें त्या तेराव्या वर्षाच्या अखेरीस सुशर्म्यानें मोठ्या आवेशानें हल्ला करून अनेक गाई बलात्कारानें धरल्या (४). तेव्हां (या गाईंचा रक्षक) गोप तत्काळ मोठ्या त्वरेनें नगरांत आला. तो कुंडलें धारण करणारा गोपाध्यक्ष मत्स्यराजाला पाहून रथांतून खालीं उतरला (५). कुंडलें व अंगदें धारण करणाऱ्या शूर योद्ध्यांनीं, मंत्रिवर्गांनीं व उदारधी पांडुपुत्रांनीं वेष्टिलेला (६), राष्ट्राचा उत्कर्ष करणारा महान् राजा (विराट) सभेंत बसला असतां, तो गोपाध्यक्ष त्याला जवळ जाऊन प्रणाम करून म्हणाला:–(७), "त्रिगर्तांनीं आम्हां सर्वांना बांधवांसह युद्धांत जिंकून व जर्जर करून कित्येक लक्ष गाई चालविल्या आहेत (८). राजेंद्रा, त्या परत मिळव. तुझें गोधन नष्ट होऊं नये." तें ऐकून राजानें मत्स्यांच्या सैन्याची तयारी केली (९). रथ, हत्ती, घोडे व पायदळ असें (चतुरंग) सैन्य ध्वजासहित सज्ज झालें. राजांनीं व राजपुत्रांनीं चिलखतें चढविलीं (१०). तीं (चिलखतें) देदीप्यमान, चित्रविचित्र व शूर योध्यांनीं धारण करण्यास योग्य अशीं होतीं. पोटांत पोलाद असल्यामुळें वज्रासारखें कठीण झालेलें एक सुवर्णाचें चिलखत (११),

विराटस्य प्रियो भ्राता शतानीकोऽभ्यहारयत् ।
सर्वपारसवं वर्म कल्याणपटलं दृढम् ॥ १२ ॥

शतानीकादवरजो मदिराक्षोऽभ्यहारयत् ।
शतसूर्यं शतावर्तं शतबिन्दु शताक्षिमत् ॥ १३ ॥

अभेद्यकल्पं मत्स्यानां राजा कवचमाहरत् ।
उत्सेधे यस्य पद्मानि शतं सौगन्धिकानि च ॥ १४ ॥

सुवर्णपृष्ठं सूर्याभं सूर्यदत्तोऽभ्यहारयत् ।
दृढमायसगर्भं च श्वेतं वर्म शताक्षिमत् ॥ १५ ॥

विराटस्य सुतो ज्येष्ठो वीरः शङ्खोऽभ्यहारयत् ।
शतशश्च तनुत्राणि यथास्वं ते महारथाः ॥ १६ ॥

योत्स्यमाना अनह्यन्त देवरूपाः प्रहारिणः ।
सूपस्करेषु शुभ्रेषु महत्सु च महारथाः ॥ १७ ॥

विराटाचा प्रिय भ्राता शतानीक यानें अंगांत घातलें. सर्व प्रकारचीं शस्त्रां सहन करणारें व सुवर्णानें मढविलेलें कवच ( १२ ) शतानीकाचा पाठचा भाऊ मदिराक्ष यानें चढविलें. शंभर सूर्य, शंभर चंद्र, शंभर सूक्ष्मचक्रें, व शेकडों नेत्राच्या आकाराचीं चक्रें यांनीं चित्रित असें (१३), बहुतेक अभेद्य कवच मत्स्यराजानें चढविलें. ज्यावर शंभर सौगंधिक कमलें ( ओळीनें ) बसविलीं आहेत असें ( विशाल ) व सुवर्णानें मढविलेलें सूर्यासारखें ( देदीप्यमान ) चिलखत सूर्यदत्तानें धारण केलें. ज्यावर शतावधि नेत्राकृति चक्रें असून ज्याचा वर्ण शुभ्र होता, असें आंतून पोलादी, भक्कम कवच (१४-१५), विराटाचा ज्येष्ठ पुत्र वीर शंख यानें चढविलें. इतर शेकडों देवतुल्य वीरांनीं आपापल्या शक्तीप्रमाणें व योग्यतेप्रमाणें युद्धास निघतांना चिलखतें चढविलीं आणि त्या महारथांनीं साहित्यानें भरलेले भव्य व शुभ्र रथ सिद्ध करून

---

[1]परान् सुनोति पीडयति सुवति क्षिपति वा परसवम् । ऋदोरप् स्वार्थे तद्धितः ॥ पारसवं शस्त्रं सर्वपारसवं सर्वशस्त्रसहमित्यर्थः । कल्याणपटलं सुवर्णपत्राच्छादितम् (नी.) दोन्ही शब्द कूट दिसतात.

पृथक्काञ्चनसन्नाहान् रथेष्वश्वानयोजयन् ।
सूर्यचन्द्रप्रतीकाशे रथे दिव्ये हिरण्मये ॥ १८ ॥
महानुभावो मत्स्यस्य ध्वज उच्छिश्रिये तदा ।
अथाऽन्यान्विविधाकारान्ध्वजान् हेमपरिष्कृतान् ॥ १९ ॥
यथास्वं क्षत्रियाः शूरा रथेषु समयोजयन् ।
अथ मत्स्योऽब्रवीद्राजा शतानीकं जघन्यजम् ॥ २० ॥
कङ्कबल्लवगोपाला दामग्रन्थिश्च वीर्यवान् ।
युद्धयेयुरिति मे बुद्धिर्वर्तते नाऽत्र संशयः ॥ २१ ॥
एतेषामपि दीयन्तां रथा ध्वजपताकिनः ।
कवचानि च चित्राणि दृढानि च मृदूनि च ॥ २२ ॥
प्रतिमुञ्चन्तु गात्रेषु दीयन्तामायुधानि च ।
वीराङ्गरूपाः पुरुषा नागराजकरोपमाः ॥ २३ ॥
नेमे जातु न युद्धयेरन्निति मे धीयते मतिः ।
एतच्छ्रुत्वा तु नृपतेर्वाक्यं त्वरितमानसः ॥
शतानीकस्तु पार्थेभ्यो रथान् राजन् समादिशत् ॥ २४ ॥

त्यांना सुवर्णालंकारांनीं शृंगारलेले घोडे जोडले. सूर्यचंद्रासारख्या तेजस्वी दिव्य सुवर्णरथावर मत्स्यराजाचा महान् अभंग ध्वज उभारला गेला. लागलेच आपापले नानाविध आकाराचे सुवर्णमंडित ध्वज दुसऱ्या शूर क्षत्रियांनीं ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें आपापल्या रथांवर फडकाविले. आतां विराटराजा धाकटा भाऊ शतानीक यास म्हणालाः-( १६–२० ) " कंक, बल्लव, गोपाल व पराक्रमी दामग्रंथि ( अश्वपाल ) निःसंशय युद्ध करण्यास समर्थ आहेत, असें मला वाटतें ( २१ ). यास्तव ध्वजपताकांनीं युक्त रथ ह्यांनांहि द्या. त्याचप्रमाणें मऊ व बळकट अशीं चित्रविचित्र चिलखतें त्यांस अंगांवर चढवूं द्या; आणि त्यांना आयुधेंहि द्या. ह्यांच्या शरीरांची ठेवण वीरांप्रमाणें असून बाहु गजश्रेष्ठाच्या सोंडेप्रमाणें आहेत(२२-२३). हे लढणार नाहींत असें कधीं होणार नाहीं, असा माझा समज आहे." राजाचें हें भाषण कानीं पडतांचे, ( युद्धास ) अगदीं आतुर मनाच्या शतानीकानें, राजा ( जनमेजया ), पृथापुत्रांना रथ देण्याची आज्ञा केली ( २४ ).

१ दामग्रंथिः=अश्वपालः ( नी. )

सहदेवाय राज्ञे च भीमाय नकुलाय च ।
तान्प्रहृष्टांस्ततः सूता राजभक्तिपुरस्कृताः ॥ २५ ॥
निर्दिष्टा नरदेवेन रथाञ्शीघ्रमयोजयन् ।
कवचानि विचित्राणि मृदूनि च दृढानि च ॥ २६ ॥
विराटः प्रादिशद्यानि तेषामक्लिष्टकर्मणाम् ।
तान्यामुच्य शरीरेषु दंशितास्ते परन्तपाः ॥ २७ ॥
रथान् हयैः सुसम्पन्नानास्थाय च नरोत्तमाः ।
निर्ययुर्मुदिताः पार्थाः शत्रुसङ्घावमर्दिनः ॥ २८ ॥
तरस्विनश्छन्नरूपाः सर्वे युद्धविशारदाः ।
रथान् हेमपरिच्छन्नानास्थाय च महारथाः ॥ २९ ॥
विराटमन्वयुः पार्थाः सहिताः कुरुपुङ्गवाः ।
चत्वारो भ्रातरः शूराः पाण्डवाः सत्यविक्रमाः ॥ ३० ॥
भीमाश्च मत्तमातङ्गाः प्रभिन्नकरटामुखाः ।
क्षरन्तश्चैव नागेन्द्राः सुदन्ताः षष्टिहायनाः ॥ ३१ ॥
स्वारूढा युद्धकुशलैः शिक्षिता हस्तिसादिभिः ।
राजानमन्वयुः पश्चाचलन्त इव पर्वताः ॥ ३२ ॥

धर्मराज, भीम, नकुल व सहदेव यांस रथ दिल्यावर त्या पांडवांस मोठा आनंद झाला. नंतर विराटानें त्या वीरांना राजभक्तीनें युक्त असलेले सारथी नेमून दिले. त्या सारथ्यांनीं रथांची ताबडतोब सिद्धता केल्यावर, मृदु व बळकट अशीं चित्रविचित्र कवचें जीं विराटराजानें त्या सततोद्योगी वीरांना अर्पण केलीं होतीं, तीं अंगांत घालून ते शत्रुतापन युद्धास सज्ज झाले (२५–२७). उत्तम प्रकारचे घोडे जोडलेल्या रथांवर आरूढ होऊन शत्रुसंघाचा नाश करणारे पांडव मोठ्या आनंदानें बाहेर निघाले (२८). आपलीं रूपें प्रकट न करतां सुवर्णानें मढविलेल्या रथांत बसून ते तरस्वी, युद्धकलेंत निपुण असलेले महारथी, शूर व सत्यपराक्रमी चौघेहि कुरुपुंगव पांडवबंधु विराटराजाच्या मागें चालले (२९–३०). तसेंच ज्यांच्या गंडस्थळांतून मदाचा स्राव होत आहे, व ज्यांचे सुळे दांत मोठमोठे आहेत असे, युद्धविशारद माहुतांनीं उत्तम शिक्षण दिलेले, साठ वर्षें वयाचे, चालणाऱ्या पर्वतांसारखे भयंकर मत्त गजेंद्र राजाचे पाठीमागून चालले (३१–३२).

विशारदानां मुख्यानां हृष्टानां चारुजीविनाम् ।
अष्टौ रथसहस्राणि दश नागशतानि च ॥ ३३ ॥
षष्टिश्चाऽश्वसहस्राणि मत्स्यानामभिनिर्ययुः ।
तदनीकं विराटस्य शुशुभे भरतर्षभ ॥ ३४ ॥
सम्प्रयातं तदा राजन्निरीक्षन्तं गवां पदम् ।
तद्बलाग्र्यं विराटस्य सम्प्रास्थितमशोभत ।
दृढायुधजनाकीर्णं गजाश्वरथसङ्कुलम् ॥ ३५ ॥ [ ९९३ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि दक्षिणगोग्रहे मत्स्यराजरणोद्योगे एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥

त्यावेळीं कुशल व युद्ध करण्यास अतिशय उत्सुक असलेले मुख्यमुख्य योद्ध्यांचे आठ हजार रथ, एक हजार हत्ती व साठ हजार घोडे, मत्स्यदेशाचे निघाले. विराटाचें तें सैन्य भरतश्रेष्ठा, उत्तम शोभत होतें ( ३३–३४ ). राजा जनमेजया, गाईंच्या पावलांचा माग काढीत चाललेलें तें विराटाचें मोठमोठीं शस्त्रें घेतलेलें व हत्ती घोडे रथ यांनीं खचून भरलेलें उत्कृष्ट सैन्य अतिशय चमकूं लागलें ( ३५ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत दक्षिण-गोग्रहणप्रसंगीं मत्स्यराज विराटाच्या युद्धोद्योगाविषयीं ३१ वा अध्याय संपला.

## अध्याय ३२

[ विराट व त्रिगर्त यांचें युद्ध ]

वैशम्पायन उवाच—निर्याय नगराच्छूरा व्यूढानीकाः प्रहारिणः ।
त्रिगर्तानस्पृशन्मत्स्याः सूर्ये परिणते सति ॥ १ ॥
ते त्रिगर्ताश्च मत्स्याश्च संरब्धा युद्धदुर्मदाः ।
अन्योन्यमभिगर्जन्तो गोषु गृद्धा महाबलाः ॥ २ ॥

वैशम्पायन म्हणाला :—शूर मत्स्यफौज शिस्तबंद होऊन युद्धासाठीं शहराच्या बाहेर पडल्यावर, सूर्यास्ताची वेळ प्रहरावर असतांना त्यांनीं त्रिगर्तांस गांठलें ( १ ). त्रिगर्त आणि मत्स्य या दोन्ही सैन्यांतील वीरांस युद्धाविषयीं अतिशय स्फुरण चढलें, अत्यंत मद आला व ते महाबलाढ्य वीर गाईंच्या लोभानें गर्जना करून

भीमाश्च मत्तमातङ्गास्तोमराङ्कुशनोदिताः ।
ग्रामणीयैः[1] समारूढाः कुशलैर्हस्तिसादिभिः ॥ ३ ॥
तेषां समागमो घोरस्तुमुलो लोमहर्षणः ।
घ्नतां परस्परं राजन्यमराष्ट्रविवर्द्धनः ॥ ४ ॥
देवासुरसमो राजन्नासीत्सूर्येऽवलम्बति ।
पदातिरथनागेन्द्रहयारोहबलौघवान् ॥ ५ ॥
अन्योन्यमभ्यापततां निघ्नतां चेतरेतरम् ।
उदतिष्ठद्रजो भौमं न प्राज्ञायत किञ्चन ॥ ६ ॥
पक्षिणश्चाऽपतन्भूमौ सैन्येन रजसाऽऽवृताः ।
इषुभिर्व्यतिसर्पद्भिरादित्योऽन्तरधीयत ॥ ७ ॥
खद्योतैरिव संयुक्तमन्तरिक्षं व्यराजत ।
रुक्मपृष्ठानि चापानि [2]व्यतिषिक्तानि धन्विनाम् ॥ ८ ॥
पततां लोकवीराणां सव्यदक्षिणमस्यताम्[3] ।
रथा रथैः समाजग्मुः पादातैश्च पदातयः ॥ ९ ॥

एकमेकांवर चालून गेले ( २ ). मोठमोठ्या मदोन्मत्त हत्तींवर तोमर व अंकुश यांचे प्रहार होऊं लागतांच ते त्या सरदारांच्या कुशल महातांच्या मर्जीप्रमाणें चालूं लागले ( ३ ). तीं दोन्ही सैन्यें एकमेकांवर तुटून पडून त्यांचा घोर व तुमुल संग्राम अंगावर रोमांच उभा करण्यासारखा झाला. राजा, जणूं तीं दोन्ही दळें एकमेकांस ठार करून यमराष्ट्राची भर करण्याकरितांच झगडत होतीं ( ४ ). राजा, सूर्यास्त होण्याचे वेळीं गज, अश्व, रथ व पायदळ, ह्यांच्या झुंडीच्याझुंडी देव व असुर यांच्या युद्धाप्रमाणें लढूं लागल्या ( ५ ). ते एकमेकांवर हल्ला करून एकमेकांवर प्रहार करीत असतां चोहींकडे भयंकर धूळ उडाली, त्यामुळें कांहींच समजेनासें झालें ( ६ ). सेनेमुळें उडालेल्या त्या धुळीच्या लोटांनीं पक्षी गुदमरून जाऊन भूमीवर पडूं लागले आणि इकडून तिकडे जाणाऱ्या बाणांनीं सूर्य अदृश्य झाला ( ७ ). जणूं काजव्यांनीं भरलेलें आकाश शोभूं लागलें ! उजव्या व डाव्या बाजूंस बाणें[3] मारणाऱ्या प्रसिद्ध धनुर्धारी वीरांचीं सोनेरी पाठीचीं धनुष्यें भिडलीं[2]. रथ

1 ग्रामणीयैः । 'ग्रामणीर्नापिते पुंसि त्रिष्वध्यक्षेऽधिपेऽपिच' इति नानार्थः (नी.) शब्द कूट आहे. २ व्यतिषिक्तानि हस्तात् हस्तान्तरं गतानि । ( नी. ) पण 'भिडलीं' अर्थ बरा दिसतो. ३ अस्यतां क्षिपताम् ( नी. ) 'बाणान्' हा शेष.

सादिनः सादिभिश्चैव गजैश्चापि महागजाः।
आसिभिः पट्टिशैः प्रासैः शक्तिभिस्तोमरैरपि ॥ १० ॥
संरब्धाः समरे राजन्निजघ्नुरितरेतरम्।
निघ्नन्तः समरेऽन्योन्यं शूराः परिघबाहवः ॥ ११ ॥
न शेकुरभिसंरब्धाः शूरान्कर्तुं पराङ्मुखान्।
कृत्तोत्तरोष्ठं सुनसं कृत्तकेशमलङ्कृतम् ॥ १२ ॥
अदृश्यत शिरश्छिन्नं रजोध्वस्तं सकुण्डलम्।
अदृश्यंस्तत्र गात्राणि शरैश्छिन्नानि भागशः ॥ १३ ॥
शालस्कन्धनिकाशानि क्षत्रियाणां महामृधे।
नागभोगनिकाशैश्च बाहुभिश्चन्दनोक्षितैः ॥ १४ ॥
आस्तीर्णा वसुधा भाति शिरोभिश्च सकुण्डलैः।
रथिनां रथिभिश्चात्र सम्प्रहारोऽभ्यवर्त्तत ॥ १५ ॥
सादिभिः सादिनां चापि पदातीनां पदातिभिः।
उपाशाम्यद्रजो भौमं रुधिरेण प्रसर्पता ॥ १६ ॥

त्यांशीं भिडले, पायदळ पायदळाशीं भिडलें (८ ९). घोडेस्वार घोडेस्वारांशीं आणि हत्ती हत्तींशीं भिडून झुंजू लागले. तलवारी, पट्टे, प्रास, शक्ति, भाले, इत्यादिकांनीं (१०), ते खवळलेले वीर युद्धांत राजा, एकमेकांस ठार करूं लागले. अडसरांप्रमाणें दीर्घ व पुष्ट बाहु असलेले ते वीर युद्धांत परस्परांवर प्रहार करीत (११) क्षुब्ध झाले असतांहि शूरांस परतवूं शकले नाहींत. वरचा ओंठ तुटलेले पण सुंदर नाकाचें, केस तुटलेलें पण अलंकार धारण करणारें (१२), धुळीनें भरलेलें पण कुंडलें धारण करणारें, अशीं तुटलेलीं डोकीं दिसूं लागलीं. क्षत्रियांच्या त्या मोठ्या युद्धांत बाणांनीं तोडलेल (हात, पाय वगैरे इतर) अवयवांचेहि भाग शालवृक्षाच्या खांद्यांसारखे दिसूं लागले. नागांच्या शरीरांसारख्या चंदनाची उटी लाविलेल्या बाहूंनीं (१३-१४), तसेंच सकुंडल मस्तकांनीं छादिलेली रणभूमि शोभूं लागली. रथ्यांनीं रथ्यांवर रथ घातले (१५). घोडदळानें घोडदळावर, व पायदळानें पायदळावर चाल केली. तेव्हां रक्ताचे पाट वाहूं लागल्यामुळें रणभूमीवरील धूळ नाहींशी झाली (१६).

कश्मलं चाऽऽविशद्घोरं निर्मर्यादमवर्तत ।
उपाविशन्गरुत्मन्तः शरैर्गाढं प्रवेजिताः ।
अन्तरिक्षे गतिर्येषा दर्शनं चाप्यरुध्यत ॥ १७ ॥
ते घ्नन्तः समरेऽन्योन्यं शूराः परिघबाहवः ।
न शेकुरभिसंरब्धाः शूरान्कर्तुं पराङ्मुखान् ॥ १८ ॥
शतानीकः शतं हत्वा विशालाक्षश्चतुश्शतम् ।
प्रविष्टौ महतीं सेनां त्रिगर्तानां महारथौ ॥ १९ ॥
तौ प्रविष्टौ महासेनां बलवन्तौ मनस्विनौ ।
आर्च्छेतां बाहुसंरब्धौ केशाकेशि रथारथि ॥ २० ॥
लक्षयित्वा त्रिगर्तानां तौ प्रविष्टौ रथव्रजम् ।
अग्रतः सूर्यदत्तश्च मदिराक्षश्च पृष्ठतः ॥ २१ ॥

( सैनिकांस ) भयंकर मूर्च्छा आली. ( युद्ध ) निर्मर्याद झालें. बाणांनीं भयभीत झालेले गरुडपक्षी ( ध्वजाच्या टोकांवर वगैरे ) बसूं लागले. ( बाणांच्या छायामुळें अंतरिक्षांतील त्यांची गति व दृष्टि बंद झाली ( १७ ). अडसरांसारख्या बाहूंचे ते शूर परस्परांवर प्रहार करीत क्षुब्ध झाले असतां ( प्रतिपक्षाकडील ) शूरांस परत फिरवूं शकले नाहींत ( १८ ). शतानीकानें शंभर वीर मारून आणि विशालाक्षानें चारशें ठार करून ते दोघेहि महारथी त्रिगर्तांच्या अफाट सैन्यांत घुसले ( १९ ). अफाट सैन्यांत घुसलेल्या त्या दोघां बलवान् व अभिमानी वीरांनी केशाकेशि ( एकमेकांच्या शेंड्या धरून केलेलें ) आणि रथारथि असें युद्ध आपल्या फुरफुरणाऱ्या बाहूंनीं चालविलें ( २० ). असें पाहून सूर्यदत्त पुढल्या अंगानें व मदिराक्ष मागच्या अंगानें त्रिगर्तांच्या रथसमूहांत शिरले (२१).

१ कश्मलं=मूर्च्छा ( नी. ) कश्मलं याचा अर्थ अंधार असाहि घेतां येईल; गरुडांना अंधार बाधला असाहि आशय दिसतो.

२ आर्च्छेताम्-मोहितवन्तौ ताम् त्रिगर्तसेनाम् असा नी. संबंध जोडतो; पण आर्च्छेतम याचा अर्थ कोशांत असा नाहीं. शिवाय ' केशाकेशि ' याचा संबंध राहात नाहीं. 'केशाकेशि युद्धं आर्च्छेताम्' असा संबंध घ्यावा. हा शब्द पुढेंच २३व्या श्लोकांत याच अर्थी आला आहे.

विराटस्तत्र सङ्ग्रामे हत्वा पञ्चशतान्रथान् ।
हयानां च शतान्यष्टौ हत्वा पञ्च महारथान् ॥ २२ ॥
चरन्स विविधान्मार्गान्रथेन रथसत्तमः ।
त्रिगर्तानां सुशर्माणमार्च्छद्रुक्मरथं रणे ॥ २३ ॥
तौ व्यवाहरतां तत्र महात्मानौ महाबलौ ।
अन्योन्यमभिगर्जन्तौ गोष्ठेषु वृषभाविव ॥ २४ ॥
ततो राजा त्रिगर्तानां सुशर्मा युद्धदुर्मदः ।
मत्स्यं समीयाद्राजानं द्वैरथेन नरर्षभः ॥ २५ ॥
ततो रथाभ्यां रथिनौ व्यतीयतुरमर्षणौ ।
शरान्व्यसृजतां शीघ्रं तोयधारा घना इव ॥ २६ ॥
अन्योन्यं चापि संरब्धौ विचेरतुरमर्षणौ ।
कृतास्त्रौ निशितैर्बाणैरसिशक्तिगदाभृतौ ॥ २७ ॥
ततो राजा सुशर्माणं विव्याध दशभिः शरैः ।
पञ्चभिः पञ्चभिश्चाऽस्य विव्याध चतुरो हयान् ॥ २८ ॥

विराटराजानें तेथें संग्रामांत पांचशें रथी, आठशें अश्व आणि पांच महारथी मारून नानाविध मार्गांनीं रथ चालवीत तो महारथी, त्रिगर्तांपैकी सुवर्णाच्या रथांत बसलेल्या सुशर्म्यावर तुटून पडला ( २२–२३ ). गोठ्यांत शिरलेल्या डुरकण्या फोडणाऱ्या वृषभांप्रमाणें ते दोघे महाबलिष्ठ महात्मे वीर गर्जना करून एकमेकाशीं लढूं लागले ( २४ ); त्यावेळीं युद्ध करण्याचा मद चढलेला सुशर्मा रथाचें द्वंद्वयुद्ध करण्याच्या इच्छेनें मत्स्यराजावर चालून आला (२५). आणि ते दोघेहि रथी रथांनीं एकमेकांवर तुटून पडून, मेघ पर्जन्यधारा सोडतात त्याप्रमाणें एकमेकांवर बाण सोडूं लागले ( २६ ). दोघेहि शस्त्रास्त्रांमध्यें निपुण असून तीक्ष्ण बाण, खड्ग, शक्ति, गदा वगैरे परस्परांवर मोठ्या त्वेषानें हाणीत होते ( २७ ). नंतर विराटराजानें दहा बाणांनीं सुशर्म्याला वेध केला व त्याच्या चारहि घोड्यांना पांच पांच बाणांनीं वेधिलें (२८).

तथैव मत्स्यराजानं सुशर्मा युद्धदुर्मदः ।
पञ्चाशद्भिः शितैर्बाणैर्विव्याध परमास्त्रवित् ॥ २९ ॥
ततः सैन्यं[1] महाराज मत्स्यराजसुशर्मणोः ॥
नाऽभ्यजानत्तदाऽन्योन्यं सैन्येन[2] रजसाऽऽवृतम्॥३०॥१०२३

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि दक्षिणगोग्रहे विराटसुशर्मयुद्धे द्वात्रिंशोऽध्यायः ॥३२॥

त्याचप्रमाणें अस्त्रविद्येंत निपुण असलेल्या सुशर्म्यानेंहि पन्नास तीक्ष्ण बाणांनीं विराटराजाला वेधिलें. सेनेनें उडालेल्या धूळीनें झांकून गेल्यामुळें विराट व सुशर्मा या दोघांचे सैनिक महाराजा, एकमेकांस ओळखूं शकेनात (२९–३०).

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोग्रहण-उपपर्वांत दक्षिण गोग्रहणप्रसंगीं विराट व सुशर्मा यांच्या युद्धाविषयीं ३२ वा अध्याय समाप्त झाला.

## अध्याय ३३

[ त्रिगर्तांचा राजा विराटास पकडून नेतो; भीम त्रिगर्तराजास जिंकून विराटाला सोडवितो. ]

वैशम्पायन उवाच– तमसाऽभिप्लुते लोके रजसा चैव भारत ।
अतिष्ठन्वै मुहूर्त्तं तु व्यूढानीकाः प्रहारिणः ॥ १ ॥
ततोऽन्धकारं प्रणुदन्नुदतिष्ठत चन्द्रमाः ।
कुर्वाणो विमलां रात्रिं नन्दयन्क्षत्रियान्युधि ॥ २ ॥
ततः प्रकाशमासाद्य पुनर्युद्धमवर्तत ।
घोररूपं ततस्ते स्म नाऽवैक्षन्त परस्परम् ॥ ३ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— राजा, अंधकार पडून कोठें कांहीं दिसेनासें झालें, व धुळीनें दिशा व्याप्त झाल्या; यामुळें तें लढवय्ये तसेच व्यूह बांधलेले कांहीं वेळ स्तब्ध राहिले (१). नंतर अंधार नष्ट करीत व रात्र उजळीत चंद्र उदयास आला, तेव्हां त्या क्षत्रियांस पुनः वीरश्री चढली (२). आणि प्रकाश मिळाल्यानें घनघोर युद्ध पुनः सुरू झालें, व ते फिरून हातघाईवर आले ( ३ ).

---

१ सैन्यं एकवचनी चूक वाटल्यानें ( नी. ) जुना प्राचीन पाठ असा देतो, " ततः सेनाः समाहृत्य मत्स्यराजसुशर्मणौ । न जानीतां तदान्योन्यं सैन्येन रजसावृतौ ॥ " पण यांतहि ' सुशर्माणौ ' च्या जागीं ' सुशर्मणौ ' हें रूप आर्ष आहे असें (नी. ) म्हणतो. सारांश, श्लोक अपपाठयुक्त आहे. २ सैन्येन सेनोत्थेन ( नी. )

ततः सुशर्मा त्रैगर्त्तः सह भ्रात्रा यवीयसा ।
अभ्यद्रवन्मत्स्यराजं रथव्रातेन सर्वशः ॥ ४ ॥
ततो रथाभ्यां प्रस्कन्द्य भ्रातरौ क्षत्रियर्षभौ ।
गदापाणी सुसंरब्धौ समभ्यद्रवतां रथान् ॥ ५ ॥
तथैव तेषां तु बलानि तानि क्रुद्धान्यथाऽन्योन्यमभिद्रवन्ति ।
गदासिखड्गैश्च परश्वधैश्च प्रासैश्च तीक्ष्णाग्रसुपीतधारैः ॥ ६ ॥
बलं तु मत्स्यस्य बलेन राजा सर्वं त्रिगर्ताधिपतिः सुशर्मा ।
प्रमथ्य जित्वा च प्रसह्य मत्स्यं विराटमोजस्विनमभ्यधावत् ॥ ७ ॥
तौ निहत्य पृथक्धुर्यावुभौ तौ पार्ष्णिसारथी ।
विरथं मत्स्यराजानं जीवग्राहमगृह्णताम् ॥ ८ ॥
तमुन्मथ्य सुशर्माऽथ युवतीमिव कामुकः ।
स्यन्दनं स्वं समारोप्य प्रययौ शीघ्रवाहनः ॥ ९ ॥

नंतर त्रिगर्ताधिपति सुशर्मा आपला रथसमुदाय बरोबर घेऊन आपल्या कनिष्ठ बंधूसहित मत्स्यराजावर चालून गेला (४). नंतर ते दोघे क्षत्रियश्रेष्ठ बंधु हातांत गदा घेऊन रथांतून खालीं उडी मारून मोठ्या आवेशानें शत्रुरथांवर चाल करून गेले (५). त्याचप्रमाणें तीं दोन्हीं सैन्यें मोठ्या त्वेषानें परस्परांशीं लढूं लागलीं; गदा, पट्टे, तरवारी, कुऱ्हाडी व टोकें पाजवलेले भाले घेऊन तीं एकमेकांवर तुटून पडलीं ( ६ ). सुशर्म्यानें विराटाचें सैन्य जर्जर केलें आणि तो वेगानें एकाएकीं तेजस्वी विराटराजावर धावून गेला ( ७ ). त्यानें तत्काळ विराटाच्या दोन्हीं बाजूंस व पाठीशीं असलेल्या रक्षकांचा प्राण घेतला, आणि विराटराजाला रथाच्या खालीं ओढून त्यास जिवंत धरिलें ( ८ ). नंतर सुशर्म्यानें जसा एखादा कामुक तरुणीस उचलतो, त्याप्रमाणें विराटास उचलून आपल्या रथांत घातलें; आणि तो जलदी घोडे दवडवीत निघाला ( ९ )

तस्मिन्गृहीते विरथे विराटे बलवत्तरे ।
प्राद्रवन्त भयान्मत्स्यास्त्रिगर्तैरर्दिता भृशम् ॥ १० ॥
तेषु सन्त्रस्यमानेषु कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
प्रत्यभाषन्महाबाहुं भीमसेनमरिन्दमम् ॥ ११ ॥
मत्स्यराजः परामृष्टस्त्रिगर्तेन सुशर्मणा ।
तं मोचय महाबाहो न गच्छेद्द्विषतां वशम् ॥ १२ ॥
उषिताः स्म सुखं सर्वे सर्वकामैः सुपूजिताः ।
भीमसेन त्वया कार्या तस्य वासस्य निष्कृतिः ॥ १३ ॥

भीमसेन उवाच— अहमेनं परित्रास्ये शासनात्तव पार्थिव ।
पश्य मे सुमहत्कर्म युध्यतः सह शत्रुभिः ॥ १४ ॥
स्वबाहुबलमाश्रित्य तिष्ठ त्वं भ्रातृभिः सह ।
एकान्तमाश्रितो राजन्पश्य मेऽद्य पराक्रमम् ॥ १५ ॥
सुस्कन्धोऽयं महावृक्षो गदारूप इव स्थितः ।
अहमेनमपारुज्य द्रावयिष्यामि शात्रवान् ॥ १६ ॥

त्या बलवत्तर विराटराजास रथांतून पकडून ओढून नेल्यावर त्रिगर्तांनीं मत्स्यदेशांतील वीरांस फार जेरास आणल्यामुळें ते भीतीनें (दशदिशांस) पळूं लागले ( १० ). सैन्य भयभीत होत असलेलें पाहून कौंतेय युधिष्ठिर महाबाहु शत्रुदमन भीमसेनास म्हणाला:—( ११ ) “त्रिगर्ताधिपति सुशर्म्यानें विराटराजास पकडिलें आहे. महाबाहू, तूं त्याची सुटका कर; तो शत्रूंच्या ताब्यांत जातां कामा नये (१२). कारण सर्व इष्टवस्तु देऊन त्यानें आपला सन्मान केला आहे व आपण सर्वजण त्याच्याकडे सुखानें राहिलो आहों. भीमसेना, तूं त्या राहण्याची फेड करणें योग्य आहे” ( १३ ).

भीमसेन म्हणाला:—“ राजा, तुझ्या आज्ञेनें मी विराटाला आतां सोडवितों; शत्रूंशीं युद्ध करतांना मी कसें अचाट कर्म करितों तें पहा ( १४ ). राजा, आपल्या बाहुबलाचा आश्रय करून तूं बंधूंसह एका बाजूस राहून, पहा माझा आज पराक्रम ! ( १५ ) स्कंध सोडलेला हा महावृक्ष गदेसारखा उभा आहे; मी ह्याला उपटून घेऊन शत्रूंना पळवून लावतों ” ( १६ ).

वैशम्पायन उवाच— तं मत्तमिव मातङ्गं वीक्षमाणं वनस्पतिम् ।
अब्रवीद्भ्रातरं वीरं धर्मराजो युधिष्ठिरः ॥ १७ ॥

मा भीम साहसं कार्षीस्तिष्ठत्वेष वनस्पतिः ।
मा त्वां वृक्षेण कर्माणि कुर्वाणमतिमानुषम् ॥ १८ ॥

जनाः समवबुद्ध्येरन्भीमोऽयमिति भारत ।
अन्यदेवाऽऽयुधं किंचित्प्रतिपद्यस्व मानुषम् ॥ १९ ॥
चापं वा यदि वा शक्तिं निस्त्रिंशं वा परश्वधम् ।
यदेव मानुषं भीम भवेदन्यैरलक्षितम् ॥ २० ॥
तदेवाऽऽयुधमादाय मोक्षयाऽऽशु महीपतिम् ।
यमौ च चक्ररक्षौ ते भवितारौ महाबलौ ॥ २१ ॥

सहिताः समरे तत्र मत्स्यराजं परीप्सत ।
वैशम्पायन उवाच—एवमुक्तस्तु वेगेन भीमसेनो महाबलः ॥ २२ ॥

गृहीत्वा तु धनुः श्रेष्ठं जवेन सुमहाजवः ।
व्यमुञ्चच्छरवर्षाणि सतोय इव तोयदः ॥ २३ ॥

**वैशंपायन** म्हणाला--: जेव्हां भीमसेन त्या वृक्षाकडे मदोन्मत्त हत्तीप्रमाणें पाहूं लागला, तेव्हां धर्मराज युधिष्ठिर त्या वीर बंधूस म्हणाला:-(१७) "भीमा, असें साहस करूं नको. हा वृक्ष असाच राहूं दे; वृक्षाच्या योगानें तूं अमानुष कृत्यें करीत असतां (१८), भारता, लोकांनीं तुला हा भीम म्हणून ओळखूं नये. मनुष्यास शोभेल असें दुसरेंच एखादें आयुध घे ( १९ ). धनुष्य, शक्ति, खड्ग किंवा कुऱ्हाड म्हणजे जें मनुष्याला शोभणारें असल्यामुळें भीमा, कोणाच्या लक्षांत भरणार नाहीं ( २० ), तें आयुध घेऊन विराटराजाला लवकर सोडव. महाबलाढ्य नकुलसहदेव तुझ्या रथाचीं चाकें ( दोन बाजूंनीं ) राखतील ( २१ ). तुम्ही तिघे मिळून युद्धांत तेथें मत्स्यराजाला सोडवा."

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें युधिष्ठिराची आज्ञा होतांच वेगानें महाबलाढ्य भीमसेनानें उत्कृष्ट धनुष्य हातीं घेतलें, आणि वेगानेंच तो महावेगवान् भीम सजल मेघाप्रमाणें बाणांचा वर्षाव करूं लागला ( २२–२३ ).

तं भीमो भीमकर्माणं सुशर्माणमथाऽद्रवत् ।
विराटं समवीक्ष्यैनं तिष्ठ तिष्ठेति चाऽवदत् ॥ २४ ॥
सुशर्मा चिन्तयामास कालान्तकयमोपमम् ।
तिष्ठ तिष्ठेति भाषन्तं पृष्ठतो रथपुङ्गवः ।
पश्यतां सुमहत्कर्म महद्युद्धमुपस्थितम् ॥ २५ ॥
परावृत्तो धनुर्गृह्य सुशर्मा भ्रातृभिः सह ।
निमेषान्तरमात्रेण भीमसेनेन ते रथाः ॥ २६ ॥
रथानां च गजानां च वाजिनां च ससादिनाम् ।
सहस्रशतसङ्घाताः शूराणामुग्रधन्विनाम् ॥ २७ ॥
पातिता भीमसेनेन विराटस्य समीपतः ।
पत्तयो निहतास्तेषां गदां गृह्य महात्मना ॥ २८ ॥
तद्‌दृष्ट्वा तादृशं युद्धं सुशर्मा युद्धदुर्मदः ।
चिन्तयामास मनसा किं शेषं हि बलस्य मे ।
अपरो दृश्यते सैन्ये पुरा मग्नो महाबले ॥ २९ ॥

आतां भीमसेन भीषण कर्में करणाऱ्या सुशर्म्यावर चाल करून गेला, आणि विराटास ( त्याचे रथांत ) पाहतांच सुशर्म्यास " उभा रहा, उभा रहा " असें म्हणाला (२४). " उभा रहा, उभा रहा, माझा अत्यंत मोठा पराक्रम आणि मोठें युद्ध प्राप्त झालेलें पहा " असे शब्द कानीं पडतांच रथश्रेष्ठ सुशर्म्यानें मागें पाहिलें, तों (जणूं काय) आपल्या मागून प्रत्यक्ष काळ यमच येत आहे असें त्यास वाटलें ( २५ ). सुशर्मा आपल्या बंधूंसह धनुष्य घेऊन मागें फिरला, व त्याचे इतर रथीहि तत्काळ मागें वळून भीमसेनाशीं भिडले ( २६ ). ( त्रिगर्तांचे ) रथ, गज व घोडेस्वारांसहित अश्व, ह्यांच्या शेकडों-हजारोंच्या झुंडीच्या झुंडी, त्यांच्यावरील शूर योद्ध्यांसहित ( २७ ), भीमसेनानें विराटादेखत मारून टाकल्या. नंतर त्या महात्म्यानें गदा घेऊन त्याचें पायदळ सैन्य ठार केलें ( २८ ). तसलें तें युद्ध पाहून युद्धाची खुमखुमी असलेला

१ या श्लोकांतील अन्वय ( नी. ) देतो, पण तो कसाबसा लागतो. ' पश्यतां कर्मव्यतिहारे तङ् ' ( नी. ) २ संगताः इति शेषः ( नी. )

३ शत, सहस्र भिन्न घ्यावे. ४ किंशेषः कुत्सितः बधः (नी.) मेदिनीकोशाधारें. ५ ( नी.) येथें सुशर्म्याच्या भावाचा उल्लेख करितो; परंतु जरूरी दिसत नाहीं.

आकर्णपूर्णेन तदा धनुषा प्रत्यदृश्यत ।
सुशर्मा सायकांस्तीक्ष्णान्क्षिपते च पुनः पुनः ॥ ३० ॥
ततः समस्तास्ते सर्वे तुरगानभ्यचोदयन् ।
दिव्यमस्त्रं विकुर्वाणास्त्रिगर्तान्प्रत्यमर्षणाः ॥ ३१ ॥
तान्निवृत्तरथान्दृष्ट्वा पाण्डवान्सा महाचमूः ।
वैराटिः परमक्रुद्धो युयुधे परमाद्भुतम् ॥ ३२ ॥
सहस्रमवधीत्तत्र कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
भीमः सप्तसहस्राणि यमलोकमदर्शयत् ॥ ३३ ॥
नकुलश्चापि सप्तैव शतानि प्राहिणोच्छरैः ।
शतानि त्रीणि शूराणां सहदेवः प्रतापवान् ॥ ३४ ॥
युधिष्ठिरसमादिष्टो निजघ्ने पुरुषर्षभः ।
ततोऽभ्यपतदत्युग्रः सुशर्माणमुदायुधः ॥ ३५ ॥
हत्वा तां महतीं सेनां त्रिगर्तानां महारथः ।
ततो युधिष्ठिरो राजा त्वरमाणो महारथः ॥ ३६ ॥

सुशर्मा मनाशीं विचार करूं लागला, कीं ' माझ्या सैन्याचा खरोखर किती शेष आहे ? कारण मोठ्या सामर्थ्याच्या सैन्यांत घुसलेला दुसरा ( भोणी ) लवकरच दिसूं लागेल ' (२९). तेव्हां सुशर्म्यानें धनुष्य आकर्ण ओढलेलें दिसलें, व तो एकसारखे तीक्ष्ण बाण टाकूं लागला (३०). नंतर मत्स्यदेशाच्या सर्व योध्यांनीं आपापले रथांचे घोडे रणभूमीकडे वळविले, आणि चवताळून जाऊन ते त्रिगर्तांवर दिव्य अस्त्रांची वृष्टि करूं लागले (३१). पांडवांना युद्ध करतांना पाहून विराटाचें प्रचंड सैन्यहि मागें वळलें, व विराटाचा पुत्रहि अत्यंत संतापून अति आश्चर्यकारक रीतीनें लढूं लागला ! ( ३२ ) या युद्धांत कुंतीपुत्र युधिष्ठिरानें एक हजार योद्धे मारिले; भीमसेनानें सात हजार योद्ध्यांना यमलोक दाखविला (३३). नकुलानेंहि बाणांची वृष्टि करून सातशें योद्धे यमलोकीं पाठविले, आणि प्रतापी सहदेवानें तीनशें योद्धे ठार केले (३४). याप्रमाणें संहार करून धर्माज्ञेनें आयुधासहित अति उग्र नकुलानें सुशर्म्यावर चाल केली ( ३५ ). नंतर त्रिगर्तांच्या प्रचंड सैन्याचा संहार झाल्यावर, महारथी युधिष्ठिर राजा मोठ्या वेगानें ( ३६ ),

१ अत्युग्रः युधिष्ठिरः ( नी. ) पण येथें नकुल घ्यावा. कारण पुढील श्लोकांत युधिष्ठिराचें नांव आहे तें व्यर्थ होईल.

अभिपत्य सुशर्माणं शरैरभ्याहनद्भृशम् ।
सुशर्माऽपि सुसंरब्धस्त्वरमाणो युधिष्ठिरम् ॥ ३७ ॥
अविध्यन्नवभिर्बाणैश्चतुर्भिश्चतुरो हयान् ।
ततो राजन्नाशुकारी कुन्तीपुत्रो वृकोदरः ॥ ३८ ॥
समासाद्य सुशर्माणमश्वानस्य व्यपोथयत् ।
पृष्ठगोपांश्च तस्याऽथ हत्वा परमसायकैः ॥ ३९ ॥
अथाऽस्य सारथिं क्रुद्धो रथोपस्थादपातयत् ।
चक्ररक्षश्च शूरो वै मदिराक्षोऽतिविश्रुतः ॥ ४० ॥
समायाद्विरथं दृष्ट्वा त्रिगर्तं प्राहरत्तदा ।
ततो विराटः प्रस्कन्द्य रथादथ सुशर्मणः ॥ ४१ ॥
गदां तस्य परामृश्य तमेवाऽभ्यद्रवद्बली ।
स चचार गदापाणिर्वृद्धोऽपि तरुणो यथा ॥ ४२ ॥
पलायमानं त्रैगर्तं दृष्ट्वा भीमोऽभ्यभाषत ।
राजपुत्र निवर्तस्व न ते युक्तं पलायनम् ॥ ४३ ॥

सुशर्म्यावर ( स्वतः ) धांवून गेला, व त्यानें बाणांनीं त्यास जोरानें ताडन केलें. तेव्हां सुशर्मा फारच क्षुब्ध झाला, आणि त्यानें त्वरा करून युधिष्ठिराला नऊ बाणांनीं वेधिलें व त्याच्या चार अश्वांना चार बाणांनीं वेधिलें. त्यासमयीं राजा, त्वरेनें काम करणारा भीमसेन पुढें होऊन त्यानें सुशर्म्याचे चारहि अश्व मारिले, व मोठमोठ्या प्रखर बाणांनीं त्याचे पाठीराखे ठार केले ( ३७–३९ ). नंतर त्यानें त्याचा सारथि रथोवरून खालीं पाडिला. ( इतक्यांत विराटराजाचा ) शूर व अतिशय प्रसिद्ध चक्ररक्षक मदिराक्ष हा रथहीन झालेल्या सुशर्म्यावर चालून गेला व त्यानें त्यास प्रहार केले. तेव्हां विराटानें सुशर्म्याच्या रथावरून उडी टाकली (४०-४१), आणि त्याचीच गदा घेऊन तो बलवान् त्यावर चालून गेला. त्यावेळीं तो वृद्ध असतांहि तरुणाप्रमाणें गदा घेऊन पावलें टाकीत होता ( ४२ ). त्रिगर्तांच्या राजाला पळतांना पाहून भीम म्हणालाः–"राजपुत्रा, मागें फिर. तुला पळणें शोभत नाहीं (४३).

१ 'रथोपस्थ' शब्द चुकीचा दिसतो; सारथि रथोपस्थांत बसत नाहीं, रथोपस्थ ही रथ्याची बसण्याची जागा आहे. भ. गी. ( १ )४७ पहा. हें युद्धवर्णन गैरमाहितीचें दिसतें.

अनेन वीर्येण कथं गास्त्वं प्रार्थयसे बलात् ।
कथं चाऽऽनुचरांस्त्यक्त्वा शत्रुमध्ये विषीदसि ॥ ४४ ॥
इत्युक्तः स तु पार्थेन सुशर्मा रथयूथपः ।
तिष्ठ तिष्ठेति भीमं स सहसाऽभ्यद्रवद्बली ॥ ४५ ॥
भीमस्तु भीमसङ्काशो रथात्प्रस्कन्द्य पाण्डवः ।
प्राद्रवत्तूर्णमव्यग्रो जीवितेप्सुः सुशर्मणः ॥ ४६ ॥
तं भीमसेनो धावन्तमभ्यधावत वीर्यवान् ।
त्रिगर्त्तराजमादातुं सिंहः क्षुद्रमृगं यथा ॥ ४७ ॥
अभिद्रुत्य सुशर्माणं केशपक्षे परामृशत् ।
समुद्यम्य तु रोषात्तं निष्पिपेष महीतले ॥ ४८ ॥
पदा मूर्ध्नि महाबाहुः प्राहरद्विलपिष्यतः ।
तस्य जानुं ददौ भीमो जघ्ने चैनमरत्निना ।
स मोहमगमद्राजा प्रहारवरपीडितः ॥ ४९ ॥
तस्मिन्गृहीते विरथे त्रिगर्त्तानां महारथे ॥
अभज्यत बलं सर्वं त्रैगर्तं तद्भयातुरम् ॥ ५० ॥

असल्या या शौर्यानें तूं विराटाच्या गाई बलात्कारानें कशा नेणार ? आणि तूं आपल्या अनुचरांना सोडून, शत्रूच्या घोळक्यांत कसा रडत बसतोस ? " ( ४४ ) हे असे भीमाचे टोचणारे शब्द ऐकून रथसमुदायाचा नेता बलवान् सुशर्माहि भीमास " उभा रहा, उभा रहा " असें म्हणून त्यावर पुनः उसळून आला ( ४५ ). पण भीमसेन—ज्याला उपमा भीमाचीच होय—निर्भयपणें रथांतून उडी टाकून सुशर्म्याचे प्राण घेण्याच्या इच्छेनें त्याच्या मागें जोरानें धांवला (४६). धांवून येणाऱ्या सुशर्म्यावर तो वीर्यशाली भीमसेन, सिंह जसा क्षुद्र मृगाला धरण्यास धावतो, तसा उलट धावला ( ४७ ). अखेरीस त्याच्या जवळ जाऊन त्यानें त्याचे केंस धरले व मोठ्या त्वेषानें त्यास उचलून भूमीवर आपटलें ( ४८ ). सुशर्मा दुःखानें विव्हळत असतां त्याच्या मस्तकावर भीमानें लाथ हाणली व उदरावर गुडघा देऊन तळहातानें त्याच्यावर प्रहार केला. त्या प्रचंड प्रहारानें पीडित होऊन सुशर्मा मूर्च्छित झाला ! ( ४९ ) त्रिगर्तांचा तो महारथी सुशर्मा रथहीन होऊन पकडला गेला, तेव्हां त्याच्या सर्व सैन्याची भीतीमुळें पांगापांग झाली ( ५० ).

निवर्त्य गास्ततः सर्वाः पाण्डुपुत्रा महारथाः ।
अवजित्य सुशर्माणं धनं चाऽऽदाय सर्वशः ॥५१ ॥
स्वबाहुबलसम्पन्ना ह्रीनिषेवा यतव्रताः ।
विराटस्य महात्मानः परिक्लेशविनाशनाः ॥ ५२ ॥
स्थिताः समक्षं ते सर्वे त्वथ भीमोऽभ्यभाषत ॥ ५३ ॥
नाऽयं पापसमाचारो मत्तो जीवितुमर्हति ।
किं तु शक्यं मया कर्तुं यद्राजा सततं घृणी ॥ ५४ ॥
गले गृहीत्वा राजानमानीय विवशं वशम् ।
तत एनं विचेष्टन्तं बद्ध्वा पार्थो वृकोदरः ॥ ५५ ॥
रथमारोपयामास विसंज्ञं पांसुगुण्ठितम् ।
अभ्येत्य रणमध्यस्थमभ्यगच्छद्युधिष्ठिरम् ॥ ५६ ॥
दर्शयामास भीमस्तु सुशर्माणं नराधिपम् ।
प्रोवाच पुरुषव्याघ्रो भीममाहवशोभिनम् ॥ ५७ ॥
तं राजा प्राहसद्दृष्ट्वा मुच्यतां वै नराधमः ।
एवमुक्तोऽब्रवीद्भीमः सुशर्माणं महाबलम् ॥ ५८ ॥

नंतर सर्व गाई परत वळवून महारथी पांडुपुत्रांनीं सुशर्म्याला जिंकून त्याचें सर्व धन घेतलें ( ५१ ). स्वतःच्या बाहुबलानें संपन्न असलेले, विनयशील, व्रतस्थ व महात्म्या विराटाचें संकट निवारण करणारे ( ५२ ), ते पांडव ( विराटा ) समोर उभे राहिले. नंतर भीम म्हणाला:–( ५३ ) "हा पापाचरण करणारा सुशर्मा माझ्या हातून जिवंत सुटावा हें योग्य नव्हे; परंतु राजा नेहमीं दयाळू आहे, तेव्हां माझा काय इलाज आहे ?" ( ५४ ). ( नंतर ) भीमानें बेभान होऊन पराधीन झालेल्या त्या सुशर्म्याची मानगुटी धरून त्यास राजाजवळ आणिलें; आणि त्याला जखडून बांधलें ( ५५ ). नंतर धुळीनें माखलेल्या व बेशुद्ध पडलेल्या त्या सुशर्म्याला रथावर घालून रणाच्या मध्यमार्गीं असलेल्या युधिष्ठिराजवळ तो आला (५६). भीमानें धर्मराजाला राजा सुशर्मा दाखविला, तेव्हां नरश्रेष्ठ धर्मराज हंसून त्यास म्हणाला:–( ५७ ) "ह्या नराधमाला सोड." त्यानें असें म्हटल्यावर भीमसेन महाबली सुशर्म्यास म्हणाला ( ५८ ).

भीम उवाच—जीवितुं चेच्छसे मूढ हेतुं मे गदतः शृणु ।
दासोऽस्मीति त्वया वाच्यं संसत्सु च सभासु च ॥ ५९ ॥
एवं ते जीवितं दद्यामेष युद्धजितो विधिः ।
तमुवाच ततो ज्येष्ठो भ्राता सप्रणयं वचः ॥ ६० ॥
युधिष्ठिर उवाच—मुञ्च मुञ्चाऽधमाचारं प्रमाणं यदि ते वयम् ।
दासभावं गतो ह्येष विराटस्य महीपतेः ।
अदासो गच्छ मुक्तोऽसि मैवं कार्षीः कदाचन ॥ ६१ ॥ [ १०८४ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि दक्षिणगोग्रहे त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३३ ॥

**भीम** म्हणालाः—"मूढा, जर तुला जगण्याची इच्छा असेल तर माझा हेतु सांगतों, ऐक. तूं सभांतून व लोकसमुदायांतून 'मी दास आहें' असें म्हणावें (५९), म्हणजे तुला मी जीवदान देईन. युद्धांत जिंकिलेल्यानें करावयाचा हा विधि आहे." तेव्हां वडील बंधु त्यास सांत्वनपूर्वक म्हणालाः–(६०)

**युधिष्ठिर** म्हणालाः—"आमचें म्हणणें तुला प्रमाण असेल, तर सोड, सोड या दुराचाऱ्यास ! विराटराजाचा हा दास झालाच आहे. (मग धर्मराजा सुशर्म्यास म्हणाला,) अदास होऊन जा. तुला मुक्त केलें आहे. असें कधीं करूं नको" (६१).

यात्रमाणें महाभारतांतील विराटपर्वांतील गोग्रहण-उपपर्वांत दक्षिणगोग्रहणाविषयीं ३३ वा अध्याय समाप्त झाला.

---

# अध्याय ३४

[ आपणांस व गाईंस शत्रूपासून सोडवून युद्धांत जय मिळविला, म्हणून विराटानें पांडवांचें अभिनंदन केलें व नगरांत जयाची थाळी पिटविली. ]

वैशम्पायन उवाच–

एवमुक्ते तु सव्रीडः सुशर्माऽऽसीदधोमुखः ।
स मुक्तोऽभ्येत्य राजानमभिवाद्य प्रतस्थिवान् ॥ १ ॥
विसृज्य तु सुशर्माणं पाण्डवास्ते हतद्विषः ।
स्वबाहुबलसम्पन्ना ह्रीनिषेवा यतव्रताः ।
संग्रामशिरसो मध्ये तां रात्रिं सुखिनोऽवसन् ॥ २ ॥
ततो विराटः कौन्तेयानतिमानुषविक्रमान् ।
अर्चयामास वित्तेन मानेन च महारथान् ॥ ३ ॥
विराट उवाच—यथैव मम रत्नानि युष्माकं तानि वै तथा ।
कार्यं कुरुत वै सर्वे यथाकामं यथासुखम् ॥ ४ ॥
ददाम्यलंकृताः कन्या वस्नानि विविधानि च ।
मनसश्चाप्यभिप्रेतं युद्धे शत्रुनिबर्हणाः ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— असें(युधिष्ठिरानें) म्हटलें तेव्हां लाजलेल्या सुशर्म्यानें मान खालीं घातली. ( भीमाच्या हातून ) सुटल्यावर (युधिष्ठिर) राजाला वंदन करून तो निघून गेला ( १ ). सुशर्म्याला सोडून दिल्यावर ते स्वतःच्या बाहुबलाच्या संपन्नतेनें शत्रूंचा नाश केलेले विनयशील व व्रतस्थ पांडव मुख्य युद्धभूमीच्या मध्यभागीं त्या रात्रीस खुशाल राहिले (२). नंतर अतिमानुष पराक्रम करून दाखविणाऱ्या महारथ पांडवांची विराटराजानें आदरपूर्वक धनानें व मानानें पूजा केली ( ३ ).

**विराट** म्हणाला:— "जशीं रत्नें माझीं आहेत तशीं तीं तुमचींहि आहेत. ह्यांचा उपयोग तुम्हीं आपल्या इच्छेप्रमाणें. वाटेल तो करा ( ४ ). युद्धांत शत्रूंचा विध्वंस करणाऱ्या योद्ध्यांनो, मी तुम्हांला सालंकृत कन्या, बहुविध संपत्ति व आणखी तुमच्या मनास जें कांहीं प्रिय वाटत असेल तें देतों ( ५ ).

युष्माकं विक्रमादद्य मुक्तोऽहं स्वस्तिमानिह ।
तस्माद्भवन्तो मत्स्यानामीश्वराः सर्वं एव हि ॥ ६ ॥
वैशम्पायन उवाच— तथेतिवादिनं मत्स्यं कौरवेयाः पृथक् पृथक् ।
ऊचुः प्राञ्जलयः सर्वे युधिष्ठिरपुरोगमाः ॥ ७ ॥
प्रतिनन्दाम ते वाक्यं सर्वं चैव विशाम्पते ।
एतेनैव प्रतीताः स्म यत्त्वं मुक्तोऽद्य शत्रुभिः ॥ ८ ॥
ततोऽब्रवीत्प्रीतमना मत्स्यराजो युधिष्ठिरम् ।
पुनरेव महाबाहुर्विराटो राजसत्तमः ॥ ९ ॥
एहि त्वामभिषेक्ष्यामि मत्स्यराजस्तु नो भवान् ॥ १० ॥
मनसश्चाप्यभिप्रेतं यथेष्टं भुवि दुर्लभम् ।
तत्तेऽहं सम्प्रदास्यामि सर्वमर्हति नो भवान् ॥ ११ ॥
रत्नानि गाः सुवर्णं च मणिमुक्तमथापि च ।
वैयाघ्रपद्य विप्रेन्द्र सर्वथैव नमोऽस्तु ते ॥ १२ ॥
त्वत्कृते ह्यद्य पश्यामि राज्यं सन्तानमेव च ।
यतश्च जातसरम्भो न च शत्रुवशं गतः ॥ १३ ॥

तुमच्या प्रतापानें मी आज येथें सुखरूप मुक्त झालों; यासाठीं तुम्हीं सर्वच मत्स्यदेशाचे खरेखरे अधिपति आहां " ( ६ ).

वैशंपायन म्हणालाः— या रीतीनें बोलणाऱ्या विराटास युधिष्ठिरादि सर्व पांडव वेग-वेगळे हात जोडून म्हणाले:-(७) " राजा, तुझ्या या सर्व भाषणाचें आम्हीं मोठ्या प्रेमानें अभिनंदन करितों. तूं आज शत्रूंपासून सुटलास यानेंच आम्हीं संतुष्ट आहों " (८ ). नंतर मत्स्यराज महाबाहु राजश्रेष्ठ विराट प्रसन्न मनानें युधिष्ठिरास पुनः म्हणाला:-( ९ ) "ये, मी तुला राज्याभिषेक करतों. तूंच आमचा मत्स्यदेशाचा राजा आहेस ( १० ). तुझ्या मनास जें कांहीं आवडत असेल, तें या पृथ्वीवर दुर्लभ असलें तरी मी तुला देईन. कोणतीहि वस्तु आम्हांपासून घेण्यास तूं पात्र आहेस ( ११ ). रत्नें, धेनु, सुवर्ण, मणि, मोत्यें, सर्व तुला देणें योग्य आहे. वैयाघ्रपद्य ब्राह्मणश्रेष्ठा, तुला सर्वथा प्रणाम असो ( १२ ). तुझ्यामुळेंच आज मी राज्य व संतति पाहत आहें; कारण (तुझ्यामुळें) मी गांगरूनहि शत्रूंच्या ताब्यांत गेलों नाहीं " ( १३ ).

ततो युधिष्ठिरो मत्स्यं पुनरेवाऽभ्यभाषत ।
प्रतिनन्दामि ते वाक्यं मनोज्ञं मत्स्य भाषसे ॥ १४ ॥
आनृशंस्यपरो नित्यं सुसुखी सततं भव ।
गच्छन्तु दूतास्त्वरितं नगरं तव पार्थिव ॥ १५ ॥
सुहृदां प्रियमाख्यातुं घोषयन्तु च ते जयम् ।
ततस्तद्वचनान्मत्स्यो दूतान् राजा समादिशत् ॥ १६ ॥
आचक्षध्वं पुरं गत्वा संग्रामविजयं मम ।
कुमार्यः समलंकृत्य पर्यागच्छन्तु मे पुरात् ॥ १७ ॥
वादित्राणि च सर्वाणि गणिकाश्च स्वलंकृताः ।
एतां चाऽऽज्ञां ततः श्रुत्वा राज्ञा मत्स्येन नोदिताः ।
तामाज्ञां शिरसा कृत्वा प्रस्थिता हृष्टमानसाः ॥ १८ ॥
ते गत्वा तत्र तां रात्रिमथ सूर्योदयं प्रति ।
विराटस्य पुराभ्याशे दूता जयमघोषयन् ॥ १९ ॥ [ ११०३ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि दक्षिणगोग्रहे विराटजयघोषे चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥३४॥

त्यानंतर युधिष्ठिर विराटास पुनः म्हणालाः–" तुझ्या भाषणाचें मी अभिनंदन करितों; मत्स्यराजा, तूं मनोज्ञ भाषण करतोस ( १४ ). तूं नेहमीं दयायुक्त राहून सतत चांगला सुखी रहा. राजा, तुझ्या दूतांनीं लवकर नगरास जावें (१५). इष्टमित्रांना ही प्रिय वार्ता सांगावी, व तुझ्या जयाचा घोष करावा. " नंतर युधिष्ठिराच्या सांगण्यावरून राजा विराटानें दूतांना सांगितलें:– " तुम्ही नगरास जाऊन संग्रामांत माझा जय झाला असें सांगा. नगरांतून कुमारिका अलंकार घालून मला सामोऱ्या येऊं द्या ( १६–१७ ); आणि सर्वप्रकारचीं मंगलवाद्यें व शृंगारलेल्या गणिकाहि सामोऱ्या येऊं द्या. " ह्याप्रमाणें आज्ञा ऐकून व ती आज्ञा शिरसा मान्य करून, मत्स्यराज विराटानें पाठविलेले दूत मोठ्या आनंदानें निघाले ( १८ ). ते रात्रींच्या रात्रींच तेथून निघून सूर्योदयाच्या सुमारास विराटाच्या नगरासमीप जाऊन पोंचले, व (तेथें) त्यांनीं विजयाचा घोष केला ( १९ ).

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण–उपपर्वांत दक्षिणगोग्रहणप्रसंगीं विराटाच्या जयाच्या घोषणेविषयीं ३४ वा अध्याय संपला.

## अध्याय ३५

[ विराटनगराच्या उत्तर दिशेकडील गाई दुर्योधन धरतो व तें वर्तमान एक गोप विराटाच्या पुत्रास ( उत्तरास ) कळवितो.]

वैशम्पायन उवाच।— याते त्रिगर्त्तान्मत्स्ये तु पशूंस्तान्वै परीप्सति ।
दुर्योधनः सहामात्यो विराटमुपयादथ ॥ १ ॥
भीष्मो द्रोणश्च कर्णश्च कृपश्च परमास्त्रवित् ।
द्रौणिश्च सौबलश्चैव तथा दुःशासनः प्रभो ॥ २ ॥
विविंशतिर्विकर्णश्च चित्रसेनश्च वीर्यवान् ।
दुर्मुखो दुश्शलश्चैव ये चैवाऽन्ये महारथाः ॥ ३ ॥
एते मत्स्यानुपागम्य विराटस्य महीपतेः ।
घोषान्विद्राव्य तरसा गोधनं जह्रुरोजसा ॥ ४ ॥
षष्टिं गवां सहस्राणि कुरवः कालयन्ति च ।
महता रथवंशेन परिवार्य समन्ततः ॥ ५ ॥
गोपालानां तु घोषस्य हन्यतां तैर्महारथैः ।
आरावः सुमहानासीत्सम्प्रहारे भयङ्करे ॥ ६ ॥
गोपाध्यक्षो भयत्रस्तो रथमास्थाय सत्वरः ।
जगाम नगरायैव परिक्रोशंस्तदाऽऽर्त्तवत् ॥ ७ ॥

**वैशम्पायन** म्हणाला:— आपल्या गाई परत आणण्यासाठीं मत्स्यदेशचा राजा विराट त्रिगर्तांवर चालून गेल्यावर, इकडे दुर्योधन अमात्यांसह विराटाच्या देशास येऊन पोंचला (१). भीष्म, द्रोण, कर्ण, उत्कृष्ट अस्त्रवेत्ता कृप, द्रोणाचा पुत्र ( अश्वत्थामा ), सुबलाचा पुत्र ( शकुनि ), त्याचप्रमाणें प्रभु जनमेजया, दुःशासन ( २ ), विविंशति, विकर्ण, वीर्यवान् चित्रसेन, दुर्मुख, दुःशल व दुसरे महारथ ( ३ ), हे सर्व मत्स्यदेशांत जाऊन त्यांनीं विराटराजाच्या गवळ्यांची झपाट्यासरशी दाणादाण करून जबरदस्तीनें गाई धरल्या ( ४ ). सभोंवतीं रथांचा गराडा घालून साठ हजार गाई घेऊन कौरव चालले (५). त्या महारथ्यांनीं गौळवाड्यांतील गोपाळांची मारपीट केली असतां, भयंकर प्रहारामुळें फार मोठा ओरडा झाला (६). तेव्हां गोपांचा अध्यक्ष भयभीत होऊन त्वरेनें रथांत बसून दीनासारखा आक्रोश करीत तडक नगरास आला(७).

स प्रविश्य पुरं राज्ञो नृपवेश्माऽभ्ययात्ततः ।
अवतीर्य रथात्तूर्णमाख्यातुं प्रविवेश ह ॥ ८ ॥
दृष्ट्वा भूमिञ्जयं नाम पुत्रं मत्स्यस्य मानिनम् ।
तस्मै तत्सर्वमाचष्ट राष्ट्रस्य पशुकर्षणम् ॥ ९ ॥
षष्टिं गवां सहस्राणि कुरवः कालयन्ति ते ।
तद्विजेतुं समुत्तिष्ठ गोधनं राष्ट्रवर्धन ॥ १० ॥
राजपुत्र हितप्रेप्सुः क्षिप्रं निर्याहि च स्वयम् ।
त्वां हि मत्स्यो महीपालः शून्यपालमिहाऽकरोत् ॥ ११ ॥
त्वया परिषदो मध्ये श्लाघते स नराधिपः ।
पुत्रो ममाऽनुरूपश्च शूरश्चेति कुलोद्वहः ॥ १२ ॥
इष्वस्त्रे निपुणो योधः सदा वीरश्च मे सुतः ।
तस्य तत्सत्यमेवाऽस्तु मनुष्येन्द्रस्य भाषितम् ॥ १३ ॥
आवर्त्तय कुरूञ्जित्वा पशून्पशुमतां वर ।
निर्दहैषामनीकानि भीमेन शरतेजसा ॥ १४ ॥

राजाच्या नगरांत प्रवेश केल्यावर तो राजवाड्याजवळ गेला, आणि रथांतून सत्वर खालीं उतरून ती हकीकत सांगण्याकरितां त्यानें आंत प्रवेश केला ( ८ ). विराटाचा मानी पुत्र भूमिंजय (उत्तर) नांवाचा त्यास ( तेथें ) भेटला. त्याला राष्ट्रांतील गाई हरण करून नेल्याचें तें सर्व वर्तमान त्यानें सांगितलें (९). (तो म्हणाला: ) "आपल्या साठ हजार गाई कौरव नेत आहेत. तें गोधन जिंकून परत आणण्याकरितां राष्ट्रवर्धना, ऊठ ( १० ); आणि राजपुत्रा, आपल्या हितावर लक्ष देऊन स्वतः त्वरित बाहेर पड. विराटराजानें ह्या शून्य नगरीचा रक्षक तुलाच नेमिलें आहे (११). तुझ्यामुळें सभेमध्यें तो राजा गर्वानें म्हणत असतो कीं, 'माझा पुत्र माझ्यासारखाच शूर असून माझ्या कुलाची कीर्ति कायम राखणारा आहे (१२). माझा पुत्र शरसंधान करण्यामध्यें निष्णात योद्धा असून नेहमीं पराक्रम गाजविणारा आहे.' त्या नरेंद्राचें तें भाषण सत्यच होवो ( १३ ). कौरवांना जिंकून पशुमंतांमध्यें श्रेष्ठा, पशु परत आण. बाणांच्या भीषण तेजानें त्यांचीं सैन्यें दग्ध कर ( १४ ).

धनुश्च्युतै रुक्मपुङ्खैः शरैः सन्नतपर्वभिः ।
द्विषतां भिन्ध्यनीकानि गजानामिव यूथपः ॥ १५ ॥
पाशोपधानां ज्यातन्त्रीं चापदण्डां महास्वनाम् ।
शरवर्णां धनुर्वीणां शत्रुमध्ये प्रवादय ॥ १६ ॥
श्वेता रजतसङ्काशा रथे युज्यन्तु ते हयाः ।
ध्वजं च सिंहं सौवर्णमुच्छ्रयन्तु तव प्रभो ॥ १७ ॥
रुक्मपुङ्खाः प्रसन्नाग्रा[1] मुक्ता हस्तवता[2] त्वया ।
छादयन्तु शराः सूर्यं राज्ञां मार्गनिरोधकाः ॥ १८ ॥
रणे जित्वा कुरून्सर्वान्वज्रपाणिरिवाऽसुरान् ।
यशो महदवाप्य त्वं प्रविशेदं पुरं पुनः ॥ १९ ॥
त्वं हि राष्ट्रस्य परमा गतिर्मत्स्यपतेः सुतः ।
यथा हि पाण्डुपुत्राणामर्जुनो जयतां वरः ॥ २० ॥

हत्तींचा म्होरक्या जसा हत्तींचे कळप पळवून लावतो, त्याप्रमाणें सोनेरी पिसांचे व चपट्या पेरांचे बाण मारून तूं शत्रूंचीं सैन्यें पळवून लाव ( १५ ). शत्रूंच्या सैन्यामध्यें तूं धनुष्यरूपी वीणा वाजव. धनुष्याची दोरी ही ह्या वीण्याची तार; दोरीच्या दोन्ही बाजूचे पाश ह्या तार अडकविण्याच्या खुंट्या, धनुष्याचा दांडा ही या वीण्याची दांडी; आणि दोरीपासून सुटणारे बाण हे वीण्यांतून निघणारे स्वर ( १६ ). चांदी-सारखे शुभ्र घोडे आपल्या रथास जोड, आणि मालका, सुवर्णाचा सिंहाकार ध्वज तुझ्या रथावर फडकूं दे ( १७ ). तूं हस्तकौशल्यानें सोडलेल्या सोनेरी पिसांच्या व घांसलेल्या टोकांच्या बाणांनीं सूर्य आच्छादिला जाऊन ( विरोधी ) राजांचा मार्ग बंद होवो ( १८ ). दैत्यांस जिंकणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं सर्व कौरवांस युद्धांत जिंकून मोठें यश मिळविल्यानंतर पुनः या शहरांत प्रवेश कर ( १९). तूं मत्स्यराजाचा पुत्र या राष्ट्राचा मोठा आधार आहेस. जसा खरोखर पांडुपुत्रांचा जेत्यांमध्यें श्रेष्ठ अर्जुन आधार आहे ( २० ),

---

१ प्रसन्नाग्राः याचा अर्थ (नी.) देत नाहीं. शब्द कूट आहे. प्रसन्न=साफ केलेलें.

२ हस्तवता दृढहस्तेन । प्रशंसायां मतुप् ( नी. )

एवमेव गतिर्नूनं भवान्विषयवासिनाम् ।
गतिमन्तो वयं त्वद्य सर्वे विषयवासिनः ॥ २१ ॥
वैशम्पायन उवाच—स्त्रीमध्य उक्तस्तेनाऽसौ तद्वाक्यमभयङ्करम् ।
अन्तःपुरे श्लाघमान इदं वचनमब्रवीत् ॥ २२ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे गोपवाक्ये पञ्चत्रिंशोऽध्यायः ॥३५॥

असाच आम्हां मत्स्यदेशीयांचा तूं खरोखर आधार आहेस. आम्ही या देशांतील सर्व लोक (तुझ्यामुळें) आज साधार आहोंत" ( २१ ).

**वैशंपायन** म्हणाला:– स्त्रियांमध्यें तो गोप, त्यास ते भय उत्पन्न न करणारे (प्रोत्साहक) शब्द बोलल्यावर, तो अंतःपुरांत बढाई करीत हें म्हणाला: (२२)

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहप्रसंगीं गोपाच्या भाषणाविषयीं ३५ वा अध्याय संपला.

## अध्याय ३६

[ बायकांत उत्तराच्या फुशारक्या ! अर्जुनाच्या सूचनेवरून द्रौपदी सारथ्य करण्याबद्दल बृहन्नलेचें नांव सुचविते व तिला बोलावण्यास उत्तरा जाते. ]

उत्तर उवाच—अद्याऽहमनुगच्छेयं दृढधन्वा गवां पदम् ।
यदि मे सारथिः कश्चिद्भवेदश्वेषु कोविदः ॥ १ ॥
तं त्वहं नाऽधिगच्छामि यो मे यन्ता भवेन्नरः ।
पश्यध्वं सारथिं क्षिप्रं मम युक्तं प्रयास्यतः ॥ २ ॥
अष्टाविंशतिरात्रं वा मासं वा नूनमन्ततः ।
यत्तदासीन्महद्युद्धं तत्र मे सारथिर्हतः ॥ ३ ॥

**उत्तर** म्हणाला:—"घोडे चालविण्याच्या विद्येंत कुशल कोणी सारथि जर मला मिळेल, तर मी आज आपलें भक्कम धनुष्य घेऊन गाईंच्या मागोमाग जाईन. परंतु जो माझा सारथि होईल, असा पुरुष माझ्या लक्षांत येत नाहीं. स्वारीवर निघतांना मला योग्य असा सारथि लवकर पहा. अठ्ठावीस दिवस किंवा वास्तविक एक महिना जें तें मोठें युद्ध झालें, त्यांत माझा सारथि मारला गेला (१-३)

स लभेयं यदा त्वन्यं हययानविदं नरम् ।
त्वरावानद्य यात्वाऽहं समुच्छ्रितमहाध्वजम् ॥ ४ ॥
विगाह्य तत्परानीकं गजवाजिरथाकुलम् ।
शस्त्रप्रतापनिर्वीर्यान्कुरूञ्जित्वाऽऽनये पशून् ॥ ५ ॥
दुर्योधनं शान्तनवं कर्णं वैकर्त्तनं कृपम् ।
द्रोणं च सह पुत्रेण महेष्वासान्समागतान् ॥ ६ ॥
वित्रासयित्वा संग्रामे दानवानिव वज्रभृत् ।
अनेनैव मुहूर्तेन पुनः प्रत्यानये पशून् ॥ ७ ॥
शून्यमासाद्य कुरवः प्रयान्त्यादाय गोधनम् ।
किन्तु शक्यं मया कर्तुं यदहं तत्र नाऽभवम् ॥ ८ ॥
पश्येयुरद्य मे वीर्यं कुरवस्ते समागताः ।
किं नु पार्थोऽर्जुनः साक्षादयमस्मान्प्रबाधते ॥ ९ ॥
वैशम्पायन उवाच—श्रुत्वा तदर्जुनो वाक्यं राज्ञः पुत्रस्य भाषतः ।
अतीतसमये काले प्रियां भार्यामनिन्दिताम् ॥ १० ॥

जर मला दुसरा एखादा ( चतुर ) अश्व चालविण्याच्या विद्येंत निपुण असा ( उत्तम ) सारथि मिळेल, तर मी ताबडतोब जाऊन, मोठमोठे ध्वज ज्यामध्यें फडकत आहेत अशा त्या शत्रूंच्या, हत्ती, घोडे, रथ, यांनीं भरलेल्या सैन्यांत घुसून माझ्या शस्त्रप्रतापानें हतवीर्य झालेल्या कौरवांस जिंकून गाई परत आणीन ( ४–५ ). दुर्योधन, भीष्म, सूर्यपुत्र कर्ण, कृप, पुत्रासहित द्रोण, ह्या जमलेल्या महाधनुर्धाऱ्यांना ( ६ ), ज्याप्रमाणें वज्रधारी इंद्र दानवांना सळो का पळो करून टाकतो, त्याप्रमाणें युद्धांत घाबरवून याच मुहूर्तांत (दोन घटकांच्या आंत) गाई पुनः परत आणीन (७). येथें कोणी नाहीं, असें पाहून कौरव गोधन हरण करीत आहेत; परंतु मी तेथें नव्हतों याला मीं काय करावें ? ( ८ ) ( असो, ) ते जमा झालेले सर्व कौरव आज माझा पराक्रम पाहतील. त्यांना असें वाटेल कीं, हा प्रत्यक्ष पृथेचा पुत्र अर्जुनच आम्हांस आडवीत आहे " (९).

**वैशंपायन** म्हणाला:— बढाई मारणाऱ्या राजाच्या पुत्राचें तें भाषण ऐकून, अर्जुनानें (कराराचा) काळ संपला असल्यानें आपली निर्दोष व प्रिय भार्या (१०),

द्रुपदस्य सुतां तन्वीं पाञ्चालीं पावकात्मजाम् ।
सत्यार्जवगुणोपेतां भर्तुः प्रियहिते रताम् ॥ ११ ॥
उवाच रहसि प्रीतः कृष्णां सर्वार्थकोविदः ।
उत्तरं ब्रूहि कल्याणि क्षिप्रं मद्वचनादिदम् ॥ १२ ॥
अयं वै पाण्डवस्याऽऽसीत्सारथिः सम्मतो दृढः ।
महायुद्धेषु संसिद्धः स ते यन्ता भविष्यति ॥ १३ ॥
वैशम्पायन उवाच—तस्य तद्वचनं स्त्रीषु भाषतश्च पुनः पुनः ।
न साऽमर्षत पाञ्चाली बीभत्सोः परिकीर्त्तनम् ॥ १४ ॥
अथैनमुपसङ्गम्य स्त्रीमध्यात्सा तपस्विनी ।
व्रीडमानेव शनकैरिदं वचनमब्रवीत् ॥ १५ ॥
योऽसौ बृहद्वारणाभो युवा सुप्रियदर्शनः ।
बृहन्नलेति विख्यातः पार्थस्याऽऽसीत्स सारथिः ॥ १६ ॥
धनुष्यनवरश्चाऽऽसीत्तस्य शिष्यो महात्मनः ।
दृष्टपूर्वो मया वीर चरन्त्या पाण्डवान्प्रति ॥ १७ ॥

द्रुपद राजाची अग्नीपासून उत्पन्न झालेली सुंदर कन्या, सत्य, सरलता इत्यादि गुणांनीं युक्त व भर्त्याचें प्रिय व हित करण्यांत रत पांचाली द्रौपदी हिला(११), (त्याला) सर्व विषयांचें ज्ञान असल्यानें आनंदानें एकीकडे म्हटलें:–"कल्याणि, माझ्या सांगण्यावरून तूं उत्तराला लवकर असें सांग कीं ( १२ ), 'हा अर्जुनाचा खंबीर व प्रिय सारथि होता. ह्याला मोठमोठ्या युद्धांतला अनुभव आहे; तो तुझा सारथि होईल' " ( १३ ).

**वैशंपायन** म्हणाला:— उत्तर त्या स्त्रियांमध्यें वारंवार अर्जुनाचें नांव काढून बडबड करीत असतां द्रौपदीला तें सहन झालें नाहीं ( १४ ). आतां ती तपस्विनी स्त्रियांतून उठून लाजत लाजत उत्तराला हळूहळू म्हणाली:– (१५) " हा जो गजेंद्रासारखा शोभणारा, प्रसन्न मुद्रा धारण करणारा व बृहन्नला नांवानें प्रसिद्ध असलेला तरुण आहे, तो पूर्वी अर्जुनाचा सारथि होता (१६). वीरा, तो धनुर्विद्येंत तर त्या महात्म्याचा पट्ट शिष्य होता, हें मी पूर्वी पांडवांकडे राहत असतांना पाहिलें आहे ( १७ ).

यदा तत्पावको दावमदहत्खाण्डवं महत् ।
अर्जुनस्य तदाऽनेन संगृहीता हयोत्तमाः ॥ १८ ॥
तेन सारथिना पार्थः सर्वभूतानि सर्वशः ।
अजयत्खाण्डवप्रस्थे न हि यन्ताऽस्ति तादृशः ॥ १९ ॥
उत्तर उवाच–सैरन्ध्रि जानासि तथा युवानं नपुंसको नैव भवेद्यथाऽसौ
अहं न शक्नोमि बृहन्नलां शुभे वक्तुं स्वयं यच्छ हयान्ममेति वै ॥२०॥
द्रौपद्युवाच— येयं कुमारी सुश्रोणी भगिनी ते यवीयसी ।
अस्याः सा वीर वचनं करिष्यति न संशयः ॥ २१ ॥
यदि वै सारथिः स स्यात्कुरून्सर्वान्न संशयः ।
जित्वा गाश्च समादाय ध्रुवमागमनं भवेत् ॥ २२ ॥
एवमुक्तः स सैरन्ध्र्या भगिनीं प्रत्यभाषत ।
गच्छ त्वमनवद्याङ्गि तामानय बृहन्नलाम् ॥ २३ ॥
सा भ्रात्रा प्रेषिता शीघ्रमगच्छन्नर्तनागृहम् ।
यत्रास्ते स महाबाहुश्छन्नः सत्रेण पाण्डवः ॥ २४ ॥

इति श्रीमहाभारते विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे
बृहन्नलासारथ्यकथने षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ३६ ॥

जेव्हां अग्नीनें तें खांडव वन जाळिलें, त्यावेळीं अर्जुनाचे घोडे हाच आवरीत होता (१८). ह्या सारथ्याच्या (साहाय्यानेंच) अर्जुनानें खांडवप्रस्थामधील सर्व प्राण्यांना रोखून धरिलें. याच्या तोडीचा दुसरा सारथीच नाहीं" ( १९ ).

**उत्तर** म्हणाला:—"सैरंध्री, तूं जाणत असशील कीं, तो तरुण पुरुष याच्यासारखा नपुंसक नसेल; ( तेव्हां ) माझे घोडे आवर असें, शुभे, बृहन्नलेला स्वतः माझ्यानें म्हणवत नाहीं" ( २० ).

**द्रौपदी** म्हणाली:—"जी ही सुंदरी कुमारी तुझी धाकटी बहीण उत्तरा आहे, हिचें सांगणें, वीरा, ती खात्रीनें मान्य करील ( २१ ). जर तो तुझा सारथि झाला तर सर्व कौरवांना निःसंशय जिंकून व गाई घेऊन तूं खात्रीनें येशील" (२२). असें सैरंध्रीचें भाषण ऐकून तो उत्तर बहिणीस म्हणाला:—"शुभांगी, जा, आणि त्या बृहन्नलेला घेऊन ये" ( २३ ). भावानें पाठवितांच, ती (उत्तरा) लागलीच, जेथें तो महाबाहु पांडव कपटानें गुप्तपणें राहिला होता, त्या नृत्यशाळेस गेली ( २४ ).

**याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर-गोग्रहणप्रसंगीं बृहन्नलेस सारथ्य करण्यास सांगण्याविषयीं ३६ वा अध्याय संपला.**

# अध्याय ३७

[ उत्तरेच्या आग्रहास्तव अर्जुन आपल्या वेषाची बतावणी करून उत्तराचें सारथ्य पतकरतो. ]

**वैशम्पायन उवाच—**

**सा प्राद्रवत्काञ्चनमाल्यधारिणी ज्येष्ठेन भ्रात्रा प्रहिता यशस्विनी ।**
**सुदक्षिणा वेदिविलग्नमध्या सा पद्मपत्राभनिभा शिखण्डिनी ॥१॥**
**तन्वी शुभाङ्गी मणिचित्रमेखला मत्स्यस्य राज्ञो दुहिता श्रिया वृता ।**
**तन्नर्तनागारमरालपक्ष्मा शतह्रदा मेघमिवाऽन्वपद्यत ॥ २ ॥**
**सा हस्तिहस्तोपमसंहितोरूः स्वनिन्दिता चारुदती सुमध्यमा ।**
**आसाद्य तं वै वरमाल्यधारिणी पार्थं शुभा नागवधूरिव द्विपम् ॥३॥**
**सा रत्नभूता मनसः प्रियाऽर्चिता सुता विराटस्य यथेन्द्रलक्ष्मीः ।**
**सुदर्शनीया प्रमुखे यशस्विनी प्रीत्याऽब्रवीदर्जुनमायतेक्षणा ॥ ४ ॥**

**वैशंपायन** म्हणाला:—ती सुवर्णपुष्पांच्या माळा (कंठामध्यें) धारण केलेली, (भावाला) अनुकूल, वेदीप्रमाणें कृशकटि, पद्मपत्राभ लक्ष्मीप्रमाणें कांतीची, ( डोक्यावर ) मयूरपिच्छाचा अलंकार घातलेली, भावानें पाठविलेली यशस्विनी धांवली (१). सडपातळ, सुंदर अवयवांची, रत्नजडित चित्रविचित्र कमरपट्टा घातलेली, कमानदार पापण्या असलेली, ऐश्वर्यानें वेष्टिलेली मत्स्यराजाची कन्या उत्तरा, त्या ( काळ्या ) नृत्यशाळेंत, मेघांत जशी वीज शिरते, तशी शिरली ( २ ). हत्तीच्या सोंडेप्रमाणें शोभणाऱ्या तिच्या मांड्या एकमेकींस लागलेल्या होत्या; तिच्या देहास कोठेंहि नांवें ठेवण्यास जागा नव्हती, तिची दंतपंक्ति मनोहर होती, व तिचा कटिमध्य भाग सुंदर होता; अशी ती सुंदर माळा धारण करणारी सुंदरी, अर्जुनाकडे, हत्तीण हत्तीकडे जाते त्याप्रमाणें पोंचून ( ३ ), नंतर ती रत्नासारखी, मनाला प्रिय व पूज्य होणारी, विराटाची कन्या, इन्द्रलक्ष्मीसारखी, अतिसुंदर, यशस्विनी, दीर्घनयना उत्तरा समोर (उभी राहून ) अर्जुनास प्रीतिपूर्वक म्हणाली (४). ( तिला पहातांच, जिच्या पुष्ट )

---

१ पद्मपत्रेषु आभाति लक्ष्मीः तद्वत् निभा दीप्तिर्यस्याः ( नी. )

सुसंहतोरुं कनकोज्ज्वलत्वचं पार्थः कुमारीं स तदाऽभ्यभाषत ।
किमागमः काञ्चनमाल्यधारिणि मृगाक्षि किं त्वं त्वरितेव भामिनि ।
किं ते मुखं सुन्दरि न प्रसन्नमाचक्ष्व तत्त्वं मम शीघ्रमङ्गने ॥ ५ ॥
वैशम्पायन उवाच—स तां दृष्ट्वा विशालाक्षीं राजपुत्रीं सखीं सखा ।
प्रहसन्नब्रवीद्राजन्किमागमनमित्युत ॥ ६ ॥
तमब्रवीद्राजपुत्री समुपेत्य नरर्षभम् ।
प्रणयं भावयन्ती सा सखीमध्य इदं वचः ॥ ७ ॥
गावो राष्ट्रस्य कुरुभिः काल्यन्ते नो बृहन्नले ।
ता विजेतुं मम भ्राता प्रयास्यति धनुर्धरः ॥ ८ ॥
नाऽचिरं निहतस्तस्य संग्रामे रथसारथिः ।
तेन नास्ति समः सूतो योऽस्य सारथ्यमाचरेत् ॥ ९ ॥
तस्मै प्रयतमानाय सारथ्यर्थं बृहन्नले ।
आचचक्षे हयज्ञाने सैरन्ध्री कौशलं तव ॥ १० ॥

मांड्या एकमेकीस लागलेल्या आहेत, अशा त्या सोन्यासारख्या तेजस्वी कान्तीच्या कुमारिकेस अर्जुन (अगोदर) म्हणालाः—“ सोन्याच्या माळा धारण करणाऱ्या मृगनयने कां येणें झालें ? भामिनी, तूं अशा [illegible] कां ? तुझें मुख सुंदरी, टवटवीत कां नाहीं ? सुंदरी, मला सत्य लवकर सांग” (५).

**वैशंपायन** म्हणालाः—त्या विशालनयना सखी राजपुत्रीस पाहून, सखा अर्जुन हंसत हंसत ‘ कां बरं आलीस ? ’ असें (प्रथम) म्हणाला ( ६ ); तेव्हां ती (उत्तरा) त्या नरश्रेष्ठाच्या अगदीं जवळ जाऊन प्रेम दाखवीत मैत्रिणींच्या मध्यें त्यास म्हणालीः—( ७ ) “ बृहन्नले, आपल्या राष्ट्राच्या गाई कौरवांनीं पळविल्या आहेत; त्या जिंकून परत आणण्यासाठीं माझा भाऊ धनुष्य घेऊन जाणार आहे ( ८ ). त्याचा सारथि नुकताच युद्धामध्यें मारला गेला. (तेव्हां) त्याची बरोबरी करणारा सारथि नाहीं, जो याचें सारथ्य करील ( ९ ). सारथ्याकरितां तो ( उत्तर ) शोध करीत असतां, सैरध्रीनें मला असें सांगितलें कीं, तूं (बृहन्नला) हयज्ञानांत (घोड्यांचें सारथ्य करण्यांत) कुशल आहेस (१०).

अर्जुनस्य किलाऽऽसीस्त्वं सारथिर्दयितः पुरा ।
त्वयाऽजयत्सहायेन पृथिवीं पाण्डवर्षभः ॥ ११ ॥
सा सारथ्यं मम भ्रातुः कुरु साधु बृहन्नले ।
पुरा[1] दूरतरं गावो ह्रियन्ते कुरुभिर्हि नः ॥ १२ ॥
अथैतद्वचनं मेऽद्य नियुक्ता न करिष्यसि ।
प्रणयादुच्यमाना त्वं परित्यक्ष्यामि जीवितम् ॥ १३ ॥
एवमुक्तस्तु सुश्रोण्या तया सख्या परन्तपः ।
जगाम राजपुत्रस्य सकाशममितौजसः ॥ १४ ॥
तमाव्रजन्तं त्वरितं प्रभिन्नमिव कुञ्जरम्[2] ।
अन्वगच्छद्विशालाक्षी शिशुं गजवधूरिव ॥ १५ ॥
दूरादेव तु तां प्रेक्ष्य राजपुत्रोऽभ्यभाषत ।
त्वया सारथिना पार्थः खाण्डवेऽग्निमतर्पयत् ॥ १६ ॥

खरोखर तूं पूर्वी अर्जुनाचा मोठा आवडता सारथि होतीस. तुझ्या साहाय्यानें त्या पांडवश्रेष्ठानें पृथ्वी जिंकिली ( ११ ). तेव्हां बृहन्नले, (आज) तूं माझ्या बंधूचें सारथ्य कर. कौरव आमच्या गाई खरोखर फार दूर नेतील ( १२ ). आज मोठ्या प्रेमानें मी तुला हें काम सांगत आहें; जर तें तूं न करशील, तर मी प्राणत्याग करीन " ( १३ ). असें सुंदरी सखी उत्तरा बोलतांच, शत्रुतापन अर्जुन अमित तेजाच्या राजपुत्राकडे गेला ( १४ ). ती विशालनयना उत्तराहि, जशी हत्तीण आपल्या छाव्यामागून जाते तशी, त्या मत्त कुंजरासारख्या घाईनें चाललेल्या त्याच्या मागून गेली ( १५ ). त्या बृहन्नलेला दुरूनच पाहून राजपुत्र उत्तर म्हणाला:— " तुला सारथि करून अर्जुनानें खांडववनांत अग्नीला संतुष्ट केलें ( १६ ),

१ ' पुरा ' याचा अर्थ ' पूर्वी ' असा येथें नाहीं. " पुरानिपातयोर्लट् " वर्तमानकालीं प्रयोग असून ' पुरा ह्रियन्ते ' याचा अर्थ भविष्यकाळीं ' नेतील ' असा होतो.

२ ' प्रभिन्नमिव कुंजरं ' याचा संबंध ' आव्रजन्तं ' कडे घेतला पाहिजे. अर्जुनाचें चालणें मत्तगजासारखें होतें. उत्तरा गजवधू शिशूमागें धावली.

पृथिवीमजयत्कृत्स्नां कुन्तीपुत्रो धनञ्जयः ।
सैरन्ध्री त्वां समाचष्टे सा हि जानाति पाण्डवान् ॥ १७ ॥
संयच्छ मामकानश्वांस्तथैव त्वं बृहन्नले ।
कुरुभिर्योत्स्यमानस्य गोधनानि परीप्सतः ॥ १८ ॥
अर्जुनस्य किलाऽऽसीस्त्वं सारथिर्दयितः पुरा ।
त्वयाऽजयत्सहायेन पृथिवीं पाण्डवर्षभः ॥ १९ ॥
एवमुक्ता प्रत्युवाच राजपुत्रं बृहन्नला ।
का शक्तिर्मम सारथ्यं कर्तुं संग्राममूर्धनि ॥ २० ॥
गीतं वा यदि वा नृत्यं वादित्रं वा पृथग्विधम् ।
तत्करिष्यामि भद्रं ते सारथ्यं तु कुतो मम ॥ २१ ॥
उत्तर उवाच—बृहन्नले [1]गायनो वा नर्त्तनो वा पुनर्भव ।
क्षिप्रं मे रथमास्थाय निगृह्णीष्व हयोत्तमान् ॥ २२ ॥
वैशम्पायन उवाच— स तत्र नर्मसंयुक्तमकरोत्पाण्डवो बहु ।
उत्तरायाः प्रमुखतः सर्वं जानन्नरिंदमः ॥ २३ ॥

आणि त्या कुंतीपुत्र धनंजयानें सर्व पृथ्वी जिंकिली, असें तुझ्या संबंधानें सैरंध्री सांगते. कारण ती पांडवांस ओळखते ( १७ ). बृहन्नले, गाई परत आणण्याच्या इच्छेनें मी कौरवांशीं जें युद्ध करणार त्यांत तूं माझे घोडे आवर (१८). पूर्वी तूं अर्जुनाचा प्रिय सारथि होतीसच, व तुझ्याच साहाय्यानें त्या पांडवश्रेष्ठानें पृथ्वी जिंकिली " ( १९ ). ( राजपुत्र उत्तरानें ) असें म्हटल्यावर बृहन्नला राजपुत्रास म्हणाली:—" युद्धाच्या ऐनभरांत सारथ्य करण्यास लागणारी शक्ति माझ्या अंगीं कोठची ? ( २० ) गाणें, नाचणें व बजावणें हें मी नानाप्रकारचें करीन;—तुझें कल्याण असो;—पण सारथ्य माझ्या अंगीं कोठून येणार ?" ( २१ ).

उत्तर म्हणाला:—" बृहन्नले, तूं गाणारी अस किंवा नाचणारी अस. लवकर माझ्या रथावर बसून ( माझ्या ) उत्तम घोड्यांस धर " ( २२ ).

वैशंपायन म्हणाला:— त्यावेळीं त्या पांडुपुत्र शत्रुदमन अर्जुनानें सर्व जाणत असूनहि उत्तरेच्या समोर पुष्कळ विनोदाचे प्रकार केले ( २३ ).

१ गायनः = गायकः

ऊर्ध्वमुत्क्षिप्य कवचं शरीरे प्रत्यमुञ्चत ।
कुमार्यस्तत्र तं दृष्ट्वा प्राहसन्पृथुलोचनाः ॥ २४ ॥

स तु दृष्ट्वा विमुह्यन्तं स्वयमेवोत्तरस्ततः ।
कवचेन महार्हेण समनह्यद्बृहन्नलाम् ॥ २५ ॥

स बिभ्रत्कवचं चाऽग्र्यं स्वयमप्यंशुमत्प्रभम् ।
ध्वजं च सिंहमुच्छ्रित्य सारथ्ये समकल्पयत् ॥ २६ ॥

धनूंषि च महार्हाणि बाणांश्च रुचिरान्बहून् ।
आदाय प्रययौ वीरः स बृहन्नलसारथिः ॥ २७ ॥

अथोत्तरा च कन्याश्च सख्यस्तामब्रुवंस्तदा ।
बृहन्नले आनयेथा वासांसि रुचिराणि च ॥ २८ ॥

पाञ्चालिकार्थं चित्राणि सूक्ष्माणि च मृदूनि च ।
विजित्य संग्रामगतान्भीष्मद्रोणमुखान्कुरून् ॥ २९ ॥

एवं ता ब्रुवतीः कन्याः सहिताः पाण्डुनन्दनः ।
प्रत्युवाच हसन्पार्थो मेघदुन्दुभिनिस्स्वनः ॥ ३० ॥

त्यानें चिलखत उलटें उभें धरून अंगावर चढविलें, तेव्हां त्याला पाहून विशाल-नेत्रांच्या कुमारिका हंसूं लागल्या ( २४ ). त्याला गोंधळून गेलेला पाहून स्वतः च उत्तरानें नंतर तें मूल्यवान् चिलखत बृहन्नलेच्या अंगावर चढविलें (२५). आणि आपणहि सूर्यासारखें देदीप्यमान श्रेष्ठ कवच चढवून, सिंहध्वज उभारून सारथ्याचे जागीं त्यास बसविलें ( २६ ). मोठमोठ्या मोलाचीं धनुष्यें आणि पुष्कळ सुंदर बाण घेऊन तो वीर बृहन्नलासारथ्यासह निघाला ( २७ ). आतां उत्तरा व तिच्या मैत्रिणी मुली बृहन्नलेला म्हणाल्या:—"बृहन्नले, सुंदर सुंदर वस्त्रें आण बरें ! ( २८ ). युद्धामध्यें भीष्म, द्रोण आदिकरून कौरवांस जिंकल्यावर आमच्या बाहुल्यांसाठीं ( त्यांचीं ) चित्रविचित्र बारीक व मृदु अशीं वस्त्रें घेऊन ये " ( २९ ). असें त्या मुली जमून बोलत असतां मेघासारख्या किंवा दुंदुभीसारख्या आवाजाच्या पांडुनंदन पृथापुत्र अर्जुनानें त्यांना हंसत हंसत उत्तर केलें ( ३० ).

बृहन्नलोवाच— यद्युत्तरोऽयं संग्रामे विजेष्यति महारथान् ।
अथाऽऽहरिष्ये वासांसि दिव्यानि रुचिराणि च ॥ ३१ ॥
वैशम्पायन उवाच— एवमुक्त्वा तु बीभत्सुस्ततः प्राचोदयद्धयान् ।
कुरूनभिमुखः शूरो नानाध्वजपताकिनः ॥ ३२ ॥
तमुत्तरं वीक्ष्य रथोत्तमे स्थितं बृहन्नलायाः सहितं महाभुजम् ।
स्त्रियश्च कन्याश्च द्विजाश्च सुव्रताः प्रदक्षिणं चक्रुरथोचुरंगनाः ॥३३॥
यदर्जुनस्यर्षभतुल्यगामिनः पुराऽभवत्खाण्डवदाहमङ्गलम् ।
कुरून्समासाद्य रणे बृहन्नले सहोत्तरेणाऽद्य तदस्तु मङ्गलम् ॥ ३४ ॥
[ ११८३

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे उत्तरनिर्याणे नाम सप्तत्रिंशोऽध्यायः ॥ ३७ ॥

**बृहन्नला** म्हणाली:—"जर हा राजपुत्र उत्तर युद्धांत महारथ्यांस जिंकील, तर मी (त्यांचीं) दिव्य व सुंदर वस्त्रें हरण करून आणीन" (३१).

**वैशंपायन** म्हणाला:—ह्याप्रमाणें बोलून, नानाप्रकारच्या ध्वजपताका फडकत असलेल्या त्या कौरवसैन्याकडे शूर अर्जुनानें घोडे हांकले (३२). बृहन्नलेसह तो महाबाहु उत्तर उत्तम, रथावर बसलेला पाहून, स्त्रिया, कुमारिका व सुव्रत ब्राह्मण यांनीं त्यास प्रदक्षिणा घातली व नंतर स्त्रियांनीं म्हटलें:—(३३) "जशी ऋषभासारख्या गतीच्या अर्जुनाला पूर्वी खांडवदाहाच्या वेळीं मंगलश्री मिळाली, तशीच कुरूंशीं रणांत गांठ पडल्यावर, बृहन्नले, उत्तरासह तुला आज मंगलश्री मिळो" (३४).

याप्रमाणें महाभारतांत विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणासाठीं उत्तराच्या बाहेर पडण्याविषयीं ३७ वा अध्याय संपला.

---





बृहन्नला म्हणते—मी शत्रूंशीं लढतों, तूं माझे घोडे आवर.

## अध्याय ३८

[ कौरवांचें प्रचंड सैन्य पाहून विराटपुत्र उत्तर भीतीनें पळूं लागतो, अर्जुन त्यास पकडून रथावर बसवितो. ]

---

वैशम्पायन उवाच— स राजधान्या निर्याय वैराटिरकुतोभयः ।
प्रयाहीत्यब्रवीत्सूतं यत्र ते कुरवो गताः ॥ १ ॥
समवेतान् कुरून्सर्वाञ्जिगीषूनवजित्य च ।
गास्तेषां क्षिप्रमादाय पुनरेष्याम्यहं पुरम् ॥ २ ॥
ततस्तांश्चोदयामास सदश्वान्पाण्डुनन्दनः ।
ते हया नरसिंहेन नोदिता वातरंहसः ।
आलिखन्त इवाऽऽकाशमूहुः काञ्चनमालिनः ॥ ३ ॥
नाऽतिदूरमथो गत्वा मत्स्यपुत्रधनञ्जयौ ।
अवेक्षेतामामित्रघ्नौ कुरूणां बलिनां बलम् ॥ ४ ॥
श्मशानमभितो गत्वा आससाद कुरूनथ ।
तां शमीमन्ववीक्षेतां व्यूढानीकांश्च सर्वशः ॥ ५ ॥
तदनीकं महत्तेषां विबभौ सागरोपमम् ।
सर्पमाणमिवाऽऽकाशे वनं बहुलपादपम् ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—तो निर्भय विराटपुत्र उत्तर, राजधानींतून बाहेर पडल्यावर सारथ्यास म्हणाला:—" जिकडे ते कौरव गेले आहेत तिकडे चल ( १ ). एकत्र जमलेल्या सर्व विजिगीषु कौरवांना उलट जिंकून, त्यांपासून मी गाई लवकर सोडवून घेऊन पुनः नगरास परत जाईन "( २ ). नंतर अर्जुनानें ते उत्तम घोडे हाकले. ते सुवर्णाचे हार घातलेले वायुवेगाचे घोडे, त्या नरकेसरीनें हाकल्याबरोबर जणूं आकाश विदारीत ( रथास ) वाहूं लागले ( ३ ). नंतर फार दूरवर गेले नाहीं तोंच, त्या शत्रुनाशकांनीं बलिष्ठ कौरवांचें सैन्य पाहिलें (४). स्मशानभूमीजवळ जाऊन त्यांनीं कौरवांस गांठलें, व तो शमीवृक्ष आणि तें व्यूह बांधलेलें सैन्य त्यांच्या दृष्टीस पडलें ( ५ ). त्यांचें तें सागरासारखें अफाट सैन्य, अनेक वृक्षांनीं भरलेलें ( जणुं काय ) वनच आकाशांत चालत असावें त्याप्रमाणें दिसलें ( ६ ).

ददृशे पार्थिवो रेणुर्जनितस्तेन सर्पता ।
दृष्टिप्रणाशो भूतानां दिवस्पृक्कुरुसत्तम ॥ ७ ॥
तदनीकं महद्दृष्ट्वा गजाश्वरथसङ्कुलम् ।
कर्णदुर्योधनकृपैर्गुप्तं शान्तनवेन च ॥ ८ ॥
द्रोणेन च सपुत्रेण महेष्वासेन धीमता ।
हृष्टरोमा भयोद्विग्नः पार्थं वैराटिरब्रवीत् ॥ ९ ॥
उत्तर उवाच— नोत्सहे कुरुभिर्योद्धुं रोमहर्षं हि पश्य मे ।
बहुप्रवीरमत्युग्रं देवैरपि दुरासदम् ॥ १० ॥
प्रतियोद्धुं न शक्ष्यामि कुरुसैन्यमनन्तकम् ।
नाऽऽशंसे भारतीं सेनां प्रवेष्टुं भीमकार्मुकाम् ॥ ११ ॥
रथनागाश्वकलिलां पत्तिध्वजसमाकुलाम् ।
दृष्ट्वैव हि परानाजौ मनः प्रव्यथतीव मे ॥ १२ ॥
यत्र द्रोणश्च भीष्मश्च कृपः कर्णो विविंशतिः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सोमदत्तश्च बाल्हिकः ॥ १३ ॥

कुरुश्रेष्ठा जनमेजया, त्याच्या हालचालीनें धूळ इतकी उडाली होती कीं, तिनें सर्व अंतराळ भरून जाऊन सर्व प्राणी अंध बनले ( ७ ). तें मोठें सैन्य गज, अश्व, रथ यांची गर्दी असलेलें, आणि कर्ण, दुर्योधन, कृप व भीष्म ( ८ ), तसेंच महाधनुर्धर बुद्धिमान् द्रोण व त्याचा पुत्र ( अश्वत्थामा ), ह्याच्या नेतृत्वाखालीं असलेलें पाहून विराटपुत्र उत्तराच्या अंगावर रोमांच उभे राहिले, व तो भयभीत होऊन अर्जुनास म्हणालाः–(९)

उत्तर म्हणालाः— " कौरवांशीं युद्ध करण्याची माझ्या अंगीं धमक नाहीं. माझा हा रोमांच पहा. ह्या सैन्यांत मोठमोठे वीर आहेत; हें सैन्य भयंकर आहे, देवांनासुद्धां हें जिंकितां येणार नाहीं ( १० ). कौरवांच्या ह्या अफाट सैन्याशीं लढण्यास मी अगदीं असमर्थ आहें. भयंकर धनुष्यें घेतलेल्या ह्या भारतीसेनेंत शिरण्याची माझी इच्छा नाहीं ( ११ ). रथ, गज, अश्व व पायदळ आणि ध्वज यांनीं ही सेना गजबजून गेली आहे. शत्रूंना रणांगणांत पाहूनच माझ्या मनाची गाळण उडाली आहे ( १२ ). ह्या ( अफाट ) सेनेंत द्रोण, भीष्म, कृप, कर्ण, विविंशति, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त व बाल्हीक (१३),

दुर्योधनस्तथा वीरो राजा च रथिनां वरः ।
द्युतिमन्तो महेष्वासाः सर्वे युद्धविशारदाः ॥ १४ ॥
दृष्ट्वैव हि कुरूनेतान् व्यूढानीकान् प्रहारिणः ।
हृषितानि च रोमाणि कश्मलं चाऽऽगतं मम ॥ १५ ॥
वैशम्पायन उवाच—अविजातो विजातस्य मौर्ख्याद्धूर्तस्य पश्यतः ।
परिदेवयते मन्दः सकाशे सव्यसाचिनः ॥ १६ ॥
त्रिगर्तान् मे पिता यातः शून्ये सम्प्रणिधाय माम् ।
सर्वां सेनामुपादाय न मे सन्तीह सैनिकाः ॥ १७ ॥
सोऽहमेको बहून्बालः कृतास्त्रानकृतश्रमः ।
प्रतियोद्धुं न शक्ष्यामि निवर्त्तस्व बृहन्नले ॥ १८ ॥
बृहन्नलोवाच—भयेन दीनरूपोऽसि द्विषतां हर्षवर्धनः ।
न च तावत्कृतं कर्म परैः किञ्चिद्रणाजिरे ॥ १९ ॥
स्वयमेव च मामात्थ वह मां कौरवान्प्रति ।
सोऽहं त्वां तत्र नेष्यामि यत्रैते बहुला ध्वजाः ॥ २० ॥

त्याचप्रमाणें महारथी वीर दुर्योधनराजा, हे सर्वजण तेजस्वी, महाधनुर्धर युद्धकुशल वीर आहेत ( १४ ). ज्यांनीं आपापलीं पथकें प्रहार करण्यासाठीं सज्ज केलीं आहेत, त्या ह्या कौरवांना पाहतांच माझे अंगावर रोमांच उभे राहिले आहेत आणि मला अंधेरी आली आहे" ( १५ ). वैशंपायन सांगतात,—(असें बोलून) तो प्राकृत (साधारण बुद्धीचा) उत्तर, असाधारण व धूर्त (कपटवेष घेतलेल्या) अर्जुनासमोर मूर्खपणानें रडूं लागला ( १६ ). तो म्हणाला:—"माझा बाप येथें मला एकटा ठेवून त्रिगर्तांकडे गेला. त्यानें बरोबर सर्व सैन्य नेलें. मला येथें कोणी सैनिक नाहींत (१७). अशा स्थितींत मी लहान, युद्धाविषयीं अनभ्यस्त व एकटा ह्या असंख्य शस्त्रास्त्रप्रवीण कौरवांशीं लढूं शकणार नाहीं. बृहन्नले, मागें फिर." ( १८ ). बृहन्नला म्हणाली:—"तूं भयानें दीनासारखा दिसूं लागलास हें पाहून शत्रूंचा हर्ष वाढेल. अजून रणांगणावर शत्रूंनीं कोणतेंच कर्म केलें नाहीं ( १९ ). स्वतःच मला म्हणालास 'मला कौरवांकडे ने.' तेव्हां जिकडे हे पुष्कळ ध्वज फडकत आहेत, तिकडेच

१ 'अविजातः'-येथें 'अवियातः' असा प्राचांचा पाठ (नी.) देतो. वियात=धृष्ट ( अमर ). विजात=विलक्षण, व अविजात=प्राकृत ( नी. ). शब्दकल्प.

मध्यमामिषगृध्राणां कुरूणामाततायिनाम् ।
नेष्यामि त्वां महाबाहो पृथिव्यामपि युध्यताम् ॥ २१ ॥
तथा स्त्रीषु प्रतिश्रुत्य पौरुषं पुरुषेषु च ।
कत्थमानोऽभिनिर्याय किमर्थं न युयुत्ससे ॥ २२ ॥
न चेद्विजित्य गास्तास्त्वं गृहान्वै प्रतियास्यसि ।
प्रहसिष्यन्ति वीरास्त्वां नरा नार्यश्च सङ्गताः ॥ २३ ॥
अहमप्यत्र सैरन्ध्र्या ख्याता सारथ्यकर्मणि ।
न च शक्ष्याम्यनिर्जित्य गाः प्रयातुं पुरं प्रति ॥ २४ ॥
स्तोत्रेण चैव सैरन्ध्र्यास्तव वाक्येन तेन च ।
कथं न युध्येयमहं कुरून्सर्वान्स्थिरो भव ॥ २५ ॥

उत्तर उवाच—

कामं हरन्तु मत्स्यानां भूयांसः कुरवो धनम् ।
प्रहसन्तु च मां नार्यो नरा वाऽपि बृहन्नले ॥ २६ ॥

मी तुला नेतों (२०). महाबाहो, मांसावर उड्या टाकणाऱ्या गिधाडांप्रमाणें पृथ्वीवरच लढणाऱ्या आततायी कौरवांच्या मध्यें तुला मी घेऊन जातों (२१). स्त्रियांमध्यें व पुरुषांमध्यें त्याप्रमाणें वचन देऊन, बढाई मारीत बाहेर पडलास, व आतां तूं युद्ध कां करूं इच्छित नाहींस? (२२) त्या गाई जिंकल्यावांचून जर तूं घराला परत गेलास, तर वीरपुरुष व स्त्रिया एकत्र जमून तुला हंसतील (२३). माझीहि या सारथ्यकर्माविषयीं सैरंध्रीनें वाखाणणी केली आहे; तेव्हां मलाहि गाई परत मिळविल्याशिवाय नगरास परत जातां येत नाहीं (२४). सैरंध्रीनें केलेल्या स्तुतिपाठामुळें व तुझ्या त्या भाषणामुळें, मी, सर्व कौरवांशीं युद्ध कसें करणार नाहीं? (अर्थात् करणारच.) तूं स्वस्थ हो" (२५).

उत्तर म्हणाला:—"बृहन्नले, ह्या असंख्य कौरवांना मत्स्य देशांतील संपत्ति खुशाल लुटूं दे आणि बायका किंवा पुरुष मला खुशाल हसूं देत (२६).

---

१ पृथिव्यां निमित्तभूतायां (नी.) हा अर्थ बरा दिसत नाहीं. रंध्राच्या विरुद्ध पृथिवी.

संग्रामे न च कार्यं मे गावो गच्छन्तु चापि मे ।
शून्यं मे नगरं चापि पितुश्चैव बिभेम्यहम् ॥ २७ ॥

वैशम्पायन उवाच—इत्युक्त्वा प्राद्रवद्भीतो रथात्प्रस्कन्द्य कुण्डली ।
त्यक्त्वा मानं च दर्पं च विसृज्य सशरं धनुः ॥ २८ ॥

बृहन्नलोवाच— नैष शूरैः स्मृतो धर्मः क्षत्रियस्य पलायनम् ।
श्रेयस्तु मरणं युद्धे न भीतस्य पलायनम् ॥ २९ ॥

वैशम्पायन उवाच— एवमुक्त्वा तु कौन्तेयः सोऽवप्लुत्य रथोत्तमात् ।
तमन्वधावद्धावन्तं राजपुत्रं धनञ्जयः ॥ ३० ॥

दीर्घां वेणीं विधुन्वानः साधु रक्ते च वाससी ।
विधूय वेणीं धावन्तमजानन्तोऽर्जुनं तदा ॥ ३१ ॥

सैनिकाः प्राहसन्केचित्तथारूपमवेक्ष्य तम् ।
तं शीघ्रमभिधावन्तं सम्प्रेक्ष्य कुरवोऽब्रुवन् ॥ ३२ ॥

मला आतां युद्धाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. माझ्या गाई गेल्या तरी हरकत नाहीं. ( सध्यां ) माझ्या नगरांत कोणी नाहीं, आणि पित्याचीहि मला भीति वाटते " ( २७ ).

**वैशंपायन** म्हणाला:—असें म्हणून तो कुंडलें धारण करणारा उत्तर आपला अभिमान व गर्व टाकून आणि सशर धनुष्यहि फेंकून देऊन रथांतून खालीं उडी टाकून भीतीनें पळूं लागला ( २८ ).

**बृहन्नला** म्हणाली:—" पळून जाणें हा क्षत्रियाचा धर्म शूरांना मान्य नाहीं. युद्धांत मरणेंहि श्रेयस्कर आहे; भिऊन पळणें श्रेयस्कर नाहीं " (२९). असें बोलून, तो कुंतीपुत्र अर्जुन त्या श्रेष्ठ रथांतून खालीं उडी टाकून त्या पळणाऱ्या राजपुत्राच्या मागून धावला ( ३० ). आपली लांब वेणी व लाल वस्त्रें हालवीत तो जोरानें धावत असतां, कौरवांकडील वीरांना, तो वेणी हालवीत धावणारा मनुष्य अर्जुन आहे असें माहित नसल्यानें ( ३१ ), तशा ( चमत्कारिक ) स्वरूपाच्या त्या सारथ्यास पाहून कित्येक सैनिक हंसूं लागले. तो (बृहन्नला) त्वरेनें पळत असतां त्यास पाहून कौरव म्हणाले:— ( ३२ ).

क एष वेषसंच्छन्नो भस्मन्येव हुताशनः ।
किञ्चिदस्य यथा पुंसः किञ्चिदस्य यथा स्त्रियः ॥ ३३ ॥
सारूप्यमर्जुनस्येव क्लीबरूपं बिभर्ति च ।
तदेवैतच्छिरोग्रीवं तौ बाहू परिघोपमौ ।
तद्वदेवाऽस्य विक्रान्तं नाऽयमन्यो धनंजयात् ॥ ३४ ॥
अमरेष्विव देवेन्द्रो मानुषेषु धनञ्जयः ।
एकः कोऽस्मानुपायायादन्यो लोके धनंजयात् ॥ ३५ ॥
एकः पुत्रो विराटस्य शून्ये सन्निहितः पुरे ।
स एष किल निर्यातो बालभावान्न पौरुषात् ॥ ३६ ॥
सत्रेण नूनं छन्नं हि चरन्तं पार्थमर्जुनम् ।
उत्तरः सारथिं कृत्वा निर्यातो नगराद्बहिः ॥ ३७ ॥
स नो मन्यामहे दृष्ट्वा भीत एष पलायते ।
तं नूनमेष धावन्तं जिघृक्षति धनञ्जयः ॥ ३८ ॥
वैशम्पायन उवाच—इति स्म कुरवः सर्वे विमृशन्तः पृथक्पृथक् ।
न च व्यवसितुं किञ्चिदुत्तरं शक्नुवन्ति ते ॥
छन्नं तथा तं सत्रेण पाण्डवं प्रेक्ष्य भारत ॥ ३९ ॥

" राखेंत झांकलेल्या अग्नीप्रमाणें, आपलें खरें स्वरूप वेषांतरानें गूढ ठेवणारा हा कोण असावा ? ह्याचें रूप कांहींसें पुरुषाप्रमाणें व कांहींसें स्त्रीप्रमाणें दिसत आहे ( ३३ ). ह्याचें अर्जुनाशीं अगदीं सादृश्य आहे, आणि नपुंसकाचें रूप तर घेतलें आहे ! (खरोखर) तेंच हें मस्तक, तीच मान, तेच परिघतुल्य दण्ड, त्याच्यासारखीच ह्याची चालण्याची ढब. हा अर्जुनाशिवाय दुसरा नाहीं ( ३४ ). देवांमध्यें जसा देवेंद्र तसा मनुष्यांमध्यें अर्जुन. आमच्याशीं युद्ध करण्यास अर्जुनाशिवाय दुसरा कोण एकटा ह्या लोकीं येऊं शकेल ? (३५) विराटाच्या शून्य नगरांत हल्लीं एकच विराटाचा पुत्र असल्यानें तो हा खरोखर, शौर्यामुळें नव्हे, तर पोरपणामुळें बाहेर पडला आहे (३६). कपटवेषानें दिवस घालवीत राहिलेल्या पार्थ अर्जुनास सारथि करून हा उत्तर नगराबाहेर आला आहे ( ३७ ). आम्हांला असेंहि वाटतें कीं, तो आम्हांला भिऊन आतां पळत सुटला आहे, व त्याला पळतांना बहुधा हा अर्जुन धरूं इच्छित आहे " ( ३८ ).

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें सर्वच कौरव वेगवेगळे तर्क करूं लागले. आणि कपटानें रूप झांकलेल्या अर्जुनास पाहून, भारता जनमेजया, निश्चित

उत्तरं तु प्रधावन्तमभिद्रुत्य धनञ्जयः ।
गत्वा पदशतं तूर्णं केशपक्षे परामृशत् ॥ ४० ॥
सोऽर्जुनेन परामृष्टः पर्यदेवयदार्त्तवत् ।
बहुलं कृपणं चैव विराटस्य सुतस्तदा ॥ ४१ ॥
उत्तर उवाच—शृणुयास्त्वं हि कल्याणि बृहन्नले सुमध्यमे ।
निवर्त्तय रथं क्षिप्रं जीवन्भद्राणि पश्यति ॥ ४२ ॥
शातकुम्भस्य शुद्धस्य शतं निष्कान्ददामि ते ।
मणीनष्टौ च वैदूर्यान्हेमबद्धान्महाप्रभान् ॥ ४३ ॥
हेमदण्डप्रतिच्छन्नं रथं युक्तं च सुव्रतैः ।
मत्तांश्च दश मातङ्गान्मुञ्च मां त्वं बृहन्नले ॥ ४४ ॥
वैशम्पायन उवाच— एवमादीनि वाक्यानि विलपन्तमचेतसम् ।
प्रहस्य पुरुषव्याघ्रो रथस्याऽन्तिकमानयत् ॥ ४५ ॥
अथैनमब्रवीत्पार्थो भयार्त्तं नष्टचेतसम् ।
यदि नोत्सहसे योद्धुं शत्रुभिः शत्रुकर्षण ॥
एहि मे त्वं हयान्यच्छ युध्यमानस्य शत्रुभिः ॥ ४६ ॥

उत्तर कोणास देतां येईना ( ३९ ). इकडे उत्तर पळत असतां त्याच्या मागोमाग शंभर पावलें जाऊन अर्जुनानें त्याचे केंस धरले ( ४० ). अर्जुनानें त्यास धरतांच तो विराटाचा पुत्र दीनासारखा दुबळेपणानें मोठ्यानें विलाप करूं लागला ( ४१ ).

**उत्तर** म्हणाला:—"कल्याणि बृहन्नले सुंदरी, माझें ऐक; रथ लवकर मागें फिरव. जिवंत राहिलेलाच ( पुढें ) वैभव पाहतो ( ४२ ). मी तुला शुद्ध सुवर्णाच्या शंभर मोहरा देईन, अत्यंत तेजस्वी सुवर्णखचित आठ वैदूर्य रत्नें अर्पण करीन ( ४३ ); आणि सुवर्णमंडित दण्डाचा व उत्तम ( घोडे ) जोडलेला रथ आणि दहा मस्त हत्तीहि देईन. बृहन्नले, तूं मला सोड" ( ४४ ).

**वैशंपायन** म्हणाला:—अशा प्रकारचीं वाक्यें बडबडणाऱ्या व घाबरलेल्या उत्तरास पाहून अर्जुनास हंसूं आलें. त्या नरश्रेष्ठानें त्यास (ओढीत) रथाजवळ आणिलें ( ४५ ), आणि त्या घाबरून बेसावध झालेल्या उत्तराला अर्जुन म्हणाला:—"शत्रुनाशना, शत्रूंशीं युद्ध करण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं जर नसेल,

प्रयाह्येतद्रथानीकं मद्बाहुबलरक्षितः ।
अप्रधृष्यतमं घोरं गुप्तं वीरैर्महारथैः ॥ ४७ ॥
मा भैस्त्वं राजपुत्राग्र्य क्षत्रियोऽसि परन्तप ।
कथं पुरुषशार्दूल शत्रुमध्ये विषीदसि ॥ ४८ ॥
अहं वै कुरुभिर्योत्स्ये विजेष्यामि च ते पशून् ।
प्रविश्यैतद्रथानीकमप्रधृष्यं दुरासदम् ॥ ४९ ॥
यन्ता भव नरश्रेष्ठ योत्स्येऽहं कुरुभिः सह ।
एवं ब्रुवाणो बीभत्सुर्वैराटिमपराजितः ।
समाश्वास्य मुहूर्तं तमुत्तरं भरतर्षभ ॥ ५० ॥
तत एनं विचेष्टन्तमकामं भयपीडितम् ।
रथमारोपयामास पार्थः प्रहरतां वरः ॥ ५१ ॥ [ १२३४ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे उत्तराश्वासने अष्टात्रिंशोऽध्यायः ॥३८॥

तर मी शत्रूंशीं युद्ध करितों; तूं माझे घोडे आवर (४६). मी आपल्या बाहुबलानें तुझें रक्षण करीन; तूं ह्या महारथी वीरांनीं रक्षिलेल्या घोर व अजिंक्य रथसैन्यावर चाल कर (४७). श्रेष्ठ राजपुत्रा, तूं भिऊं नकोस. परंतपा, तूं क्षत्रिय आहेस. पुरुषव्याघ्रा, शत्रूंच्या मध्यें असा खिन्न कसा होतोस ? (४८) ह्या अजिंक्य व दुर्दमनीय रथसैन्यांत घुसून मीच कौरवांशीं लढतों आणि तुझ्या गाई जिंकून आणतों ( ४९ ). नरश्रेष्ठा, तूं माझा सारथी हो. मी कौरवांशीं लढतों." जनमेजया, ह्याप्रमाणें बोलून विजयशाली अर्जुनानें उत्तराची एक मुहूर्तपर्यंत समजूत घातली (५०). नंतर भयानें व्याकुळ झालेल्या व धडपडणाऱ्या उत्तरास तो नाकबूल असतांहि वीरशिरोमणि पार्थानें त्यास रथावर बसविलें ( ५१ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर-गोग्रहण-प्रसंगीं उत्तराला धीर देण्याविषयीं ३८ वा अध्याय संपला.



# अध्याय ३९

[ कौरवांस अपशकुन होतात. कौरव अर्जुनास ओळखतात. ]

—:o:—

वैशम्पायन उवाच— तं दृष्ट्वा क्लीबवेषेण रथस्थं नरपुङ्गवम् ।
शमीमभिमुखं यान्तं रथमारोप्य चोत्तरम् ॥ १ ॥
भीष्मद्रोणमुखास्तत्र कुरवो रथिसत्तमाः ।
वित्रस्तमनसः सर्वे धनञ्जयकृताद्भयात् ॥ २ ॥
तानवेक्ष्य हतोत्साहानुत्पातानपि चाऽद्भुतान् ।
गुरुः शस्त्रभृतां श्रेष्ठो भारद्वाजोऽभ्यभाषत ॥ ३ ॥
चण्डाश्च वाताः संवान्ति रूक्षाः शर्करवर्षिणः ।
भस्मवर्णप्रकाशेन तमसा संवृतं नभः ॥ ४ ॥
रूक्षवर्णाश्च जलदा दृश्यन्तेऽद्भुतदर्शनाः ।
निस्सरन्ति च कोशेभ्यः शस्त्राणि विविधानि च ॥ ५ ॥
शिवाश्च विनदन्त्येता दीप्तायां[1] दिशि दारुणाः ।
हयाश्वाऽश्रूणि मुञ्चन्ति ध्वजाः कम्पन्त्यकम्पिताः ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—उत्तरास रथामध्यें घालून तो क्लीबाचा वेष धारण केलेला नरश्रेष्ठ (अर्जुन) रथांत बसून शमीवृक्षाकडे जातांना पाहून ( १ ), भीष्म, द्रोण प्रभृति महान्महान् सर्व कौरवरथी अर्जुनाच्या भीतीनें मनांत उद्विग्न झाले ( २ ). कौरव उत्साहरहित झालेले असून, अद्भुत उत्पात होत आहेत असें पाहून, शस्त्रधाऱ्यांमध्यें श्रेष्ठ गुरु भारद्वाज म्हणाला:—( ३ ) "प्रचंड व रुक्ष वारे वाहूं लागून बारीक खड्यांची वृष्टि करित आहेत. भस्म-वर्णाप्रमाणें दिसणाऱ्या काळोखानें अंतरिक्ष व्याप्त झालें आहे (४). मेघ रुक्षवर्ण व अदभुत दिसत आहेत. नानाप्रकारचीं शस्त्रें कोशांतून आपोआप बाहेर पडत आहेत ! (५) दीप्त दिशेकडे भयंकर भालु ओरडत आहेत. ह्या अश्वांच्या नेत्रां-तून अश्रु वाहत आहेत; व ध्वज न हालवितां हालूं लागले आहेत ( ६ ).

१ दीप्त—पेटलेली; आग्नेयी घ्यावी. ( नी. ) मुग्ध आहे.

यादृशान्यत्र रूपाणि सन्दृश्यन्ते बहूनि च ।
यत्ता भवन्तस्तिष्ठन्तु साध्वसं समुपस्थितम् ॥ ७ ॥
रक्षध्वमपि चाऽऽत्मानं व्यूहध्वं वाहिनीमपि ।
वशसं च प्रतीक्षध्वं रक्षध्वं चापि गोधनम् ॥ ८ ॥
एष वीरो महेष्वासः सर्वशस्त्रभृतां वरः ।
आगतः क्लीबवेषेण पार्थो नाऽस्त्यत्र संशयः ॥ ९ ॥
नदीजलंकेशवनारिकेतुर्नगाह्वयो नाम नगारिसूनुः ।
एषोऽङ्गनावेषधरः किरीटी जित्वावयंनेष्यतिचाऽद्यगावः ॥ १० ॥
स एष पार्थो विक्रान्तः सव्यसाची परन्तपः ।
नाऽयुद्धेन निवर्तेत सर्वैरपि सुरासुरैः ॥ ११ ॥
क्लेशितश्च वने शूरो वासवेनाऽपि शिक्षितः ।
अमर्षवशमापन्नो वासवप्रतिमो युधि ।
नेहाऽस्य प्रतियोद्धारमहं पश्यापि कौरवाः ॥ १२ ॥

या सर्व दुश्चिन्हांवरून कांहींतरी भयंकर अरिष्ट कोसळणार असें भासत आहे, म्हणून तुम्ही सर्व सज्ज रहा ( ७ ). आपलें स्वतःचें संरक्षण करा आणि सैन्याची रचनाहि उत्तम प्रकारें करा. युद्धांत प्राणनाश होणार त्याला तोंड द्या आणि गोधनहि राखा ( ८ ). हा वीर महाधनुर्धर, सर्व शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ असलेला अर्जुनच क्लीबवेषांत आला आहे यांत संशयः नाहीं ( ९ ). गंगानंदना (भीष्मा), लंकेशाच्या (रावणाच्या) वनाचा विध्वंस करणारा ( हनुमान् ) ज्याच्या रथावरील चिन्ह आहे, आणि ज्याला वृक्षाचें ( अर्जुन ) नांव आहे, तो हा पर्वतशत्रूचा ( इंद्राचा ) पुत्र स्त्रीवेषधारी अर्जुन आज ज्याला जिंकून तुमच्या गाई घेऊन जाण्याच्या विचारांत आहे त्या ( दुर्योधना )चें तुम्ही रक्षण करा ( १० ). हा सव्यसाची पराक्रमी परंतप अर्जुन सर्व सुरासुरांशींसुद्धां युद्ध केल्यावांचून परत फिरणार नाहीं ( ११ ). ह्या शूरास वनवासांत फार क्लेश भोगावे लागल्यामुळें हा अत्यंत क्रोधाविष्ट झाला आहे; इंद्रानेंहि ह्यास (अस्त्रविद्या) शिकविल्यामुळें युद्धांत हा इंद्राच्या तोडीचा आहे. ह्याची बरोबरी करणारा वीर, कौरवांनो, मला येथें कोणी दिसत नाहीं (१२)

१ हा प्रसिद्ध कूटश्लोक आहे. वाचतांना चुकलें तर ' नदीजलं केशव नारिकेतुः ' व ' जित्वा वयं नेष्यति चाद्य गावः ' असा भास होईल. ' नदीज लङ्केशवनारिकेतुः ' व ' जित्वा अव यं...गाः वः ' असा पदच्छेद खरा आहे.

महादेवोऽपि पार्थेन श्रूयते युधि तोषितः ।
किरातवेषप्रच्छन्नो गिरौ हिमवति प्रभुः ॥ १३ ॥
कर्ण उवाच— सदा भवान्फाल्गुनस्य गुणैरस्मान्विकत्थसे ।
न चाऽर्जुनः कलापूर्णो मम दुर्योधनस्य च ॥ १४ ॥
दुर्योधन उवाच— यद्येष पार्थो राधेय कृतं कार्यं भवेन्मम ।
ज्ञाताः पुनश्चरिष्यन्ति द्वादशाऽब्दान्विशाम्पते ॥ १५ ॥
अथैष कश्चिदेवाऽन्यः क्लीबवेषेण मानवः ।
शरैरेनं सुनिशितैः पातयिष्यामि भूतले ॥ १६ ॥
वैशम्पायन उवाच— तस्मिन् ब्रुवति तद्वाक्यं धार्त्तराष्ट्रे परन्तप ।
भीष्मो द्रोणः कृपो द्रोणिः पौरुषं तदपूजयन् ॥१७॥[१२५१]

इति श्रीमहाभारते विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनप्रशंसायां एकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥ ३९ ॥

हिमालय पर्वतावर किराताच्या वेषांत गुप्तपणें आलेल्या प्रभु महादेवालासुद्धां अर्जुनानें युद्धांत संतुष्ट केलें आहे, असें ऐकण्यांत आहे " ( १३ ).

**कर्ण** म्हणाला:—" नेहमीं आपण अर्जुनाचें गुणवर्णन करून आमच्याजवळ त्याची बढाई मारतां, परंतु तो माझ्या किंवा दुर्योधनाच्या कला—( सोळावा अंश ) भरहि नाहीं " ( १४ ).

**दुर्योधन** म्हणाला:—" जर हा खरोखरीच अर्जुन असेल, तर राधेया कर्णा, माझें कामच साध्य झालें ! (अंग—) राजा, ह्यांना आपण ओळखिल्यानें पुनः बारा वर्षें ( वनांत ) भटकावें लागेल ( १५ ). आतां हा अर्जुनाशिवाय दुसरा कोणी क्लीबाचा वेष घेणारा मनुष्य असेल, तर मी आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्यास (सहज) रणभूमीवर मारून पाडीन " ( १६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—दुर्योधनाचें तें भाषण चालू असतां परंतपा, भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, त्याच्या त्या पौरुषाची प्रशंसा करीत होते ( १७ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण—उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं अर्जुनाच्या प्रशंसेविषयीं ३९ वा अध्याय संपला.

———

## अध्याय ४०

[ अर्जुन उत्तरास स्मशानांतील शमीवर चढून आपलीं व इतर पांडवांचीं शस्त्रास्त्रें काढण्यास सांगतो.

वैशम्पायन उवाच— तां शमीमुपसङ्गम्य पार्थो वैराटिमब्रवीत् ।
सुकुमारं समाज्ञाय संग्रामे नाऽतिकोविदम् ॥ १ ॥
समादिष्टो मया क्षिप्रं धनूंष्यवहरोत्तर ।
नेमानि हि त्वदीयानि सोढुं शक्ष्यन्ति मे बलम् ।
भारं चापि गुरुं वोढुं कुञ्जरं वा प्रमर्दितुम् ॥ २ ॥
मम वा बाहुविक्षेपं शत्रूनिह विजेष्यतः ।
तस्माद्भूमिञ्जयाऽऽरोह शमीमेतां पलाशिनीम् ॥ ३ ॥
अस्यां हि पाण्डुपुत्राणां धनूंषि निहितान्युत ।
युधिष्ठिरस्य भीमस्य बीभत्सोर्यमयोस्तथा ॥ ४ ॥
ध्वजाः शराश्च शूराणां दिव्यानि कवचानि च ।
अत्र चैतन्महावीर्यं धनुः पार्थस्य गाण्डिवम् ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—त्या शमीजवळ गेल्यावर, फार नाजुक असून संग्रामांत फारसा प्रवीण नसलेल्या विराटपुत्रास अर्जुनानें आज्ञा करीत म्हटलें:-(१) "माझ्या सांगण्यावरून उत्तरा, (वृक्षावर ठेवलेलीं) धनुष्यें लवकर खालीं काढ; कारण तुझीं हीं धनुष्यें माझें बल सहन करूं शकणार नाहींत. ह्यांना मोठा भार सोसणार नाहीं, अथवा हत्तीला हीं मारूं शकणार नाहींत(२). मी शत्रूंना जिंकूं लागल्यावर माझ्या हाताचे हिसकेसुद्धां या धनुष्यांना सोसणार नाहींत ! यासाठीं भूमिंजया ( उत्तरा ), ह्या पानांनीं भरलेल्या शमीवर चढ ( ३ ). कारण, हिच्यावर धर्म, भीम, अर्जुन, तसेच नकुल व सहदेव या पांडुपुत्रांचीं धनुष्यें ठेवलेलीं आहेत (४). त्या शूरांचे ध्वज, बाण व दिव्य कवचेंहि ठेविलेलीं आहेत. येथेंच अर्जुनाचें तें महापराक्रमी गांडीव धनुष्य आहे (५).

एकं शतसहस्रेण सम्मितं राष्ट्रवर्धनम् ।
व्यायामसहमत्यर्थं तृणराजसमं महत् ॥ ६ ॥

सर्वायुधमहामात्रं शत्रुसम्बाधकारकम् ।
सुवर्णविकृतं दिव्यं श्लक्ष्णमायतमव्रणम् ॥ ७ ॥

अलं भारं गुरुं वोढुं दारुणं चारुदर्शनम् ।
तादृशान्येव सर्वाणि बलवन्ति दृढानि च ।
युधिष्ठिरस्य भीमस्य बीभत्सोर्यमयोस्तथा ॥ ८ ॥ [१२५९]

इति श्रीमहाभारते० विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनास्त्रकथने चत्वारिंशोऽध्यायः ॥४०॥

त एक लाख धनुष्यांबरोबर असून राष्ट्राची अभिवृद्धि करणारें आहे. त्याला कितीहि ताण पडला तरी तें सहन करणारें आहे, व तें ताडाप्रमाणें अवाढव्य आहे ( ६ ). तें सर्व आयुधांचा सरदार आहे. त्यानें शत्रूचा नाश निश्चयानें व्हावयाचा. या दिव्य धनुष्यावर सुवर्णाचें काम केलें असून तें अगदीं गुळगुळीत, दीर्घ व अभंग आहे ( ७ ). मोठा भार सहन करण्याची शक्ति या धनुष्यांत असून, तें ( परिणामांत ) दारुण पण दिसण्यांत सुंदर आहे. धर्म, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांचीं धनुष्यें त्यासारखींच सर्व बळकट व भक्कम आहेत " ( ८ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांत गोहरण—उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं अर्जुनाच्या अस्त्रांच्या वर्णनाविषयीं ४० वा अध्याय संपला.

---

१ महामात्रं—अतिप्रमाणं ( नी० ). पण वरील अर्थ बरा दिसतो.

## अध्याय ४१

[ अर्जुन व उत्तर यांचा संवाद. ]

---

उत्तर उवाच—अस्मिन्वृक्षे किलोद्बद्धं शरीरमिति नः श्रुतम् ।
तदहं राजपुत्रः सन्स्पृशेयं पाणिना कथम् ॥ १ ॥
नैवंविधं मया युक्तमालब्धुं क्षत्रयोनिना ।
महता राजपुत्रेण मन्त्रयज्ञविदा सता ॥ २ ॥
स्पृष्टवन्तं शरीरं मां शववाहमिवाऽशुचिम् ।
कथं वा व्यवहार्यं वै कुर्वीथास्त्वं बृहन्नले ॥ ३ ॥
बृहन्नलोवाच— व्यवहार्यश्च राजेन्द्र शुचिश्चैव भविष्यसि ।
धनूंष्येतानि मा भैस्त्वं शरीरं नाऽत्र विद्यते ॥ ४ ॥
दायादं मत्स्यराजस्य कुले जातं मनस्विनाम् ।
त्वां कथं निन्दितं कर्म कारयेयं नृपात्मज ॥ ५ ॥

**उत्तर** म्हणाला:—या वृक्षावर एक प्रेत बांधून ठेविलें आहे, असें आम्हीं ऐकिलें आहे; तर मी राजपुत्र असून त्याला आपल्या हातानें कसा बरें स्पर्श करूं ? ( १ ) मी ह्यास स्पर्श करणें योग्य नाहीं; कारण मी क्षत्रियाच्या कुलांत जन्म घेतला असून महान् राजपुत्र आहें व वेद व ब्राह्मणें[1] जाणणारा आहें ( २ ). त्या शवाला स्पर्श केल्यास मी शववाहकाप्रमाणें अशुचि होईन आणि मग बृहन्नले, तुलासुद्धां माझ्याशीं व्यवहार कसा करतां येईल ? "(३).

**बृहन्नला** म्हणाली:—" राजेंद्रा, तुझ्याशीं व्यवहार करण्यास कोणतीहि अडचण येणार नाहीं; तूं शुद्धच राहशील. हीं धनुष्यें आहेत. तूं भिऊं नकोस. येथें शव वगैरे कांहीं नाहीं ( ४ ). तेजस्वी पुरुषांच्या कुळांत जन्मलेल्या, मत्स्यराजाच्या पुत्राच्या तुझ्या हातून राजपुत्रा, मी निंद्य कर्म कसें करवीन ? " ( ५ )

---

१ यज्ञ म्ह० यज्ञप्रतिपादक ब्राह्मणें घ्यावीं.

वैशम्पायन उवाच— एवमुक्तः स पार्थेन रथात्प्रस्कन्द्य कुण्डली ।
आरुरोह शमीवृक्षं वैराटिरवशस्तदा ॥ ६ ॥

तमन्वशासच्छत्रुघ्नो रथे तिष्ठन्धनञ्जयः ।
अवरोपय वृक्षाग्राद्धनूंष्येतानि मा चिरम् ॥ ७ ॥

परिवेष्टनमेतेषां क्षिप्रं चैव व्यपानुद ।
सोऽपहृत्य महार्हाणि धनूंषि पृथुवक्षसाम् ।
परिवेष्टनपत्राणि विमुच्य समुपानयत् ॥ ८ ॥

तथा सन्नहनान्येषां परिमुच्य समन्ततः ।
अपश्यद्गाण्डिवं तत्र चतुर्भिरपरैः सह ॥ ९ ॥

तेषां विमुच्यमानानां धनुषामर्कवर्चसाम् ।
विनिश्चेरुः प्रभा दिव्या ग्रहाणामुदयेष्विव ॥ १० ॥

स तेषां रूपमालोक्य भोगिनामिव जृम्भताम् ।
हृष्टरोमा भयोद्विग्नः क्षणेन समपद्यत ॥ ११ ॥

**वैशंपायन** म्हणाला—अर्जुनानें हें सांगितलें तेव्हां तो कुंडलधारी उत्तर रथांतून खालीं उतरून निरुपाय होऊन शमीवृक्षावर चढला ( ६ ). शत्रुनाशक अर्जुन रथांत उभा राहूनच त्यास म्हणालाः—"वृक्षाच्या शेंड्यावरून हीं धनुष्यें खालीं काढ; वेळ लावूं नको (७). त्यांचें वेष्टनहि तूं लवकर काढून टाक." नंतर रुंद छातीच्या पांडवांचीं तीं मोठ्या किंमतीचीं धनुष्यें उत्तरानें वृक्षावरून काढलीं व त्याच्या भोंवतीं गुंडाळलेलीं डहाळ्या-पानें सोडून तीं आपल्या जवळ घेतलीं(८). मग त्यानें त्या धनुष्यांचीं सर्व बाजूंचीं बंधनें सोडलीं, तेव्हां त्यांत गांडीव धनुष्य व दुसरीं चार धनुष्यें त्याच्या दृष्टीस पडलीं ( ९ ). सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशीं तीं धनुष्यें सोडीत असतां ( सूर्यादि ) ग्रहांच्या उदयकाळीं जशी प्रभा फांकते तशी प्रभा त्यांतून फांकूं लागली (१०). त्या धनुष्यांचा आकार पहात असतां जणूं काय सर्पच फोंफावत आहेत असें त्यास वाटलें व एकदम भयभीत झाल्यामुळें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले ( ११ ).

संस्पृश्य तानि चापानि भानुमन्ति बृहन्ति च ।
वैराटिरर्जुनं राजन्निदं वचनमब्रवीत् ॥ १२ ॥ [ १२७१ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्या संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरगोग्रहे अस्त्रारोपणे एकचत्वारिंशोऽध्यायः ॥४१॥

राजा, त्या प्रचंड व देदीप्यमान धनुष्यांना स्पर्श करून उत्तर अर्जुनास असें म्हणाला:—( १२ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोग्रहण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं अस्त्रें काढण्याविषयीं ४१ वा अध्याय संपला.

## अध्याय ४२

[ शमीवरचीं पांडवांचीं शस्त्रास्त्रें पाहून चकित झालेल्या उत्तराचे अर्जुनास प्रश्न. ]

उत्तर उवाच—बिन्दवो जातरूपस्य शतं यस्मिन्निपातिताः ।
सहस्रकोटिसौवर्णाः कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥ १ ॥
वारणा यत्र सौवर्णाः पृष्ठे भासन्ति दंशिताः ।
सुपार्श्वं सुग्रहं चैव कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥ २ ॥
तपनीयस्य शुद्धस्य पृष्ठे यस्येन्द्रगोपकाः ।
पृष्ठे विभक्ताः शोभन्ते कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥ ३ ॥

उत्तर म्हणाला:—" ज्या ह्या धनुष्यावर सुवर्णाचे शंभर बिंदु काढिलेले असून ज्याचीं अग्रें बळकट आहेत, असें हें उत्कृष्ट धनुष्य कोणत्या प्रख्यात वीराचें आहे ? ( १ ) ज्याच्या पृष्ठभागावर सुवर्णाचे हत्ती काढलेले आहेत व ज्याचा मध्यभाग व पार्श्वभाग सुंदर आहे, असें हें उत्तम धनुष्य कोणाचें ? (२) ज्याच्या पाठीवर ( तांबड्या व पिवळ्या रंगाचे ) शुद्ध सोन्याचे इंद्रगोप कीटक निरनिराळे काढलेले दिसत आहेत असें हें उत्तम धनुष्य कोणाचें ? ( ३ )

१ हे शब्द कूटार्थी आहेत. समालोचन पहावें.

सूर्या यत्र च सौवर्णास्त्रयो भासन्ति दंशिताः[1] ।
तेजसा प्रज्वलन्तो हि कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥ ४ ॥
शलभा यत्र सौवर्णास्तपनीयविभूषिताः[2] ।
सुवर्णमणिचित्रं च कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥ ५ ॥
इमे च कस्य नाराचाः साहस्रा[3] लोमवाहिनः[4] ।
समन्तात्कलधौताग्रा उपासङ्गे हिरण्मये ॥ ६ ॥
विपाठाः पृथवः कस्य गार्धपत्राः शिलाशिताः ।
हारिद्रवर्णाः सुमुखाः पीताः सर्वायसाः शराः ॥ ७ ॥
कस्याऽयमसितश्चापः पञ्चशार्दूललक्षणः ।
वराहकर्णव्यामिश्राञ्छरान्धारयते दश ॥ ८ ॥
कस्येमे पृथवो दीर्घाश्चन्द्रबिम्बार्धदर्शनाः ।
शतानि सप्त तिष्ठन्ति नाराचा रुधिराशनाः ॥ ९ ॥
कस्येमे शुकपत्राभैः पूर्वैरर्धैः सुवाससः ।
उत्तरैरायसैः पीतैर्हेमपुङ्खैः शिलाशितैः ॥ १० ॥

ज्याच्यावर सुवर्णाचे तीन सूर्य झळकत असलेले दिसतात असें हें उत्तम धनुष्य कोणाचें ? ( ४ ) ज्याच्यावर कृष्णागरूचे शलभ काढलेले असून त्यांवर सुवर्णाचे अलंकार आहेत व जें सुवर्णमण्यांनीं चित्रित झालें आहे असें हें उत्तम धनुष्य कोणाचें ? ( ५ ) सुवर्णाच्या भात्यांत असलेले, सर्व अंगांनीं पाजळलेले आणि केंस ( देखील ) तोडणारे हे सहस्रावधि बाण कोणाचे ? ( ६ ) गिधाडाचे पंख लाविलेले, शिळेवर धार केलेले, हळदीसारखे पिवळेजरद, व सबंध लोखंडाचे असे हे तीक्ष्ण तोंडाचे विपाठ जातीचे विशाल बाण कोणाचे ? ( ७ ) ज्यावर पांच वाघांचीं चित्रें आहेत, असें हें वराहाच्या कर्णासारखे दहा बाण धारण करणारें कृष्णवर्ण धनुष्य कोणाचें ? ( ८ ) हे जाड, लांब व अर्धचंद्राकृति असे रक्तप्राशन करणारे सातशें नाराच ( बाण ) कोणाचे ? ( ९ ) ज्यांचीं पूर्वार्धें राघूच्या पिसांसारखीं व उत्तरार्धें लोखंडाचीं आहेत, व जे शिळेवर लावून पाजळलेले आहेत, असे हे टोंकदार, पिंवळे व सुवर्णपुंख असलेले बाण कोणाचे ? ( १० )

१ दंशिताः-दीप्यमानाः ( नी. ) हा अर्थ कसा ?
२ सुवर्ण-कृष्णागरु; तपनीय-सुवर्ण (नी ). ३ साहस्राः-सहस्रशः संख्याताः ( नी. )
४ लोमवाहिनः-पत्रवन्तः, लोमच्छेदिनः इत्यन्ये.

गुरुभारसहो दिव्यः शात्रवाणां भयङ्करः ।
कस्याऽयं सायको दीर्घः शिलीपृष्ठः शिलीमुखः ॥ ११ ॥
वैयाघ्रकोशे निहितो हेमचित्रत्सरुर्महान् ।
सुफलश्चित्रकोशश्च किङ्किणीसायको महान् ॥ १२ ॥
कस्य हेमत्सरुर्दिव्यः खड्गः परमनिर्मलः ।
कस्याऽयं विमलः खड्गो गव्ये कोशे समर्पितः ॥ १३ ॥
हेमत्सरुरनाधृष्यो नैषध्यो भारसाधनः ।
कस्य पाञ्चनखे कोशे सायको हेमविग्रहः ॥ १४ ॥
प्रमाणरूपसम्पन्नः पीत आकाशसन्निभः ।
कस्य हेममये कोशे सुतप्ते पावकप्रभे ॥ १५ ॥
निस्त्रिंशोऽयं गुरुः पीतः सायकः परनिर्व्रणः ।
कस्याऽयमसितः खड्गो हेमबिन्दुभिरावृतः ॥ १६ ॥

मोठा भार सहन करणारा, शत्रूंना अत्यंत भय देणारा, व ज्याचा पृष्ठभाग व मुख बेडकीप्रमाणें आहे, असा हा दिव्य व दीर्घ खड्ग कोणाचा ? (११) वाघाच्या कातड्याच्या सुंदर कोशांत ठेविलेला, सुवर्णाची चित्रविचित्र मूठ असलेला, उत्तम फाळ असलेला व ज्याला लहान लहान घागऱ्या जोडल्या आहेत असा हा सोनेरी मुठीचा खड्ग कोणाचा ? (१२) सोनेरी मुठीचा आणि अत्यंत निर्मळ असा हा दिव्य खड्ग कोणाचा ? बैलाच्या कातड्याच्यां कोशांत ठेवलेली ही अतिनिर्मळ लहान तरवार कोणाची ? (१३) पराक्रम गाजविणारें, निषध देशांत तयार झालेलें, सुवर्णाची मूठ असलेलें व बकऱ्याच्या कातड्याचे कोशांत असलेलें हें खड्ग कोणाचें ? (१४) उत्तम प्रमाण व स्वरूप असलेला व आकाशाप्रमाणें ( निळा ), पाजळलेला, अग्नीसारख्या चकाकणाऱ्या म्यानामध्यें हा खांडा कोणाचा ? (१५) तीस अंगुळांहून अधिक लांब, शत्रूंनीं कितीहि आघात केले तरी जिला मुळींच धक्का बसावयाचा नाहीं व जीवर सुवर्णाचीं लहान चक्रें काढिलीं आहेत अशी ही पिवळ्या रंगाची सांगी

१ शिली—मेकी ( नी. ). सायकः खड्गः इत्यमरः ( नी. )

२ त्सरु—मूठ; खड्ग—तलवार किंवा खांडा; सायक—खड्ग; असे शब्द भिन्न भिन्न घ्यावे. निस्त्रिंश—लांब सांगी ( ३० आंगळांहून अधिक लांब. नी. )

आशीविषसमस्पर्शः परकायप्रभेदनः ।
गुरुभारसहो दिव्यः सपत्नानां भयप्रदः ॥ १७ ॥
निर्दिशस्व यथातत्त्वं मया पृष्टा बृहन्नले ।
विस्मयो मे परो जातो दृष्ट्वा सर्वमिदं महत् ॥ १८ ॥ १२८९

इति श्रीमहाभारते विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरवाक्यं नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥

कोणाची ? ( १६ ) सर्पाप्रमाणें जिचा स्पर्श प्राणघातक होईल, जी शत्रूचे देह निश्चयानें विदारण करील, अतिशय भार सहन करणारी, शत्रूंना भयभीत करणारी, अशी ही दिव्य सांगी कोणाची ? ( १७ ) बृहन्नले, मी विचारिलेल्या प्रश्नांसंबंधीं खराखरा प्रकार काय असेल तो मला सांग. हीं सर्व शस्त्रें पाहून मला मोठा विस्मय झाला आहे " (१८).

यात्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोग्रहण-उपपर्वांत उत्तराचें भाषण या नांवाचा ४२ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ४३

[ अर्जुन उत्तरास पांडवांची ओळख पटविण्याकरितां शस्त्रास्त्रांचें वर्णन करतो. ]

बृहन्नलोवाच— यन्मां पूर्वमिहाऽपृच्छः शत्रुसेनापहारिणम् ।
गाण्डीवमेतत्पार्थस्य लोकेषु विदितं धनुः ॥ १ ॥
सर्वायुधमहामात्रं शातकुम्भपरिष्कृतम् ।
एतत्तदर्जुनस्याऽसीद्गाण्डीवं परमायुधम् ॥ २ ॥
यत्तच्छतसहस्रेण सम्मितं राष्ट्रवर्द्धनम् ।
येन देवान्मनुष्यांश्च पार्थो विजयते मृधे ॥ ३ ॥

बृहन्नला म्हणाली:—"तूं मला प्रथम ज्या धनुष्याविषयीं विचारिलेंस, तें, ज्याच्या मध्यें शत्रूच्या सैन्याचा काळ वसत आहे व जें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे, असें अर्जुनाचें गांडीव होय ( १ ). सर्व आयुधांचा सरदार असून सुवर्णानें मढविलेलें हें तें अर्जुनाचें गांडीव नांवाचें मोठें आयुध होतें ( २ ). हें एकटें लक्ष धनुष्यांची बरोबरी करून राष्ट्राचा अभ्युदय करणारें आहे. ह्यानेंच अर्जुन देवांना व मनुष्यांना युद्धांत जिंकतो ( ३ ).

चित्रमुच्चावचैर्वर्णैः श्लक्ष्णमायतमव्रणम् ।
देवदानवगन्धर्वैः पूजितं शाश्वतीः समाः ॥ ४ ॥
एतद्वर्षसहस्रं तु ब्रह्मा पूर्वमधारयत् ।
ततोऽनन्तरमेवाऽथ प्रजापतिरधारयत् ॥ ५ ॥
त्रीणि पञ्चशतं चैव शक्रोऽशीति च पञ्च च ।
सोमः पञ्चशतं राजा तथैव वरुणः शतम् ।
पार्थः पञ्च च षष्टिं च वर्षाणि श्वेतवाहनः ॥ ६ ॥
महावीर्यं महादिव्यमेतत्तद्धनुरुत्तमम् ।
एतत्पार्थमनुप्राप्तं वरुणाच्चारुदर्शनम् ॥ ७ ॥
पूजितं सुरमर्त्येषु बिभर्ति परमं वपुः ।
सुपार्श्वं भीमसेनस्य जातरूपग्रहं धनुः ।
येन पार्थोऽजयत्कृत्स्नां दिशं प्राचीं परन्तपः ॥ ८ ॥
इन्द्रगोपकचित्रं च यदेतच्चारुदर्शनम् ।
राज्ञो युधिष्ठिरस्यैतद्वैराटे धनुरुत्तमम् ॥ ९ ॥

ह्या धनुष्याला नानाप्रकारचे चित्रविचित्र रंग दिलेले आहेत; हें गुळगुळीत व लांब असून ह्यावर व्रण मुळींच नाहींत. अनादिकालापासून देव, दानव व गंधर्व ह्यांनीं हें पूजिलें आहे ( ४ ). प्रथम एक हजार वर्षें हें ब्रह्मदेवानें धारण केलें. नंतर प्रजापतीनें पांचशें-तीन वर्षें धारण केलें; त्याच्यामागून इंद्रानें पंचायशीं वर्षें, सोमराजानें एकशेंपांच वर्षें, वरुणानें शंभर वर्षें आणि त्यानंतर पांढरे शुभ्र वाहन (घोडे) असणाऱ्या अर्जुनानें पांसष्ट वर्षें तें बाळगिलें (५–६). हें मनोहर, मोठें पराक्रमी आणि अत्यंत दिव्य गांडीव धनुष्य वरुणापासून अर्जुनास मिळालें(७). सुवर्णाच्या कोशांत असलेलें हें श्रेष्ठ धनुष्य भीमसेनाचें आहे. ह्यास देव व मनुष्य ह्यांजकडून मोठा मान मिळतो. ह्याच्या साहाय्यानें परंतप भीमानें संपूर्ण पूर्व दिशा जिंकिली ( ८ ). उत्तरा, इंद्रगोप कीटकांनीं चित्रित केलेलें हें सुंदर व उत्कृष्ट धनुष्य युधिष्ठिर राजाचें आहे ( ९ ).

१ हीं वर्षें प्रत्येकाचीं कशीं सांगितलीं, कशीं धरावयाचीं हें एक कूट आहे. प्रजापति आणि ब्रह्मदेव यांत फरक काय ? ( भागवतांत ' प्रजापति ' नांवानें ब्रह्मपुत्र मरीच्यादि ऋषि उल्लेखिले आहेत, पण ते धनुष्यधारी कसे ? ). ६५=३७½ ( नी. )

सूर्या यस्मिंस्तु सौवर्णाः प्रकाशन्ते प्रकाशिनः ।
तेजसा प्रज्वलन्तो वै नकुलस्यैतदायुधम् ॥ १० ॥
शलभा यत्र सौवर्णास्तपनीयविचित्रिताः ।
एतन्माद्रीसुतस्यापि सहदेवस्य कार्मुकम् ॥ ११ ॥
ये त्विमे क्षुरसङ्काशाः सहस्रा[1] लोमवाहिनः ।
एतेऽर्जुनस्य वैराटे शराः सर्वविषोपमाः ॥ १२ ॥
एते ज्वलन्तः संग्रामे तेजसा शीघ्रगामिनः ।
भवन्ति वीरस्याऽक्षय्या व्यूहतः समरे रिपून् ॥ १३ ॥
ये चेमे पृथवो दीर्घाश्चन्द्रबिम्बार्धदर्शनाः ।
एते भीमस्य निशिता रिपुक्षयकराः शराः ॥ १४ ॥
हारिद्रवर्णा ये त्वेते हेमपुङ्खाः शिलाशिताः ।
नकुलस्य कलापो[2]ऽयं पञ्चशार्दूललक्षणः ॥ १५ ॥
येनाऽसौ व्यजयत्कृत्स्नां प्रतीचीं दिशमाहवे ।
कलापो ह्येष तस्याऽऽसीन्माद्रीपुत्रस्य धीमतः ॥ १६ ॥
ये त्विमे भास्कराकाराः सर्वपारसवाः[3] शराः ।
एते चित्रक्रियोपेताः सहदेवस्य धीमतः ॥ १७ ॥

ज्यावर तेजानें झळकणारे सुवर्णाचे भास्वर सूर्य प्रकाशत आहेत तें हें नकुलाचें आयुध आहे (१०). ज्यावर कृष्णागरूचे शलभ ( काढले ) असून सुवर्णाच्या वेलबुट्या आहेत असें हें धनुष्य माद्रीपुत्र सहदेवाचें आहे (११). आतां हे जे दृढ, सर्पासारखे भयंकर, वस्तऱ्यासारखे तीक्ष्ण, केंस लावलेले बाण आहेत ते विराटपुत्रा, अर्जुनाचे आहेत (१२). वीर युद्धांत शत्रूंचा वध करीत असतां, हे तेजानें प्रज्वलित होणारे शीघ्रगामी बाण अक्षय्य होतात ( १३ ). आणि जे हे अर्धचंद्राकृति, दीर्घ, जाड, तीक्ष्ण व शत्रुसंहारक बाण, हे भीमसेनाचे होत (१४). आतां हळदीच्या वर्णाचे जे हे सोनेरी पंखाचे साहाणेवर पाजळलेले बाण, हा पांच वाघांचीं चिन्हें असलेला नकुलाच्या बाणांचा समूह होय (१५). ह्याच्या बळावरच त्या बुद्धिमान् माद्रीपुत्रानें सबंध पश्चिम दिशा जिंकिली (१६). ज्यांचा आकार सूर्याप्रमाणें आहे व ज्यांच्यावर चित्रविचित्र काम केलेलें आहे

१ सहस्राः–तेजस्विनो दृढाः सहस्रशः संमिता वा (नी.) 'दृढ' अर्थ बरा दिसतो.
२ कलाप=समूह ( नी. ) अर्थ देत नाहीं. ३ पारः–परसमूहः तं सुवते हिंसन्ति (नी.)

ये त्विमे निशिताः पीताः पृथवो दीर्घवाससः ।
हेमपुङ्खास्त्रिपर्वाणो राज्ञ एते महाशराः ॥ १८ ॥
यस्त्वयं सायको दीर्घः शिलीपृष्ठः शिलीमुखः ।
अर्जुनस्यैष संग्रामे गुरुभारसहो दृढः ॥ १९ ॥
वैयाघ्रकोशः सुमहान्भीमसेनस्य सायकः ।
गुरुभारसहो दिव्यः शात्रवाणां भयङ्करः ॥ २० ॥
सुफलश्चित्रकोशश्च हेमत्सरुरनुत्तमः ।
निस्त्रिंशः कौरवस्यैष धर्मराजस्य धीमतः ॥ २१ ॥
यस्तु पाञ्चनखे कोशे निहितश्चित्रयोधने ।
नकुलस्यैष निस्त्रिंशो गुरुभारसहो दृढः ॥ २२ ॥
यस्त्वयं विपुलः खड्गो गव्ये कोशे समर्पितः ।
सहदेवस्य विद्ध्येनं सर्वभारसहं दृढम् ॥ २३ ॥ [ १३१२ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे आयुधवर्णनं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥४३॥

असे हे सर्व शत्रुसमूहाचा नाश करणारे बाण सहदेवाचे आहेत ( १७ ). मोठे विशाल, तीन पेऱ्यांचे, पाजळलेले व सोनेरी पुंखांचे हे बाण राजा युधिष्ठिराचे आहेत ( १८ ). आतां जो हा, पृष्ठभाग व मुख बेडकीसारखा असलेला, लांबलचक व प्रचंड खड्ग आहे, तो अर्जुनाचा असून युद्धांत मोठा भार सहन करणारा व बळकट आहे (१९). व्याघ्रचर्माच्या कोशांत असणारा हा भयंकर खड्ग भीमसेनाचा आहे. हा दिव्य खांडा प्रचंड भार सहन करणारा असून, शत्रूंच्या मनांत भीति उत्पन्न करणारा आहे ( २० ). उत्कृष्ट फाळ असलेलें, सुवर्णाची मूठ धारण करणारें व चित्रविचित्र कोशांत असलेलें हें खड्ग कुरुवंशज बुद्धिमान् युधिष्ठिराचें आहे ( २१ ). पण हें जें व्याघ्रचर्मामध्यें असणारें खड्ग विचित्र युद्धपद्धतीकरितां राखून ठेवलेलें आहे, हें सुदृढ व मोठा भार सहन करणारें खड्ग नकुलाचें आहे ( २२ ). आणि जो हा गोचर्माचे कोशांत ठेवलेला विशाल, सुदृढ व सर्वभार सहन करणारा खड्ग आहे, तो सहदेवाचा आहे असें जाण" ( २३ ).

याप्रमाणें 'आयुधांचें वर्णन' या नांवाचा ४३ वा अध्याय संपला.

# अध्याय ४४

[ अर्जुन उत्तरास पांडवांची ओळख पटवून देतो. ]

उत्तर उवाच—सुवर्णविकृतानीमान्यायुधानि महात्मनाम् ।
रुचिराणि प्रकाशन्ते पार्थानामाशुकारिणाम् ॥ १ ॥
क्व नु स्विदर्जुनः पार्थः कौरव्यो वा युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च भीमसेनश्च पाण्डवः ॥ २ ॥
सर्व एव महात्मानः सर्वामित्रविनाशनाः ।
राज्यमक्षैः पराकीर्य[1] न श्रूयन्ते कथञ्चन ॥ ३ ॥
द्रौपदी क्व च पाञ्चाली स्त्रीरत्नमिति विश्रुता ।
जितानक्षैस्तदा कृष्णा तानेवाऽन्वगमद्वनम् ॥ ४ ॥
अर्जुन उवाच—अहमस्म्यर्जुनः पार्थः सभास्तारो युधिष्ठिरः ।
बल्लवो भीमसेनस्तु पितुस्ते रसपाचकः ॥ ५ ॥
अश्वबन्धोऽथ नकुलः सहदेवस्तु गोकुले ।
सैरन्ध्रीं द्रौपदीं विद्धि यत्कृते कीचका हताः ॥ ६ ॥

उत्तर म्हणाला:—" ज्यांवर सुवर्णाचीं कामें केलीं आहेत अशीं हीं सुंदर आयुधें त्या महापराक्रमी वेगवान् महात्म्या पांडवांचीं आहेत (१). पण पृथानंदन अर्जुन, कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर, नकुल, सहदेव व पांडुपुत्र भीमसेन कोठें आहेत? सर्व शत्रूंचा नाश करणारे ते सर्वच महात्मे द्यूतांत राज्य घालवून आतां कोठेंच ऐकण्यांत येत नाहींत. ती स्त्रीरत्न म्हणून प्रख्यात असलेली पंचाल देशाच्या राजाची कन्या द्रौपदी कोठें आहे? पांडव फाशांनीं जिंकिले गेल्यानंतर ती त्यांच्याच मागोमाग वनांत गेली " (२–४).

अर्जुन म्हणाला:—" मीच तो पृथेचा पुत्र अर्जुन होय; सभासद (कंक) तोच युधिष्ठिर होय; तुझ्या पित्याचा आचारी बल्लव हा भीमसेन (५). आतां (तुझ्या पित्याचा) अश्वपाळ नकुळ आहे. आणि गोठ्यावर सहदेव आहे. जिच्याकरितां कीचकांचा वध झाला ती सैरंध्री द्रौपदी जाण " (६).

१ पराकीर्य अपास्य (नी.)

उत्तर उवाच— दश पार्थस्य नामानि यानि पूर्वं श्रुतानि मे ।
प्रब्रूयास्तानि यदि मे श्रद्दध्यां सर्वमेव ते ॥ ७ ॥
अर्जुन उवाच— हन्त तेऽहं समाचक्षे दश नामानि यानि मे ।
वैराटे शृणु तानि त्वं यानि पूर्वं श्रुतानि ते ॥ ८ ॥
एकाग्रमानसो भूत्वा शृणु सर्वं समाहितः ।
अर्जुनः फाल्गुनो जिष्णुः किरीटी श्वेतवाहनः ।
बीभत्सुर्विजयः कृष्णो सव्यसाची धनञ्जयः ॥ ९ ॥
उत्तर उवाच—केनाऽसि विजयो नाम केनाऽसि श्वेतवाहनः ।
किरीटी नाम केनाऽसि सव्यसाची कथं भवान् ॥ १० ॥
अर्जुनः फाल्गुनो जिष्णुः कृष्णो बीभत्सुरेव च ।
धनञ्जयश्च केनाऽसि ब्रूहि तन्मम तत्त्वतः ॥ ११ ॥
श्रुता मे तस्य वीरस्य केवला नामहेतवः ।
तत्सर्वं यदि मे ब्रूयाः श्रद्दध्यां सर्वमेव ते ॥ १२ ॥
अर्जुन उवाच—सर्वाञ्जनपदाञ्जित्वा वित्तमादाय केवलम् ।
मध्ये धनस्य तिष्ठामि तेनाऽऽहुर्मां धनञ्जयम् ॥ १३ ॥

**उत्तर** म्हणाला:—" अर्जुनाचीं जीं दहा नांवें पूर्वी मीं ऐकिलीं आहेत तीं तूं मला सांगशील तर तुझ्या सर्व सांगण्यावर माझा विश्वास बसेल " (७).

**अर्जुन** म्हणाला:—" विराटपुत्रा, जीं तूं पूर्वी ऐकलीं आहेस तीं माझीं दहा नांवें आतां मी तुला सांगतों; तीं तूं ऐक ( ८ ). एकाग्र मन करून सर्व लक्षपूर्वक ऐक. अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, किरीटी, श्वेतवाहन, बीभत्सु, विजय, कृष्ण, सव्यसाची आणि धनंजय, हीं तीं नांवें होत." ( ९ ).

**उत्तर** म्हणाला:—" तुला विजय नांव कसें पडलें ? त्याचप्रमाणें श्वेतवाहन, किरीटी व सव्यसाची हीं नांवें कशीं मिळालीं ? ( १० ). तसेंच अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, कृष्ण व बीभत्सु आणि धनंजय हीं तरी नांवें कशीं पडलीं, हें मला यथार्थतेनें सांग ( ११ ). त्या वीराचीं तीं नांवें पडण्याचे फक्त हेतु मी ऐकिले आहेत. तें सर्व जर सांगशील तर मी तुझें सर्वच म्हणणें खरें मानीन " (१२).

**अर्जुन** म्हणाला:—" सर्व देश जिंकून त्यांतील केवळ धन हरण करून धनाच्या मध्यें मी राहतों, म्हणून मला 'धनंजय' म्हणतात ( १३ ).

अभिप्रयामि संग्रामे यहहं युद्धदुर्मदान् ।
नाऽजित्वा विनिवर्त्तामि तेन मां विजयं विदुः ॥ १४ ॥
श्वेताः काञ्चनसन्नाहा रथे युज्यन्ति मे हयाः ।
संग्रामे युद्धयमानस्य तेनाऽहं श्वेतवाहनः ॥ १५ ॥
उत्तराभ्यां फल्गुनीभ्यां नक्षत्राभ्यामहं दिवा ।
जातो हिमवतः पृष्ठे तेन मां फाल्गुनं विदुः ॥ १६ ॥
पुरा शक्रेण मे दत्तं युद्धयतो दानवर्षभैः ।
किरीटं मूर्ध्नि सूर्याभं तेनाऽहुर्मां किरीटिनम् ॥ १७ ॥
न कुर्यां कर्म बीभत्सं युध्यमानः कथञ्चन ।
तेन देवमनुष्येषु बीभत्सुरिति विश्रुतः ॥ १८ ॥
उभौ मे दक्षिणौ पाणी गाण्डीवस्य विकर्षणे ।
तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥ १९ ॥
पृथिव्यां चतुरन्तायां वर्णो मे दुर्लभः समः ।
करोमि कर्म शुक्लं च तस्मान्मामर्जुनं[२] विदुः ॥ २० ॥

संग्रामामध्यें युद्धाची खुमखुमी असलेल्या शत्रूंवर मी चाल करून जातों व त्यांस जिंकिल्याशिवाय माघारा वळत नाहीं, म्हणून मला 'विजय' म्हणतात ( १४ ). मी संग्रामांत युद्ध करीत असतां माझ्या रथाला सुवर्णाच्या पाखरी चढविलेले पांढरे घोडे असतात, म्हणून मी 'श्वेतवाहन' आहें ( १५ ). माझा जन्म हिमालय पर्वताच्या पृष्ठभागीं दिवसा उत्तरा-फाल्गुनी नक्षत्रावर झाला, म्हणून माझें नांव 'फाल्गुन' असें पडलें ( १६ ). पूर्वी मी मोटमोठ्या दैत्यांशीं लढत असतां इंद्रानें माझ्या मस्तकावर सूर्याप्रमाणें देदीप्यमान किरीट (मुकुट) घातला, म्हणून मला किरीटी म्हणतात ( १७ ). मी युद्ध करीत असतां कधींहि बीभत्स ( निंद्य ) कर्म करीत नाहीं, त्यामुळें देवांमध्यें व मनुष्यांमध्यें मी 'बीभत्सु'[१] नांवानें प्रख्यात आहें ( १८ ). मी गांडीव धनुष्याचें आकर्षण करूं लागलों म्हणजे माझे दोन्ही हात एकसारखे चालतात, म्हणून देव-मनुष्यांमध्यें मला 'सव्यसाची' म्हणतात ( १९ ). समुद्रवलयांकित पृथ्वीवर माझ्यासारखा वर्ण दुर्लभ आहे व मी निर्मळ कर्म करितों, म्हणून मला 'अर्जुन' ( उलट व्यंजनेनें ) म्हणतात ( २० ).

१ नांव उलटें आहे. पण " भदि कल्याणे सुखे चेतयस्य सनि रूपम् " ( नी. ).
२ अर्जुन=पांढरा. ऋज् धातूपासून अनेक अर्थ ( नी. ) देतो. पण अर्जुन काळा होता.

अहं दुरापो दुर्धर्षो दमनः पाकशासनिः ।
तेन देवमनुष्येषु जिष्णुर्नामाऽस्मि विश्रुतः ॥ २१ ॥
कृष्ण इत्येव दशमं नाम चक्रे पिता मम ।
कृष्णावदातस्यं सतः प्रियत्वाद्बालकस्य वै ॥ २२ ॥

वैशंपायन उवाच— ततः स पार्थं वैराटिरभ्यवादयदन्तिकात् ।
अहं भूमिञ्जयो नाम नाम्नाऽहमपि चोत्तरः ॥ २३ ॥
दिष्ट्या त्वां पार्थ पश्यामि स्वागतं ते धनञ्जय ।
लोहिताक्ष महाबाहो नागराजकरोपम ॥ २४ ॥
यदज्ञानादवोचं त्वां क्षन्तुमर्हसि तन्मम ॥
यतस्त्वया कृतं पूर्वं चित्रं कर्म सुदुष्करम् ।
अतो भयं व्यतीतं मे प्रीतिश्च परमा त्वयि ॥२५॥ [१३३७]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनपरिचये चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥४४॥

मी इंद्राचा पुत्र असून मोठा बलाढय, दुर्धर्ष व जिंकणारा आहें, म्हणून देवांत व मानवांत मी ' जिष्णु ' म्हणून प्रसिद्ध आहें ( २१ ). ' कृष्ण ' हें दहावें नांव माझ्या पित्यानें बालपणीं माझा वर्ण कृष्णभास्वर ( काळा पण तेजस्वी ) असल्यामुळें ठेविलें " ( २२ ).

**वैशंपायन** म्हणाला:— नंतर त्या विराटपुत्रानें पृथापुत्र अर्जुनाला जवळून वंदन केलें आणि म्हटलें:—"मी भूमिंजय नांवाचा आहें. मला उत्तर असेंहि म्हणतात (२३). तुला पाहण्याचा हा योग आला, हें मी आपलें सुदैव समजतों; गजेंद्राच्या सोंडेसारखे बाहु धारण करणाऱ्या महाबाहो, लोहिताक्षा, धनंजया, तुझें स्वागत असो ( २४ ). माहिती नसल्यामुळें, अज्ञपणें, मी तुला जें कांहीं बोललों असेन, त्याची तूं मला क्षमा कर. ज्याअर्थीं पूर्वी आश्चर्यकारक दुष्कर कर्में तूं केलीं आहेस, त्या अर्थीं आतां माझें भय गेलें व माझी तुजवर परम प्रीति जडली आहे " ( २५ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहप्रसंगी अर्जुनाची ओळख पटण्याविषयींचा ४४ वा अध्याय संपला.

१ कृष्णाव दात-कृष्णभास्वर. अवदात म्हणजे पांढरा नव्हे. कृष्ण आकर्षणामुळेंही.

# अध्याय ४५

[ अर्जुन उत्तरास अभयदान देतो व उत्तर आपलें शौर्य दाखवितो. ]

उत्तर उवाच—आस्थाय रुचिरं वीर रथं सारथिना मया ।
कतमं यास्यसेऽनीकमुक्तो यास्याम्यहं त्वया ॥ १ ॥
अर्जुन उवाच—प्रीतोऽस्मि पुरुषव्याघ्र न भयं विद्यते तव ।
सर्वान्नुदामि ते शत्रून्रणे रणविशारद ॥ २ ॥
स्वस्थो भव महाबाहो पश्य मां शत्रुभिः सह ।
युध्यमानं विमर्देऽस्मिन्कुर्वाणं भैरवं महत् ॥ ३ ॥
एतान्सर्वानुपासंगान्क्षिप्रं बध्नीहि मे रथे ।
एकं चाऽऽहर निस्त्रिंशं जातरूपपरिष्कृतम् ॥ ४ ॥
वैशम्पायन उवाच—अर्जुनस्य वचः श्रुत्वा त्वरावानुत्तरस्तदा ।
अर्जुनस्याऽऽयुधान्गृह्य शीघ्रेणावातरत्ततः ॥ ५ ॥

**उत्तर** म्हणालाः—"मी सारथि होतों. या सुंदर रथांत बसून तूं कोणत्या सैन्यावर चाल करून जातोस तें मला सांग; मी तुला तिकडे घेऊन जातों" ( १ ).

**अर्जुन** म्हणालाः—"शूर पुरुषा, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें; तुला भय राहिलें नाहीं. रणविशारदा, तुझ्या सर्व शत्रूंची मी युद्धांत दाणादाण उडवितों ( २ ). महाबाहो, तूं स्वस्थ हो आणि शत्रूंशीं लढतांना या युद्धांत मी भयंकर करामत करितों ती पहा (३). हे सर्व भाते माझ्या रथाला लवकर बांध, आणि एक सुवर्णमंडित खड्ग मला दे" ( ४ ).

**वैशंपायन** म्हणालाः—अर्जुनाचें भाषण ऐकून उत्तरानें फार त्वरा केली; आणि अर्जुनाची आयुधें घेऊन तो त्या शमीवृक्षावरून ताबडतोब खालीं उतरला ( ५ ).

अर्जुन उवाच—अहं वै कुरुभिर्योत्स्याम्यवजेष्यामि ते पशून् ॥ ६ ॥
सङ्कल्पपक्षविक्षेपं बाहुप्राकारतोरणम् ।
त्रिदण्डतूणसम्बाधमनेकध्वजसंकुलम् ॥ ७ ॥
ज्याक्षेपणं क्रोधकृतं नेमीनिनददुन्दुभि ।
नगरं ते मया गुप्तं रथोपस्थं[1] भविष्यति ॥ ८ ॥
अधिष्ठितो मया संख्ये रथो गाण्डीवधन्वना ।
अजेयः शत्रुसैन्यानां वैराटे व्येतु ते भयम् ॥ ९ ॥
उत्तर उवाच—बिभेमि नाऽहमेतेषां जानामि त्वां स्थिरं युधि ।
केशवेनाऽपि संग्रामे साक्षादिन्द्रेण वा समम् ॥ १० ॥
इदं तु चिन्तयन्नेवं परिमुह्यामि केवलम् ।
निश्चयं चापि दुर्मेधा न गच्छामि कथंचन ॥ ११ ॥

अर्जुन म्हणाला:—"मी आतां कौरवांबरोबर युद्ध करतों व तुझ्या गाई सहज जिंकून आणतों ( ६ ). तूं अगदीं निर्भयपणें माझें सारथ्य कर. तुझें हें सारथ्याचें स्थानरूपाचें नगर मी रक्षण केलें आहे. चाकें, कणा, ध्वज, वगैरे ( या नगरांतील ) रस्त्यांच्या बाजूंस असलेले विस्तृत प्रदेश आहेत. माझे बाहु हीं त्या नगराच्या कोटाचीं तोरणें होत. रथाच्या तीन दांड्या व भाते हे गजबजलेले रस्ते. नगराच्या ध्वजांची बरोबरी करणारा हनुमान् ध्वज आहे ( ७ ). ( धनुष्याची ) दोरी हीच येथें सरबत्ती देणारी तोफ होय. क्रोधानें हें नगर शृंगारलेलें आहे. रथचक्राचा घडघडाट हाच या नगरांतील दुंदुभि होय ( ८ ). गांडीव धनुष्य घेऊन मी युद्धासाटीं रणांगणांत घातलेला रथ शत्रूच्या सैन्यास अजिंक्य आहे. विराटपुत्रा, तूं कोणतेंहि भय बाळगूं नकोस" ( ९ ).

उत्तरः—"मी ह्या शत्रूंना भीत नाहीं. तूं युद्धांत न डगमगणारा आहेस. हें मी जाणतों. तूं संग्रामांत प्रत्यक्ष केशवाची किंवा इंद्राची बरोबरी करशील(१०). परंतु तुझी ही हल्लींची स्थिति पाहून माझा जीव व्याकूळ होत आहे, व मला मूढाला ह्या स्थितीचें खरें कारण कांहींच समजत नाहीं ( ११ ).

---

1 रथोपस्थ हें सारथ्याचें स्थान नाहीं. हा दुसऱ्यानदा शब्द आला, तो चूक दिसतो. भगवद्गीतेंत (१।४७) 'रथोपस्थ उपाविशत्' या वाक्यांत रथीचें तें स्थान आहे.

एवं युक्ताङ्गरूपस्य लक्षणैः सूचितस्य च ।
केन कर्मविपाकेन क्लीबत्वमिदमागतम् ॥ १२ ॥
मन्ये त्वां क्लीबवेषेण चरन्तं शूलपाणिनम् ।
गन्धर्वराजप्रतिमं देवं वाऽपि शतक्रतुम् ॥ १३ ॥
अर्जुन उवाच—भ्रातुर्नियोगाज्ज्येष्ठस्य संवत्सरमिदं व्रतम् ।
चरामि व्रतचर्यं च सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥ १४ ॥
नाऽस्मि क्लीबो महाबाहो परवान्धर्मसंयुतः ।
समाप्तव्रतमुत्तीर्णं विद्धि मां त्वं नृपात्मज ॥ १५ ॥
उत्तर उवाच—परमोऽनुग्रहो मेऽद्य यतस्तर्को न मे वृथा ।
न हीदृशाः क्लीबरूपा भवन्ति तु नरोत्तम ॥ १६ ॥
सहायवानस्मि रणे युध्येयममरैरपि ।
साध्वसं हि प्रनष्टं मे किं करोमि ब्रवीहि मे ॥ १७ ॥
अहं ते संग्रहीष्यामि हयाञ्छत्रुरथारुजान् ।
शिक्षितो ह्यस्मि सारथ्ये तीर्थतः पुरुषर्षभ ॥ १८ ॥

(शूराच्या) अंगांत अवश्य असणारीं सर्व लक्षणें तुझ्यामध्यें उपलब्ध असतां, हें क्लीबत्व तुझ्या अंगीं कोठून आलें? (१२) क्लीबवेषानें संचार करीत असलेला तूं केवळ शंकर, गंधर्वराज, किंवा देवेंद्रच असावास असें मला भासतें" (१३).

**अर्जुन** म्हणालाः—"मी ज्येष्ठ बंधूच्या आज्ञेनें एक वर्षपर्यंत हें क्लीबव्रत आचरण करीत आहें. मी खरोखर तुला सांगतों कीं, व्रतामुळें माझें हें असें आचरण आहे ( १४ ). मी धर्मनिष्ठ व परतंत्र आहें; महाबाहो, मी नपुंसक नाहीं. राजपुत्रा, माझें हें व्रत आतां निर्विघ्नपणें समाप्त झालें आहे, हें माहीत असूं दे" ( १५ ).

**उत्तर** म्हणालाः—"नरोत्तमा, माझा तर्क खोटा नाहीं, हा माझ्यावर मोठा उपकार आज झाला. अशा प्रकारचे पुरुष नरश्रेष्ठा, कधींहि नपुंसक असावयाचे नाहींत ( १६ ). आतां मला तुझें साहाय्य आहे, ह्यामुळें मी देवांबरोबरसुद्धां युद्ध करीन. माझी सर्व भीति पळाली; मी काय करूं तें सांग ( १७ ). शत्रूच्या रथांचा भंग करणाऱ्या अश्वांचें मी निग्रहण करीन. पुरुषश्रेष्ठा, मी चांगल्या गुरूपासून सारथ्यकर्म शिकलों आहें ( १८ ).

दारुको वासुदेवस्य यथा शक्रस्य मातलिः ।
तथा मां विद्धि सारथ्ये शिक्षितं नरपुङ्गव ॥ १९ ॥
यस्य याते न पश्यन्ति भूमौ क्षिप्तं पदं पदम् ।
दक्षिणां यो धुरं युक्तः सुग्रीवसदृशो हयः ॥ २० ॥
योऽयं धुरं धुर्यवरो वामां वहति शोभनः ।
तं मन्ये मेघपुष्पस्य जवेन सदृशं हयम् ॥ २१ ॥
योऽयं काञ्चनसन्नाहः पार्ष्णिं वहति शोभनः ।
समं शैब्यस्य तं मन्ये जवेन बलवत्तरम् ॥ २२ ॥
योऽयं वहति मे पार्ष्णिं दक्षिणामभितः स्थितः ।
बलाहकादपि मतः स जवे वीर्यवत्तरः ॥ २३ ॥
त्वामेवाऽयं रथो वोढुं संग्रामेऽर्हति धन्विनम् ।
त्वं चेमं रथमास्थाय योद्धुमर्हो मतो मम ॥ २४ ॥
वैशम्पायन उवाच—ततो विमुच्य बाहुभ्यां वलयानि स वीर्यवान् ।
चित्रे काञ्चनसन्नाहे प्रत्यमुञ्चत्तदा तले ॥ २५ ॥

जसा इंद्राचा सारथि मातलि किंवा श्रीकृष्णाचा सारथि दारुक,तसा मी, नरर्षभा, सारथ्यकर्मांत कसलेला आहें असें समज ( १९ ). ह्या रथाच्या उजव्या बाजूस जोडलेला सुग्रीवासारखा घोडा चालत असतां याचें जमिनीवर पडणारें प्रत्येक पाऊल दिसत नाहीं ( २० ). हा डाव्या बाजूच्या धुरेस जोडलेला घोडा डौलानें चालतांना, ह्याचा वेग पाहून मला मेघपुष्पाची आठवण होते (२१). हा सुवर्णालंकारांनीं शृंगारलेला मागच्या बाजूला (डाव्या अंगास) जोडलेला घोडा श्रीकृष्णाच्या रथाच्या शैब्य अश्वापेक्षांहि वेगवान् भासत आहे ( २२ ). आणि हा मागच्या बाजूला उजव्या अंगास जोडलेला घोडा बलाहक अश्वापेक्षांहि वेगानें अधिक वीर्यवान् वाटतो ( २३ ). ह्या रणभूमीवर ह्या रथानें तुझ्यासारख्या धनुर्धाऱ्यासच वहावें हें उचित आहे. ह्या रथांत बसून युद्ध करण्यास योग्य असा तूंच आहेस असें मला वाटतें" (२४).

**वैशंपायन** म्हणाला:— नंतर त्या वीर्यशाली अर्जुनानें आपल्या हातांतले चुडे काढून, सुंदर, सोनेरी बंधांचे, चामड्याचे हातमोजे (तल) चढविले (२५).

कृष्णान्भङ्गिमतः केशान् श्वेतेनोद्ग्रथ्य वाससा ।
अथाऽसौ प्राङ्मुखो भूत्वा शुचिः प्रयतमानसः ।
अभिदध्यौ महाबाहुः सर्वास्त्राणि रथोत्तमे ॥ २६ ॥

ऊचुश्च पार्थं सर्वाणि प्राञ्जलीनि नृपात्मजम् ।
इमे स्म परमोदाराः किङ्कराः पाण्डुनन्दन ॥ २७ ॥

प्रणिपत्य ततः पार्थः समालभ्य च पाणिना ।
सर्वाणि मानसानीह भवतेत्यभ्यभाषत ॥ २८ ॥

प्रतिगृह्य ततोऽस्त्राणि प्रहृष्टवदनोऽभवत् ।
अधिज्यं तरसा कृत्वा गाण्डीवं व्याक्षिपद्धनुः ॥ २९ ॥

तस्य विक्षिप्यमाणस्य धनुषोऽभून्महाध्वनिः ।
यथा शैलस्य महतः शैलेनैवाऽवजघ्नतः ॥ ३० ॥

स निर्घातोऽभवद्भूमिर्दिक्षु वायुर्ववौ भृशम् ।
पपात महती चोल्का दिशो न प्रचकाशिरे ।
भ्रान्तध्वजं खं तदाऽऽसीत्प्रकम्पितमहाद्रुमम् ॥ ३१ ॥

मग त्यानें भांग करून शृंगारलेले आपले काळेभोर केंस शुभ्र वस्त्रानें गुंडाळिले, आणि पूर्वाभिमुख होऊन निर्मल अंतःकरणानें मन एकाग्र करून त्या महाबाहूनें त्या श्रेष्ठ रथांत सर्व अस्त्रांचें ध्यान केलें ( २६ ). तेव्हां राजपुत्र अर्जुनापुढें सर्व अस्त्रांच्या देवता हात जोडून म्हणाल्या:—"आम्ही सर्व उदार मनानें तुझी सेवा करण्यास सिद्ध आहों" ( २७ ). नंतर अर्जुनानें त्यांस प्रणिपात करून हस्तस्पर्श केला व म्हटलें:—"मला कारण पडलें म्हणजे येथें तुमचें स्मरण व्हावें" ( २८ ). याप्रमाणें अर्जुनानें अस्त्रांस अनुकूल केल्यावर, प्रसन्नमुख होऊन गांडीव धनुष्याला दोरी जोरानें चढवून तो धनुष्याचा टणत्कार करूं लागला ( २९ ). त्याच्या धनुष्याच्या टणत्कारानें, जसा एका मोठ्या पर्वतावर दुसरा पर्वत आपटून प्रचंड आवाज व्हावा, तसा मोठा आवाज होऊं लागला ( ३० ). त्या टणत्कारानें भूमि हादरून हालूं लागली; चोहोंकडे सोसाट्याचा वारा सुटला; मोठी उल्का पडली; दिशा प्रकाशहीन झाल्या; आणि वृक्षहि हालूं लागून, ( परसैन्यांतील ) ध्वज आकाशांत हालले ( ३१ ).

१ मानसानि प्रयोजनकाले स्मृतिगोचराणि ( नी. )

तं शब्दं कुरवोऽजानन्विस्फोटमशनेरिव ।
यदर्जुनो धनुश्श्रेष्ठं बाहुभ्यामाक्षिपद्रथे ॥ ३२ ॥

उत्तर उवाच—एकस्त्वं पाण्डवश्रेष्ठ बहूनेतान्महारथान् ।
कथं जेष्यसि संग्रामे सर्वशस्त्रास्त्रपारगान् ॥ ३३ ॥
असहायोऽसि कौन्तेय ससहायाश्च कौरवाः ।
अत एव महाबाहो भीतस्तिष्ठामि तेऽग्रतः ॥ ३४ ॥
उवाच पार्थो मा भैषीः प्रहस्य स्वनवत्तदा ॥ ३५ ॥
युध्यमानस्य मे वीर गन्धर्वैः सुमहाबलैः ।
सहायो घोषयात्रायां कस्तदाऽऽसीत्सखा मम ॥ ३६ ॥
तथा प्रतिभये तस्मिन्देवदानवसङ्कुले ।
खाण्डवे युध्यमानस्य कस्तदाऽऽसीत्सखा मम ॥ ३७ ॥
निवातकवचैः सार्धं पौलोमैश्च महाबलैः ।
युध्यतो देवराजार्थे कः सहायस्तदाऽभवत् ॥ ३८ ॥

अर्जुनानें रथांतच त्या प्रचंड धनुष्याचा आपल्या बाहूंनीं जो टणत्कार केला तो वज्रपाताच्या स्फोटासारखा कौरवांस वाटला ( ३२ ).

उत्तर म्हणाला:—"पांडवश्रेष्ठा, तूं तर एकटा आहेस, शस्त्रास्त्रांत पारंगत असलेल्या ह्या अनेक महारथांना युद्धामध्यें कसा जिंकशील? ( ३३ ) कुंतीपुत्रा, तुला कोणाची मदत नाहीं. ह्या कौरवांना किती तरी मदत आहे! याकरितां, महाभुजा, मी भीतभीतच (ह्या रथावर) तुझ्या अग्रभागीं उभा आहें" ( ३४ ). तेव्हां अर्जुन मोठ्यानें हंसून त्यास म्हणाला:—"भिऊं नकोस; वीरा, घोषयात्रेच्या प्रसंगीं मीं जेव्हां अत्यंत बलवान् गंधर्वांशीं युद्ध केलें, तेव्हां मला मदत करणारा कोण मित्र होता? (३५–३६) देवदानवांनीं गजबजून गेलेल्या त्या भयंकर खांडव वनांत ज्या वेळीं मीं युद्ध केलें, त्यावेळीं मला कोण सहाय होता? ( ३७ ) देवेन्द्राकरितां महाबलिष्ठ पौलोम व निवातकवच असुरांशीं मीं युद्ध केलें, तेव्हां माझा साहाय्यकर्ता कोण होता? ( ३८ )

स्वयंवरे तु पाञ्चाल्या राजभिः सह संयुगे ।
युध्यतो बहुभिस्तात कः सहायस्तदाऽभवत् ॥ ३९ ॥
उपजीव्य गुरुं द्रोणं शक्रं वैश्रवणं यमम् ।
वरुणं पावकं चैव कृपं कृष्णं च माधवम् ॥ ४० ॥
पिनाकपाणिनं चैव कथमेतान्न योधये ।
रथं वाहय मे शीघ्रं व्येतु ते मानसो ज्वरः ॥४१॥ [१३७८]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे उत्तरार्जुनयोर्वाक्यं नाम पञ्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४५ ॥

त्याप्रमाणेंच द्रौपदीच्या स्वयंवरांत ज्यावेळीं मी अनेक राजांबरोबर संग्राम केला, त्यावेळीं माझा साह्यकर्ता कोण होता ? ( ३९ ) गुरु द्रोण, इंद्र, कुबेर, यम, वरुण, अग्नि, कृप व माधव कृष्ण ( ४० ), त्याचप्रमाणें पिनाकपाणि ( शंकर ) ह्यांची मीं सेवा केली आहे, तेव्हां मी ह्या कौरवांशीं युद्ध करण्यास समर्थ कसा होणार नाहीं ? माझा रथ जलद चालव, तुझ्या मनाची तळमळ दूर होऊं दे "( ४१ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर-गोग्रहणप्रसंगीं 'उत्तर व अर्जुन यांचा संवाद' या नांवाचा ४५ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ४६

[ भ्यालेल्या उत्तरास अर्जुन धीर देतो. कौरवांस अपशकुन होतात. सावध राहण्याविषयीं द्रोण बजावतो. ]

---

वैशम्पायन उवाच—उत्तरं सारथिं कृत्वा शमीं कृत्वा प्रदक्षिणम् ।
आयुधं सर्वमादाय प्रययौ पाण्डवर्षभः ॥ १ ॥
ध्वजं सिंहं रथात्तस्मादपनीय महारथः ।
प्रणिधाय शमीमूले प्रायादुत्तरसारथिः ॥ २ ॥

वैशम्पायन म्हणाला:—उत्तराला सारथि करून पांडवश्रेष्ठ अर्जुनानें शमी वृक्षाला प्रदक्षिणा घातली व सर्व आयुधें घेऊन तो निघाला ( १ ). सिंहध्वज त्या रथावरून काढून, तो महारथी अर्जुनानें शमीवृक्षाच्या बुंध्याशीं ठेवला व नंतर

देवीं मायां रथे युक्तां विहितां विश्वकर्मणा ।
काञ्चनं सिंहलाङ्गूलं ध्वजं वानरलक्षणम् ॥ ३ ॥

मनसा चिन्तयामास प्रसादं पावकस्य च ।
स च तच्चिन्तितं ज्ञात्वा ध्वजे भूतान्यदेशयत् ॥ ४ ॥

सपताकं विचित्राङ्गं सोपासङ्गं महाबलम् ।
खात्पपात रथे तूर्णं दिव्यरूपं मनोरमम् ॥ ५ ॥

रथं तमागतं दृष्ट्वा दक्षिणं प्राकरोत्तदा ।
रथमास्थाय बीभत्सुः कौन्तेयः श्वेतवाहनः ॥ ६ ॥

बद्धगोधाङ्गुलित्राणः प्रगृहीतशरासनः ।
ततः प्रायादुदीचीं च कपिप्रवरकेतनः ॥ ७ ॥

स्वनवन्तं महाशङ्खं बलवानरिमर्दनः ।
प्राधमद्बलमास्थाय द्विषतां लोमहर्षणम् ॥ ८ ॥

उत्तरसारथ्यासह तो तेथून निघाला ( २ ). अर्जुनानें वानरचिन्हानें युक्त अशा पीतवर्ण ध्वजाचें मनानें चिंतन केलें. तो ध्वज म्हणजे विश्वकर्म्यानें निर्मिलेली रथाला जोडलेली दिव्य माया होती. त्या ध्वजावरील वानराचें पुच्छ सिंहासरखें नाश करणारें होतें. अर्जुनानें अग्नीच्या प्रसादाचें ( प्रसादानें मिळालेल्या रथाचें ) हि चिंतन केलें; तेव्हां तें चिंतन जाणून त्यानें ध्वजावरील भूतांस आज्ञा केली (३–४). (त्या आज्ञेप्रमाणें) तें ध्वजयुक्त वानररूप आकाशांतून एकदम खालीं आलें. त्याचीं अद्भुत अंगें, अक्षय्य भाते, विलक्षण सामर्थ्य असून त्याचें दिव्यरूप मनोहर होतें ( ५ ). त्यास रथावर आलेला पाहतांच अर्जुनानें प्रदक्षिणा घातली. नंतर रथांत बसून श्वेतवाहन कुंतीपुत्र अर्जुन ( ६ ), तलत्राण व अंगुलित्राण चढवून, धनुष्य घेऊन, वानरध्वज फडकावीत तेथून उत्तरेकडे निघाला ( ७ ). बलवान् शत्रुमर्दन अर्जुनानें मोठ्या बादाच्या शत्रूंना रोमांचित करणारा प्रचंड शंख जोरानें फुंकला ( ८ ).

---

१ सिंह–हिंस्र. ( नी. )

ततस्ते जवना धुर्या जानुभ्यामगमन्महीम् ।
उत्तरश्चापि सन्त्रस्तो रथोपस्थ उपाविशत् ॥ ९ ॥
संस्थाप्य चाऽश्वान्कौन्तेयः समुद्यम्य च रश्मिभिः ।
उत्तरं च परिष्वज्य समाश्वासयदर्जुनः ॥ १० ॥
अर्जुन उवाच—मा भैस्त्वं राजपुत्राग्र्य क्षत्रियोऽसि परन्तप ।
कथं तु पुरुषव्याघ्र शत्रुमध्ये विषीदसि ॥ ११ ॥
श्रुतास्ते शङ्खशब्दाश्च भेरीशब्दाश्च पुष्कलाः ।
कुञ्जराणां च नदतां व्यूढानीकेषु तिष्ठताम् ॥ १२ ॥
स त्वं कथमिहाऽनेन शङ्खशब्देन भीषितः ।
विवर्णरूपो वित्रस्तः पुरुषः प्राकृतो यथा ॥ १३ ॥
उत्तर उवाच—श्रुता मे शङ्खशब्दाश्च भेरीशब्दाश्च पुष्कलाः ।
कुञ्जराणां निनदतां व्यूढानीकेषु तिष्ठताम् ॥ १४ ॥
नैवंविधः शङ्खशब्दः पुरा जातु मया श्रुतः ।
ध्वजस्य चापि रूपं मे दृष्टपूर्वं नहीदृशम् ॥ १५ ॥

तेव्हां ( अग्नीनें दिलेल्या त्या ) रथाच्या वेगवान् घोड्यांनीं गुढघे टेंकले, व उत्तरहि भयभीत होऊन रथाच्या अग्रभागीं खालीं बसला ( ९ ). अर्जुनानें स्वतः लगाम हातांत घेऊन घोडे आवरले व उत्तराला पोटाशीं धरून धीर दिला ( १० ).

अर्जुन म्हणालाः—" श्रेष्ठ राजपुत्रा, तूं भिऊं नको. परंतपा, तूं क्षत्रिय आहेस. पुरुषश्रेष्ठा, शत्रूंच्यामध्यें कसा विषण्ण होतोस? ( ११ ) तूं शंखांचे व नोबदींचे पुष्कळ शब्द ऐकले आहेस; तसेंच व्यूह बांधलेल्या सैन्यांमध्यें उभे केलेल्या हत्तींच्या गर्जना तूं ऐकल्या आहेस ( १२ ). मग आतां ह्या शंखाच्या आवाजानें तो तूं कां घाबरलास ? सामान्य माणसाप्रमाणें तुझी मुद्रा निस्तेज झाली आहे ? " ( १३ ).

उत्तर म्हणालाः—"व्यूह रचलेल्या सैन्यांत गर्जत असलेल्या हत्तींच्या गर्जना व शंखांचे व नौबदींचे आवाज मी पुष्कळ ऐकले आहेत ( १४ ). परंतु अशा प्रकारचा शंखाचा शब्द पूर्वीं कधीं मीं ऐकिला नाहीं. ध्वजाचें रूपहि

धनुषश्चैव निर्घोषः श्रुतपूर्वो न मे क्वचित् ।
अस्य शङ्खस्य शब्देन धनुषो निःस्वनेन च ॥ १६ ॥
अमानुषाणां शब्देन भूतानां ध्वजवासिनाम् ।
रथस्य च निनादेन मनो मुह्यति मे भृशम् ॥ १७ ॥
व्याकुलाश्च दिशः सर्वा हृदयं व्यथतीव मे ।
ध्वजेन पिहिताः सर्वा दिशो न प्रतिभान्ति मे ॥ १८ ॥
गाण्डीवस्य च शब्देन कर्णौ मे बधिरीकृतौ ।
स मुहूर्तं प्रयातं तु पार्थो वैराटिमब्रवीत् ॥ १९ ॥

अर्जुन उवाच— एकान्तं रथमास्थाय पद्भ्यां त्वमवपीडयन् ।
दृढं च रश्मीन्संयच्छ शङ्खं ध्मास्याम्यहं पुनः ॥ २० ॥

वैशम्पायन उवाच—ततः शङ्खमुपाध्मासीद्दारयन्निव पर्वतान् ।
गुहा गिरीणां च तदा दिशः शैलांस्तथैव च ।
उत्तरश्चापि संलीनो रथोपस्थ उपाविशत् ॥ २१ ॥
तस्य शङ्खस्य शब्देन रथनेमिस्वनेन च ।
गाण्डीवस्य च घोषेण पृथिवी समकम्पत ॥ २२ ॥

मी अशाप्रकारचें पूर्वी पाहिलें नाहीं (१५). धनुष्याचा टणत्कारहि यासारखा मी यापूर्वी कोठें ऐकिला नाहीं. या शंखाच्या शब्दानें व धनुष्याच्या टणत्कारानें (१६), तसेंच ध्वजावर बसलेल्या अमानुष प्राण्यांच्या गर्जनेनें आणि रथाच्या घडघडाटानें माझें मन अगदीं गांगरून गेलें आहे (१७). दिशा सुद्धां व्याकुल झाल्या; माझें हृदय धडाडूं लागलें आहे; ध्वजानें सर्व दिशा झांकून गेल्यानें मला दिसत नाहींत(१८). गांडीवाच्या टणत्कारानें तर माझ्या कानठळ्या बसल्या आहेत!" थोडा वेळ मार्ग क्रमिल्यावर अर्जुन विराटपुत्र उत्तरास म्हणाला (१९).

**अर्जुन** म्हणाला:—"बाजूला रथ थांबवून पाय जोरानें रथावर दाबून लगाम चांगले बळकट धर. मी पुनः शंख फुंकीत आहें" (२०).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर अर्जुनानें शंख पुनः वाजविला तेव्हां जणूं पर्वतांचा चुराडाच झाला असें वाटलें, तसेंच पर्वतांच्या गुहा, पर्वत व दिशा दणाणून गेलीं! उत्तराची पुनः मुरकुंडी वळून तो रथाच्या खोलगट जागेंत बसला (२१). त्या शंखाच्या आवाजानें, रथाच्या धावांच्या घरघराटानें व

तं समाश्वासयामास पुनरेव धनञ्जयः ॥ २३ ॥
द्रोण उवाच— यथा रथस्य निर्घोषो यथा मेघ उदीर्यते ।
कम्पते च यथा भूमिर्नैषोऽन्यः सव्यसाचिनः ॥ २४ ॥
शस्त्राणि न प्रकाशन्ते न प्रहृष्यन्ति वाजिनः ।
अग्नयश्च न भासन्ते समिद्धास्तन्न शोभनम् ॥ २५ ॥
प्रत्यादित्यं च नः सर्वे मृगा घोरप्रवादिनः ।
ध्वजेषु च निलीयन्ते वायसास्तन्न शोभनम् ॥ २६ ॥
शकुनाश्चाऽपसव्या नो वेदयन्ति महद्भयम् ॥ २७ ॥
गोमायुरेष सेनायां रुदन्मध्येन धावति ।
अनाहतश्च निष्क्रान्तो महद्वेदयते भयम् ॥ २८ ॥
भवतां रोमकूपाणि प्रहृष्टान्युपलक्षये ।
ध्रुवं विनाशो युद्धेन क्षत्रियाणां प्रदृश्यते ॥ २९ ॥
ज्योतींषि न प्रकाशन्ते दारुणा मृगपक्षिणः ।
उत्पाता विविधा घोरा दृश्यन्ते क्षत्रनाशनाः ॥ ३० ॥

गांडीवाच्या टणत्कारानें पृथ्वी कांपूं लागली, तेव्हां अर्जुनानें उत्तरास पुनः धीर दिला ( २२–२३ ).

**द्रोण** म्हणाला:—"ज्याअर्थी रथाचा घडघडाट मेघ बोलल्याप्रमाणें होत आहे व भूमि कांपत आहे, त्याअर्थी हा अर्जुनावांचून दुसरा कोणी नाहीं (२४). शस्त्रांचें तेज नष्ट झालें, घोड्यांची मुद्रा खिन्न झाली, व अग्नीमध्यें समिधा टाकल्या तरी तो पेट घेत नाहीं, हें चांगलें नाहीं ( २५ ). सूर्याकडे तोंड करून आमचे सर्व मृग भयंकर शब्द करीत आहेत व कावळे आमच्या ध्वजांवर बसत आहेत, तें बरें नव्हे ( २६ ). पक्षी आम्हांला डावी घालून मोठ्या संकटाची सूचना देत आहेत ( २७ ). हा कोल्हा सैन्यांमधून ओरडत धांवत आहे व त्यास कोणीं न मारतां बाहेर पडत, मोठ्या संकटाची सूचना देत आहे ( २८ ). तुमचीं शरीरें रोमांचित दिसतात. खरोखर युद्धांत क्षत्रियांचा संहार होणार असें दिसतें (२९). ज्योतींचा प्रकाश पडत नाहीं. पशुपक्षी भयंकर आवाज काढतात. क्षत्रियांचा नाश करणारे अनेक

विशेषत इहाऽस्माकं निमित्तानि विनाशने ।
उल्काभिश्च प्रदीप्ताभिर्बाध्यते पृतना तव ।
वाहनान्यप्रहृष्टानि रुदन्तीव विशाम्पते ॥ ३१ ॥

उपासते च सैन्यानि गृध्रास्तव समन्ततः ।
तप्स्यसे वाहिनीं दृष्ट्वा पार्थबाणप्रपीडिताम् ।
पराभूता च वः सेना न कश्चिद्योद्धुमिच्छति ॥ ३२ ॥

विवर्णमुखभूयिष्ठाः सर्वे योधा विचेतसः ।
गाः सम्प्रस्थाप्य तिष्ठामो व्यूढानीकाः प्रहारिणः ॥ ३३ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि उत्तरगोग्रहे औत्पातिको नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥ [ १४११ ]

भयंकर उत्पात दिसूं लागले ( ३० ). विशेषेंकरून येथें आमचा नाश दर्शविणारीं चिन्हें दिसतात. तुझ्या सैन्यावर जळजळीत उल्का तुझ्या सैन्याला पीडीत आहेत. अश्वादिक सर्व वाहनें खिन्न होऊन राजा दुर्योधना, जणु रडत आहेत (३१). तुझ्या सैन्याच्या सभोंवतीं गिधाडें येऊन बसत आहेत. अर्जुनाच्या बाणांनीं आपलें सैन्य जर्जर केलेलें पाहून तुला संताप होईल. तुझें सर्व सैन्य पराजय झाल्यासारखें (खिन्न) दिसत असून ह्यांतील कोणीहि युद्ध करूं इच्छित नाहीं ( ३२ ). सर्व योद्धयांचीं मनें भ्रमित होऊन मुखें निस्तेज झालीं आहेत. गाईंना पुढें पाठवून व्यूह रचून आपण युद्धाला उभे राहूं " ( ३३ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर-गोग्रहण-प्रसंगीं औत्पातिक नांवाचा ४६ वा अध्याय संपला.



# अध्याय ४७

[ दुर्योधन घडलेल्या गोष्टींचें वर्णन करतो, व कर्ण अर्जुनाच्या व अपशकुनांच्या वर्णनानें चिडून द्रोणाची निंदा करितो. ]

---

**वैशम्पायन उवाच**—अथ दुर्योधनो राजा समरे भीष्ममब्रवीत् ।

द्रोणं च रथशार्दूलं कृपं च सुमहारथम् ॥ १ ॥

उक्तोऽयमर्थ आचार्यौ मया कर्णेन चाऽसकृत् ।

पुनरेव प्रवक्ष्यामि न हि तृप्यामि तं ब्रुवन् ॥ २ ॥

पराभूतैर्हि वस्तव्यं तैश्च द्वादश वत्सरान् ।

वने जनपदेऽज्ञातैरेष एव पणो हि नः ॥ ३ ॥

तेषां न तावन्निर्वृत्तं वर्तते तु त्रयोदशम् ।

अज्ञातवासो बीभत्सुरथास्माभिः समागतः ॥ ४ ॥

अनिवृत्ते तु निर्वासे यदि बीभत्सुरागतः ।

पुनर्द्वादश वर्षाणि वने वत्स्यन्ति पाण्डवाः ॥ ५ ॥

लोभाद्वा ते न जानीयुरस्मान्वा मोह आविशत् ।

हीनातिरिक्तमेतेषां भीष्मो वेदितुमर्हति ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर दुर्योधनराजा त्या युद्धप्रसंगीं भीष्म, रथिश्रेष्ठ द्रोण व महारथ कृप यांस म्हणाला:-( १ ) " उभयतां आचार्यांना मीं व कर्णानें ही गोष्ट अनेकदां सांगितली आहे. पुनः तीच गोष्ट सांगतों. ती सांगतांना माझी तृप्ति होत नाहीं ( २ ). ( द्यूतामध्यें ) पराजित झाल्यास पांडवांनीं बारा वर्षेंपर्यंत वनांत रहावें व ( नंतर एक वर्ष ) कोणत्या तरी एखाद्या देशांत अज्ञातवास करावा, असाच आमचा पण झालेला आहे ( ३ ). अजून त्यांनीं तो पण सिद्धीस नेला नाहीं. अद्यापि अज्ञातवासाचें तेरावें वर्ष उरलें आहे आणि अज्ञातवासांत अर्जुन आमच्याशीं युद्ध करण्यास आला आहे ( ४ ). जर ते अज्ञातवासाचे दिवस संपल्याशिवाय अर्जुन आला असेल, तर पांडव पुनः बारा वर्षें वनवास करतील ( ५ ). लोभामुळें जर त्यांस हें भान राहिलें नसेल, किंवा (कालगणनेविषयीं) आमचीच समजूत चुकत असेल, तर ह्यांत जें कांहीं कमीजास्त असेल तें जाणण्यास भीष्म समर्थ आहे ( ६ ).

अर्थानां च पुनर्द्वैधे नित्यं भवति संशयः।
अन्यथा चिन्तितो ह्यर्थः पुनर्भवति सोऽन्यथा ॥ ७ ॥
उत्तरं मार्गमाणानां मत्स्यानां च युयुत्सताम्।
यदि बीभत्सुरायातस्तदा कस्याऽपराध्नुमः ॥ ८ ॥
त्रिगर्त्तानां वयं हेतोर्मत्स्यान्योद्धुमिहाऽऽगताः।
मत्स्यानां विप्रकारांस्ते बहूनस्मानकीर्त्तयन् ॥ ९ ॥
तेषां भयाभिभूतानां तदस्माभिः प्रतिश्रुतम्।
प्रथमं तैर्ग्रहीतव्यं मत्स्यानां गोधनं महत् ॥
सप्तम्यामपराह्णे वै तथा तैस्तु समाहितम् ॥ १० ॥
अष्टम्यां पुनरस्माभिरादित्यस्योदयं प्रति।
इमा गावो ग्रहीतव्या गते मत्स्ये गवां पदम् ॥ ११ ॥
ते वा गाश्चाऽऽनयिष्यन्ति यदि वा स्युः पराजिताः।
अस्मान्वा ह्युपसन्धाय कुर्युर्मत्स्येन सङ्गतम् ॥ १२ ॥

प्रत्येक विषयाच्या दोन बाजू असल्यामुळें त्यांच्यासंबंधीं संशय नेहमीं रहातो. एक प्रकारानें विचार केलेला विषय, तो पुन्हां दुसऱ्या प्रकारचा निघतो (७). उत्तरेकडील गाई हरण करण्याच्या इच्छेनें आम्ही मत्स्यदेशाच्या वीरांशीं लढत असतांनां अर्जुन पुढें आला तर आम्हीं कोणाचा अपराध केला? (८). आम्ही येथें त्रिगर्तांकरितां मत्स्यांशीं युद्ध करण्यास आलों. त्यांनीं 'मत्स्य लोक आपणास फार पीडा करतात' असें आम्हांला सांगितलें (९). त्या भयग्रस्त लोकांना आम्हीं तसें (मत्स्यांशीं युद्ध करूं असें) वचन दिलें. प्रथम त्यांनीं (त्रिगर्तांनीं) मत्स्यांचें मोठें गोधन सप्तमीच्या दिवशीं तिसरे प्रहरीं हरण करावयाचें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं केलें (१०). आणि अष्टमीच्या दिवशीं आम्हीं सूर्योदयाबरोबर—(दक्षिणेकडच्या) गाईंच्या मागें मत्स्यराज विराट गेला असतां—ह्या गाई धरावयाच्या होत्या (११). (आतां, तिकडे) ते त्रिगर्त विराटाच्या गाई हरण करून आणतील, किंवा त्यांचा पराजय होईल, अथवा आम्हांशीं दगा करून ते विराटाशीं तहहि करतील (१२).

अथवा तानपाहाय मत्स्यो जनपदैः सह ।
सर्वया सेनया सार्धं संवृतो भीमरूपया ॥
आयातः केवलं रात्रिमस्मान्योद्धुमिहाऽऽगतः ॥ १३ ॥
तेषामेव महावीर्यः कश्चिदेष पुरस्सरः ।
अस्माञ्जेतुमिहाऽऽयातो मत्स्यो वापि स्वयं भवेत् ॥ १४ ॥
यद्येष राजा मत्स्यानां यदि बीभत्सुरागतः ।
सर्वैर्योद्धव्यमस्माभिरिति नः समयः कृतः ॥ १५ ॥
अथ कस्मात्स्थिता ह्येते रथेषु रथसत्तमाः ।
भीष्मो द्रोणः कृपश्चैव विकर्णो द्रौणिरेव च ॥ १६ ॥
सम्भ्रान्तमनसः सर्वे काले ह्यस्मिन्महारथाः ।
नाऽन्यत्र युद्धाच्छ्रेयोऽस्ति तथाऽऽत्मा प्रणिधीयताम् ॥ १७ ॥
आच्छिन्ने गोधनेऽस्माकमपि देवेन वज्रिणा ।
यमेन वाऽपि सङ्ग्रामे को हास्तिनपुरं व्रजेत् ॥ १८ ॥
शरैरेभिः प्रणुन्नानां भग्नानां गहने वने ।
को हि जीवेत्पदातीनां भवेदश्वेषु संशयः ॥ १९ ॥

अथवा त्रिगर्तांचा पाठलाग सोडून आपल्या प्रचंड सर्व सैन्यासह मत्स्यराज विराट आपले लोक घेऊन रात्रींच परत फिरला असेल व आमच्याबरोबर लढण्यास येथें आला असेल ( १३ ). त्यांच्यापैकींच हा कोणी महावीर्यशाली पुरुष पुढें होऊन आम्हांस जिंकण्यासाठीं येथें आला असेल, किंवा हा स्वतः विराटराजाहि असेल ( १४ ). हा आलेला पुरुष जरी विराटराजा खुद्द असला किंवा अर्जुन जरी असला, तरी सर्वांनीं मिळून युद्ध करावयाचें असा आपला ठराव झाला आहे ( १५ ). भीष्म, द्रोण, कृप, विकर्ण, अश्वत्थामा, हे महारथी ह्या समयीं सर्व, चित्त गोंधळून, रथांत कशास बसले आहेत ? युद्धावांचून आतां हित नाहीं, यासाठीं सर्वांनीं चित्त स्वस्थ ठेवावें (१६–१७).यावेळीं इंद्र किंवा यम (सुद्धां) जर आम्हांपासून ह्या गाई छिनून घेऊन जाईल तर हस्तिनापुरास कोण जाईल ? ( १८ ). या बाणांच्या तडाक्यांतून या गहन वनांत ( शत्रुपक्षांतील) पायदळापैकीं कोण जिवंत राहील? घोडेस्वारासंबंधानें मात्र शंका असेल"(१९).

दुर्योधनवचः श्रुत्वा राधेयस्त्वब्रवीद्वचः ।
आचार्यं पृष्ठतः कृत्वा तथा नीतिर्विधीयताम् ॥ २० ॥
जानाति हि मतं तेषामतस्त्रासयतीह नः ।
अर्जुने चाऽस्य सम्प्रीतिमधिकामुपलक्षये ॥ २१ ॥
तथा हि दृष्ट्वा बीभत्सुमुपायान्तं प्रशंसति ।
यथा सेना न भज्येत तथा नीतिर्विधीयताम् ॥ २२ ॥
हेषितं ह्युपशृण्वाने द्रोणे सर्वं विघट्टितम्[1] ।
अदेशिका महारण्ये ग्रीष्मे शत्रुवशं गताः[2] ॥
यथा न विभ्रमेत्सेना तथा नीतिर्विधीयताम् ॥ २३ ॥
इष्टा हि पाण्डवा नित्यमाचार्यस्य विशेषतः ।
आसयन्[3]परार्थाश्च कथ्यते स्म स्वयं तथा ॥ २४ ॥

याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण ऐकून कर्ण म्हणालाः—" द्रोणाचार्याला पाठीमागें सारून, ( आपण जशी मसलत पूर्वी ठरविली आहे ) तसें करण्यांत यावें ( २० ). त्यांना ( पांडवांना ) काय प्रिय आहे हें हा जाणतो, म्हणून आम्हांला येथें भीति दाखवित आहे. आणि अर्जुनावर ह्याची प्रीति अधिक आहे असें मला दिसतें (२१). त्याप्रमाणें ' अर्जुन आला आहे ' असें पाहून यानें त्याची प्रशंसा चालविली आहे; तरी आपल्या सैन्याची फांकाफाक होणार नाहीं अशाच व्यवस्था केली पाहिजे(२२). अर्जुनाच्या घोड्यांचें खिंकाळणें द्रोणानें ऐकिलें कीं सर्व बिघडलेंच ! ह्या ग्रीष्म ऋतूमध्यें गहन अरण्यांत आपल्या सैन्याची दाणादाण होऊन तें शत्रूच्या तडाक्यांत सांपडून गोंधळणार नाहीं अशी व्यवस्था केली पाहिजे ( २३ ). नेहमीं या द्रोणाचार्यांचें विशेष प्रेम पांडवांवर आहे. त्या स्वार्थसाधु पांडवांनीं द्रोणास मुद्दाम तुझ्याजवळ ठेविलें आहे व तसें (त्याच्या) स्वतःच्या बोलण्यावरूनच उघड आहे ( २४ ).

१ विघट्टितं विचालितं सामर्थ्यमिति शेषः ( नी. ) २ गताः हा ( नी. ) पाठ चुकीचा वाटतो. ३ आसयन् समीपे स्थापितवन्तः ( नी. )

अश्वानां ह्रेषितं श्रुत्वा कः प्रशंसापरो भवेत् ।
स्थाने वाऽपि व्रजन्तो वा सह ह्रेषन्ति वाजिनः ।। २५ ।।
सदा च वायवो वान्ति नित्यं वर्षति वासवः ।
स्तनयित्नोश्च निर्घोषः श्रूयते बहुशस्तथा ।। २६ ।।
किमत्र कार्यं पार्थस्य कथं वा स प्रशस्यते ।
अन्यत्र कामाद्द्वेषाद्वा रोषादस्मासु केवलात् ।। २७ ।।
आचार्या वै कारुणिकाः प्राज्ञाश्चाऽपापदर्शिनः ।
नैते महाभये प्राप्ते सम्प्रष्टव्याः कथञ्चन ।। २८ ।।
प्रासादेषु विचित्रेषु गोष्ठीषूपवनेषु च ।
कथा विचित्राः कुर्वाणाः पण्डितास्तत्र शोभनाः ।। २९ ।।
बहून्याश्चर्यरूपाणि कुर्वाणा जनसंसदि ।
इष्वास्त्रे चोपसन्धाने पण्डितास्तत्र शोभनाः ।। ३० ।।
परेषां विवरज्ञाने मनुष्यचरितेषु च ।
हस्त्यश्वरथचर्यासु खरोष्ट्राजाविकर्मणि ।। ३१ ।।

घोड्यांच्या खिंकाळण्यावरून ( द्रोणाशिवाय ) कोण ( पांडवांच्या ) स्तुतीला आरंभ करील ? घोडे ठाणावर असतांना किंवा वाट चालतांना एकत्र नेहमींच खिंकाळतात ( २५ ). वारेहि नेहमीं वाहतात, इंद्राकडून पर्जन्याची वृद्धिहि नेहमीं होते, तशीच मेघांची गर्जनाहि पुष्कळदां ऐकूं येते(२६). ह्यांत अर्जुनाचें कर्तृत्व तें कोणतें ? आणि ( द्रोणाचार्यांचें पांडवांविषयीं ) प्रेम व ( आम्हांविषयीं ) द्वेष किंवा संताप यांशिवाय त्याची प्रशंसा कां करावी ? (२७) आचार्य म्हटले म्हणजे ते कारुणिक व ज्ञानी असून त्यांच्या मनाला ( हिंसा वगैरे ) पापबुद्धि दिसावयाची नाहीं. महान् संकटाचे वेळीं यांस मुळींच विचारूं नये ( २८ ). हे विद्वान् राजवाड्यांत गोष्टींच्या आखाड्यांत, किंवा बागबगीचांत विचित्र गोष्टी करतांना चांगले शोभतात ( २९ ). पुष्कळ प्रकारचे आश्चर्यकारक विनोद करितांना लोकांच्या सभेंत किंवा यज्ञाचें आयुध ( कपाल वगैरे ) याची ( प्रोक्षण वगैरे ) व्यवस्था चालली असतां, अशा प्रसंगीं हे पंडित शोभतात ( ३०. ). दुसऱ्या याज्ञिकांचीं व्यंगें शोधण्यांत मनुष्यांच्या आचरणांतील दोष हुडकण्यांत, हत्ती, घोडे, किंवा रथ ह्यांवर आरूढ होऊन फिरण्यांत, गर्दभ, उंट बोकड, मेंढा ह्यांची चिकित्सा वगैरे करण्यांत ( हे बरे शोभतात ) ( ३१ )

गोधनेषु प्रतोलीषु वरद्वारमुखेषु च ।
अन्नसंस्कारदोषेषु पण्डितास्तत्र शोभनाः ॥ ३२ ॥
पण्डितान्पृष्ठतः कृत्वा परेषां गुणवादिनः ।
विधीयतां तथा नीतिर्यथा वध्यो भवेत्परः ॥ ३३ ॥
गावश्च संप्रतिष्ठाप्य सेनां व्यूह्य समन्ततः ।
आरक्षाश्च विधीयन्ता यत्र योत्स्यामहे परान् ॥३४॥[१४४५]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि उत्तरगोग्रहे दुर्योधनवाक्ये सप्तचत्वारिंशोऽध्यायः॥४७॥

गोधनाच्या संबंधांत, घराबाहेर किंवा वेशीबाहेर (बलिदान ठेवण्याचे बाबतींत), तसेंच अन्नावर करावयाचे ( वैश्वदेवादि ) संस्कार किंवा अन्नांतील दोष इत्याकांची चर्चा करण्यांत हे पंडित शोभतात ( ३२ ). शत्रूंची प्रशंसा करणाऱ्या ह्या पंडितांस पाठीमागें सारून, ज्या मसलतीनें शत्रूचा विनाश करतां येईल ती मसलत योजण्यांत यावी ( ३३ ). गाई चालत्या करून सभोंवतीं सेना रचून रक्षक ठेवावे व मग शत्रूशीं युद्ध करूं ( ३४ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं दुर्योधनाच्या भाषणाविषयीं ४७ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ४८

कर्ण आपल्या पराक्रमाचें वर्णन करितो. ]

---

**कर्ण उवाच—** सर्वानायुष्मतो भीतान्सन्त्रस्तानिव लक्षये ।
अयुद्धमनसश्चैव सर्वांश्चैवाऽनवस्थितान् ॥ १ ॥
यद्येष राजा मत्स्यानां यदि बीभत्सुरागतः ।
अहमावारयिष्यामि वेलेव मकरालयम् ॥ २ ॥

**कर्ण** म्हणाला:—" ( भीष्मादि ) सर्व चिरंजीव योद्धे भयभीत होऊन घाबरून गेल्यासारखे दिसत आहेत व सर्वांचें मन चंचल झालें असून युद्ध करण्याचें कोणाच्या मनांत नाहीं ( १ ). जरी हा मत्स्यांचा राजा किरीट किंवा अर्जुन आला असला, तरी मी त्याला—किनारा जसा

१ पाठांतर— गावश्च संप्रतिष्ठन्ताम् ( नी. )—' गाईना निघूं द्या. '

मम चापप्रयुक्तानां शराणां नतपर्वणाम् ।
नाऽवृत्तिर्गच्छतां तेषां सर्पाणामिव सर्पताम् ॥ ३ ॥

रुक्मपुङ्खाः सुतीक्ष्णाग्रा मुक्ता हस्तवता मया ।
छादयन्तु शराः पार्थं शलभा इव पादपम् ॥ ४ ॥

शराणां पुङ्खसक्तानां मौर्व्याऽभिहतया दृढम् ।
श्रूयतां तलयोः शब्दो भेर्योराहतयोरिव ॥ ५ ॥

समाहितो हि बीभत्सुर्वर्षाण्यष्टौ च पञ्च च ।
जातस्नेहश्च युद्धेऽस्मिन्मयि सम्प्रहरिष्यति ॥ ६ ॥

पात्रीभूतश्च कौन्तेयो ब्राह्मणो गुणवानिव ।
शरौघान्प्रतिगृह्णातु मया मुक्तान्सहस्रशः ॥ ७ ॥

एष चैव महेष्वासस्त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
अहं चापि नरश्रेष्ठादर्जुनान्नाऽवरः क्वचित् ॥ ८ ॥

समुद्राला अडवितो तसा--अडवतों ( २ ). माझ्या धनुष्यापासून सुटलेले अणकुचीदार बाण एकदां सर्पाप्रमाणें सरसर सुटले कीं ते भलत्या ठिकाणीं जात नाहींत ( ३ ). सोनेरी पंखांचे जलाल बाण मी कौशल्ययुक्त हातानें सोडीन, ते वृक्षास छादून टाकणाऱ्या टोळांप्रमाणें त्या अर्जुनाला झांकून टाकतील ( ४ ). सक्तपुंखं बाणांवर माझ्या प्रत्यंचेचे जोराचे प्रहार होतांना माझ्या तळहाताचा, नौबदी झडत असल्याप्रमाणें, घोर ध्वनि ऐकूं येईल ( ५ ). आठ व पांच ( तेरा ) वर्षें स्वस्थ बसलेला अर्जुन युद्ध करण्याविषयीं उत्सुक होऊन ह्या युद्धामध्यें माझ्यावर प्रहार करील ( ६ ). आणि गुणवान् ब्राह्मणाप्रमाणें सत्पात्र असलेला कुंतीपुत्र अर्जुन मी सोडलेले हजारों बाणांचे ओघ ( दक्षिणा म्हणून ) घेईल ( ७ ). या महाधनुर्धारी अर्जुनाची त्रैलोक्यांत ख्याति आहे; परंतु मीहि नरश्रेष्ठ अर्जुनाहून कांहीं कमी नाहीं ( ८ ).

१ अवृत्तिः-लक्ष्यच्युतिः ( नी. ) २ पुंखसक्त-सक्तपुंख ( नी. ) अर्थ स्पष्ट नाहीं.

इतश्चेतश्च निर्मुक्तैः काञ्चनैर्गार्ध्रवाजितैः ।
दृश्यतामद्य वै व्योम खद्योतैरिव संवृतम् ॥ ९ ॥
अद्याऽहमृणमक्षय्यं पुरा वाचा प्रतिश्रुतम् ।
धार्त्तराष्ट्राय दास्यामि निहत्य समरेऽर्जुनम् ॥ १० ॥
अन्तरा च्छिद्यमानानां पुङ्खानां व्यतिशीर्यताम् ।
शलभानामिवाऽऽकाशे प्रचारः सम्प्रदृश्यताम् ॥ ११ ॥
इन्द्राशनिसमस्पर्शं महेन्द्रसमतेजसम् ।
अर्दयिष्याम्यहं पार्थमुल्काभिरिव कुञ्जरम् ॥ १२ ॥
रथादतिरथं शूरं सर्वशस्त्रभृतां वरम् ।
विवशं पार्थमादास्ये गरुत्मानिव पन्नगम् ॥ १३ ॥
तमग्निमिव दुर्धर्षमसिशक्तिशरेन्धनम् ।
पाण्डवाग्निमहं दीप्तं प्रदहन्तमिवाऽऽहितम् ॥ १४ ॥
अश्ववेगपुरोवातो रथौघस्तनयित्नुमान् ।
शरधारो महामेघः शमयिष्यामि पाण्डवम् ॥ १५ ॥

गिधाडाच्या पिसांचे पंख असणाऱ्या सुवर्ण बाणांची मी आज सर्वत्र इतकी वृष्टि करितों कीं, सर्वत्र अंतरिक्षांत काजवेच पसरले आहेत असा भास होईल ( ९ ). आज मी अर्जुनाला युद्धांत ठार करून दुर्योधनाला पूर्वी कबूल केलेलें फिटण्यास अशक्य असें ऋण देऊन टाकीन ( १० ). ( आज ) आकाशांत मध्यंतरीं तुटून इकडे तिकडे उडणाऱ्या बाणांची अशी कांहीं गर्दी उसळलेली दिसेल, कीं जणूं टोळांचे थवेच्या थवे अंतरिक्षांत संचार करीत आहेत (११). वज्राप्रमाणें असह्य स्पर्शाचा इंद्राप्रमाणें तेजस्वी अशा अर्जुनास, हत्तीस जसे तोळ्यांनीं त्रासवून सोडतात तसा मी त्रासवून सोडीन ( १२ ). ज्याप्रमाणें गरुड सर्पास पकडतो त्याप्रमाणें मी त्या महाशस्त्रास्त्रविद् शूर, अतिरथ अर्जुनास रथांतून विवश करून उचलीन ( १३ ). त्या अग्नीप्रमाणें अजिंक्य, खड्ग, शक्ति व बाण या इंधनांनीं चेतविलेल्या, व शत्रूंस जाळणाऱ्या प्रदीप्त पांडवअग्नीस मी ( १४ ), अश्ववेगरूप पूर्व दिशेचा वारा, रथघोषरूप गर्जना ह्यांसह, शरधारा सोडणारा महामेघ, शांत करून टाकीन ( १५ ).

१ गृध्रपक्षैर्वाजो वेगः शब्दः पक्षो वा संजातो येषां तैः ( नी. )

मत्कार्मुकविनिर्मुक्ताः पार्थमाशीविषोपमाः ।
शराः समभिसर्पन्तु वल्मीकमिव पन्नगाः ॥ १६ ॥
सुतेजनै रुक्मपुङ्खैः सुधौतैर्नतपर्वभिः[१] ।
आचितं पश्य कौन्तेयं कार्णिकारैरिवाऽचलम् ॥ १७ ॥
जामदग्न्यान्मया ह्यस्त्रं यत्प्राप्तमृषिसत्तमात् ।
तदुपाश्रित्य वीर्यं च युध्येयमपि वासवम् ॥ १८ ॥
ध्वजाग्रे वानरस्तिष्ठन्भल्लेन निहतो मया ।
अद्यैव पततां भूमौ विनदन्भैरवान्रवान् ॥ १९ ॥
शत्रोर्मया विपन्नानां भूतानां ध्वजवासिनाम् ।
दिशः प्रतिष्ठमानानामस्तु शब्दो दिवङ्गमः ॥ २० ॥
अद्य दुर्योधनस्याऽहं शल्यं हृदि चिरास्थितम् ।
समूलमुद्धरिष्यामि बीभत्सुं पातयन्रथात् ॥ २१ ॥

माझ्या धनुष्यापासून सुटलेले सर्पतुल्य भयंकर बाण, साप जसे (मुंग्यांचे) वारुळांत शिरतात, तसे अर्जुनाच्या शरीरांत घुसूं द्या (१६). कार्णिकार वृक्षांनीं जसा पर्वत आच्छादून जावा, तसा आज अर्जुन माझ्या पाणीदार, सुवर्णपुंख, अणकुचीदार[१] व झगझगीत बाणांनीं आच्छादून गेलेला पहा (१७). ऋषिश्रेष्ठ परशुरामापासून मिळालेल्या अस्त्रानें व (माझ्या) पराक्रमानें मी आज इंद्राशीं देखील युद्ध करीन (१८). अर्जुनाच्या ध्वजावर बसलेला वानर माझ्या भाल्याच्या बाणाच्या प्रहारानें छिन्न होऊन भयंकर आक्रोश करीत आजच भूमीवर कोसळो (१९). शत्रूच्या ध्वजावर असलेल्या भूतांची मी इतकी त्रेधा उडवीन कीं, ते दशदिशांस पळ काढतील व पळतांना जो आवाज होईल तो स्वर्गापर्यंत ऐकूं जाईल (२०). मी आज अर्जुनास रथांतून खालीं पाडून दुर्योधनाच्या हृदयांत फार दिवस सलत असलेला कांटा समूळ काढून टाकतों (२१).

१ नतपर्वभिः समीकृतग्रन्थिप्रदेशैः (नी.) अर्थ स्पष्ट नाहीं. बाण अलीकडे प्रचारांत नसल्यानें असें आहे.

हताश्वं विरथं पार्थं पौरुषे पर्यवस्थितम् ।
निःश्वसन्तं यथा नागमद्य पश्यन्तु कौरवाः ॥ २२ ॥
कामं गच्छन्तु कुरवो धनमादाय केवलम् ।
रथेषु वापि तिष्ठन्तो युद्धं पश्यन्तु मामकम् ॥ २३ ॥ [१४६८]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे कर्णविकत्थने अष्टचत्वारिंशोऽध्यायः ॥४८॥

पराक्रमासाठीं स्थिर उभा राहिलेल्या अर्जुनाच्या रथाचे घोडे मारून त्यास मी विरथ केलें म्हणजे तो सर्पाप्रमाणें सुस्कार टाकतांना कौरव पाहोत ( २२ ). कौरववीरांनो, तुम्ही केवळ गोधन घेऊन (खुशाल) जावें, किंवा रथांत स्वस्थ उमे राहून माझें युद्ध पाहावें" ( २३ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं कर्णाच्या आत्मस्तुतीविषयीं ४८ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ४९

[ कृप कर्णाची कानउघाडणी करून अर्जुनाशीं देशकालपरिस्थितीप्रमाणें सामना करण्याची युक्ति सांगतो. ]

कृप उवाच-- सदैव तव राधेय युद्धे क्रूरतरा मतिः ।
नाऽर्थानां प्रकृतिं वेत्सि नाऽनुबन्धमवेक्षसे ॥ १ ॥
मायाे हि बहवः सन्ति शास्त्रमाश्रित्य चिन्तिताः ।
तेषां युद्धं तु पापिष्ठं वेदयन्ति पुराविदः ॥ २ ॥

**कृप** म्हणाला:—" कर्णा, युद्धासंबंधानें तुझें मत नेहमींच अति क्रूर असतें; प्राप्तव्य अर्थाचें स्वरूप व त्यांचा भावी परिणाम ह्यांकडे तूं मुळींच लक्ष देत नाहींस ( १ ). शास्त्राच्या आधारानें विचार करून काढलेल्या ( शकुनीच्या कपटद्यूतासारख्या ) माया पुष्कळच आहेत. त्यांत युद्ध अत्यंत पापकारक म्हणून इतिहास जाणणाऱ्यांचा अभिप्राय आहे ( २ ).

१ मायाः-कपटानि ( नी. ) अर्थ नीट जुळत नाहीं.

देशकालेन संयुक्तं युद्धं विजयदं भवेत् ।
हीनकाले तदेवेह फलं न लभते पुनः ।
देशे काले च विक्रान्तं कल्याणाय विधीयते ॥ ३ ॥
आनुकूल्येन कार्याणामन्तरं[1] संविधीयते ।
भारं हि रथकारस्य न व्यवस्यन्ति पण्डिताः ॥ ४ ॥
परिचिन्त्य तु पार्थेन सन्निपातो न नः क्षमः ।
एकः कुरूनभ्यगच्छदेकश्चाऽग्निमतर्पयत् ॥ ५ ॥
एकश्च पञ्च वर्षाणि ब्रह्मचर्यमधारयत् ।
एकः सुभद्रामारोप्य द्वैरथे कृष्णमाह्वयत् ॥ ६ ॥
एकः किरातरूपेण स्थितं रुद्रमयोधयत् ।
अस्मिन्नेव वने पार्थो हृतां कृष्णामवाजयत् ॥ ७ ॥
एकश्च पञ्च वर्षाणि शक्रादस्त्राण्यशिक्षत ।
एकः सोऽयमरिं जित्वा कुरूणामकरोद्यशः ॥ ८ ॥

देशकाल परिस्थितीची अनुकूलता असेल तर युद्ध विजय देणारें होतें, विपरीत काळांत त्यापासून कांहीं फळ मिळत नाहीं. देश व काळ यांची परिस्थिति पाहून केलेला पराक्रम कल्याणप्रद होत असतो ( ३ ). देशकाळाच्या परिस्थितीवरच कार्याचें सफलत्व अवलंबून असतें. ( मी एक बळकट रथ तयार केला आहे असें रथकारानें—सुतारानें—म्हटलें, तर तेवढ्या ) रथकाराच्या बोलण्यावर भार (विश्वास) ठेवून शहाणे लोक ( युद्ध करण्याचा ) निश्चय करीत नाहींत ( ४ ). एकंदर परिस्थितीचा विचार करितां अर्जुनाशीं युद्ध करणें आपणांस उचित नाहीं. हा एकटा कौरवांवर चाल करून आला आहे; पण ह्यानें एकट्यानेंच ( खांडव वनांत ) अग्नीची तृप्ति केली. (५) एकट्यानेंच पांच वर्षें ब्रह्मचर्य व्रत आचरिलें; एकट्यानेंच सुभद्रेला रथांत घालून द्वैरथ युद्ध करण्यासाठीं कृष्णास पाचारिलें ( ६ ). एकट्यानेंच भिल्लाचे रूपानें आलेल्या शंकराशीं युद्ध केलें; ह्याच वनांत ( जयद्रथानें ) हरण केलेल्या द्रौपदीस परत जिंकून एकट्यानेंच आणिलें ( ७ ). एकट्यानेंच पांच वर्षेंपर्यंत इंद्राजवळ राहून त्यापासून अस्त्रविद्या मिळविली; ह्यानें एकट्यानेंच शत्रूंना जिंकून कौरवांचें नांव राखलें ( ८ ).

1 अन्तरं=तादर्थ्ये फलवत्त्वमिति यावत् ( नी. ) असा ओढून ताणून निघतो.

एको गन्धर्वराजानं चित्रसेनमरिन्दमः ।
विजिग्ये तरसा सङ्ख्ये सेनां प्राप्य सुदुर्जयाम् ॥ ९ ॥
तथा निवातकवचाः कालखञ्जाश्च दानवाः ।
दैवतैरप्यवध्यास्ते एकेन युधि पातिताः ॥ १० ॥
एकेन हि त्वया कर्ण किं नामेह कृतं पुरा ।
एकैकेन यथा तेषां भूमिपाला वशे कृताः ॥ ११ ॥
इन्द्रोऽपि हि न पार्थेन संयुगे योद्धुमर्हति ।
यस्तेनाऽऽशंसते योद्धुं कर्तव्यं तस्य भेषजम् ॥ १२ ॥
आशीविषस्य क्रुद्धस्य पाणिमुद्यम्य दक्षिणम् ।
अवमुच्य प्रदेशिन्या दंष्ट्रामादातुमिच्छसि ॥ १३ ॥
अथवा कुञ्जरं मत्तमेक एव चरन्वने ।
अनङ्कुशं समारुह्य नगरं गन्तुमिच्छसि ॥ १४ ॥
समिद्धं पावकं चैव घृतमेदोवसाहुतम् ।
घृताक्तश्चीरवासास्त्वं मध्येनोत्सर्तुमिच्छसि ॥ १५ ॥

ह्या शत्रुदमनानें एकट्यानेंच मोठ्या पराक्रमानें अजिंक्य सेनेचा युद्धांत पराजय करून गंधर्वराज चित्रसेनाला जिंकिलें ( ९ ). तसेंच देवांनाहि दुर्जय झालेल्या निवातकवच व कालखंज दानवांस ह्यानें एकट्यानेंच युद्धांत पाडिलें ( १० ). ( पांडवांपैकीं ) प्रत्येक जणानें एकएकट्यानेंच जसे राजे जिंकिले आहेत, तसे कर्णा, तूं एकट्यानें पूर्वी खरोखर काय बरें केलें आहेस ? ( ११ ). समरभूमीवर अर्जुनाशीं युद्ध करण्यास, वास्तविक, इंद्रदेखील समर्थ नाहीं. ( तेव्हां ) जो त्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत असेल, (त्याचा भ्रम उतरण्यास) त्याला कांहीं तरी औषध केलें पाहिजे (१२). चवताळलेल्या सर्पाची दाढ—उजवा हात पुढें करून—तर्जनीनें उपटून घेण्याची तुझी इच्छा आहे (१३). किंवा अंकुश नसतांना मस्त हत्तीवर बसून तूं एकटाच वनांत फिरतांना नगरास जाऊं पहात आहेस (१४). किंवा तूप, मेद व वसा यांच्या आहुति देऊन प्रज्वलित केलेल्या अग्नीमधून तूं आपल्या अंगाभोवतीं तुपांत भिजविलेलें वस्त्र गुंडाळून चालण्याची इच्छा करीत आहेस ( १५ ).

आत्मानं कः समुद्धृत्य कण्ठे बध्वा महाशिलाम् ।
समुद्रं तरते दोर्भ्यां तत्र किं नाम पौरुषम् ॥ १६ ॥
अकृतास्त्रः कृतास्त्रं वै बलवन्तं सुदुर्बलः ।
तादृशं कर्ण यः पार्थं योद्धुमिच्छेत्स दुर्मतिः ॥ १७ ॥
अस्माभिर्ह्येष निकृतो वर्षाणीह त्रयोदश ।
सिंहः पाशविनिर्मुक्तो न नः शेषं करिष्यति ॥ १८ ॥
एकान्ते पार्थमासीनं कूपेऽग्निमिव संवृतम् ।
अज्ञानादभ्यवस्कन्द्य प्राप्ताः स्मो भयमुत्तमम् ॥ १९ ॥
सह युध्यामहे पार्थमागतं युद्धदुर्मदम् ।
सैन्यास्तिष्ठन्तु सन्नद्धा व्यूढानीकाः प्रहारिणः ॥ २० ॥
द्रोणो दुर्योधनो भीष्मो भवान्द्रौणिस्तथा वयम् ।
सर्वे युध्यामहे पार्थं कर्ण मा साहसं कृथाः ॥ २१ ॥
वयं व्यवसितं पार्थं वज्रपाणिमिवोद्यतम् ।
षड्रथाः प्रतियुध्येम तिष्ठेम यदि संहताः ॥ २२ ॥

स्वतःला बांधून घेऊन व गळ्यांत मोठी शिळा अडकवून बाहुबलानें कोण वीर समुद्र तरून जाईल ? त्यांत पराक्रम तो काय ? ( १६ ). अस्त्रविद्यानिपुण व बलवान् अशा अर्जुनाशीं युद्ध करण्यास जो अस्त्रविद्याहीन व दुर्बल पुरुष तयार होईल त्याची बुद्धिच बिघडली ( १७ ). आपण तेरा वर्षें छळलेला हा पुरुषसिंह पाशांतून मुक्त होऊन आलेला आपला सप्पा उडविणार नाहीं का ? ( १८ ). कूपांत असलेल्या अग्नीप्रमाणें गुप्त राहणाऱ्या अर्जुनाशीं एका बाजूस अवचित प्रसंग पडून आपणांवर मोठें संकट ओढवलें आहे ( १९ ). ह्याकरितां, आपण सर्व मिळून त्या रणमस्त वीराशीं युद्ध करूं. सर्व सैन्यांनीं मोठ्या तयारीनें निरनिराळ्या भागांची[1] व्यूह-रचना करून प्रहार करण्यास सिद्ध व्हावें ( २० ). भीष्म, दुर्योधन, द्रोण, अश्वत्थामा, तूं व आम्ही, असे आपण सर्व पार्थाशीं युद्ध करूं; कर्णा, तूं साहस करूं नको ( २१ ). युद्धार्थ सिद्ध झालेल्या, वज्रधारी इंद्रासारख्या बलाढ्य अर्जुनाशीं आपण सहाहि रथी जमून लढलों तरच टिकाव लागेल (२२).

१ अनीकाः सैन्यभागाः। (सैन्य शब्द आणखी आहे.) सेनेचें नांव अनीकिनी आहे.

व्यूढानीकानि सैन्यानि यत्ताः परमधन्विनः ।
युध्यामहेऽर्जुनं संख्ये दानवा इव वासवम् ॥ २३ ॥ [१४९१]

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे कृपवाक्यं नाम एकोनपंचाशत्तमोऽध्यायः॥ ४९॥

सैन्यांच्या भागांची व्यवस्थित रचना झाली आहे; महान् धनुर्धर सज्ज झाले आहेत; ( अशा स्थितींत ) देवेंद्राशीं जसे दानव लढतात, तसे आपण युद्धांत अर्जुनाशीं लढूं " ( २३ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोग्रहण-उपपर्वांत उत्तरगोग्रह-प्रसंगीं ' कृपाचें भाषण ' या नांवाचा ४९ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ५०

[ अश्वत्थामा कर्णास उपदेशाच्या गोष्टी सांगतो. ]

अश्वत्थामोवाच— न च तावज्जिता गावो न च सीमान्तरं गताः ।
न हास्तिनपुरं प्राप्तास्त्वं च कर्ण विकत्थसे ॥ १ ॥
संग्रामांश्च बहूञ्जित्वा लब्ध्वा च विपुलं धनम् ।
विजित्य च परां सेनां नाऽऽहुः किञ्चन पौरुषम् ॥ २ ॥
दहत्यग्निरवाक्यस्तु तूष्णीं भाति दिवाकरः ।
तूष्णीं धारयते लोकान्वसुधा सचराचरान् ॥ ३ ॥

अश्वत्थामा म्हणाला:—" कर्णा, गाई अजून जिंकिल्या नाहींत, किंवा त्या अजून मत्स्यांच्या हद्दीच्याहि पलीकडे गेल्या नाहींत, त्या हस्तिनापुरास पोंचण्याची गोष्ट लांबच आहे, आणि तूं मात्र बढाया मारतोस ( १ ). अनेक लढाया जिंकिल्या, पुष्कळ धन मिळविलें, आणि शत्रूंचें प्रबळ सैन्य जरी जर्जर केलें, तरी ( लोक ) आपल्या पराक्रमाची प्रौढी मिरवीत नाहींत (२). अग्नि कांहींएक वल्गना न करितां दहनक्रिया करतो, सूर्य गप्प राहून प्रकाश पाडतो, आणि पृथ्वी ही निमुटपणें चराचर वस्तूंना धारण करते ( ३ ).

चातुर्वर्ण्यस्य कर्माणि विहितानि स्वयम्भुवा ।
धनं यैरधिगन्तव्यं यच्च कुर्वन्न दुष्यति ॥ ४ ॥
अधीत्य ब्राह्मणो वेदान्याजयेत यजेत वा ।
क्षत्रियो धनुराश्रित्य यजेच्चैव न याजयेत् ॥ ५ ॥
वैश्योऽधिगम्य वित्तानि ब्रह्मकर्माणि कारयेत् ।
शूद्रः शुश्रूषणं कुर्यात्त्रिषु वर्णेषु नित्यशः ।
वन्दनायोगविधिभिर्वैतसीं वृत्तिमास्थितः ॥ ६ ॥
वर्त्तमाना यथाशास्त्रं प्राप्य चापि महीमिमाम् ।
सत्कुर्वन्ति महाभागा गुरून्सुविगुणानपि ॥ ७ ॥
प्राप्य द्यूतेन को राज्यं क्षत्रियस्तोष्टुमर्हति ।
तथा नृशंसरूपोऽयं धार्त्तराष्ट्रश्च निर्घृणः ॥ ८ ॥
तथाऽधिगम्य वित्तानि को विकत्थेद्विचक्षणः ।
निकृत्या वञ्चनायोगैश्चरन्वैतंसिको[1] यथा ॥ ९ ॥
कतमं द्वैरथं युद्धं यत्राऽऽजैषीर्धनञ्जयम् ।
नकुलं सहदेवं वा धनं येषां त्वया हृतम् ॥ १० ॥

ब्रह्मदेवानें चार वर्णांचीं कामें लावून दिलीं आहेत. धन कोणी मिळवावें, आणि कोणतें कर्म करण्यांत दोष नाहीं, तेंहि ठरविलें आहे ( ४ ). ब्राह्मणानें वेदाध्ययन करून यजन व याजन हीं करावीं; क्षत्रियानें धनुष्याच्या आश्रयानें यजन मात्र करावें, याजन करूं नये ( ५ ). वैश्यानें द्रव्य संपादून वैदिककर्में करवावीं; आणि शूद्रानें वंदन व पूजा करून, वेतसवृत्ति (नम्रता) धरून ( ब्राह्मणादिक ) तीन वर्णांची नेहमीं सेवा करावी ( ६ ). यथाशास्त्र वर्तन करणाऱ्या पुरुषांना अखिल पृथ्वी मिळाली, तरी ते महाभाग अत्यंत गुणरहित अशाहि गुरूंचा सत्कार करीत असतात ( ७ ). द्यूतांत राज्य मिळविणारा क्षत्रिय कसा बरें स्तुतीस पात्र होईल ? हा दुर्योधन अशा प्रकारचा दुष्ट व निर्लज्ज आहे ( ८ ). कपटानें दुसऱ्याचा घात करणाऱ्या पारध्याप्रमाणें संपत्ति मिळवून कोणता शहाणा मनुष्य त्याबद्दल प्रौढी मिरवील ?(९) ज्यांचें धन तूं हिरावून घेतलेंस त्या अर्जुन, नकुल व सहदेव ह्यांना तूं कोणत्या

1 वितंसो बन्धनोपायस्तेन जीवति वैतंसिकः व्याधः ( नी. )

युधिष्ठिरो जितः कस्मिन्भीमश्च बलिनां वरः ।
इन्द्रप्रस्थं त्वया कस्मिन्संग्रामे निर्जितं पुरा ॥ ११ ॥
तथैव कतमद्युद्धं यस्मिन्कृष्णा जिता त्वया ।
एकवस्त्रा सभां नीता दुष्टकर्मन् रजस्वला ॥ १२ ॥
मूलमेषां महत्कृत्तं सारार्थी चन्दनं यथा ।
कर्म कारयिथाः सूत तत्र किं विदुरोऽब्रवीत् ॥ १३ ॥
यथाशक्ति मनुष्याणां शममालक्षयामहे ।
अन्येषामपि सत्त्वानामपि कीटपिपीलिकैः ।
द्रौपद्याः सम्परिक्लेशं न क्षन्तुं पाण्डवोऽर्हति ॥ १४ ॥
क्षयाय धार्तराष्ट्राणां प्रादुर्भूतो धनञ्जयः ।
त्वं पुनः पण्डितो भूत्वा वाचं वक्तुमिहेच्छसि ॥ १५ ॥

द्वैरथ युद्धांत जिंकिलेंस ? ( १० ) धर्म व भीम ह्यांचा कोणत्या संग्रामांत पराजय केलास ? व इंद्रप्रस्थ यापूर्वी कोणत्या युद्धांत जिंकून घेतलेंस ? ( ११ ) दुष्टकर्म्या, ती एकवस्त्रा रजस्वला द्रौपदी कोणत्या युद्धांत जिंकून सभेंत नेली ? ( १२ ) धनार्थी मनुष्यानें चंदनाच्या झाडाचें मुख्य मूळच तोडून टाकावें, त्याप्रमाणें तुम्ही मुख्य मूळ जो परब्रह्म श्रीकृष्ण, त्याचा संबंध तोडून टाकला ! ( दुर्योधनानें कपटद्यूत खेळून धर्माचें मूळाचा उच्छेद केला ! व तूं ( कर्णा ) ब्राह्मणांची निंदा करून त्यांचा अवमान केलास ! ) तेव्हां, सूता-राधेया, धर्माचा अशारीतीनें उच्छेद करणाऱ्यांस उद्देशून विदुर काय म्हणाला होता ? ( ' ह्या द्यूतापासून तुमचा सर्वस्वी नाश होईल ! ' त्याची आठवण आहे काय ? ) (१३) मनुष्याच्या सहनशीलतेला कांहीं मर्यादा असते. कीड, मुंगी वगैरे प्राणीसुद्धां विशिष्टमर्यादेपर्यंतच दुःखें सहन करितात. द्रौपदीची झालेली अपेष्टा अर्जुनादि पांडवांस कधींहि सहन होणार नाहीं ( १४ ). धृत-राष्ट्राच्या पुत्रांचा नाश करण्याकरितां हा अर्जुन प्रकट झाला आहे; आणि तूं [illegible] पण्डित बनून या ठिकाणीं बडबड चालविली आहेस ( १५ ).

१ श्लोक कूटार्थी-( नी. ) नें फार मोठी टीका केली आहे, तदनुरूप हा अर्थ विस्तारानें नाह[illegible] केला आहे. " मूलं कृष्णो ब्रह्म च ब्राह्मणाश्च " असा आदिपर्वांतील श्लोक ( नी. ) येथें प्रारंभीं आधार घेतो.

वैरान्तकरणो जिष्णुर्न नः शेषं करिष्यति ॥ १६ ॥
नैष देवान्न गन्धर्वान्न सुरान्न च राक्षसान् ।
भयादिह न युध्येत कुन्तीपुत्रो धनञ्जयः ॥ १७ ॥
यं यमेषोऽतिसंक्रुद्धः संग्रामे निपतिष्यति ।
वृक्षं गरुत्मान्वेगेन विनिहत्य तमेष्यति ॥ १८ ॥
त्वत्तो विशिष्टं वीर्येण धनुष्यमरराट्समम् ।
वासुदेवसमं युद्धे तं पार्थं को न पूजयेत् ॥ १९ ॥
देवं देवेन युध्येत मानुषेण च मानुषम् ।
अस्त्रं ह्यस्त्रेण यो हन्यात्कोऽर्जुनेन समः पुमान् ॥ २० ॥
पुत्रादनन्तरं शिष्य इति धर्मविदो विदुः ।
एतेनापि निमित्तेन प्रियो द्रोणस्य पाण्डवः ॥ २१ ॥
यथा त्वमकरोर्द्यूतमिन्द्रप्रस्थं यथाऽहरः ।
यथाऽऽनैषीः सभां कृष्णां तथा युध्यस्व पाण्डवम् ॥ २२ ॥
अयं ते मातुलः प्राज्ञः क्षत्रधर्मस्य कोविदः ।
दुर्द्यूतदेवी गान्धारः शकुनिर्युध्यतामिह ॥ २३ ॥

आतां हा जिष्णु आपणा सर्वांस मारून सर्वच वैर संपवून न टाको ! (१६) देव, गंधर्व, असुर व राक्षस ह्यांपैकीं कोणाशींहि हा अर्जुन भयानें युद्ध करणार नाहीं असें होणार नाहीं (१७). युद्धामध्यें ज्या ज्या वीरावर हा चाल करून जाईल, त्याला हा, गरुड जसा वेगानें वृक्षाला पाडतो, तसा पाडील (१८). तुझ्याहून सामर्थ्यानें अधिक, धनुर्विद्येंत देवराजासारखा, व युद्धांत श्रीकृष्णासारखा हा अर्जुन–याची पूजा कोण करणार नाहीं? (१९) तो देवाशीं देवाप्रमाणें युद्ध करितो, मनुष्याशीं मनुष्याप्रमाणें युद्ध करितो; तसेंच, अस्त्राचा (उलट) अस्त्रानें नाश करतो. (याची बरोबरी कोण करील?) (आज) अर्जुनासारखा पुरुष कोण आहे? (२०) 'पुत्राचे खालोखाल शिष्य प्रिय' असें धर्मवेत्ते जाणतात. ह्या कारणानेंहि द्रोणाचार्यांस अर्जुन प्रिय आहे (२१). ज्याअर्थी त्वां द्यूत केलें, इंद्रप्रस्थ हिसकावून घेतलें, व द्रौपदीला सभेंत आणिलें, त्याअर्थी तूंच (आतां) अर्जुनाशीं युद्ध कर (२२). हा शकुनि मामा मोठा शहाणा असून क्षात्रधर्मांत मोठा पंडित आहे; याकरितां ह्या दुष्ट द्यूत करणाऱ्या गांधार राजानें आतां याठिकाणीं युद्ध करावें (२३).

नाऽक्षान्क्षिपति गाण्डीवं न कृतं द्वापरं[1] न च ।
ज्वलतो निशितान्बाणांस्तांस्तान्क्षिपति गाण्डिवम् ॥ २४ ॥
न हि गाण्डीवनिर्मुक्ता गार्ध्रपक्षाः सुतेजनाः ।
नाँऽन्तरेष्ववतिष्ठन्ते गिरीणामपि दारणाः ॥ २५ ॥
अन्तकः पवनो मृत्युस्तथाऽग्निर्वडवामुखः ।
कुर्युरेते क्वचिच्छेषं न तु क्रुद्धो धनञ्जयः ॥ २६ ॥
यथा सभायां द्यूतं त्वं मातुलेन सहाऽकरोः ।
तथा युध्यस्व संग्रामे सौबलेन सुरक्षितः ॥ २७ ॥
युध्यन्तां कामतो योधा नाऽहं योत्स्ये धनञ्जयम् ।
मत्स्यो ह्यस्माभिरायोध्यो यद्यागच्छेद्गवां पदम् ॥ २८ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे द्रौणिवाक्यं नाम पञ्चाशत्तमोऽध्यायः ॥५०॥

अर्जुनाचें गांडीव धनुष्य कांहीं फांसे फेंकीत नाहीं; फांशांतून दुद्दी चव्वा पडतात तसे गांडीवांतून चारदोन पडत नाहींत ! तीक्ष्ण धारेचे नानाप्रकारचे प्रज्वलित बाणच बाहेर पडतात ( २४ ). हे गृध्रपुंख जलाल बाण पर्वतांचेंहि विदारण करणारे मध्यंतरीं अडकून राहात नाहींत ( २५ ). यम, वायु, मृत्यु, वडवाग्नि ह्यांच्यापासूनहि एकवेळ सुटका करून घेतां येईल, पण क्रुद्ध झालेल्या अर्जुनापासून सुटका करून घेणें अशक्य होय ( २६ ). ज्याप्रमाणें शकुनिमामाच्या सहाय्यानें त्वां द्यूत केलें, त्याप्रमाणें ( आतां ) त्याच शकुनीनें सुरक्षित राहून संग्राम कर ( २७ ). इतर योद्ध्यांनीं वाटेल तर अर्जुनाशीं लढावें; मी लढणार नाहीं. जर ह्या गाई सोडविण्याकरितां विराटराजा आला, तर मात्र आम्ही त्याच्याशीं युद्ध केलें पाहिजे; कारण, आम्ही मत्स्याशीं लढण्यास आलों आहों" ( २८ ).

याप्रमाणें महाभारताच्या बिराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं 'अश्वत्थाम्याचें भाषण' या नांवाचा ५० वा अध्याय संपला.

---

१ प्राचीनकाळीं फाशांवर दोन, तीन, चार पडले तर त्यांस द्वापर, त्रेता व कृत म्हणत.
२ दोन 'न' चुकलेले वाटतात. दुसऱ्या चरणारंभीं 'अन्तरेष्ववतिष्ठन्ते' पाहिजे.

# अध्याय ५१

[ भीष्माचीं नीतिवचनें ऐकून दुर्योधनादि द्रोणाची क्षमा मागतात. ]

भीष्म उवाच— साधु पश्यति वै द्रौणिः कृपः साध्वनुपश्यति ।
कर्णस्तु क्षत्रधर्मेण केवलं योद्धुमिच्छति ॥ १ ॥
आचार्यो नाऽभिवक्तव्यः पुरुषेण विजानता ।
देशकालौ तु सम्प्रेक्ष्य योद्धव्यमिति मे मतिः ॥ २ ॥
यस्य सूर्यसमाः पञ्च सपत्नाः स्युः प्रहारिणः ।
कथमभ्युदये तेषां न प्रमुह्येत पण्डितः ॥ ३ ॥
स्वार्थे सर्वे विमुह्यन्ति येऽपि धर्मविदो जनाः ।
तस्माद्राजन्ब्रवीम्येष वाक्यं ते यदि रोचते ॥ ४ ॥
कर्णो हि यदवोचत्त्वां तेजस्सञ्जननाय तत् ।
आचार्यपुत्रः क्षमतां महत्कार्यमुपस्थितम् ॥ ५ ॥
नाऽयं कालो विरोधस्य कौन्तेये समुपस्थिते ।
क्षन्तव्यं भवता सर्वमाचार्येण कृपेण च ॥ ६ ॥

भीष्म म्हणाले:—"अश्वत्थाम्याचें म्हणणें बरोबर आहे, व कृपानेंहि दूरवर दृष्टि देऊन योग्य तेंच सांगितलें आहे, परंतु कर्ण केवळ क्षत्रियाच्या कर्तव्यावर लक्ष देऊन युद्ध करूं इच्छितो ( १ ). विचारी पुरुषानें आचार्यास दोष देऊं नये; परंतु देशकालावर दृष्टि देऊन युद्ध करावें असें मला वाटतें(२). सूर्यासारखे प्रतापशाली पांच ( पांडव ) शत्रु होऊन ज्यावर प्रहार करणार, त्याच्या अभ्युदयाचा विचार करतां कोण शहाणा मनुष्य गोंधळणार नाहीं ? (३) सर्व-धर्मवेत्ते पुरुषहि-स्वार्थाच्या-कामीं गोंधळतात. यास्तव, राजा, तुला आवडत असेल, तर मी कांहीं सांगतों ( ४ ). कर्णानें जें कांहीं तुला म्हटलें, त्यांत त्याचा हेतु वीरश्री उत्पन्न करावी हाच होय. आचार्यपुत्रानें कार्याच्या महत्त्वाकडे दृष्टि देऊन ( कर्णास ) क्षमा करावी (५). ज्याअर्थीं आतां कुंतीचा पुत्र ( अर्जुन ) लढाईस उपस्थित झाला आहे, त्या अर्थीं ( आपसांत ) विरोध वाढविण्याची ही वेळ नव्हे; तूं, आचार्य व कृप ह्यांसह, सर्व क्षमा करावी (६).

भवतां हि कृतास्त्रत्वं यथाऽऽदित्ये प्रभा तथा ।
यथा चन्द्रमसो लक्ष्मीः सर्वथा नाऽपकृष्यते ॥ ७ ॥
एवं भवत्सु ब्राह्मण्यं ब्रह्मास्त्रं च प्रतिष्ठितम् ।
चत्वार एकतो वेदाः क्षात्रमेकत्र दृश्यते ॥ ८ ॥
नैतत्समस्तमुभयं कस्मिंश्चिदनुशुश्रुम ।
अन्यत्र भारताचार्यात्सपुत्रादिति मे मतिः ॥ ९ ॥
वेदान्ताश्च पुराणानि इतिहासं पुरातनम् ।
जामदग्न्यमृते राजन्को द्रोणादधिको भवेत् ॥ १० ॥
ब्रह्मास्त्रं चैव वेदाश्च नैतदन्यत्र दृश्यते ।
आचार्यपुत्रः क्षमतां नाऽयं कालो विभेदने ॥ ११ ॥
सर्वे संहत्य युद्ध्यामः पाकशासनिमागतम् । १२ ॥
बलस्य व्यसनानीह यान्युक्तानि मनीषिभिः ।
मुख्यो भेदो हि तेषां तु पापिष्ठो विदुषां मतः ॥ १३ ॥

सूर्याच्या ठिकाणीं जशी प्रभा तशी तुमच्या ठिकाणीं अस्त्रनिपुणता आहे. जशी चंद्राचे ठिकाणीं शोभा सदोदित वास करिते, त्याप्रमाणें तुमच्या ठिकाणीं ब्राह्मण्य व ब्रह्मास्त्र हीं दोन्हीं आहेत. चार वेद एका ठिकाणीं, आणि क्षात्रतेज दुसरीकडे दिसतें. हीं दोन्हीं एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं असलेलीं कोठेंहि ऐकलीं नाहींत; पण तीं ह्या द्रोणाचार्यांच्या व त्याच्या पुत्राच्या ठिकाणीं एकत्र आहेत असें मला वाटतें ( ७–९ ). वेदान्त, पुराणें व पुरातन इतिहास ह्यांत पारंगत असलेल्या द्रोणाचार्यांपेक्षां एका जमदग्नि-पुत्र परशुरामाखेरीज दुसरा कोण अधिक आहे ? (१०). ब्रह्मास्त्र व वेद हीं एकत्र इतर कोठेंहि आढळणार नाहींत. ह्यास्तव आचार्यपुत्रानें क्षमा करावी. आपसांत तंटा करण्याचा हा काळ नाहीं ( ११ ). आपण सर्व एक होऊन समोर आलेल्या अर्जुनाशीं युद्ध करूं (१२). ज्ञात्यांनीं सैन्याचे जे दोष सांगितले आहेत, त्यांत ‘ आपसांत भेद ’ हा मुख्य व अत्यंत पापकारक दोष मानिला आहे ” ( १३ ).

**अश्वत्थामोवाच**— नैव न्याय्यमिदं वाच्यमस्माकं पुरुषर्षभ ।
किन्तु रोषपरीतेन गुरुणा भाषिता गुणाः ॥ १४ ॥
शत्रोरपि गुणा ग्राह्या दोषा वाच्या गुरोरपि ।
सर्वथा सर्वयत्नेन पुत्रे शिष्ये हितं वदेत् ॥ १५ ॥
**दुर्योधन उवाच**— आचार्य एष क्षमतां शान्तिरत्र विधीयताम् ।
अभिद्यमाने तु गुरौ तद्वृत्तं रोषकारितम्[१] ॥ १६ ॥
**वैशम्पायन उवाच**-ततो दुर्योधनो द्रोणं क्षमयामास भारत ।
सह कर्णेन भीष्मेण कृपेण च महात्मना ॥ १७ ॥
**द्रोण उवाच**— यदेतत्प्रथमं वाक्यं भीष्मः शान्तनवोऽब्रवीत् ।
तेनैवाऽहं प्रसन्नो वै नीतिरत्र विधीयताम् ॥ १८ ॥
यथा दुर्योधनं पार्थो नोपसर्पति सङ्गरे ।
साहसाद्यदि वा मोहात्तथा नीतिर्विधीयताम् ॥ १९ ॥

**अश्वत्थामा** म्हणाला:—" पुरुषश्रेष्ठा, आमच्या ह्या न्याय्य भाषणाला तुम्ही नांवें ठेवूं नका. रागाच्या आवेशांत गुरूंनीं ( द्रोणाचार्यांनीं ) अर्जुनाचे गुण वर्णन केले ( ह्यांत दोष तो कोणता ? ) ( १४ ) शत्रूचेहि गुण वर्णावे आणि गुरूचेहि दोष सांगावे; हरप्रयत्नानें पुत्राचें व शिष्याचें ज्यांत सर्वतोपरी कल्याण असेल तें त्यास सांगावें "( १५ ).

**दुर्योधन** म्हणाला—" या द्रोणाचार्यांनीं क्षमा करावी. येथें शांति स्थापावी. ह्या द्रोणाचार्यांची आम्हाविषयीं भेदबुद्धि नसल्यामुळें त्यांनीं जे उद्गार काढले ते केवळ क्रोधाचे आवेशांतच काढिले आहेत " ( १६ ).

**वैशंपायन** म्हणाला:— नंतर कर्ण, भीष्म व महात्मा कृप ह्यांसह दुर्योधनानें द्रोणाची क्षमा मागितली ( १७ ).

**द्रोण** म्हणाला:—" शंतनुपुत्र भीष्म यानें प्रथम जें वाक्य म्हटलें त्यानेंच माझा कोप नष्ट झाला आहे. त्यानेंच मी प्रसन्न होऊन सांगतों कीं, ह्यावेळीं योग्य नीति योजिली पाहिजे ( १८ ). जें केलें असतां अर्जुन साहसानें किंवा मोहानें दुर्योधनावर चाल करून येणार नाहीं, अशी योजना करा ( १९ ).

---

१ " अभिद्यमाणे गुरौ तद्वृत्तं रोषकारितम् " असा दुसरा पाठ नी. दतो. दोन्ही सारखेच दुर्बोध. ( उपालभ्यमाने गुरौ शेषं कर्तव्यं न कृतं स्यात् । नी. )

वनवासे ह्यनिर्वृत्ते दर्शयेन्न धनञ्जयः ।
धनं चाऽऽलभमानोऽत्र नाऽद्य तत्क्षन्तुमर्हति ॥ २० ॥
यथा नाऽयं समायुञ्ज्याद्धार्तराष्ट्रान्कथश्चन ।
न च सेना पराजय्यात्तथा नीतिर्विधीयताम् ॥ २१ ॥
उक्तं दुर्योधनेनापि पुरस्ताद्वाक्यमीदृशम् ।
तदनुस्मृत्य गाङ्गेय यथावद्वक्तुमर्हसि ॥ २२ ॥ [ १५४१ ]

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे द्रोणवाक्ये एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५१ ॥**

वनवास संपविल्याशिवाय अर्जुन प्रकट होणार नाहीं. जर कां त्यास आज गोधन मिळालें नाहीं, तर तो तें सहन करणार नाहीं ( २० ). (ह्यास्तव) अशी कांहीं युक्ति योजा, कीं धृतराष्ट्राच्या पुत्रांची व अर्जुनाची गांठच पडूं नये, व आपल्या सैन्याचा पराभव होऊं नये ( २१ ). आणि पूर्वी दुर्योधनानें ( पांडवांचा अज्ञातवास समाप्त झाला किंवा नाहीं ह्याबद्दल ) अशा तऱ्हेचें वाक्य म्हटलें आहे, त्याचा विचार करून भीष्मानें योग्य उत्तर द्यावें " ( २२ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत द्रोणाच्या भाषणाविषयीं ५१ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ५२

[ भीष्म पांडवांच्या वनवासाच्या वर्षांची मोजणी करून दाखवितो व सैन्याची मांडणी करवितो. दुर्योधन गाई घेऊन पळतो. ]

---

भीष्म उवाच—कला काष्ठाश्च युज्यन्ते मुहूर्ताश्च दिनानि च ।
अर्धमासाश्च मासाश्च नक्षत्राणि ग्रहास्तथा ॥ १ ॥
ऋतवश्चापि युज्यन्ते तथा संवत्सरा अपि ।
एवं कालविभागेन कालचक्रं प्रवर्तते ॥ २ ॥

भीष्म म्हणाला:—"कला आणि काष्ठा मिळवितात; मुहूर्त, आणि दिवस मिळवितात; पक्ष, मास, नक्षत्रें तसेच ग्रह ( १ ), त्याचप्रमाणें ऋतु आणि संवत्सर (जोडतात); ह्या रीतीनें कालाचें चक्र फिरत असतें ( २ ).

तेषां कालातिरेकेण ज्योतिषां च व्यतिक्रमात् ।
पञ्चमे पञ्चमे वर्षे द्वौ मासावुपजायतः ॥ ३ ॥
एषामभ्यधिका मासाः पञ्च च द्वादश क्षपाः ।
त्रयोदशानां वर्षाणामिति मे वर्त्तते मतिः ॥ ४ ॥
सर्वं यथावच्चरितं यद्यदेभिः प्रतिश्रुतम् ।
एवमेतद् ध्रुवं ज्ञात्वा ततो बीभत्सुरागतः ॥ ५ ॥
सर्वे चैव महात्मानः सर्वे धर्मार्थकोविदाः ।
येषां युधिष्ठिरो राजा कस्माद्धर्मेऽपराध्नुयुः ॥ ६ ॥
अलुब्धाश्चैव कौन्तेयाः कृतवन्तश्च दुष्करम् ।
न चापि केवलं राज्यमिच्छेयुस्तेऽनुपायतः ॥ ७ ॥
तदैव ते हि विक्रान्तुमीषुः कौरवनन्दनाः ।
धर्मपाशनिबद्धास्तु न चेलुः क्षत्रियव्रतात् ॥ ८ ॥
यश्चाऽनृत इति ख्यायाद्यः स गच्छेत्पराभवम् ।
वृणुयुर्मरणं पार्था नाऽनृतत्वं कथञ्चन ॥ ९ ॥

त्यांचा काळ वाढल्यानें व नक्षत्रांच्या लंघनकालाशीं भेद पडल्यानें प्रत्येक पांचवे वर्षी दोनदोन महिने अधिक उत्पन्न होतात. (ह्या हिशेबानें) यांच्या तेरा वर्षांत पांच महिने व बारा दिवस जास्त उत्पन्न होतात, असें मला वाटतें. त्यांनीं आपली प्रतिज्ञा योग्यरीतीनें आचरण करून सर्व पार पाडली; आणि हें निश्चित जाणूनच अर्जुन आला आहे (३–५). सर्वच पांडव मोठे महात्मे, सर्वांसच धर्माचें ज्ञान उत्तम; आणि (तशांत) ज्यांचा युधिष्ठिर हा राजा; त्यांच्या हातून धर्माचा अपराध कसा होईल ? ( ६ ). ह्या निर्लोभ पांडवांनीं मोठी दुर्घट गोष्ट करून दाखविली ! ते ( सामादि ) उपाय योजल्याशिवाय ( एकदम ) राज्य मिळविण्याची इच्छा करणार नाहींत ( ७ ). ह्या कौरवकुलनंदनांनीं त्याचवेळीं पराक्रम करून दाखविला असता ! पण धर्माच्या पाशानें बद्ध असलेले (पांडव) क्षात्रधर्मापासून मुळींच च्युत झाले नाहींत ( ८ ). अर्जुन असत्य वर्तन करणारा आहे असें जो म्हणेल, त्याचा खचित पराभव होईल ! पांडव मरण पत्करतील, पण असत्यपणा कधींहि पत्करणार नाहींत ( ९ ).

प्राप्तकाले तु प्राप्तव्यं नोत्सृजेयुर्नरर्षभाः ।
अपि वज्रभृता गुप्तं तथावीर्या हि पाण्डवाः ॥ १० ॥
प्रतियुध्येम समरे सर्वशस्त्रभृतां वरम् ।
तस्माद्यदत्र कल्याणं लोके सद्भिरनुष्ठितम् ।
तत्संविधीयतां शीघ्रं मा वो ह्यर्थोऽभ्यगात्परम् ॥ ११ ॥
न हि पश्यामि संग्रामे कदाचिदपि कौरव ।
एकान्तसिद्धिं राजेन्द्र सम्प्राप्तश्च धनंजयः ॥ १२ ॥
सम्प्रवृत्ते तु संग्रामे भावाभावौ जयाजयौ ।
अवश्यमेकं स्पृशतो दृष्टमेतदसंशयम् ॥ १३ ॥
तस्माद्युद्धोचितं कर्म कर्म वा धर्मसंहितम् ।
क्रियतामाशु राजेन्द्र सम्प्राप्तश्च धनंजयः ॥ १४ ॥
दुर्योधन उवाच— नाऽहं राज्यं प्रदास्यामि पाण्डवानां पितामह ।
युद्धोपचारिकं यत्तु तच्छीघ्रं प्रविधीयताम् ॥ १५ ॥

त्या पांडवांना जी गोष्ट योग्यकाळीं मिळण्यासारखी ती गोष्ट मिळविल्याशिवाय ते कधींहि सोडणार नाहींत; मग ती गोष्ट इंद्रानें रक्षण करून ठेविलेली असेना ! ( कारण ) त्यांच्यामध्यें तसाच पराक्रम आहे ( १० ). आपण धनुर्धरश्रेष्ठ अर्जुनाशीं युद्ध करणार आहों; यासाठीं, जी गोष्ट हितावह असेल, व जी आजपर्यंत थोर लोकांनीं केली असेल, ती लवकर करण्याविषयीं विचार ठरवा. तुमचा अर्थ शत्रूस जाऊं देऊं नका ( ११ ). दुर्योधना, युद्धामध्यें निश्चयानें जय मिळेल असें मला दिसत नाहीं. धनंजय तर आला आहे ( १२ ). युद्ध सुरू झालें म्हणजे जय किंवा अपजय, उत्कर्ष किंवा ऱ्हास ह्यांपैकीं एक कोणाच्या तरी वांट्यास निश्चयानें येणार यात संदेह नाहीं ( १३ ). ह्यास्तव युद्धास उचित असें कर्म लवकर कर, किंवा धर्मास अनुसरून ( पांडवाशीं ऐक्य ) कर्म कर. अर्जुन येऊन पोचला आहे " ( १४ ).

दुर्योधन म्हणालाः—" आजोबा, मी पांडवांना राज्य देणार नाहीं. युद्धासंबंधीं जें कांहीं कर्तव्य इष्ट असेल तें त्वरित करा " ( १५ ).

भीष्म उवाच— अत्र या मामिका बुद्धिः श्रूयतां यदि रोचते ।
सर्वथा हि मया श्रेयो वक्तव्यं कुरुनन्दन ॥ १६ ॥
क्षिप्रं बलचतुर्भागं गृह्य गच्छ पुरं प्रति ।
ततोऽपरश्चतुर्भागो गाः समादाय गच्छतु ॥ १७ ॥
वयं चार्धेन सैन्यस्य प्रतियोत्स्याम पाण्डवम् ।
अहं द्रोणश्च कर्णश्च अश्वत्थामा कृपस्तथा ।
प्रतियोत्स्याम बीभत्सुमागतं कृतनिश्चयम् ॥ १८ ॥
मत्स्यं वा पुनरायातमागतं वा शतक्रतुम् ।
अहमावारयिष्यामि वेलेव मकरालयम् ॥ १९ ॥
वैशम्पायन उवाच— तद्वाक्यं रुरुचे तेषां भीष्मेणोक्तं महात्मना ।
तथा हि कृतवान्राजा कौरवाणामनन्तरम् ॥ २० ॥
भीष्मः प्रस्थाप्य राजानं गोधनं तदनन्तरम् ।
सेनामुख्यान्व्यवस्थाप्य व्यूहितुं सम्प्रचक्रमे ॥ २१ ॥
भीष्म उवाच—आचार्य मध्ये तिष्ठ त्वमश्वत्थामा तु सव्यतः ।
कृपः शारद्वतो धीमान्पार्श्वं रक्षतु दक्षिणम् ॥ २२ ॥

भीष्म म्हणाला:—"तुला आवडेल तर माझें मत ऐक. जें श्रेयस्कर असेल तेंच मला सर्वप्रकारें तुला सांगितलें पाहिजे ( १६ ). तूं चवथा भाग सैन्य घेऊन हस्तिनापुरास जा. चौथाभाग सैन्य गाईंना घेऊन जाऊं दे (१७). आम्ही राहिलेलें अर्धें सैन्य घेऊन अर्जुनाशीं युद्ध करतों. तो युद्ध करण्याच्या निश्चयानेंच येथें आला आहे. त्याशीं मी, द्रोण, अश्वत्थामा, कृप व कर्ण, असे सर्व मिळून युद्ध करूं ( १८ ). विराट राजा जरी पुनः आला, किंवा इंद्रहि जरी आला, तरी समुद्राच्या मर्यादेप्रमाणें मी त्याला आडवतों "( १९ ).

वैशंपायन म्हणाला:— महात्म्या भीष्मानें जी सल्ला, दिली ती त्या सर्वांना पसंत झाली, व दुर्योधनानें पुढें तसेंच केलें ( २० ). भीष्मानें दुर्योधनाची व गाईंची रवानगी केली, आणि मुख्य योद्ध्यांना व्यवस्थित उभे करून सैन्याचा व्यूह रचण्यास सुरुवात केली ( २१ ).

भीष्म म्हणाला—"आचार्य, तुम्ही मध्यें उभे राहा. उजवीकडे अश्वत्थाम्यानें उभें राहावें. बुद्धिमान् शारद्वत कृपानें दक्षिण भागाचें संरक्षण करावें (२२).

अग्रतः सूतपुत्रस्तु कर्णस्तिष्ठतु दंशितः ।
अहं सर्वस्य सैन्यस्य पश्चात्स्थास्यामि पालयन् ॥ २३ ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि उत्तरगोग्रहे भीष्मसैन्यव्यूहे द्विपञ्चाशत्तमोऽध्यायः ॥ ५२ ॥

सर्वांच्या पुढें कवच घालून कर्णानें उभें राहावें; आणि मी सर्व सैन्याचें रक्षण करीत मागें राहतों ( २३ )."

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर गोग्रहणप्रसंगीं भीष्माच्या सैन्याच्या व्यूहरचनेविषयीं ५२ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ५३

[ गाई घेऊन पळणाऱ्या दुर्योधनाचा अर्जुन पाठलाग करतो. व त्याकडून गाई सोडवितो.]

वैशम्पायन उवाच—तथा व्यूढेष्वनीकेषु कौरवेयेषु भारत ।
उपायादर्जुनस्तूर्णं रथघोषेण नादयन् ॥ १ ॥
ददृशुस्ते ध्वजाग्रं वै शुश्रुवुश्च महास्वनम् ।
दोधूयमानस्य भृशं गाण्डीवस्य च निःस्वनम् ॥ २ ॥
ततस्तु सर्वमालोक्य द्रोणो वचनमब्रवीत् ।
महारथमनुप्राप्तं दृष्ट्वा गाण्डीवधन्विनम् ॥ ३ ॥
द्रोण उवाच—एतद्ध्वजाग्रं पार्थस्य दूरतः सम्प्रकाशते ।
एष घोषः स रथजो रोरवीति च वानरः ॥ ४ ॥

वैशंपायन म्हणाले:— राजा, याप्रमाणें कौरव वीर व्यूह रचून उभे राहिल्यानंतर, आपल्या रथाच्या घोषानें ( अंतराल ) दणाणून सोडीत अर्जुन त्वरेनें त्यांजवर चालून आला ( १ ). त्याच्या ध्वजाचें अग्र कौरवांच्या दृष्टीस पडलें, आणि त्याच्या रथाचा भयंकर शब्द व तो वरचेवर टणत्कार करीत असलेल्या गांडीव धनुष्याचाहि शब्द त्यांच्या कानीं पडला ( २ ). तो सर्व प्रकार पाहून आणि गांडीवधारी महारथ अर्जुन आला हें जाणून, द्रोण म्हणाले:-(३)"अर्जुनाच्या ध्वजाचा हा शेंडा दुरून झळकत आहे, हा त्याच्याच रथाचा गडगडाट आहे, व हा वानरहि गर्जना करीत आहे ( ४ ).

एष तिष्ठन्रथश्रेष्ठे रथे च रथिनां वरः ।
उत्कर्षति धनुः श्रेष्ठं गाण्डीवमशनिस्वनम् ॥ ५ ॥
इमौ च बाणौ सहितौ पादयोर्मे व्यवस्थितौ ।
अपरौ चाप्यतिक्रान्तौ कर्णौ संस्पृश्य मे शरौ ॥ ६ ॥
निरुष्य हि वने वासं कृत्वा कर्माऽतिमानुषम् ।
अभिवादयते पार्थः श्रोत्रे च परिपृच्छति ॥ ७ ॥
चिरदृष्टोऽयमस्माभिः प्रज्ञावान्बान्धवप्रियः ।
अतीव ज्वलितो लक्ष्म्या पाण्डुपुत्रो धनञ्जयः ॥ ८ ॥
रथी शरी चारुतली निषङ्गी शङ्खी पताकी कवची किरीटी ।
खड्गी च धन्वी च विभाति पार्थः शिखी वृतः स्रुग्भिरिवाऽऽज्यसिक्तः॥९
अर्जुन उवाच—इषुपाते च सेनाया हयान्संयच्छ सारथे ।
यावत्समीक्षे सैन्येऽस्मिन्क्वाऽसौ कुरुकुलाधमः ॥ १० ॥

आणि हा रथांमध्यें श्रेष्ठ अशा रथांत बसलेला रथिश्रेष्ठ अर्जुन वज्राप्रमाणें भयंकर शब्द करणारें श्रेष्ठ गांडीव धनुष्य ओढीत आहे (५). दोन बाण (वंदनार्थ) माझ्या पायापाशीं येऊन पडले आहेत, आणि दुसरे दोन बाण माझ्या कानांस स्पर्श करून निघून गेले (६). वनांत राहून अमानुष कर्म करून येथें आलेला हा अर्जुन मला प्रथम वंदन करून व नंतर कानीं लागून युद्धार्थ माझी आज्ञा मागत आहे (७). बुद्धिवान्, अतिशय उज्ज्वल कांतीनें युक्त आणि बांधवप्रिय पांडुपुत्र धनंजय कितीतरी दिवसांनीं आमच्या दृष्टीस पडला (८). याजपाशीं रथ, शर, सुंदर तलत्राण, भाते, शंख, ध्वज, कवच, मुकुट, खड्ग व धनुष्य आहे; आणि त्यामुळें हा, स्रुवांनीं वेष्टिलेल्या अशा तूप ओतलेल्या अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसत आहे" (९).

अर्जुन म्हणालाः—"ही सेना बाणाच्या टप्यांत आली आहे, तेव्हां, सारथ्या, आतां घोडे जरा आवरून धर; म्हणजे तो कुरुकुलांतील नीच (दुर्योधन) या सैन्यांत कोठें आहे तें मी न्याहाळतों (१०).

---

१ स्रुग्भिः जुहूप्रभृतिभिः । (नी.) आहुति देण्याचीं साधनें.

सर्वानेताननादृत्य दृष्ट्वा तमतिमानिनम् ।
तस्य मूर्ध्नि पतिष्यामि तत एते पराजिताः ॥ ११ ॥
एष व्यवस्थितो द्रोणो द्रौणिश्च तदनन्तरम् ।
भीष्मः कृपश्च कर्णश्च महेष्वासाः समागताः ॥ १२ ॥
राजानं नाऽत्र पश्यामि गाः समादाय गच्छति ।
दक्षिणं मार्गमास्थाय शङ्के जीवपरायणः ॥ १३ ॥
उत्सृज्यैतद्रथानीकं गच्छ यत्र सुयोधनः ।
तत्रैव योत्स्ये वैराटे नास्ति युद्धं निरामिषम् ।
तं जित्वा विनिवर्त्तिष्ये गाः समादाय वै पुनः ॥ १४ ॥
वैशम्पायन उवाच—एवमुक्तः स वैराटिर्हयान्सयम्य यत्नतः ।
नियम्य च ततो रश्मीन्यत्र ते कुरुपुङ्गवाः ।
अचोदयत्ततो वाहान्यत्र दुर्योधनो गतः ॥ १५ ॥
उत्सृज्य रथवंशं तु प्रयाते श्वेतवाहने ।
अभिप्रायं विदित्वा च कृपो वचनमब्रवीत् ॥ १६ ॥

आणि तो अतिमानी दृष्टीस पडतांक्षणींच ह्या सर्वांना सोडून त्याच्या मस्तकावर जाऊन आदळतों, म्हणजे ह्या सर्वांचा आपोआपच पराजय होईल (११). येथें हा द्रोण सज्ज होऊन उभा आहे आणि त्याच्याजवळच अश्वत्थामा उभा आहे; शिवाय भीष्म, कृप व कर्ण हे महाधनुर्धारी येथें आलेले दिसत आहेत ( १२). पण येथें राजा दुर्योधन कांहीं दिसत नाहीं. मला वाटतें, तो जीव घेऊन गाईंसह दक्षिण मार्गानें पळून जात असावा (१३). ( तर ) ह्या वीरांना येथेंच सोडून तो दुर्योधन जिकडे जात आहे तिकडे चल. उत्तरा, मी तेथेंच युद्ध करीन. ( कारण ) आमिषावांचून युद्धांत अर्थ नाहीं. त्याला जिंकून गाई घेऊन पुनः मी येथें परत येईन ( १४ )."

**वैशंपायन म्हणाला:—** हें भाषण ऐकून उत्तरानें मोठ्या प्रयत्नानें ते घोडे आवरून धरले व ( भीष्मादि ) कुरुश्रेष्ठांकडून त्या घोड्यांचे लगाम वळवून जिकडे दुर्योधन गेला होता तिकडे घोडे चालविले ( १५ ). रथिसमुदायास सोडून अर्जुन गेल्याबरोबर, त्याचा अभिप्राय जाणून कृप म्हणाला:-( १६ )

नैषोऽन्तरेण राजानं बीभत्सुः स्थातुमिच्छति ।
तस्य पार्ष्णिं ग्रहीष्यामो जवेनाऽभिप्रयास्यतः ॥ १७ ॥
न ह्येनमतिसंक्रुद्धमेको युध्येत संयुगे ।
अन्यो देवात्सहस्राक्षात्कृष्णाद्वा देवकीसुतात् ।
आचार्याच्च सपुत्राद्वा भारद्वाजान्महारथात् ॥ १८ ॥
किं नो गावः करिष्यन्ति धनं वा विपुलं तथा ।
दुर्योधनः पार्थजले पुरा नौरिव मज्जति ॥ १९ ॥
तथैव गत्वा बीभत्सुर्नाम विश्राव्य चाऽऽत्मनः ।
शलभैरिव तां सेनां शरैः शीघ्रमवाकिरत् ॥ २० ॥
कीर्यमाणाः शरौघैस्तु योधास्ते पार्थचोदितैः ।
नाऽपश्यन्नावृतां भूमिं नाऽन्तरिक्षं च पत्रिभिः ॥ २१ ॥
तेषामापततां युद्धे नाऽपयानेऽभवन्मतिः ।
शीघ्रत्वमेव पार्थस्य पूजयन्ति स्म चेतसा ॥ २२ ॥

" राजाशिवाय येथें थांबण्याची अर्जुनाची इच्छा नाहीं. तो फारच त्वरेनें तिकडे चालला आहे; तर आपणहि त्याच्या मागोमाग जाऊं ( १७ ) ( कारण ) तो अतिशय संतापलेला आहे. अशा वेळीं रणांत त्याशीं एकाकी युद्ध करण्यास देवेंद्र, देवकीचा पुत्र कृष्ण, किंवा पुत्रासह महारथी भारद्वाज ( द्रोणाचार्य ) ह्यांवांचून दुसरा कोणीहि समर्थ नाहीं ( १८ ). आपल्याला गाई किंवा पुष्कळ द्रव्य ह्यांशीं काय करावयाचें आहे ? दुर्योधन पार्थरूपी जलांत नावेप्रमाणें बुडेल[1] " ( १९ ) ( इकडे ) अर्जुनानें तसाच जाऊन व आपलें नांव कळवून, लगेच टोळधाडीप्रमाणें ती सर्व सेना बाणांनीं छावून सोडली ( २० ). अर्जुनाच्या शरसमुदायानें आच्छादित झालेले ते योद्धे इकडे तिकडे पाहूं लागले तों, भूमि व अंतरिक्ष यांपैकीं बाणांनीं भरून गेली नाहीं अशी जागा त्यांना दिसेना ( २१ ). लढाईंत भिडणाऱ्या त्या योद्धयांच्या मनांत पळून जाण्याची इच्छा झाली नाहीं. अर्जुनाचें तें हस्तलाघव पाहून ते त्याचीच प्रशंसा करीत राहिले ( २२ ).

१ " पुरा मज्जति " याचा अर्थ नुसता " मङ्क्ष्यति " पुरा निर्पातैर्योलद्.

ततः शङ्खं प्रदध्मौ स द्विषतां लोमहर्षणम् ।
विस्फार्य च धनुः श्रेष्ठं ध्वजे भूतान्यचोदयत् ॥ २३ ॥

तस्य शङ्खस्य शब्देन रथनेमिस्वनेन च ।
गाण्डीवस्य च घोषेण पृथिवी समकम्पत ॥ २४ ॥

अमानुषाणां भूतानां तेषां च ध्वजवासिनाम् ।
ऊर्ध्वं पुच्छान्विधुन्वाना रेभमाणाः समन्ततः ।
गावः प्रतिन्यवर्तन्त दिशमास्थाय दक्षिणाम् ॥२५॥[१५८९]

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे गोनिवर्तने त्रिपञ्चाशत्तमोऽध्यायः ॥ ५३ ॥**

( इतक्यांत ) शत्रूंच्या अंगावर रोमांच उभे करणारा आपला भयंकर शंख अर्जुनानें वाजविला, आणि आपल्या श्रेष्ठ धनुष्याचा टणत्कार करून ध्वजावरील भूतांनाहि महाशब्द करण्याविषयीं इषारा दिला ( २३ ). त्या शंखाच्या शब्दानें, रथाच्या चाकांच्या घडघडाटानें, व धनुष्याच्या टणत्कारानें ( २४ ) आणि ध्वजावर बसलेल्या त्या अमानुष भूतगणांच्या गर्जनेनें पृथ्वी कांपू लागली, व गाई शेपट्या उभारून हंबरडा फोडीत दक्षिण दिशेकडे तोंडें करून परत वळल्या ! ( २५ )

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहण प्रसंगीं गाईंच्या मागें वळण्याविषयीं ५३ वा अध्याय संपला.



# अध्याय ५४

[ अर्जुनाकडून कर्णास मदत करणाऱ्यांचा पराजय. ]

वैशम्पायन उवाच-

स शत्रुसेनां तरसा प्रणुद्य गास्ता विजित्याऽथ धनुर्धराग्र्यः ।
दुर्योधनायाऽभिमुखं प्रयातो भूयो रणं सोऽभिचिकीर्षमाणः ॥१॥
गोषु प्रयातासु जवेन मत्स्यान्किरीटिनं कृतकार्यं च मत्वा ।
दुर्योधनायाऽभिमुखं प्रयान्तं कुरुप्रवीराः सहसाऽभिपेतुः ॥ २ ॥
तेषामनीकानि बहूनि गाढं व्यूढानि दृष्ट्वा बहुलध्वजानि ।
मत्स्यस्य पुत्रं द्विषतां निहन्ता वैराटिमामन्त्र्य ततोऽभ्युवाच ॥ ३ ॥
एतेन तूर्णं प्रतिपादयेमाञ्छ्वेतान्हयान्काञ्चनरश्मियोक्त्रान् ।
जवेन सर्वेण कुरु प्रयत्नमासादयेऽहं कुरुसिंहवृन्दम् ॥ ४ ॥
गजो गजेनेव मया दुरात्मा योद्धुं समाकाङ्क्षति सूतपुत्रः ।
तमेव मां प्रापय राजपुत्र दुर्योधनापाश्रयजातदर्पम् ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:-- शत्रुसैन्याची जोरानें दाणादाण उडवून गाई जिंकून घेतल्यावर आणखी युद्ध करण्याच्या इच्छेनें तो धनुर्धराग्रणी अर्जुन पुनः दुर्योधनावर चालून गेला ( १ ). गाई वेगानें मत्स्य नगराकडे गेल्यावर अर्जुन कृतकार्य झाला असें समजून दुर्योधनावर चालून जाणाऱ्या अर्जुनावर सर्व कौरववीर एकदम तुटून पडले(२). व्यूह रचून तयार झालेलीं व अनेक ध्वज असलेलीं कौरव-सैन्याचीं पथकें पाहून तो शत्रुहन्ता अर्जुन मत्स्यराजपुत्र उत्तराला हांक मारून म्हणाला:-( ३ ). " सोन्याचे लगाम व सामान घातलेले हे आपले पांढरे घोडे सर्व सामर्थ्य खर्च करून तूं प्रयत्नानें ह्या इकडे वळीव; म्हणजे कौरवांकडील मुख्यांच्या समुदायावर मी चाल करतों ( ४ ). राज-पुत्रा, हत्ती हत्तीवर तुटून पडूं पाहतो, त्याप्रमाणें हा दुरात्मा सूतपुत्र कर्ण माझ्याशीं भिडण्याची इच्छा करीत आहे. ह्मणून दुर्योधनाच्या आश्रयावर उन्मत्त झालेल्या ह्या कर्णाकडेच प्रथम मला घेऊन चल ( ५ ).

स तैर्हयैर्वातजवैर्बृहद्भिः पुत्रो विराटस्य सुवर्णकक्षैः[1] ।
व्यध्वंसयत्तद्रथिनामनीकं ततोऽवहत्पाण्डवमाजिमध्ये ॥ ६ ॥
तं चित्रसेनो विशिखैर्विपाठैः संग्रामजिच्छत्रुसहो जयश्च ।
प्रत्युद्ययुर्भारतमापतन्तं महारथाः कर्णमभीप्समानाः[2] ॥ ७ ॥
ततः स तेषां पुरुषप्रवीरः शरासनार्चिः शरवेगतापः ।
व्रातं रथानामदहत्समन्युर्वनं यथाऽग्निः कुरुपुङ्गवानाम् ॥ ८ ॥
तस्मिंस्तु युद्धे तुमुले प्रवृत्ते पार्थं विकर्णोऽतिरथं रथेन ।
विपाठवर्षेण कुरुप्रवीरो भीमेन भीमानुजमाससाद ॥ ९ ॥
ततो विकर्णस्य धनुर्विकृष्य जाम्बूनदाग्र्योपचितं दृढज्यम् ।
अपातयत्तं ध्वजमस्य मथ्य च्छिन्नध्वजः सोऽप्यपयाज्जवेन ॥ १० ॥
तं शात्रवाणां गणबाधितारं कर्माणि कुर्वन्तममानुषाणि ।
शत्रुन्तपः पार्थममृष्यमाणः समार्दयच्छरवर्षेण पार्थम् ॥ ११ ॥

सोन्याचें सामान घातलेल्या, वायूप्रमाणें गति असणाऱ्या अश्वांच्या योगानें, रथसेनेचा भेद करून तो विराटाचा पुत्र अर्जुनास युद्धाच्या मध्यभागीं घेऊन गेला. कर्णास वाचविण्याचें मनांत आणून चित्रसेन, संग्रामजित्, शत्रुसह व जय हे महारथी, विपाठ व विशिख बाण सोडीत चालून येणाऱ्या अर्जुनास आडवे आले (६–७). तेव्हां, वन जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें, धनुष्यरूपी ज्वाला व शरांचा वेगरूपी ताप यांनीं क्रुद्ध झालेल्या अग्नितुल्य नरश्रेष्ठ पार्थानें तो कुरुश्रेष्ठांचा रथसमुदाय भस्मसात् करून टाकिला ( ८ ). त्यावेळीं त्या तुमुल युद्धांत कौरवांतील श्रेष्ठ वीर विकर्ण हा स्थूलदंड बाणांची भीम (भयद) पेर करीत रथासह भीमाचा धाकटा बंधु अतिरथ अर्जुन याजवर चालून आला ( ९ ). परंतु पार्थानें त्याचें तें सुवर्णानें भूषित केलेलें व बळकट प्रत्यंचा असलेलें धनुष्य तोडून त्याचा ध्वजहि खालीं पाडला. ध्वज छिन्न होतांच विकर्णहि घाईनें निघून गेला ( १० ). अमानुष कर्मे करून शत्रुगणास ताप देणाऱ्या अर्जुनावर रागावलेल्या शत्रुंतपानें बाणांचा वर्षाव करून त्यास पीडिलें ( ११ ).

1 कक्षौ पल्याणस्य पश्चादञ्चलपल्लवौ (नी.) २ अभीप्समानाः जीवन्तमिच्छन्तः (ती.)

स तेन राज्ञाऽतिरथेन विद्धो विगाहमानो ध्वजिनीं कुरूणाम् ।
शत्रुन्तपं पञ्चभिराशु विद्ध्वा ततोऽस्य सूतं दशभिर्जघान ॥ १२ ॥

ततः स विद्धो भरतर्षभेण बाणेन गात्रावरणातिगेन ।
गतासुराजौ निपपात भूमौ नगो नगाग्रादिव वातरुग्णः ॥ १३ ॥

नरर्षभास्तेन नरर्षभेण वीरा रणे वीरतरेण भग्नाः ।
चकम्पिरे वातवशेन काले प्रकम्पितानीव महावनानि ॥ १४ ॥

हतास्तु पार्थेन नरप्रवीरा गतासवोर्व्यां सुषुपुः सुवेषाः ।
वसुप्रदा वासवतुल्यवीर्याः पराजिता वासवजेन संख्ये ॥ १५ ॥

सुवर्णकार्ष्णायसवर्मनद्धा नागा यथा हैमवताः प्रवृद्धाः ।
तथा स शत्रून्समरे विनिघ्नन्गाण्डीवधन्वा पुरुषप्रवीरः ॥ १६ ॥

चचार सङ्ख्ये विदिशो दिशश्च दहन्निवाऽग्निर्वनमातपान्ते ।
प्रकीर्णपर्णानि यथा वसन्ते विशातयित्वा पवनोऽम्बुदांश्च ॥ १७ ॥

त्या महारथी राजानें अशाप्रकारें बाणांची झोड उडविलेली पाहून कौरवसेनेंत शिरलेल्या अर्जुनानें, शत्रुंतपाला पांच बाण मारून दहांनीं त्याचे सारथ्यास ठार केलें ( १२ ). भरतश्रेष्ठ अर्जुनाचे ते बाण लागताच वाऱ्यानें उपटलेला वृक्ष पर्वतशिखरावरून जसा कोसळून पडतो त्याप्रमाणें ( शत्रूंतप राजा ) गतप्राण होऊन भूमीवर पडला ( १३ ). वर्षाकाळीं वावटळीनें मोठीं अरण्यें कंपित होतात, त्याप्रमाणें नरश्रेष्ठ अर्जुनाच्या श्रेष्ठ पराक्रमानें रणांगणीं पराजित झालेले ते वीर भयभीत होऊन कापूं लागले ( १४ ). सुंदर पोषाख घातलेले ते नरवीर पार्थाच्या बाणांचे तडाखे बसतांच गतप्राण होऊन सुखरूप भूमीवर निजले (दुसरेहि) पुष्कळ दानशूर व इंद्रासारखे पराक्रमी योद्धे इंद्रपुत्रानें पराजित केले ( १५ ). सोन्याचें काम केलेलीं लोहमय कवचें घातलेले हिमालयावरील धिप्पाड हत्तींप्रमाणें ते दिसले. या रीतीनें समरभूमीवर शत्रूंचा सप्पा उडवीत तो गांडीवधनुर्धारी नरवीर अर्जुन ( १६ ), ग्रीष्मांतीं अग्नि वन जाळीत सुटतो तसा—रणभूमीवर सर्वत्र फिरूं लागला. वायु जसा वसंत ऋतूंत गळून पडलेलीं पानें आणि मेघ यांना

तथा सपत्नान्विकिरन्किरीटी चचार सङ्ख्येऽतिरथो रथेन ।
शोणाश्ववाहस्य हयान्निहत्य वैकर्तनभ्रातुरदीनसत्त्वः ।
एकेन संग्रामजितः शरेण शिरो जहाराऽथ किरीटमाली ॥ १८ ॥
तस्मिन्हते भ्रातरि सूतपुत्रो वैकर्त्तनो वीर्यमथाऽऽददानः ।
प्रगृह्य दन्ताविव नागराजो महर्षभं व्याघ्र इवाऽभ्यधावत् ॥ १९ ॥
स पाण्डवं द्वादशभिः पृषत्कैर्वैकर्त्तनः शीघ्रमथो जघान ।
विव्याध गात्रेषु हयांश्च सर्वान्विराटपुत्रं च करे निजघ्ने ॥ २० ॥
तमापतन्तं सहसा किरीटी वैकर्तनं वै तरसाऽभिपत्य ।
प्रगृह्य वेगं न्यपतज्जवेन नागं गरुत्मानिव चित्रपक्षः ॥ २१ ॥
तावुत्तमौ सर्वधनुर्धराणां महाबलौ सर्वसपत्नसाहौ ।
कर्णस्य पार्थस्य निशम्य युद्धं दिदृक्षमाणाः कुरवोऽभितस्थुः ॥ २२ ॥

उडवीत फिरतो ( १७ ), तसा तो रथांत बसलेला अतिरथी अर्जुन शत्रूंची धुळधाण उडवीत समरांगणावर वावरूं लागला. त्यानें सूर्यपुत्र कर्णाच्या भावाच्या रथाला जोडलेले तांबडेलाल घोडे मारिले; आणि मुकुट व माला धारण केलेल्या त्या महाधैर्यवान् संग्रामजिताचें एकाच बाणानें मस्तक तोडिलें (१८). आपल्या भावाचा वध झालेला पाहून शूरत्वानें चेतलेला कर्ण, दांत वर करून बलाढ्य हत्ती हल्ला करितो तसा, किंवा वाघ मोठ्या बैला-वर धांवतो तसा, धांवला (१९). त्या सूर्यपुत्रानें तडाक्या सरशीं अर्जुनाला बारा पृषत्क बाण मारले व घोड्यांनाहि वेध करून उत्तराच्या हातावरहि प्रहार केला ( २० ). ( तेव्हां ) चित्रविचित्र पंखांचा गरुड वेगानें सर्पावर तुटून पडतो, त्याप्रमाणें चालून येणाऱ्या त्या सूतपुत्र कर्णावर वेगानें अर्जुन तुटून पडला ( २१ ). सर्व धनुर्धरांमध्यें ते दोघे उत्तम महाबलवान् असून सर्व शत्रूंना थांबविणारे होते. कर्ण व अर्जुन यांचें द्वन्द्वयुद्ध लागलें तेव्हां सर्व कौरव

---

१ प्रगृह्य दन्तौ-कूटशब्द मानून, प्रगृह्य-आग्रहेण, दन्तौ पर्वतशिखरौ (मेदिनी विश्वकोश) म्हणजे अर्जुन व उत्तर असा अर्थ (नी.) लावतो, पण व्याघ्राच्या दृष्टान्तांत एकच वृषभ आहे. तेव्हां ' दन्तौ ' दांत वर करून किंवा समोर घेऊन हत्ती हल्ला करण्यास धांवतो तसा, असा अर्थ बरा दिसतो.

स पाण्डवस्तूर्णमुदीर्णकोपः कृतागसं कर्णमुदीक्ष्य हर्षात् ।
क्षणेन साश्वं सरथं ससारथिमन्तर्दधे घोरशरौघवृष्ट्या ॥ २३ ॥
ततः सुविद्धाः सरथाः सनागा योधा विनेदुर्भरतर्षभाणाम् ।
अंतर्हिता भीष्ममुखाः सहाश्वाः किरीटिना कीर्णरथाः पृषत्कैः ॥२४॥
स चापि तानर्जुनबाहुमुक्ताञ्छराञ्छरौघैः प्रतिहत्य वीरः ।
तस्थौ महात्मा सधनुः सबाणः सविस्फुलिङ्गोऽग्निरिवाऽशु कर्णः॥२५॥
ततस्त्वभूद्वै तलतालशब्दः सशङ्खभेरीपणवप्रणादः ।
प्रक्ष्वेडितज्यातलनिःस्वनं तं वैकर्तनं पूजयतां कुरूणाम् ॥ २६ ॥
उद्धूतलाङ्गूलमहापताकध्वजोत्तमांसाकुलभीषणान्तम्[1] ।
गाण्डीवनिर्ह्रादकृतप्रणादं किरीटिनं प्रेक्ष्य ननाद कर्णः ॥ २७ ॥

पाहण्यास जमा झाले (२२). ज्यानें आपले अनेक अपराध केले होते तो कर्ण आलेला पाहतांच अर्जुनाला फारच संताप आला, त्यानें घोर शरवृष्टि करून घोडे, रथ व सारथि ह्यांसह कर्णास आच्छादून टाकिलें ( २३ ). मग अर्जुनानें पृषत्क बाण मारून कौरवांकडील भीष्म प्रभृति योद्धे, रथ, अश्व, गज ह्यासुद्धां सर्व भरून काढले, तेव्हां त्याच्या बाणाचे तडाके बसलेले भरतर्षभाचे योद्धे ओरडूं लागले ( २४ ). त्यावेळीं अर्जुनाच्या बाहूंनीं टाकलेल्या बाणांचा आपल्या बाणांनीं प्रतिकार करीत तो धनुष्यबाणयुक्त महात्मा कर्ण ठिणग्या उडत असलेल्या देदीप्यमान अग्नीप्रमाणें ( स्थिर ) राहिला ( २५ ). तेव्हां तलत्राण आणि प्रत्यंचा यांचा टणत्कार करीत असलेल्या कर्णाची त्या सर्व कौरव वीरांनीं प्रशंसा केली; टाळ्या वाजविल्या; आणि शंख, नगारे व पणव यांचा नाद झाला (२६). रथाचे ध्वजावर पुच्छाची मोठी हालत असलेली पताका; त्या ध्वजावर दोन्ही बाजूच्या फळीच्या दोन्ही टोंकावर भयंकर भूतें गर्दी करून बसलेलीं; आणि स्वतः गांडीवाच्या टणत्काराबरोबरच मोठ्यानें गर्जना करणारा; अशा त्या अर्जुनाला पाहून कर्णानें मोठ्यानें आरोळी दिली (२७).

---

१ ध्वजस्य उत्तमौ अंसौ उपरिस्थतिर्यक्फलकाया भागौ तत्र आकुला व्यग्राः येभीषणाः भूतादयः, ते अन्ते समीपे यस्य तम् ( नी. )

स चापि वैकर्त्तनमर्दयित्वा साश्वं ससूतं सरथं पृषत्कैः ।
तमाववर्ष प्रसभं किरीटी पितामहं द्रोणकृपौ च दृष्ट्वा ॥ २८ ॥
स चापि पार्थं बहुभिः पृषत्कैर्वैकर्त्तनो मेघ इवाऽभ्यवर्षत् ।
तथैव कर्णं च किरीटमाली सञ्छादयामास शितैः पृषत्कैः ॥ २९ ॥
तयोः सुतीक्ष्णान्सृजतोः शरौघान्महाशरौघास्त्रविवर्धने[1] रणे ।
रथे [2]विलग्नाविव चन्द्रसूर्यौ घनान्तरेणाऽनुददर्श लोकः ॥ ३० ॥
अथाऽऽशुकारी चतुरो हयांश्च विव्याध कर्णो निशितैः किरीटिनः ।
त्रिभिश्च यन्तारममृष्यमाणो विव्याध तूर्णं त्रिभिरस्य केतुम् ॥ ३१ ॥
ततोऽभिविद्धः समरावमर्दी प्रबोधितः सिंह इव प्रसुप्तः ।
गाण्डीवधन्वा ऋषभः कुरूणामजिह्मगैः कर्णमियाय जिष्णुः ॥ ३२ ॥

तेव्हां अर्जुनानेंहि रथ, सारथि व अश्व, ह्यासह कर्णावर पृषत्क बाणांची वृष्टि करून त्याला ' त्राहि त्राहि ' करून, भीष्म, द्रोण व कृप दृष्टीस पडतांच त्यावरहि बाणांचा पाऊस पाडिला ( २८ ). ( उलट ) कर्णानेंहि अर्जुनावर मेघाप्रमाणें पृषत्क बाणांची धार धरिली. तेव्हां किरीट व माला धारण करणाऱ्या अर्जुनानेंहि सहाणेवर घासलेल्या पृषत्कबाणांनींच कर्णाला छावून सोडिलें ( २९ ). भयंकर शरवृष्टीच्या योगानें त्या रणांत सारखी अस्त्रांचीं छेदनें चालू असतां, बाणांचा सारखा वर्षाव करीत असलेले ते रथी परस्परांच्या बाणवृष्टीमुळें आच्छादित होऊन गेलेले मेघाच्छादित चंद्रसूर्यांप्रमाणें विलग्न[2] ( बिलगलेले ) असे लोकांच्या दृष्टीस पडले ( ३० ). आतां त्या चलाख कर्णानें तीक्ष्ण बाणांनीं अर्जुनाच्या चारहि घोड्यांचा वेध केला, मोठ्या रागानें तीन बाण त्याच्या सारथ्याला मारिले आणि लगेच त्याच्या ध्वजावरहि तीन बाण टाकले ( ३१ ). तेव्हां, रणांत शत्रूंचें मर्दन करणारा अर्जुन, डंवचून निद्रेंतून जागा केलेल्या सिंहाप्रमाणें कर्णानें मारलेल्या बाणांनीं क्षुब्ध झाला; आणि तो कुरुवंशांत जन्मलेल्यांमध्यें श्रेष्ठ गांडीव-धनुष्यधारी, सरळ जाणाऱ्या बाणांची झोड उडवीत कर्णावर धसरला (३२).

---

१ विवर्धन=छेदन (नी. अमर), २ विलग्न = सन्निहित (नी.) विशेषण लग्न.

शरास्त्रवृष्ट्या निहतो महात्मा प्रादुश्चकाराऽतिमनुष्यकर्म ।
प्राच्छादयत्कर्णरथं पृषत्कैर्लोकानिमान्सूर्य इवांऽशुजालैः॥ ३३॥
स हस्तिनेवाऽभिहतो गजेन्द्रः प्रगृह्य भल्लान्निशितान्निषङ्गात् ।
आकर्णपूर्णं च धनुर्विकृष्य विव्याध गात्रेष्वथ सूतपुत्रम्॥ ३४॥
अथाऽस्य बाहूरुशिरोललाटं ग्रीवां वराङ्गानि परावमर्दी ।
शितैश्च बाणैर्युधि निर्बिभेद गाण्डीवमुक्तैरशनिप्रकाशैः ॥ ३५ ॥
स पार्थमुक्तैरिषुभिः प्रणुन्नो गजो गजेनेव जितस्तरस्वी ।
विहाय संग्रामशिरः प्रयातो वैकर्त्तनः पाण्डवबाणतप्तः ३६॥[१६२५]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरगोग्रहे कर्णापयाने चतुःपञ्चाशत्तमोऽध्यायः॥५४॥

बाण व अस्त्रें यांनीं ताडित झालेल्या त्या महात्म्या अर्जुनानें मनुष्याला दुष्कर असें कर्म केलें; सूर्य आपल्या किरणजालांनीं लोक भरून काढतो, त्याप्रमाणें त्यानें कर्णाचा रथ पृषत्क बाणांनीं भरून काढिला ( ३३ ). नंतर, हत्तीनें टक्कर दिलेल्या गजेंद्राप्रमाणें चिडलेल्या त्या अर्जुनानें भात्यांतून तीक्ष्ण भल्ल बाण घेऊन धनुष्याला जोडून आणि कानापर्यंत ओढून कर्णाच्या गात्रागात्रावर प्रहार केला! ( ३४ ) शत्रूचें मर्दन करणाऱ्या अर्जुनानें आपल्या गांडीव धनुष्यापासून सोडलेल्या विद्युत्तुल्य तीक्ष्ण बाणांनीं त्या रणभूमीवर कर्णाचे हात, पाय, कपाळ, कंठ व श्रेष्ठ अवयव ( डोकें वगैरे ) विद्ध करून सोडले (३५). ( याप्रमाणें ) अर्जुनानें सोडलेल्या बाणांनीं पीडित झालेला कर्ण हत्तीनें पराभव केलेल्या हत्तीप्रमाणें अर्जुनाच्या बाणांनीं घाबरून गेला, आणि रणांगणांतून चालता झाला ( ३६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर-गोग्रहण-प्रसंगीं कर्णाच्या निघून जाण्याविषयीं ५४ वा अध्याय संपला.

## अध्याय ५५

[ असंख्य कौरवांशीं एकव्या अर्जुनाचें युद्ध. त्यांत कौरवांची दाणादाण. ]

वैशम्पायन उवाच— अपयाते तु राधेये दुर्योधनपुरोगमाः ।
अनीकेन यथास्वेन शनैराच्र्छन्त पाण्डवम् ॥ १ ॥
बहुधा तस्य सैन्यस्य व्यूढस्याऽऽपततः शरैः ।
अधारयत वेगं स वेलेव तु महोद्धेः ॥ २ ॥
ततः प्रहस्य बीभत्सुः कौन्तेयः श्वेतवाहनः ।
दिव्यमस्त्रं प्रकुर्वाणः प्रत्यायाद्रथसत्तमः ॥ ३ ॥
यथा रश्मिभिरादित्यः प्रच्छादयति मेदिनीम् ।
तथा गाण्डीवनिर्मुक्तैः शरैः पार्थो दिशो दश ॥ ४ ॥
न रथानां न चाऽश्वानां न गजानां न वर्मणाम् ।
अनिविद्धं शितैर्बाणैरासीद्द्व्यङ्गुलमन्तरम् ॥ ५ ॥
दिव्ययोगाच्च पार्थस्य हयानामुत्तरस्य च ।
शिक्षाशिल्पोपपन्नत्वादस्त्राणां च परिक्रमात् ।
वीर्यवत्वं द्रुतं[1] चाग्र्यं दृष्ट्वा जिष्णोरपूजयन् ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— कर्ण निघून गेल्यावर दुर्योधनादि कौरव पुढारी आपापल्या पथकासह एकामागें एक अर्जुनावर चालून आले ( १ ). (तेव्हां ) नानाव्यूहाकार असलेल्या व चाल करून येणाऱ्या सैन्यास महासागराला मर्यादेंत ठेवणाऱ्या तीराप्रमाणें अर्जुनानें बाणांनीं अडवून धरिलें ( २ ). नंतर ज्यास पांढरे घोडे असलेल्या रथिश्रेष्ठ अर्जुनानें हंसत हंसत दिव्य अस्त्र सोडीत पुढें पाऊल घातलें ( ३ ), आणि ज्याप्रमाणें सूर्य आपल्या किरणांनीं भूमि आच्छादित करतो, त्याप्रमाणें आपल्या गांडीव धनुष्यापासून निघालेल्या बाणांनीं दाही दिशा भरून टाकल्या ( ४ ). अर्जुनाच्या तीव्र बाणांनीं विद्ध झाली नाहीं अशी बोटभर देखील जागा, गज, अश्व व कवचें ह्यांवर उरली नाहीं ( ५ ). पार्थाच्या दिव्यास्त्रप्रयोगामुळें, उत्तराच्या घोड्यांच्या अंगीं शिक्षणाचें मर्म उत्तम प्रकारें बिंबून गेलें असल्यामुळें, आणि सुटत असलेल्या अस्त्रांच्या सामर्थ्यामुळें, अनुभवास येऊं लागलेला तो अर्जुनाचा पराक्रम व वेग

१ द्रुतं=वेगं ( नी. ) द्रुतत्वं पाहिजे.

कालाग्निमिव बीभत्सुं निर्दहन्तमिव प्रजाः ।
नाऽरयः प्रेक्षितुं शेकुर्ज्वलन्तमिव पावकम् ॥ ७ ॥
तानि ग्रस्तान्यनीकानि रेजुरर्जुनमार्गणैः ।
शैलं प्रति बलाभ्राणि व्याप्तानीवाऽर्करश्मिभिः ॥ ८ ॥
अशोकानां वनानीव च्छन्नानि बहुशः शुभैः
रेजुः पार्थशरैस्तत्र तदा सैन्यानि भारत ॥ ९ ॥
स्रजोऽर्जुनशरैः शीर्णं शुष्यत्पुष्पं हिरण्मयम् ।
छत्राणि च पताकाश्च खे दधार सदागतिः ॥ १० ॥
स्वबलत्रासनात्त्रस्ताः परिपेतुर्दिशो दश ।
रथाङ्गदेशानादाय पार्थच्छिन्नयुगा हयाः ॥ ११ ॥
कर्णकक्षविषाणेषु अन्तरोष्ठेषु चैव ह ।
मर्मस्वङ्गेषु चाऽऽहत्य पातयत्समरे गजान् ॥ १२ ॥

पाहून त्याचे शत्रुहि मान डोलवूं लागले ( ६ ). धडाडलेल्या अग्नीकडे पाहवत नाहीं त्याप्रमाणें प्रजा नष्ट करण्यास उद्युक्त झालेल्या प्रलय कालच्या अग्नी-सारख्या अर्जुनाकडे बघण्यास शत्रू समर्थ झाले नाहींत ( ७ ). अर्जुनाच्या बाणांनीं आच्छादित झालेलीं तीं सैन्यें सूर्य किरणांनीं व्याप्त झालेल्या पर्वता-समीप[1] निश्चल मेघाप्रमाणें शोभूं लागलीं (८). अर्जुनाच्या तेजस्वी बाणांनीं अनेक बाजूंनी झाकलेलीं तीं सैन्यें[2] अशोकवनांप्रमाणें शोभूं लागलीं ( ९ ). सुकून गळून पडलेलीं सोनचाफ्याचीं फुलें वाऱ्यानें उडून जातात त्याप्रमाणें अर्जुनाच्या बाणांच्या तडाक्यांनीं छत्रें व पताका आकाशांत वायूनें वरच्यावर धरल्या (१०). सेनेच्या त्रासानें आधींच त्रासलेले (शत्रुरथांचे) घोडे अर्जुनानें जूं तोडून टाकल्यामुळें रथाच्या शिल्लक राहिलेल्या सांगाड्यासह दशदिशा धांवूं लागले ( ११ ). कान, कक्षा, दांत, अधरोष्ठ व मर्मांग ह्याचे ठिकाणीं प्रहार करून अर्जुनानें रणभूमीवर हत्ती लोळविले ( १२ ).

---

१ प्रति=समीपे बल = बलवन्ति अचंचलानि (नी. )

२ अशोकाचीं पानें बारीक व तांबडीं असतात अशी कल्पना दिसते. शुभैः पुष्पैः ॥ फलसूचकत्वात्तेषां शुभत्वम् ( नी. )

कौरवाग्रगजानां तु शरीरैर्गतचेतसाम् ।
क्षणेन संवृता भूमिर्मेघैरिव नभस्तलम् ॥ १३ ॥
युगान्तसमये सर्वं यथा स्थावरजङ्गमम् ।
कालक्षयमशेषेण दहत्यग्रशिखः[1] शिखी ।
तद्वत्पार्थो महाराज ददाह समरे रिपून् ॥ १४ ॥
ततः सर्वास्त्रतेजोभिर्धनुषो निःस्वनेन च ।
शब्देनाऽमानुषाणां च भूतानां ध्वजवासिनाम् ।
भैरवं शब्दमत्यर्थं वानरस्य च कुर्वतः ॥ १५ ॥
[2]दैवारिपाच्च बीभत्सुस्तस्मिन्दौर्योधने बले ।
भयमुत्पादयामास बलवानरिमर्दनः ॥ १६ ॥
[3]रथशक्तिममित्राणां प्रागेव निपतद्भुवि ।
सोऽपयात्[3]सहसा पश्चात्साहसाच्चाऽभ्युपेयिवान् ॥ १७ ॥
शरव्रातैः सुतीक्ष्णाग्रैः समादिष्टैः खगैरिव ।
अर्जुनस्तु खमावव्रे लोहितप्राशनैः खगैः ॥ १८ ॥

(तेव्हां) मेघांनीं नभस्तल भरावें त्याप्रमाणें कुरुश्रेष्ठांकडील गतप्राण झालेल्या गजांच्या शरीरांनीं ती भूमि एका क्षणांत आच्छादून गेली (१३). महाराज, कालगतीनें क्षय पावणारें हें चराचर जग, युगाचा अंत होण्याचे वेळीं ज्याप्रमाणें तीव्र[1] ज्वालांचा अग्नि भस्म करून टाकतो, त्याप्रमाणें पार्थ त्या रणांगणांत शत्रूंना भाजून काढूं लागला (१४). पुढें सर्व अस्त्रांचें तेज, गांडीव धनुष्याचा टणत्कार, ध्वजावर बसलेल्या अमानुष भूतगणांचा अट्टाहास, भयंकर शब्द करणाऱ्या त्या वानराची गर्जना, (१५) आणि आपल्या देवदत्त शंखाचा भयंकर शब्द, यांच्या योगानें त्या बलवान शत्रूंचें मर्दन करणाऱ्या अर्जुनानें दुर्योधनाच्या सैन्यांत भीति उत्पन्न केली (१६). प्रथमतः केवळ दर्शनानें अर्जुनानें शत्रूंची शरीरशक्ति नाहींशी केली होती. नंतर (अवसान येण्याकरितां) जरा मागें सरून तो वीर एकदम शत्रूंवर तुटून पडला (१७). आकाशांत संचार करणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या शत्रूंचें रक्तप्राशन करणाऱ्या बाणांनीं अर्जुनानें आकाश व्यापिलें (१८).

१ अग्रशिखः अग्रवत्तीक्ष्णाः शिखाःयस्य (नी.) २ दैवारिपः शंखः देवारीनसुरान्पाति समुद्रः तद्भवः (नी.) ३ रथः शरीरं (नी.) अपयात् पयगतौ गत्यभावात् । (नी.)

अत्रमध्ये यथाऽर्कस्य रश्मयास्तिग्मतेजसः ।
दिशासु च तथा राजन्नसङ्ख्याताः शरास्तदा ॥ १९ ॥
सकृदेवाऽऽनतं शेकू रथमभ्यासितुं परे ।
अलभ्यः पुनरश्वैस्तु रथात्सोऽतिप्रपादयेत् ॥ २० ॥
ते शरा द्विट्शरीरेषु यथैव न ससञ्जिरे ।
द्विडनीकेषु बीभत्सोर्न ससञ्जे रथस्तदा ॥ २१ ॥
स तद्विक्षोभयामास द्वारातिबलमञ्जसा ।
अनन्तभोगो भुजगः क्रीडन्निव महार्णवे ॥ २२ ॥
अस्यतो नित्यमत्यर्थं सर्वमेवाऽतिगस्तथा ।
अश्रुतः श्रूयते भूतैर्धनुर्घोषः किरीटिनः ॥ २३ ॥
सन्ततास्तत्र मातङ्गा बाणैरल्पान्तरान्तरे ।
संवृतास्तेन दृश्यन्ते मेघा इव गभस्तिभिः ॥ २४ ॥

तेव्हां, राजा, भांड्यामध्यें जसे तीक्ष्णतेजस्वी सूर्यकिरण भरतात, तसे अर्जुनाचे ते असंख्य बाण ( सर्व ) दिशांत भरले (१९). अर्जुनाच्या रथाजवळ आलेल्या शत्रूचा व त्याचा सामना होण्याचा योग एकदांच येत होता. कारण शत्रूची गांठ पडली कीं त्याला रथावरून खालीं ओढून अश्वांसह तो त्याची परलोकीं पाठवणी करीत असे (२०). त्या अर्जुनाचे बाण जसे शत्रूच्या शरीरांत न अडकतां पार निघून जावयाचे, तसा त्याचा रथहि शत्रूंच्या सैन्यांत कोठेंहि न अडकतां पार निघून जाई. (२१). याप्रमाणें अर्जुनानें, महासागरांत क्रीडा करणाऱ्या अनंतफणांच्या शेषाप्रमाणें, शत्रूच्या सेनेची सहज खळबळ उडवून दिली (२२). सर्वांवर ताण करणारा त्याच्या धनुष्याचा शब्द, पूर्वी कधींहि ऐकिला नाहीं असा, सारखे जोरानें बाण मारतांना ऐकूं येऊं लागला (२३). रणांगणांत एकमेकांच्या अगदीं जवळ जवळ एका रांगेनें उभे राहिलेले हत्ती, अर्जुनाच्या बाणांनीं भरून गेल्यामुळें सूर्यकिरणांनीं व्याप्त झालेल्या मेघांसारखे दिसूं लागले (२४).

१ अत्रमध्ये पात्रे. अत्रं अमत्रं, मध्यवर्ण लोपश्छान्दसः. ( नी. )

२ अनन्तभोगः बहुफणः शेषः ( नी. )

दिशोऽनुभ्रमतः सर्वाः सव्यदक्षिणमस्यतः ।
सततं दृश्यते युद्धे सायकासनमण्डलम् ॥ २५ ॥
पतन्त्यरूपेषु यथा चक्षूंषि न कदाचन ।
नाऽलक्ष्येषु शराः पेतुस्तथा गाण्डीवधन्वनः ॥ २६ ॥
मार्गो गजसहस्रस्य युगपद्गच्छतो वने ।
यथा भवेत्तथा जज्ञे रथमार्गः किरीटिनः ॥ २७ ॥
नूनं पार्थजयैषित्वाच्छक्रः सर्वामरैः सह ।
हन्त्यस्मानित्यमन्यन्त पार्थेन निहताः परे ॥ २८ ॥
घ्नन्तमत्यर्थमहितान्विजयं तत्र मेनिरे ।
कालमर्जुनरूपेण संहरन्तमिव प्रजाः ॥ २९ ॥
कुरुसेनाशरीराणि पार्थेनैवाऽहतान्यपि ।
सेदुः पार्थहतानीव पार्थकर्मानुशासनात्[1] ॥ ३० ॥

डाव्या उजव्या बाजूंनीं सारखे बाण सोडीत अर्जुन सर्वत्र संचार करीत असल्यामुळें, त्याचें धनुष्य एकसारखें बिंदुकलीप्रमाणें वांकलेलें दिसे (२५). सुंदर वस्तु सोडून दृष्टि इकडे तिकडे जात नाहीं, त्याप्रमाणें गांडीवधन्व्याचे बाण निशाण सोडून अन्यत्र जात नव्हते ( २६ ). वनांत संचार करित असलेल्या हजार हत्तींच्या मार्गाप्रमाणें अर्जुनाच्या रथाचा मार्ग ( शेंकडो लोक मेलेले पडल्यानें ) विस्तीर्ण होई ( २७ ). अर्जुनाच्या बाणांचे सारखे तडाखे बसूं लागले तेव्हां शत्रूंना वाटलें कीं, अर्जुनाला जय मिळावा म्हणून इन्द्रच सर्व देवांसह आम्हांस ठार करीत आहे ! (२८) तो एकसारखा शत्रूंचा सप्पा उडवीत चालला तेव्हां असेंहि वाटूं लागलें कीं, अर्जुनरूपानें हा प्रत्यक्ष काळच प्रजेचा संहार करीत आहे (२९). अर्जुनाच्या प्रहारांनीं पडणारीं तीं कुरुसैनिकांचीं शरीरें अर्जुनानें प्रहार केलेल्या शरीरांप्रमाणेंच पडत होतीं; कारण, पार्थाच्या त्या पराक्रमाला उपमा ( रामा-रावणांच्या युद्धाप्रमाणें ) त्याच्याच पराक्रमाची '! ( ३० ) !

[1] पार्थकर्मानुशासनात् ' अर्थ लागत नाहीं. ( नी. ) मुग्ध आहे.

ओषधीनां[1] शिरांसीव द्विषच्छीर्षाणि सोऽन्वयात्[2] ।
अवनेशुः[3] कुरूणां हि वीर्याण्यर्जुनजाद्भयात् ॥ ३१ ॥
अर्जुनानिलभिन्नानि वनान्यर्जुनविद्विषाम्[4] ।
चक्रुर्लोहितधाराभिर्धरणीं लोहितान्तराम् ॥ ३२ ॥
लोहितेन समायुक्तैः पांसुभिः पवनोद्धतैः ।
बभूवुर्लोहितास्तत्र भृशमादित्यरश्मयः ॥ ३३ ॥
सार्कं खं तत्क्षणेनाऽऽसीत्सन्ध्यायमिव लोहितम् ।
अप्यस्तं प्राप्य सूर्योऽपि निवर्त्तेत न पाण्डवः ॥ ३४ ॥
तान्सर्वान्समरे शूरः पौरुषे समवास्थितान् ।
दिव्यैरस्त्रैरचिन्त्यात्मा सर्वानाच्छेद्धनुर्धरान् ॥ ३५ ॥
स तु द्रोणं त्रिसप्तत्या क्षुरप्राणां समार्पयत् ।
दुःसहं[5] दशभिर्बाणैर्द्रौणिमष्टाभिरेव च ॥ ३६ ॥

धान्याचीं कणसें खुडावींत त्याप्रमाणें अर्जुनानें शत्रूचीं शिरें क्रमानें तोडण्याचा सपाटा चालविला असतां त्याच्या भयानें कौरवांचे पराक्रम नष्ट झाले ( ३१ ) अर्जुनरूप वायूनें छिन्नभिन्न झालेल्या शत्रूंच्या शरीरांपासून रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागल्यामुळें सर्व जमीन तांबडी लाल होऊन गेली (३२). रक्तानें भिजलेले तेथलि ते रजःकण वाऱ्यानें उडूं लागले असतां, सूर्यकिरणेंहि आरक्त दिसूं लागलीं (३३). आणि त्यायोगानें संध्याकाळाप्रमाणें सूर्यासह आकाश तत्क्षणींच लाल दिसूं लागलें. सूर्यहि अस्ताला गेला तरी अर्जुन परतणार नाहीं ( असें वाटलें ) ( ३४ ). आपल्या पराक्रमाच्या घमेंडींत असलेल्या त्या सर्व धनुर्धरांना त्या अचिंत्य मनाच्या शूरानें दिव्यास्त्रांनीं त्या समरभूमीवर ताडन केलें ( ३५ ). त्यानें त्र्याहत्तर क्षुरप्र बाण द्रोणावर टाकिले, दुःसहाला दहा बाण मारले, व अश्वत्थाम्यावर आठ बाण सोडले ( ३६ ).

१ ओषधीनां=व्रीह्यादीनाम् । ( नी. ). २ अन्वयात्=अनुक्रमात् । ( नी. )
३ अवनेशुः नष्टानि ( नी. ) ४ वनानि आलयानि शरीराणि ( नी. )
५ दुःसह धृतराष्ट्रपुत्र असावा.

दुश्शासनं द्वादशभिः कृपं शारद्वतं त्रिभिः ।
भीष्मं शान्तनवं षष्ट्या राजानं च शतेन ह ।
कर्णं च कर्णिना कर्णे विव्याध परवीरहा ॥ ३७ ॥
तस्मिन्विद्धे महेष्वासे कर्णे सर्वास्त्रकोविदे ।
हताश्वसूते विरथे ततोऽनीकमभज्यत ॥ ३८ ॥
तत्प्रभग्नं बलं दृष्ट्वा पार्थमाजिस्थितं पुनः ।
अभिप्रायं समाज्ञाय वैराटिरिदमब्रवीत् ॥ ३९ ॥
आस्थाय रुचिरं जिष्णो रथं सारथिना मया ।
कतमं यास्यसेऽनीकमुक्तो यास्याम्यहं त्वया ॥ ४० ॥

अर्जुन उवाच—लोहिताश्वमरिष्टं यं वैयाघ्रमनुपश्यसि ।
नीलां पताकामाश्रित्य रथे तिष्ठन्तमुत्तर ॥ ४१ ॥
कृपस्यैतदनीकाग्र्यं प्रापयस्वैतदेव माम् ।
एतस्य दर्शयिष्यामि शीघ्रास्त्रं दृढधन्विनः ॥ ४२ ॥

बारा बाणांनीं दुःशासनास ताडन केलें; तिहींनीं कृपास वेधिलें; शंतनुपुत्र भीष्मास साठांनीं प्रहार केला, दुर्योधनाचा शंभरांनीं समाचार घेतला, आणि शत्रूंच्या वीरांस मारणाऱ्या त्या अर्जुनानें कर्णाच्या कानावर एक कर्णी बाण मारून वेध केला ( ३७ ). त्या सर्वास्त्रकोविद महाधनुर्धर कर्णाचा वेध करून अर्जुनानें त्याचा सारथि व अश्व यांस मारल्यावर तो विरथ झाला, तेव्हां सैन्याची पांगापांग झाली ( ३८ ). त्या सैन्याचा मोड झालेला असतांहि अर्जुन आपलें ठाण मांडून उभाच आहे, असें जाणून उत्तरानें त्याचें मनोगत ओळखिलें, आणि म्हटलें:-( ३९ ) " अर्जुना, ह्या सुंदर रथावर मज सारथ्यासह बसून आतां कोणत्या पथकावर तूं जाणार आहेस तें सांग, म्हणजे मीं रथ घेऊन तिकडे चलतों "( ४० ).

**अर्जुन म्हणाला:**— " उत्तरा, तांबडे घोडे जोडलेल्या रथांत व्याघ्रचर्म परिधान करून नीलध्वजाच्या आश्रयानें जो शुभ वीर उभा आहे ( ४१ ) त्या कृपाच्या पथकाचें हें मुख ! तिकडेच मला घेऊन चल, म्हणजे बळकट धनुष्य धारण करणाऱ्या ह्याला मी शीघ्र अस्त्रें सोडण्याचें माझें कौशल्य दाखवितों ( ४२ ).

ध्वजे कमण्डलुर्यस्य शातकौम्भमयः शुभः ।
आचार्य एष हि द्रोणः सर्वशस्त्रभृतां वरः ॥ ४३ ॥
सदा ममैष मान्यस्तु सर्वशस्त्रभृतामपि ।
सुप्रसन्नं महावीरं कुरुष्वैनं प्रदक्षिणम् ॥ ४४ ॥
अत्रैवाऽवाऽवरोहैनमेष धर्मः सनातनः[1] ।
यदि मे प्रथमं द्रोणः शरीरे प्रहरिष्यति ।
ततोऽस्य प्रहरिष्यामि नाऽस्य कोपो भवेदिति ॥ ४५ ॥
अस्याऽविदूरे हि धनुर्ध्वजाग्रे यस्य दृश्यते ।
आचार्यस्यैष पुत्रो वै अश्वत्थामा महारथः ॥ ४६ ॥
सदा ममैष मान्यस्तु सर्वशस्त्रभृतामपि ।
एतस्य त्वं रथं प्राप्य निवर्तेथाः पुनः पुनः ॥ ४७ ॥
य एष तु रथानीके सुवर्णकवचावृतः ।
सेनाग्र्येण तृतीयेन व्यावहार्येण[2] तिष्ठति ॥ ४८ ॥
यस्य नागो ध्वजाग्रेऽसौ हेमकेतनसंवृतः ।
धृतराष्ट्रात्मजः श्रीमानेष राजा सुयोधनः ॥ ४९ ॥

ज्याच्या ध्वजावर सोन्याचा शुभ कमंडलु झळकत आहे, तो हा सर्व शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ आचार्य द्रोण ( ४३ ). हा मला तसेंच सर्व शस्त्रधरांनाहि मान्य आहे. तेव्हां ह्या सुप्रसन्न महावीराला प्रदक्षिणा कर ( ४४ ). अथवा येथेंच त्यास मान द्यावा आणि नंतर फिरून रथावर चढून युद्धास सज्ज व्हावें, असा सनातन धर्म आहे. प्रथम जर द्रोण मजवर प्रहार करील तरच मी त्याजवर हत्यार उपशीन. म्हणजे ( मर्यादा पालन केल्यामुळें ) ह्याचा मजवर कोप होणार नाहीं ( ४५ ). ह्याच्या सन्निधच ज्याच्या ध्वजावर धनुष्य काढलेलें आहे तो ह्याचा पुत्र महारथ अश्वत्थामा ( ४६ ). हाहि सर्वदा मला व तसाच सर्व शस्त्रधरांनाहि मान्य आहे. याच्या रथाजवळ गेल्यावर तूं पुनः पुनः परत फिर ( ४७ ). हा जो रथांच्या पथकामध्यें सोन्याचें कवच घालून ताज्या दमाच्या तिसऱ्या तुकडीसह उभा आहे ( ४८ ), आणि ज्याच्या ध्वजाग्रावर सुवर्णमय हत्ती काढलेला आहे, तो हा धृतराष्ट्राचा पुत्र श्रीमान् राजा दुर्योधन ( ४९ ).

१ वाऽवाऽवरोह=वा, अव, अवरोह अशीं पदें. अव=मानय ( नी. )
२ व्यावहार्येण व्यवहारयोग्येन अश्रान्तेन ( नी. )

एतस्याऽभिमुखं वीर रथं पररथारुजम् ।
प्रापयस्वैष राजा हि प्रमाथी युद्धदुर्मदः ॥ ५० ॥
एष द्रोणस्य शिष्याणां शीघ्रास्त्रे प्रथमो मतः ।
एतस्य दर्शयिष्यामि शीघ्रास्त्रं विपुलं रणे ॥ ५१ ॥
नागकक्षा तु रुचिरा ध्वजाग्रे यस्य तिष्ठति ।
एष वैकर्तनः कर्णो विदितः पूर्वमेव ते ॥ ५२ ॥
एतस्य रथमास्थाय राधेयस्य दुरात्मनः ।
यत्तो भवेथाः संग्रामे स्पर्द्धते हि सदा मया ॥ ५३ ॥
यस्तु नीलानुसारेण पञ्चतारेण केतुना ।
हस्तावापी बृहद्धन्वा रथे तिष्ठति वीर्यवान् ॥ ५४ ॥
यस्य तारार्कचित्रोऽसौ ध्वजो रथवरे स्थितः ।
यस्यैतत्पाण्डुरं छत्रं विमलं मूर्ध्नि तिष्ठति ॥ ५५ ॥
महतो रथवंशस्य नानाध्वजपताकिनः ।
बलाहकाग्रे सूर्यो वा य एष प्रमुखे स्थितः ॥ ५६ ॥

शत्रूंच्या रथांचा चुराडा करून सोडणारा तुझा रथ याच्या पुढें ने; कारण हा मोठा खळबळ करणारा व युद्धाविषयीं गर्व करणारा आहे ( ५० ). द्रोणाच्या सर्व शिष्यांत शीघ्रास्त्राविषयीं हा पहिला, अशी याची आख्या आहे. याला रणांत शीघ्रास्त्र खूप दाखवीन ( ५१ ). हत्तीच्या साखळदंडाचें सुंदर चित्र ज्याच्या ध्वजावर आहे तो हा वैकर्तन कर्ण, हा तुला मघां माहीत झालेला आहेच ( ५२ ). ह्या दुष्ट राधेयाच्या जवळ तूं भिडलास म्हणजे सावध रहा; कारण युद्धामध्यें हा मला नेहमीं पाण्यांत पहात असतो ( ५३ ). निळ्या पताकेवर काढलेल्या सोन्याच्या पाच ताऱ्यांचा ध्वज रथावर असलेल्या, हातीं भलें मोठें धनुष्य घेऊन व हस्तकवच घालून जो वीर रथांत उभा आहे ( ५४ ), सभोंवतीं तारेव मध्यें सूर्य यांनीं सुशोभित झालेला ध्वज ज्याच्या श्रेष्ठ रथावर झळकत आहे, ज्याच्या मस्तकावर पांढरें शुभ्र निर्मल छत्र शोभत आहे ( ५५ ), मेघांच्या अग्रभागीं असलेला जणूं सूर्यच असा जो ह्या नानाध्वजपताकांनीं युक्त अशा मोठ्या रथदळाच्या बिनीवर उभा आहे (५६),

हैमं चन्द्रार्कसङ्काशं कवचं यस्य दृश्यते ।
जातरूपशिरस्त्राणं मनस्तापयतीव मे ॥ ५७ ॥
एष शान्तनवो भीष्मः सर्वेषां नः पितामहः ।
राजश्रियाऽभिवृद्धश्च सुयोधनवशानुगः ॥५८ ॥
पश्चादेष प्रयातव्यो न मे विघ्नकरो भवेत् ।
एतेन युध्यमानस्य यत्तः संयच्छ मे हयान् ॥ ५९ ॥
ततोऽभ्यवहदव्यग्रो वैराटिः सव्यसाचिनम् ।
यत्राऽतिष्ठत्कृपो राजन्योत्स्यमानो धनञ्जयम् ॥ ६० ॥
[ १६८५ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनकृपसंग्रामे पञ्चपञ्चाशत्तमोऽध्यायः ॥ ५५ ॥

ज्यानें अंगांत घातलेलें सोन्याचें कवच सूर्य किंवा चंद्राप्रमाणें लकाकत आहे, आणि ज्याचें सुवर्णमय शिरस्त्राण माझ्या मनाला ताप देत आहे ( ५७ ), तो हा राजतेजानें झळकत असलेला, व दुर्योधनाच्या मर्जीप्रमाणें चालणारा, आम्हां सर्वांचा पितामह, शंतनूचा पुत्र भीष्म आहे ( ५८ ). शेवटीं याशीं गांठ घालावयाची; म्हणजे मला कांहीं अडचण पडणार नाहीं. मात्र याच्याशीं युद्ध चालू झालें म्हणजे तूं आपले घोडे फार सावधगिरीनें हांक " ( ५९ ). राजा, याप्रमाणें अर्जुनानें सांगितल्यावर, जेथें कृप अर्जुनाशीं युद्ध करण्याची इच्छा करून उभा होता, तिकडे त्या दक्ष उत्तरानें अर्जुनास नेलें ( ६० ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं अर्जुन व कृप यांच्या युद्धाविषयीं ५५ वा अध्याय संपला.



# अध्याय ५६

[ इन्द्रादिदेव युद्ध पाहाण्यास येतात. ]

वैशम्पायन उवाच—तान्यनीकान्यदृश्यन्त कुरूणामग्रधन्विनाम् ।
संसर्पन्ते यथा मेघा घर्मान्ते मन्दमारुताः ॥ १ ॥
अभ्याशे वाजिनस्तस्थुः समारूढाः प्रहारिणः ।
भीमरूपाश्च मातङ्गास्तोमराङ्कुशनोदिताः।
महामात्रैः समारूढा विचित्रकवचोज्ज्वलाः ॥ २ ॥
ततः शक्रः सुरगणैः समारुह्य सुदर्शनम् ।
सहोपायात्तदा राजन्विश्वाश्विमरुतां गणैः ॥ ३ ॥
तद्देवयक्षगन्धर्वमहोरगसमाकुलम् ।
शुशुभेऽभ्रविनिर्मुक्तं ग्रहाणामिव मण्डलम् ॥ ४ ॥
अस्त्राणां च बलं तेषां मानुषेषु प्रयुञ्जताम् ।
तच्च भीमं महद्युद्धं कृपार्जुनसमागमे ।
द्रष्टुमभ्यागता देवाः स्वविमानैः पृथक् पृथक् ॥ ५ ॥

वैशंपायन म्हणालाः— ग्रीष्मकाळाचे शेवटीं जसे मंद वाऱ्याच्या योगानें ढग हळूहळू पुढें जातात, त्याप्रमाणें त्या कुरुश्रेष्ठ धनुर्धरांचीं पथकें हळूहळू पुढें सरसावत आहेत असें दिसूं लागलें ( १ ). वर योद्धे बसलेले असे घोडे, आणि लखलखीत कवचें घालून व हातांत तोमर व अंकुश घेऊन हत्तींना चालवीत माहत वर बसलेले हत्ती ( पथकाच्या ) जवळ उभे होते (२). नंतर, राजा, इंद्र ( विमानांत ) बसून विश्वेदेव, अश्विनीकुमार व मरुद्गण यांसह त्या शत्रुसमागमास ( युद्धास ) आला ( ३ ). तेव्हां देव, गंधर्व, यक्ष, महासर्प, ह्यांनीं गजबजून गेलेलें तें रणमंडळ निरभ्र ग्रहमंडळाप्रमाणें शोभूं लागलें ( ४ ). मानवयुद्धामध्यें योजिल्या जाणाऱ्या त्या अस्त्रांचें सामर्थ्य आणि कृपाचार्य व अर्जुन यांची गांठ पडल्यानंतर त्यांचें होणारें महाभयंकर युद्ध, पाहण्याकरितां देव आपापल्या निरनिराळ्या विमानांत बसून तेथें आले ( ५ ).

१ ' उपायात्'चें कर्म ' सुदर्शनम् शत्रुसमागमम् ( युद्ध ).' पण ' समारुह्य विमानमिति शेषः ' असें घ्यावें लागतें ( नी. )

शतं शतसहस्राणां यत्र स्थूणा हिरण्मयी ।
मणिरत्नमयी चाऽन्या प्रासादं तदधारयत् ॥ ६ ॥
ततः कामगमं दिव्यं सर्वरत्नविभूषितम् ।
विमानं देवराजस्य शुशुभे खेचरं तदा ॥ ७ ॥
तत्र देवास्त्रयस्त्रिंशत्तिष्ठन्ति सहवासवाः ।
गन्धर्वा राक्षसाः सर्पाः पितरश्च महर्षिभिः ॥ ८ ॥
तथा राजा वसुमना बलाक्षः सुप्रतर्दनः
अष्टकश्च शिविश्चैव ययातिर्नहुषो गयः ॥ ९ ॥
मनुः पूरू रघुर्भानुः कृशाश्वः सगरो नलः ।
विमाने देवराजस्य समदृश्यन्त सुप्रभाः ॥ १० ॥
अग्नेरीशस्य सोमस्य वरुणस्य प्रजापतेः ।
तथा धातुर्विधातुश्च कुबेरस्य यमस्य च ॥ ११ ॥
अलम्बुषोग्रसेनानां गन्धर्वस्य च तुम्बरोः ।
यथामानं यथोद्देशं विमानानि चकाशिरे ॥ १२ ॥
सर्वदेवनिकायाश्च सिद्धाश्च परमर्षयः ।
अर्जुनस्य कुरूणां च द्रष्टुं युद्धमुपागताः ॥ १३ ॥

एक कोट सुवर्णमय खांबांचा आणि दुसरा रत्नमय खांबाचा समूह ज्याच्या प्रासादाला होता तें देवेंद्राचें आकाशात इच्छेप्रमाणें जाणारें दिव्य आणि सर्व रत्नानीं भूषित विमान तेव्हां शोभत होतें (६-७ ). त्यांत इंद्रासह तेहतीस देव बसले असून, गंधर्व, राक्षस, सर्प, पितर व महर्षिहि होते ( ८ ). त्याचप्रमाणें राजा वसुमना, बलाक्ष, सुप्रतर्दन, अष्टक, शिबि, तसाच ययाति, नहुष, गय, मनु, पुरु, रघु, भानु, कृशाश्व, सगर व नल हे महातेजस्वी देवराजाच्या विमानांत बसलेले दिसत होते ( ९-१० ). अग्नि, शंकर, सोम, वरुण, प्रजापति, तसाच धाता, विधाता, कुबेर, यम, ( ११ ) व अलंबुष-उग्रसेन-प्रभृति आणि तुंबरु गंधर्व ह्यांचींहि विमानें आपापल्या योग्यतेप्रमाणें यथोचित स्थानीं झळकूं लागलीं; आणि अर्जुनाचें व कौरवांचें तें युद्ध पाहण्याकरितां सर्व देवशरीर असलेले सिद्ध व महर्षि तेथें जमले (१२-१३).

१ अलंबुषोग्रसेनानां तत्प्रमुखानां गन्धर्वाणाम् ( नी. )

दिव्यानां सर्वमाल्यानां गन्धः पुण्योऽथ सर्वशः ।
प्रससार वसन्ताग्रे वनानामिव भारत ॥ १४ ॥
तत्र रत्नानि देवानां समदृश्यन्त तिष्ठताम् ।
आतपत्राणि वासांसि स्रजश्च व्यजनानि च ॥ १५ ॥
उपाशाम्यद्रजो भौमं सर्वं व्याप्तं मरीचिभिः ।
दिव्यगन्धानुपादाय वायुर्योधानसेवत ॥ १६ ॥
प्रभासितमिवाऽऽकाशं चित्ररूपमलंकृतम् ।
संपतद्भिः स्थितैश्चापि नानारत्नावभासितैः ॥ १७ ॥
विमानैर्विविधैश्चित्रैरुपानीतैः सुरोत्तमैः ।
वज्रभृच्छुशुभे तत्र विमानस्थैः सुरैर्वृतः ॥ १८ ॥
बिभ्रन्मालां महातेजाः पद्मोत्पलसमायुताम् ।
विप्रेक्ष्यमाणो[1] बहुभिर्नाऽतृप्यत्सुमहाहवम् ॥ १९ ॥ [ १७०४ ]

इति श्रीमहाभारते० संहितायां विराटपर्वणि गोहरणपर्वणि देवागमने षट्पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५६ ॥

भारता जनमेजया, वनामध्यें वसंत ऋतूचे आरंभीं ज्याप्रमाणें सुगंधि पुष्पांचा दरवळ सुटतो, तसा त्याठिकाणीं सर्व दिव्यपुष्पांचा चोहोंकडे पुण्यकारक सुगंध सुटला (१४). व देवांनीं धारण केलेलीं रत्नें, वस्त्रें, छत्रें, चामरें व माळा दिसूं लागल्या ( १५ ). जमिनीवरील धूळ नाहींशी झाली; सर्व आकाश किरणांनीं व्याप्त झालें, आणि दिव्य सुगंध वाहून आणून वायुहि योद्धयांस संतोषित करूं लागला ( १६ ). देवांनीं आणलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या रत्नांनीं चमकणाऱ्या विविध विमानांनीं, फिरत्या व स्थिर स्थितींत, आकाश प्रकाशित झालें आणि शोभायमान चित्रें काढल्यासारखें झालें. वज्रपाणी इंद्र, सभोंवती असणाऱ्या विमानांतील देवसमुदायामुळें शोभूं लागला ( १७-१८.) तो कमलांची माळ गळ्यांत घातलेला महातेजस्वी इंद्र, अनेक देवांसह तें महायुद्ध पाहात तृप्ति पावला नाहीं ( १९ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत देवांच्या आगमनाविषयीं ५६ वा अध्याय संपला.

---

1 विप्रेक्ष्यमाण = विप्रेक्षमाण = असावें. 'बहुभिः' = चा संबंध 'सुरैः' कडे घेणें.

# अध्याय ५७

[ कृप व अर्जुन यांचें युद्ध. कृपाचा पराजय. ]

वैशम्पायन उवाच—दृष्ट्वा व्यूढान्यनीकानि कुरूणां कुरुनन्दन ।
तत्र वैराटिमामन्त्र्य पार्थो वचनमब्रवीत् ॥ १ ॥
जाम्बूनदमयी वेदी ध्वजे यस्य प्रदृश्यते ।
तस्य दक्षिणतो याहि कृपः शारद्वतो यतः ॥ २ ॥
वैशम्पायन उवाच—धनञ्जयवचः श्रुत्वा वैराटिस्त्वरितस्ततः ।
हयान्रजतसङ्काशान्हेमभाण्डानचोदयत् ॥ ३ ॥
आनुपूर्व्यात्तु तत्सर्वमास्थाय जवमुत्तमम् ।
प्राहिणोच्चन्द्रसङ्काशान्कुपितानिव तान्हयान् ॥ ४ ॥
स गत्वा कुरुसेनायाः समीपं हयकोविदः ।
पुनरावर्त्तयामास तान्हयान्वातरंहसः ॥ ५ ॥
प्रदक्षिणमुपावृत्य मण्डलं सव्यमेव च ।
कुरून्संमोहयामास मत्स्यो यानेन तत्त्ववित् ॥ ६ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—कौरवांचीं तीं व्यूह रचलेलीं पथकें पाहून कुरुकुलभूषणा, पार्थ उत्तराला हांक मारून म्हणाला:—( १ ) " ज्याच्या ध्वजावर जांबूनद सुवर्णाची वेदी काढलेली आहे त्यास उजवी घालून शारद्वत कृपाचार्य जेथें आहे तिकडे रथ घेऊन चल " ( २ ). अर्जुनाचें हें भाषण ऐकून उत्तरानें, सोन्याचे अलंकार घातलेल्या, व रुप्याप्रमाणें पांढरे असलेल्या घोड्यांना तिकडे त्वरेनें चालविलें ( ३ ). ( अर्जुनानें ) पूर्वी सांगितल्याप्रमाणें सर्व कांहीं क्रमशः उत्तराचे लक्षांत होतें, त्याप्रमाणें करण्यासाठीं त्यानें चंद्राप्रमाणें पांढऱ्या शुभ्र व रागावल्यासारखे दिसणाऱ्या त्वरित गतीच्या घोड्यांना तिकडे फेकलें ( ४ ). हयकर्मांत निपुण असलेल्या उत्तरानें कौरवसैन्याच्या जवळ जाऊन पुनः ते वायुवेगाचे घोडे परत वळविले ( ५ ). याप्रमाणें उजवी डावी मंडलें घेऊन प्रदक्षिणा घालण्यांत रथ चालविण्याचें कौशल्य, घोड्यांच्या खुब्या जाणणाऱ्या त्या उत्तरानें दाखवून, कौरवांची अक्कल गुंग केली ( ६ ).

कृपस्य रथमास्थाय वैराटिरकुतोभयः ।
प्रदक्षिणमुपावृत्य तस्थौ तस्याऽग्रतो बली ॥ ७ ॥
ततोऽर्जुनः शङ्खवरं देवदत्तं महारवम् ।
प्रदध्मौ बलमास्थाय नाम विश्राव्य चाऽऽत्मनः ॥ ८ ॥
तस्य शब्दो महानासीद्धम्यमानस्य जिष्णुना ।
तथा वीर्यवता संख्ये पर्वतस्येव दीर्यतः ॥ ९ ॥
पूजयाञ्चक्रिरे शङ्खं कुरवः सहसैनिकाः ।
अर्जुनेन तथा ध्मातः शतधा यन्न दीर्यते ॥ १० ॥
दिवमावृत्य शब्दस्तु निवृत्तः शुश्रुवे पुनः ।
सृष्टो मघवता वज्रः प्रपतन्निव पर्वते ॥ ११ ॥
एतस्मिन्नन्तरे वीरो बलवीर्यसमान्वितः ।
अर्जुनं प्रति संरब्धः कृपः परमदुर्जयः ।
अमृष्यमाणस्तं शब्दं कृपः शारद्वतस्तदा ॥ १२ ॥
अर्जुनं प्रति संरब्धो युद्धार्थी स महारथः ।
महोदधिजमादाय दध्मौ वेगेन वीर्यवान् ॥ १३ ॥

नंतर कृपाच्या रथाकडे रोख धरून त्यास प्रदक्षिणा घातल्यावर, तो निर्भय व बलवान् विराटपुत्र ( रथासह ) त्याच्यापुढें उभा राहिला ( ७ ). नंतर अर्जुनानें स्वतःचें नांव मोठ्यानें कळवून, भयंकर शब्द करणारा आपला श्रेष्ठ देवदत्त शंख खूप जोरानें वाजविला (८). तो वीर्यवान् अर्जुन जोरानें रणभूमीवर शंख फुंकूं लागला तेव्हां त्याचा नाद, फुटणाऱ्या पर्वताप्रमाणें भयंकर झाला (९). कौरवांनीं सैन्यासह त्या शंखाची वाहवा केली कीं, अर्जुनानें शंख इतका फुंकला तरी हा फुटत नाहीं ! (१०) त्या शंखाचा शब्द आकाशास जाऊन परतला तेव्हां इंद्रानें सोडलेलें वज्र पर्वतावर आपटलें असतां त्याचा नाद व्हावा तसा, परत ऐकूं आला ( ११ ). इतक्या अवधींत तो सामर्थ्य व पराक्रम यांनीं शोभणारा दुर्जय कृप अर्जुनावर फार संतापला ( १२ ). अर्जुनावर संतापलेल्या महारथी कृपानें युद्धास तयार असल्याची खूण म्हणून आपलाहि शंख घेऊन तो मोठ्या जोरानें फुंकिला ( १३ ).

स तु शब्देन लोकांस्त्रीनावृत्य रथिनां वरः ।
धनुरादाय सुमहज्ज्याशब्दमकरोत्तदा ॥ १४ ॥
तौ रथौ सूर्यसङ्काशौ योत्स्यमानौ महाबलौ ।
शारदाविव जीमूतौ व्यरोचेतां व्यवस्थितौ ॥ १५ ॥
ततः शारद्वतस्तूर्णं पार्थं दशभिराशुगैः ।
विव्याध परवीरघ्नं निशितैर्मर्मभेदिभिः ॥ १६ ॥
पार्थोऽपि विश्रुतं लोके गाण्डीवं परमायुधम् ।
विकृष्य चिक्षेप बहून्नाराचान्मर्मभेदिनः ॥ १७ ॥
तानप्राप्ताञ्छितैर्बाणैर्नाराचान्रक्तभोजनान् ।
कृपश्चिच्छेद पार्थस्य शतशोऽथ सहस्रशः ॥ १८ ॥
ततः पार्थस्तु संक्रुद्धश्चित्रान्मार्गान्प्रदर्शयन् ।
दिशः सञ्छादयन्बाणैः प्रदिशश्च महारथः ।
एकच्छायमिवाऽऽकाशमकरोत्सर्वतः प्रभुः ॥ १९ ॥

त्या शब्दानें त्रैलोक्य व्यापून गेल्यावर त्या रथिश्रेष्ठानें आपलें प्रचंड धनुष्य घेऊन त्यावेळीं त्याच्या प्रत्यंचेचा मोठा टणत्कार केला ( १४ ). ते दोन्ही सूर्यासारखे वीर पवित्र्यांत उभे राहून युद्ध करूं लागले तेव्हां शरद ऋतूंतील ( एकमेकांवर आपटणाऱ्या ) मेघांप्रमाणें शोभले ( १५ ). नंतर शत्रूकडील वीरांचा विध्वंस करणाऱ्या अर्जुनाला कृपानें त्वरेनें तीक्ष्ण व मर्मभेदक अशा दहा बाणांनीं विद्ध केलें ( १६ ). अर्जुनानेंहि आपलें लोकविश्रुत उत्कृष्ट गांडीव धनुष्य खेंचून अनेक मर्मभेदक नाराच बाण सोडले (१७). परंतु रक्त पिऊन खोल जखमा करणारे ते पार्थाचे नाराच बाण येऊन लागण्यापूर्वींच कृपानें तीक्ष्ण बाणांनीं त्यांचे शेंकडों–हजारों तुकडे केले ( १८ ). तेव्हां अतिशय संतप्त होऊन बाण सोडण्याचे अनेक अद्भुत प्रकार दाखवीत त्या महारथी अर्जुनानें ( बाणांनीं ) दशदिशा भरून एक छायाच पसरली आहे असें आकाश करून टाकलें ( १९ ).

प्राच्छादयदमेयात्मा पार्थः शरशतैः कृपम् ।
स शरैरर्दितः क्रुद्धः शितैरग्निशिखोपमैः ॥ २० ॥
तूर्णं दशसहस्रेण पार्थमप्रतिमौजसम् ।
अर्दयित्वा महात्मानं ननर्द समरे कृपः ॥ २१ ॥
ततः कनकपर्वाग्रैर्वीरः सन्नतपर्वभिः ।
त्वरन्गाण्डीवनिर्मुक्तैरर्जुनस्तस्य वाजिनः ॥ २२ ॥
चतुर्भिश्चतुरस्तीक्ष्णैरविध्यत्परमेषुभिः ।
ते हया निशितैर्बाणैर्ज्वलद्भिरिव पन्नगैः ।
उत्पेतुः सहसा सर्वे कृपः स्थानादथाऽच्यवत् ॥ २३ ॥
च्युतं तु गौतमं स्थानात्समीक्ष्य कुरुनन्दनः ।
नाऽविध्यत्परवीरघ्नो रक्षमाणोऽस्य गौरवम् ॥ २४ ॥
स तु लब्ध्वा पुनः स्थानं गौतमः सव्यसाचिनम् ।
विव्याध दशभिर्बाणैस्त्वरितः कङ्कपत्रिभिः ॥ २५ ॥
ततः पार्थो धनुस्तस्य भल्लेन निशितेन ह ।
चिच्छेदैकेन भूयश्च हस्तावापमथाऽहरत् ॥ २६ ॥

त्या महात्म्यानें शेकडों बाणांनीं कृपासहि झांकून टाकिलें. अग्निज्वालांसारखे ते तीक्ष्ण बाण लागतांच कृप व्यथित होऊन अतिशय संतापला (२०). लागलेंच त्या अप्रतिम बलवान् पार्थाला दहा हजार बाण मारून त्यानें त्या रणांगणावर मोठ्यानें आरोळी दिली ( २१ ). अर्जुनानेंहि सोन्यानें मढवून फाळ लावलेले असे चार तीक्ष्ण बाण गांडीव धनुष्यास जोडले ( २२ ), व त्या उत्कृष्ट बाणांनीं कृपाच्या चारहि घोड्यांना प्रहार केला. तेव्हां जळजळणाऱ्या सर्पासारखे ते तीक्ष्ण बाण लागतांच सर्व घोडे एकदम उसळले आणि कृप रथांतून खालीं पडला ( २३ ). पण तो खालीं पडला असतां त्या शत्रुहंत्या कुरुनंदनानें त्याची बूज राखण्याकरितां त्यावर प्रहार केला नाहीं ( २४ ). नंतर कृपानें पुनः रथावर बसून घाईघाईनें अर्जुनावर कंकपिसें लावलेले दहा बाण टाकिले ( २५ ). तेव्हां तीक्ष्ण भल्लबाणानें अर्जुनानें त्याचें धनुष्य तोडिलें, आणि दुसऱ्या बाणानें त्याचें हस्तकवचहि उडीवेंल ( २६ ).

अथाऽस्य कवचं बाणैर्निशितैर्मर्मभेदिभिः ।
व्यधमन्न च पार्थोऽस्य शरीरमवपीडयत् ॥ २७ ॥
तस्य निर्मुच्यमानस्य कवचात्काय आबभौ ।
समये मुच्यमानस्य सर्पस्येव तनुर्यथा ॥ २८ ॥
छिन्ने धनुषि पार्थेन सोऽन्यदादाय कार्मुकम् ।
चकार गौतमः सज्यं तदद्भुतमिवाऽभवत् ॥ २९ ॥
स तदप्यस्य कौन्तेयश्चिच्छेद नतपर्वणा ।
एवमन्यानि चापानि बहूनि कृतहस्तवत् ।
शारद्वतस्य चिच्छेद पाण्डवः परवीरहा ॥ ३० ॥
स छिन्नधनुरादाय रथशक्तिं प्रतापवान् ।
प्राहिणोत्पाण्डुपुत्राय प्रदीप्तामशनीमिव ॥ ३१ ॥
तामर्जुनस्तदाऽऽयान्तीं शक्तिं हेमविभूषिताम् ।
वियद्गतां महोल्काभां चिच्छेद दशभिः शरैः ॥ ३२ ॥
साऽपतद्दशधा छिन्ना भूमौ पार्थेन धीमता ॥ ३३ ॥

नंतर मर्मभेदक तीक्ष्ण बाणांनीं त्याचें कवच छेदून पाडिलें; परंतु त्याच्या शरीरास पीडा दिली नाहीं. कवच छेदून टाकल्यामुळें उघडें पडलेलें कृपाचें शरीर, कात टाकिलेल्या सर्पाप्रमाणें शोभूं लागलें ( २७–२८ ). अर्जुनानें धनुष्य तोडून टाकिल्यावर कृपानें दुसरें धनुष्य घेऊन त्याला प्रत्यंचा चढविली, परंतु अर्जुनानें पेरी काढलेल्या बाणानें तेंहि धनुष्य तोडून पाडिलें. तेव्हां तें एक मोठें आश्चर्य झालें. याप्रमाणें त्या चलाख हाताच्या पांडुपुत्रानें त्याचीं आणखींहि पुष्कळ धनुष्यें तोडून टाकलीं ( २९–३० ). धनुष्यें तुटून पडलीं ( असें पाहून ) प्रतापी कृपानें, रथांत असलेली शक्ति उचलली, आणि ती विजेसारखी शक्ति पार्थावर सोडली ( ३१ ). उल्केसारखी ती प्रज्वलित सुवर्णभूषित शक्ति त्या बुद्धिमान् अर्जुनानें दहा बाण मारून आकाशांतच तोडली, आणि अर्जुनानें दहा तुकडे केलेली ती शक्ति जमिनीवर पडली ( ३२–३३ ).

१ रथावर ठेवण्यासारखी ( बाड भाला ) असा अर्थ दिसतो. (नी) मुग्ध आहे.

युगपच्चैव भल्लैस्तु ततः सज्यधनुः कृपः ।
तमाशु निशितैः पार्थं बिभेद दशभिः शरैः ॥ ३४ ॥
ततः पार्थो महातेजा विशिखानाग्नितेजसः ।
चिक्षेप समरे क्रुद्धस्त्रयोदश शिलाशितान् ॥ ३५ ॥
अथाऽस्य युगमेकेन चतुर्भिश्चतुरो हयान् ।
षष्ठेन च शिरः कायाच्छरेण रथसारथेः ॥ ३६ ॥
त्रिभिस्त्रिवेणुं समरे द्वाभ्यामक्षं महारथः ।
द्वादशेन तु भल्लेन चकर्ताऽस्य ध्वजं तदा ॥ ३७ ॥
ततो वज्रनिकाशेन फाल्गुनः प्रहसन्निव ।
त्रयोदशेनेन्द्रसमः कृपं वक्षस्यविध्यत ॥ ३८ ॥
स छिन्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः ।
गदापाणिरवप्लुत्य तूर्णं चिक्षेप तां गदाम् ॥ ३९ ॥
सा च मुक्ता गदा गुर्वी कृपेण सुपरिष्कृता ।
अर्जुनेन शरैर्नुन्ना प्रतिमार्गमथाऽगमत् ॥ ४० ॥

लागलींच धनुष्य सज्ज करून कृपानें दहा तीक्ष्ण भल्ल बाणांनीं अर्जुनाला वेध केला. तेव्हां त्या महातेजस्वी पार्थानें शिळेवर घासलेले अग्नीसारखे तेजस्वी तेरा बाण क्रोधानें मारले ( ३४-३५ ). नंतर एका बाणानें त्याच्या रथाचें जूं तोडून दुसऱ्या चार बाणांनीं त्याच्या घोड्यांचा वेध केला; आणि साहाव्या बाणानें त्याच्या सारथ्याचें डोकें धडापासून तोडून पाडिलें ( ३६ ). तीन बाणांनीं त्यानें त्याच्या रथाचें त्रिवेणु मोडलें. त्या महारथानें दोन बाणांनीं त्याच्या रथाचा कणा मोडला, व बाराव्या भल्ल बाणानें त्याचा ध्वजहि तोडला ( ३७ ). नंतर त्या इंद्रतुल्य पराक्रमी फाल्गुनानें हंसतच तेरावा वज्रप्राय बाण कृपाच्या छातींत खोंचला ( ३८ ). याप्रमाणें धनुष्य तुटून जाऊन, सारथि व अश्व मरून पडल्यामुळें विरथ झालेल्या कृपानें घाईघाईनें गदा उचलून ती अर्जुनावर भिरकावली ( ३९ ). पण कृपानें सोडलेली ती चांगली भूषित केलेली प्रचंड गदा अर्जुनानें बाणांनीं टोंचल्यामुळें परत फिरली ( ४० ).

---

१ त्रिवेणु म्हणजे रथाची दांडी. २ प्रतिमार्गं विपरीत मार्गं अगमत् परावृत्ता इत्यर्थः (नी.)

तं तु योधाः परीप्सन्तः शारद्वतममर्षणम् ।
सर्वतः समरे पार्थं शरवर्षैरवाकिरन् ॥ ४१ ॥
ततो विराटस्य सुतोऽसव्यमावृत्य वाजिनः ।
यमकं मण्डलं कृत्वा तान्योधान्प्रत्यवारयत् ॥ ४२ ॥
ततः कृपमुपादाय विरथं ते नरर्षभाः ।
अपजग्मुर्महावेगाः कुन्तीपुत्राद्धनञ्जयात् ॥ ४३ ॥ [ १७४७ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे कृपापयाने सप्तपञ्चाशत्तमोऽध्यायः ॥ ५७ ॥

तेव्हां संतापणाऱ्या कृपाचा बचाव करण्याकरितां त्या रणांगणांत अनेक वीरांनीं अर्जुनास चहूंकडून वेढून त्यावर बाण टाकले ( ४१ ). परंतु घोडे डावे फिरवून त्या विराटपुत्रानें शत्रूंचें निरोधक ( अपमान करणारें ) मंडल घेऊन त्या वीरांचें निवारण केलें ( ४२ ). नंतर त्या विरथ झालेल्या कृपास घेऊन त्या नरश्रेष्ठांनीं कुंतीपुत्र धनंजयापासून घाईघाईनें दूर नेलें ( ४३ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं कृपाच्या माघार घेण्याविषयीं ५७ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ५८

[ द्रोणार्जुनांचें युद्ध. ]

वैशम्पायन उवाच—कृपेऽपनीते द्रोणस्तु प्रगृह्य सशरं धनुः ।
अभ्यद्रवदनाधृष्यः शोणाश्वः श्वेतवाहनम् ॥ १ ॥
स तु रुक्मरथं दृष्ट्वा गुरुमायान्तमन्तिकात् ।
अर्जुनो जयतां श्रेष्ठ उत्तरं वाक्यमब्रवीत् ॥ २ ॥

वैशंपायन म्हणाला:—कृप दूर नेला गेल्यावर अजिंक्य द्रोण हातीं धनुष्यबाण घेऊन, तांबडे घोडे जोडलेल्या रथांत बसून, पांढरे घोडे जोडलेल्या रथांत बसलेल्या अर्जुनावर चालून आला ( १ ). सुवर्णरथावर बसून जवळ आलेला तो गुरु पाहतांच विजयिश्रेष्ठ अर्जुन उत्तरास म्हणाला:—( २ ).

अर्जुन उवाच—यत्रैषा काञ्चनी वेदी ध्वजे यस्य प्रकाशते ।
उच्छ्रिता प्रवरे दण्डे पताकाभिरलंकृता ।
अत्र मां वह भद्रं ते द्रोणानीकाय सारथे ॥ ३ ॥
अश्वाः शोणाः प्रकाशन्ते बृहन्तश्चारुवाहिनः ।
स्निग्धविद्रुमसङ्काशास्ताम्रास्याः प्रियदर्शनाः ।
युक्ता रथवरे यस्य सर्वशिक्षाविशारदाः ॥ ४ ॥
दीर्घबाहुर्महातेजा बलरूपसमन्वितः ।
सर्वलोकेषु विक्रान्तो भारद्वाजः प्रतापवान् ॥ ५ ॥
बुद्ध्या तुल्यो ह्युशनसा बृहस्पतिसमो नये ।
वेदास्तथैव चत्वारो ब्रह्मचर्यं तथैव च ॥ ६ ॥
ससंहाराणि सर्वाणि दिव्यान्यस्त्राणि मारिष ।
धनुर्वेदश्च कात्स्न्र्येन यस्मिन्नित्यं प्रतिष्ठितः ॥ ७ ॥
क्षमा दमश्च सत्यं च आनृशंस्यमथाऽऽर्जवम् ।
एते चाऽन्ये च बहवो यस्मिन्नित्यं द्विजे गुणाः ॥ ८ ॥

**अर्जुन** म्हणालाः—"उत्तरा, तुझें कल्याण असो. श्रेष्ठ दंडावर उभारलेली आणि पताकांनीं भूषित केलेली ही सोन्याची वेदी ज्याच्या ध्वजावर झळकत आहे त्या द्रोणाच्या पथकावर मला घेऊन चल (३). त्याच्या त्या मोठ्या रथाला लावलेले तांबडे घोडे रथ ओढण्यांत मोठे कुशल आहेत; त्यांची कांति तुळतुळीत पोंवळ्याप्रमाणें आहे, त्यांचीं तोंडेंहि तांबडींच आहेत; त्यांच्या मुद्रा आल्हादकारक आहेत, आणि तेजस्वी दिसत असलेले हे मोठे घोडे सर्व (शिक्षेंत) कसरतींत तरबेज आहेत (४). हा प्रतापी, बलाढ्य, रूपसंपन्न महातेजस्वी, दीर्घबाहु, भरद्वाजगोत्री द्रोण, पराक्रमाविषयीं त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे (५). हा बुद्धीनें शुक्राचार्यासारखा असून, नीतींत बृहस्पतीप्रमाणें आहे; आणि याचे ठिकाणीं चारहि वेद व ब्रह्मचर्य आहे (६). त्याचप्रमाणें संहारासह[1] सर्व दिव्य अस्त्रें व पूर्ण धनुर्वेद याच्या अंगीं सदैव वास करीत आहेत (७). क्षमा, दया, सत्य, सौजन्य व सरळत्व यांचें आणि दुसऱ्याहि पुष्कळ गुणांचें वास्तव्य ह्याच्याठिकाणीं नेहमी आहे (८).

१ संहार=अस्त्र परत घेणें.

तेनाऽहं योद्धुमिच्छामि महाभागेन संयुगे ।
तस्मात्त्वं प्रापयाऽऽचार्यं क्षिप्रमुत्तर वाहय ॥ ९ ॥
वैशंपायनउवाच—अर्जुनेनैवमुक्तस्तु वैराटिर्हेमभूषणान् ।
चोदयामास तानश्वान्भारद्वाजरथं प्रति ॥ १० ॥
तमापतन्तं वेगेन पाण्डवं रथिनां वरम् ।
द्रोणः प्रत्युद्ययौ पार्थं मत्तो मत्तमिव द्विपम् ॥ ११ ॥
ततः प्राध्मापयच्छङ्खं भेरीशतनिनादिनम् ।
प्रचुक्षुभे बलं सर्वमुद्धूत इव सागरः ॥ १२ ॥
अथ शोणान्सदश्वांस्तान्हंसवर्णैर्मनोजवैः ।
मिश्रितान्समरे दृष्ट्वा व्यस्मयन्त रणे नराः ॥ १३ ॥
तौ रथौ वीरसंपन्नौ दृष्ट्वा संग्राममूर्धनि ।
आचार्यशिष्यावजितौ कृतविद्यौ मनस्विनौ ॥ १४ ॥

उत्तरा, अशा या महाभाग्यवान् द्विजाशीं रणांत दोन हात करण्याची माझी इच्छा आहे, तर मला त्या आचार्याकडे लवकर घेऊन चल " ( ९ ).

वैशंपायन म्हणाला:—अर्जुनाचें हें भाषण ऐकून सोन्याचे अलंकार घातलेले ते घोडे उत्तरानें द्रोणाचार्यांच्या रथाकडे हांकले ( १० ). तो रथिश्रेष्ठ अर्जुन त्वरेनें आपल्यावर चालून येत आहे असें पाहतांच एका मस्त हत्तीवर दुसरा मस्त हत्ती धांवून जातो त्याप्रमाणें द्रोण पार्थावर चालून गेला ( ११ ). नंतर शंभर भेरींच्या आवाजासारख्या आवाजाचा आपला शंख त्यानें फुंकिला, तेव्हां खवळलेल्या समुद्राप्रमाणें त्या सैन्याची खळबळ उडाली(१२). रणभूमीवर ते तांबडे लाल घोडे, ( अर्जुनाच्या ) मनाप्रमाणें वेग असलेल्या पांढऱ्या घोड्यांशीं मिसळलेले पाहून लोकांना आश्चर्य वाटलें (१३). रथी, वीर, क्षत्रगुणासंपन्न, सर्वविद्यापारंगत आणि मनस्वी असे ते गुरु शिष्य ( १४ ).

[1]समाश्लिष्टौ तदाऽन्योन्यं द्रोणपार्थौ महाबलौ ।
दृष्ट्वा प्राकम्पत मुहुर्भरतानां महद्बलम् ॥ १५ ॥
हर्षयुक्तस्ततः पार्थः प्रहसन्निव वीर्यवान् ।
रथं रथेन द्रोणस्य समासाद्य महारथः ॥ १६ ॥
अभिवाद्य महाबाहुः सामपूर्वमिदं वचः ।
उवाच श्लक्ष्णया वाचा कौन्तेयः परवीरहा ॥ १७ ॥
उषिताः स्मो वने वासं प्रति[2]कर्म चिकीर्षवः ।
कोपं नाऽर्हसि नः कर्तुं सदा समरदुर्जय ॥ १८ ॥
अहं तु प्रहृते पूर्वं प्रहरिष्यामि तेऽनघ ।
इति मे वर्तते बुद्धिस्तद्भवान्कर्तुमर्हति ॥ १९ ॥
ततोऽस्मै प्राहिणोद् द्रोणः शरानधिकविंशतिम् ।
अप्राप्तांश्चैव तान्पार्थश्चिच्छेद कृतहस्त[3]वत् ॥ २० ॥

महाबलवान् द्रोण व अर्जुन, रणाच्या अग्रभागीं भिडलेले[1] पाहून कौरवांचें सैन्य कांपूं लागलें ( १५ ). नंतर द्रोणाच्या रथापाशीं जाऊन पोंचलेल्या त्या महारथ, वीर्यवान् रथस्थ कुंतीपुत्रानें आनंदित होऊन हास्य करीत त्याला वंदन केलें ( १६ ). आणि तो शत्रुहंता महापराक्रमी अर्जुन नम्रतेनें व गोड वाणीनें म्हणाला:–(१७) "आम्ही वनवास करून शत्रूंची परत फेड करण्याची इच्छा करीत राहिलों. समरदुर्जया, तूं आम्हांवर कोप करणें योग्य नाहीं ( १८ ). निष्पापा, प्रथम आपण प्रहार केल्यावर मी आपल्यावर प्रहार करावा अशी माझी इच्छा आहे; तर हा माझा हेतु आपण पूर्ण करावा " ( १९ ). नंतर द्रोणानें त्याजवर विसांपेक्षां अधिक बाण मारले; परंतु ते जवळ येऊन पोंचण्याचे पूर्वींच त्या चलाख हाताच्या

१समाश्लिष्टौ-रथस्थावेवालिंगितवन्तौ, असा अर्थ(नी.)करतो. पण तो युक्त नाहीं. २ प्रतिकर्म-शत्रूणामपकारम् ( नी. ) ३ सुशिक्षितहस्तयुक्तं यथा तथा ( नी. )

ततः शरसहस्रेण रथं पार्थस्य वीर्यवान् ।
अवाकिरत्ततो द्रोणः शीघ्रमस्त्रं विदर्शयन् ॥ २१ ॥
हयांश्च रजतप्रख्यान्कङ्कपत्रैः शिलाशितैः ।
अवाकिरदमेयात्मा पार्थं सङ्कोपयन्निव ॥ २२ ॥
एवं प्रववृते युद्धं भारद्वाजकिरीटिनोः ।
समं विमुञ्चतोः सङ्ख्ये विशिखान्दीप्ततेजसः ॥ २३ ॥
तावुभौ ख्यातकर्माणावुभौ वायुसमौ जवे ।
उभौ दिव्यास्त्रविदुषावुभावुत्तमतेजसौ ।
क्षिपन्तौ शरजालानि मोहयामासतुर्नृपान् ॥ २४ ॥
व्यस्मयन्त ततो योधा ये तत्राऽऽसन्समागताः ।
शरान्विसृजतोस्तूर्णं साधु साध्वित्यपूजयन् ॥ २५ ॥
द्रोणं हि समरे कोऽन्यो योद्धुमर्हति फाल्गुनात् ।
रौद्रः क्षत्रियधर्मोऽयं गुरुणा यदयुध्यत ।
इत्यब्रुवञ्जनास्तत्र संग्रामशिरसि स्थिताः ॥ २६ ॥

अर्जुनानें ते वीसही बाण तोडून पाडिले (२०). तेव्हां, त्या पराक्रमी द्रोणानें हजार बाण टाकून अर्जुनाचा रथ भरून काढिला; व या रीतीनें आपलें अस्त्रकौशल्य दाखवीत (२१), त्या अचिंत्य मनाच्या द्रोणानें निसणावर घांसलेले कंकपिसाचे बाण मारून अर्जुनाला चिडविण्याकरितांच कीं काय, त्याचे चांदीसारखे पांढरे घोडेहि व्याप्त करून सोडले (२२). एकमेकावर चकचकीत बाण टाकणाऱ्या द्रोण–अर्जुनांचें असें युद्ध चाललें. ते दोघेहि द्रोणार्जुन नामांकित पराक्रमी, दोघेहि वायूसारखे बलवान्, दोघेहि दिव्य अस्त्रज्ञ आणि दोघेहि उत्तम तेजस्वी होते. त्यांनीं शरजालांचा वर्षाव करीत पाहणाऱ्या राजांची अक्कल गुंग केली (२३–२४). तेथें जे योद्धे जमले होते त्यांना फार विस्मय वाटला, आणि ते दोघे जेव्हां त्वरेनें बाण टाकूं लागले तेव्हां त्यांनीं 'वाहवा, शाबास!' म्हणून त्यांची प्रशंसा केली (२५). समरभूमीवर जमलेले लोक म्हणूं लागले कीं, "द्रोणाशीं युद्धांत उभे राहण्याची अर्जुनावांचून दुसऱ्या कोणाची प्राज्ञा आहे? क्षात्रधर्म भयंकर आहे; कारण यामुळें अर्जुनाला प्रत्यक्ष गुरूशींहि युद्ध करावें लागलें" (२६).

वीरौ तावभिसंरब्धौ सन्निकृष्टौ महाभुजौ ।
छादयेतां शरव्रातैरन्योन्यमपराजितौ ॥ २७ ॥
विस्फार्य सुमहच्चापं हेमपृष्ठं दुरासदम् ।
भारद्वाजोऽथ संक्रुद्धः फाल्गुनं प्रत्यविध्यत ॥ २८ ॥
स सायकमयैर्जालैरर्जुनस्य रथं प्रति ।
भानुमद्भिः शिलाधौतैर्भानोराच्छादयत्प्रभाम् ॥ २९ ॥
पार्थं च सुमहाबाहुर्महावेगैर्महारथः ।
विव्याध निशितैर्बाणैर्मेघो वृष्ट्येव पर्वतम् ॥ ३० ॥
तथैव दिव्यं गाण्डीवं धनुरादाय पाण्डवः ।
शत्रुघ्नं वेगवान्हृष्टो भारसाधनमुत्तमम् ॥ ३१ ॥
विससर्ज शरांश्चित्रान्सुवर्णविकृतान्बहून् ।
नाशयञ्छरवर्षाणि भारद्वाजस्य वीर्यवान् ॥
तूर्णं चापविनिर्मुक्तैस्तदद्भुतमिवाऽभवत् ॥ ३२ ॥
स रथेन चरन्पार्थः प्रेक्षणीयो धनंजयः ।
युगपद्दिक्षु सर्वासु सर्वतोऽस्त्राण्यदर्शयत् ॥ ३३ ॥

ते दोघेहि महाभुज व अपराजित वीर अतिशय खवळून जाऊन भिडले असतां त्यांनीं बाणांनीं एकमेकांस छावून टाकलें ( २७ ). नंतर सोन्याच्या पाठीचें आपलें मोठें धनुष्य ताणून, संतप्त झालेल्या द्रोणानें अर्जुनास वेधिलें ( २८ ). निसणावर घासलेल्या उज्ज्वल बाणांनीं अर्जुनाच्या रथावर मंडप करून सूर्यप्रभा ( सुद्धां ) त्यानें झांकून टाकली ( २९ ); आणि मेघ पर्वतावर वृष्टि करतो त्याप्रमाणें त्या महाबाहु महारथ द्रोणानें महावेगवान् तीक्ष्ण बाणांचा अर्जुनावर पाऊस पाडून त्यास वेध केला ( ३० ). तेव्हां आनंदित झालेल्या त्या वीर्यवान् अर्जुनानें आपलें अच्छेद्य, शत्रुघातक, दिव्य व उत्कृष्ट गांडीव धनुष्य घेऊन ( ३१ ), त्यापासून अद्भुत असे अनेक सोनेरी बाण सोडून तो द्रोणाच्या बाणवृष्टीचें निराकरण करूं लागला. त्याचे ते बाण इतक्या वेगानें निघत कीं, तें एक अदभुतच झालें ( ३२ ). रथांतून संचार करीत प्रेक्षणीय अर्जुनानें एकदम सर्व दिशांस सर्व बाजूंनीं अस्त्रें प्रकट केलीं (३३).

एकच्छायमिवाऽऽकाशं बाणैश्चक्रे समन्ततः ।
नाऽदृश्यत तदा द्रोणो नीहारेणेव संवृतः ॥ ३४ ॥
तस्याऽभवत्तदा रूपं संवृतस्य शरोत्तमैः ।
जाज्वल्यमानस्य तदा पर्वतस्येव सर्वतः ॥ ३५ ॥
दृष्ट्वा तु पार्थस्य रणे शरैः स्वरथमावृतम् ।
स विस्फार्य धनुः श्रेष्ठं मेघस्तनितनिस्स्वनम् ॥ ३६ ॥
अग्निचक्रोपमं घोरं व्यकर्षत्परमायुधम् ।
व्यशातयच्छरांस्तांस्तु द्रोणः समितिशोभनः ॥ ३७ ॥
महानभूत्ततः शब्दो वंशानामिव दह्यताम् ॥ ३८ ॥
जाम्बूनदमयैः पुङ्खैश्चित्रचापविनिर्गतैः ।
प्राच्छादयदमेयात्मा दिशः सूर्यस्य च प्रभाम् ॥ ३९ ॥
ततः कनकपुङ्खानां शराणां नतपर्वणाम् ।
वियच्चराणां वियति दृश्यन्ते बहवो व्रजाः ॥ ४० ॥
द्रोणस्य पुङ्खसक्ताश्च प्रभवन्तः शरासनात् ।
एको दीर्घ इवाऽदृश्यदाकाशे संहतः शरः ॥ ४१ ॥

त्यानें बाणांचें एकरंगी छत आकाशास घातलें, त्यावेळीं धुक्यानें आच्छादित झाल्याप्रमाणें द्रोण दिसेनासा झाला ( ३४ ). त्यावेळीं चकाकणाऱ्या बाणांनीं भरून गेल्यामुळें त्या द्रोणाचें रूप चहूंकडून पेटलेल्या पर्वताप्रमाणें दिसूं लागलें (३५). त्या रणभूमीवर आपला रथ अर्जुनाच्या बाणांनीं झाकला गेलेला पाहून, युद्धांत शोभणाऱ्या द्रोणानें आपलें मेघगर्जनेसारखा आवाज करणारें सर्वोत्कृष्ट आणि अग्निचक्रासारखें घोर धनुष्य प्रत्यंचेचा टणत्कार करून ताणलें आणि अर्जुनाचे ते बाण तोडले ( ३६–३७ ). तेव्हां पेट घेतलेल्या वेळूंप्रमाणें मोठा आवज होऊं लागला ( ३८ ). त्या सोन्याचा मुलामा दिलेल्या, व चित्रविचित्र धनुष्याला लावून सोडलेल्या पराक्रमी द्रोणाच्या बाणांनीं दिशा व सूर्यप्रभा आच्छादिली ( ३९ ). नंतर सोन्याच्या पिसाऱ्याच्या व पेरी काढलेल्या त्या आकाशगामी बाणांचे अनेक समुदाय अंतराळीं दिसले ( ४० ). द्रोणाच्या धनुष्यापासून एकसारखे सुटलेले बाण, एक लांबच लांब बाण आकाशांत पसरलेला आहे, असे दिसले ! ( ४१ ).

एवं तौ स्वर्णविकृतान्विमुञ्चन्तौ महाशरान् ।
आकाशं संवृतं वीरावुल्काभिरिव चक्रतुः ॥ ४२ ॥
शरास्तयोस्तु विबभुः कङ्कबर्हिणवाससः ।
पङ्क्तयः शरदि खस्थानां हंसानां चरतामिव ॥ ४३ ॥
युद्धं समभवत्तत्र सुसंरब्धं महात्मनोः ।
द्रोणपाण्डवयोर्घोरं वृत्रवासवयोरिव ॥ ४४ ॥
तौ गजाविव चाऽऽसाद्य विषाणाग्रैः परस्परम् ।
शरैः पूर्णायतोत्सृष्टैरन्योन्यमभिजघ्नतुः ॥ ४५ ॥
तौ व्यवाहरतां युद्धे संरब्धौ रणशोभिनौ ।
उदीरयन्तौ समरे दिव्यान्यस्त्राणि भागशः ॥ ४६ ॥
अथ त्वाचार्यमुख्येन शरान्सृष्टाञ्छिलाशितान् ।
न्यवारयच्छितैर्बाणैरर्जुनो जयतां वरः ॥ ४७ ॥
दर्शयन्वीक्षमाणानामस्त्रमुग्रपराक्रमः ।
इषुभिस्तूर्णमाकाशं बहुभिश्च समावृणोत् ॥ ४८ ॥

या प्रमाणें ते वीर मोठमोठे स्वर्णमय बाण सोडूं लागले असतां त्यांनीं आकाश जणूं उल्कांनीं ( तुटणाऱ्या ताऱ्यानींच ) भरून सोडलें ( ४२ ). त्यांनीं सोडलेले कंक व मयूर पक्ष्यांच्या पिसांनीं सजविलेले बाण आकाशांत घिरट्या घालणाऱ्या हंसांच्या रांगांप्रमाणें शोभूं लागले ( ४३ ). त्या महात्म्या द्रोणार्जुनाचें युद्ध वृत्रासुर व इंद्र यांच्या युद्धाप्रमाणें अति जोराचें झालें ( ४४ ). ज्याप्रमाणें हत्ती एकमेकांना दांतांच्या टोंकांनीं प्रहार करितात, त्याप्रमाणें पूरापूर धनुष्यें खेंचून सोडलेल्या बाणांनीं ते एकमेकांना प्रहार करूं लागले ( ४५ ). अतिशय खवळून गेलेले व रणांत शोभणारे ते दोघे वीर, युद्धांत वेळोवेळीं दिव्य अस्त्रें सोडीत असतां धर्मयुद्ध करीत होते ( ४६ ). आतां आचार्यश्रेष्ठ द्रोणानें निसणावर घांसलेले बाण अर्जुनावर टाकिले, पण त्या विजयिश्रेष्ठ अर्जुनानें त्याचें तीक्ष्ण बाणांनीं निवारण केलें (४७). त्या पराक्रमी अर्जुनानें असंख्य बाणांनीं आकाश भरून टाकून प्रेक्षकांना आपलें अस्त्रकौशल्य दाखविलें ( ४८ ).

---

१ व्यवाहरतां-व्यवहारं धर्मयुद्धं कृतवन्तौ ( नी. )

जिघांसन्तं नरव्याघ्रमर्जुनं तिग्मतेजसम् ।
आचार्यमुख्यः समरे द्रोणः शस्त्रभृतां वरः ।
अर्जुनेन सहाऽक्रीडच्छरैः सन्नतपर्वभिः ॥ ४९ ॥
दिव्यान्यस्त्राणि वर्षन्तं तस्मिन्वै तुमुले रणे ।
अस्त्रैरस्त्राणि संवार्य फाल्गुनं समयोधयत् ॥ ५० ॥
तयोरासीत्संप्रहारः क्रुद्धयोर्नरसिंहयोः ।
अमर्षिणोस्तदाऽन्योन्यं देवदानवयोरिव ॥ ५१ ॥
ऐन्द्रं वायव्यमाग्नेयमस्त्रमस्त्रेण पाण्डवः ।
द्रोणेन मुक्तमात्रं तु ग्रसति स्म पुनः पुनः ॥ ५२ ॥
एवं शूरौ महेष्वासौ विसृजन्तौ शिताञ्छरान् ।
एकच्छायं चक्रतुस्तावाकाशं शरवृष्टिभिः ॥ ५३ ॥
तत्राऽर्जुनेन मुक्तानां पततां वै शरीरिषु ।
पर्वतेष्विव वज्राणां शराणां श्रूयते स्वनः ॥ ५४ ॥
ततो नागा रथाश्चैव वाजिनश्च विशांपते ।
शोणिताक्ता व्यदृश्यन्त पुष्पिता इव किंशुकाः ॥ ५५ ॥

नरव्याघ्र उग्रतेजस्वी अर्जुनानें जरी झोड उडवून दिली, तरी शस्त्रधरश्रेष्ठ आचार्य-मुख्य द्रोणानें लवलेल्या अग्रांच्या बाणांनीं त्याशीं खेळत खेळतच युद्ध चालविलें होतें (४९). त्या तुंबळ युद्धामध्यें अर्जुन दिव्य अस्त्रांचा वर्षाव करूं लागला तेव्हां द्रोणानें दिव्य अस्त्रांनींच त्यांचें निवारण करून त्याशीं युद्ध केलें (५०). परस्परांचा सूड उगविणाऱ्या देवदानवांप्रमाणें, त्या खवळून गेलेल्या नरश्रेष्ठांचा चांगलाच झगडा चालला ( ५१ ). ऐंद्र, वायव्य, आग्नेय, वगैरे अस्त्र द्रोणानें सोडलें कीं, अर्जुनानें लगेच तें आपल्या अस्त्रानें हाणून पाडावें ! (५२) याप्रमाणें युद्ध करितां करितां त्या महाधनुर्धर शूरांनीं एकमेकांवर तीक्ष्ण बाण टाकून आकाशांत घनदाट मंडप करून सोडला (५३). अर्जुनानें टाकलेले बाण शरीरधारी प्राण्यांवर पडतांना, पर्वतांवर वज्र आदळल्याप्रमाणें मोठा शब्द ऐकूं येऊं लागला ( ५४ ). त्यामुळें राजा, रक्तानें न्हालेले हत्ती, घोडे व रथी[1] हे फुललेल्या पळसांप्रमाणें दिसूं लागले ( ५५ ).

---

[1] रथशब्द रथी अर्थी घेतला पाहिजे. रथ रक्ताने लाल होणार नाहीं.

बाहुभिश्च सकेयूरैर्विचित्रैश्च महारथैः ।
सुवर्णचित्रैः कवचैर्ध्वजैश्च विनिपातितैः ॥ ५६ ॥
योधैश्च निहतैस्तत्र पार्थबाणप्रपीडितैः ।
बलमासीत्समुद्भ्रान्तं द्रोणार्जुनसमागमे ॥ ५७ ॥
विधुन्वानौ तु तौ तत्र धनुषी भारसाधने ।
आच्छादयेतामन्योन्यं ततक्षतुरथेषुभिः ॥ ५८ ॥
तयोः समभवद्युद्धं तुमुलं भरतर्षभ ।
द्रोणकौन्तेययोस्तत्र बलिवासवयोरिव ॥ ५९ ॥
अथ पूर्णायतोत्सृष्टैः शरैः सन्नतपर्वभिः ।
व्यदारयेतामन्योन्यं प्राणद्यूते प्रवर्त्तिते ॥ ६० ॥
अथाऽन्तरिक्षे नादोऽभूद् द्रोणं तत्र प्रशंसताम् ।
दुष्करं कृतवान्द्रोणो यदर्जुनमयोधयत् ॥ ६१ ॥
प्रमाथिनं महावीर्यं दृढमुष्टिं दुरासदम् ।
जेतारं देवदैत्यानां सर्वेषां च महारथम् ॥ ६२ ॥

केयूरभूषणांसह बाहू, निरनिराळ्या प्रकारचे मोठे रथ, सुवर्ण कवचें, मोडून पडलेले ध्वज (५६), आणि पार्थाच्या बाणाचे तडाखे बसल्यामुळें मरून पडलेले योद्धे पाहून द्रोणार्जुनसंग्रामामध्यें तें सैन्य भेदरून गेलें (५७). त्या दोघांनीं आपलीं भक्कम धनुष्यें ताणून बाणांच्या माऱ्यानें परस्परांस आच्छादिलें व विद्ध केलें (५८). भरतश्रेष्ठा, द्रोणार्जुनांचें तें तुंबळ युद्ध बलि आणि इंद्र यांच्या युद्धाप्रमाणें झालें (५९). नंतर धनुष्यें ताणून लवलेल्या टोकांच्या बाणांनीं ते एकमेकांस इतके घायाळ करूं लागले कीं, त्यांनीं परस्परांचे प्राण घेण्याची जणूं पैजच लाविली (६०). तेव्हां अंतरिक्षांत द्रोणाची स्तुति करणाऱ्यांचा शब्द झाला; कीं, " द्रोणानें अर्जुनाशीं युद्ध केलें हें फारच कठिण काम केलें (६१). (कारण) शत्रूंची धुळधाण करणारा महारथी अर्जुन दृढमुष्टि, अजिंक्य, महासमर्थ व सर्व देव-दैत्यांना जिंकणारा आहे" (६२).

अविभ्रमं च शिक्षां च लाघवं दूरपातिताम् ।
पार्थस्य समरे दृष्ट्वा द्रोणस्याऽभूच्च विस्मयः ॥ ६३ ॥
अथ गाण्डीवमुद्यम्य दिव्यं धनुरमर्षणः ।
विचकर्ष रणे पार्थो बाहुभ्यां भरतर्षभ ॥ ६४ ॥
तस्य बाणमयं वर्षं शलभानामिवाऽऽयतिम् ।
दृष्ट्वा ते विस्मिताः सर्वे साधु साध्वित्यपूजयन् ॥ ६५ ॥
न च बाणान्तरे वायुरस्य शक्नोति सर्पितुम् ।
अनिशं संदधानस्य शरानुत्सृजतस्तथा ॥ ६६ ॥
ददर्श नान्तरं कश्चित्पार्थस्याऽऽददतोऽपि च ॥ ६७ ॥
तथा शीघ्रास्त्रयुद्धे तु वर्त्तमाने सुदारुणे ।
शीघ्रं शीघ्रतरं पार्थः शरानन्यानुदीरयत् ॥ ६८ ॥
ततः शतसहस्राणि शराणां नतपर्वणाम् ।
युगपत्प्रापतंस्तत्र द्रोणस्य रथमन्तिकात् ॥ ६९ ॥
कीर्यमाणे तदा द्रोणे शरैर्गाण्डीवधन्वना ।
हाहाकारो महानासीत्सैन्यानां भरतर्षभ ॥ ७० ॥

युद्धप्रसंगीं अर्जुनाचें मन:स्थैर्य, त्याचें हस्तलाघव, त्याचें समरनैपुण्य आणि दूर अंतरावरून नेम मारण्याचें कौशल्य पाहून द्रोणाला विस्मय वाटला ( ६३ ). आतां भारता, क्रुद्ध झालेल्या पार्थानें आपलें दिव्य गांडीव धनुष्य उचलून धरून त्या रणांत दोन्हीं बाहूंनीं खेंचलें ( ६४ ). तेव्हां त्यापासून टोळधाडीप्रमाणें बाणांचे थवेच्या थवे सुटले ते पाहून सर्व ( पाहणारे देव ) विस्मित झाले, आणि त्यांनीं " शाबास, शाबास !" म्हणून अर्जुनाची प्रशंसा केली ( ६५ ). अर्जुनाचे बाण इतक्या त्वरेनें सुटत होते कीं, वायूलाहि त्यांतून फिरकण्यास सवड मिळेना ! तो नेम धरून सारखे बाण सोडीत होता (६६). अर्जुन पुन्हां बाण घेत असतांहि कोणाला अंतर गेलेलें दिसलें नाहीं ( ६७ ). याप्रमाणें मोठ्या घाईनें तें भयंकर अस्त्रयुद्ध चालू असतां, अधिकाधिक चपलतेनें अर्जुनानें आणखी बाण सोडले ( ६८ ). त्यामुळें एक लाख नतपर्व बाण द्रोणाच्या रथाच्या सभोंवतीं एकदम पडले ( ६९ ). गांडीवधन्वा द्रोणास बाणांनीं भरून काढूं लागला; तेव्हां जनमेजया, त्या

पाण्डवस्य तु शीघ्रास्त्रं मघवा प्रत्यपूजयत् ।
गन्धर्वाप्सरसश्चैव ये च तत्र समागताः ॥ ७१ ॥
ततो वृन्देन महता रथानां रथयूथपः ।
आचार्यपुत्रः सहसा पाण्डवं पर्यवारयत् ॥ ७२ ॥
अश्वत्थामा तु तत्कर्म हृदयेन महात्मनः ।
पूजयामास पार्थस्य कोपं चाऽस्याऽकरोद्भृशम् ॥ ७३ ॥
स मन्युवशमापन्नः पार्थमभ्यद्रवद्रणे ।
किरञ्छरसहस्राणि पर्जन्य इव वृष्टिमान् ॥ ७४ ॥
आवृत्य तु महाबाहुर्यतो द्रौणिस्ततो हयान् ।
अन्तरं प्रददौ पार्थो द्रोणस्य व्यपसर्पितुम् ॥ ७५ ॥
स तु लब्ध्वाऽन्तरं तूर्णमपायाज्जवनैर्हयैः ।
छिन्नवर्मध्वजः शूरो निकृत्तः परमेषुभिः ॥ ७६ ॥ [ १८२३ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे द्रोणापयानेऽष्टपञ्चाशत्तमोऽध्यायः ॥ ५८ ॥

सैन्यांत एकच हाहाःकार झाला ( ७० ). पांडवाच्या त्या अस्त्र सोडण्यांतील शीघ्र गतीची इंद्रहि प्रशंसा करूं लागला आणि तेथें जे गंधर्व आणि अप्सरा जमल्या होत्या त्यांनींहि तिची प्रशंसा केली ( ७१ ). नंतर रथूयूथपति अश्वत्थामा मोठ्या त्वेषानें रथांचा समूह घेऊन त्या रणांत अर्जुनावर धांवून गेला (७२). त्यानें त्या महात्म्याची या कृत्याबद्दल मनांतले मनांत प्रशंसा केली, पण तो अतिशय संतप्त झालेला होता (७३). अत्यंत संतापलेला तो अश्वत्थामा वर्षणाऱ्या मेघाप्रमाणें हजारों बाणांची पेर करीत त्या रणांत अर्जुनावर धांवून गेला ( ७४ ). अर्जुनानेंहि महाबाहु अश्वत्थाम्याकडे आपले घोडे वळविले आणि द्रोणालाहि बाजूला जाण्यास वाट करून दिली ( ७५ ). याप्रमाणें वाट मिळाली असतां, अर्जुनाच्या भयंकर बाणांनीं कवच फुटून गेलेला आणि ध्वज पडलेला तो शूर आचार्य, वेगवान् घोड्यांच्या साहाय्यानें त्वरेनें रणांतून दूर गेला ( ७६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तर गोग्रहणप्रसंगीं द्रोणाच्या माघार घेण्याविषयीं ५८ वा अध्याय संपला.

# अध्याय ५९

[ अश्वत्थामा व अर्जुन यांचें घनघोर युद्ध. ]

**वैशम्पायन उवाच—** ततो द्रौणिर्महाराज प्रययावर्जुनं रणे ।
तं पार्थः प्रतिजग्राह वायुवेगमिवोद्धतम् ।
शरजालेन महता वर्षमाणमिवाऽम्बुदम् ॥ १ ॥
तयोर्देवासुरसमः सन्निपातो महानभूत् ।
किरतोः शरजालानि वृत्रवासवयोरिव ॥ २ ॥
न स्म सूर्यस्तदा भाति न च वाति समीरणः ।
शरजालावृते व्योम्नि च्छायाभूते समन्ततः ॥ ३ ॥
महांश्चटचटाशब्दो योधयोर्हन्यमानयोः ।
दह्यतामिव वेणूनामासीत्परपुरंजय ॥ ४ ॥
हयानस्याऽर्जुनः सर्वान्कृतवानल्पजीवितान् ।
ते राजन्न प्रजानन्त दिशं कांचन मोहिताः ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— नंतर महाराज, त्या रणांत अश्वत्थामा अर्जुनावर चालून गेला, तेव्हां मेघाप्रमाणें शरांची वृष्टि करणाऱ्या व वायुप्रमाणें वेग असलेल्या अश्वत्थाम्याचा अर्जुनानें सत्कार केला ( १ ). मग शरजालांची वृष्टि करणाऱ्या त्या उभयतांची वृत्र आणि इन्द्र यांप्रमाणें मोठ्या निकराची लढाई जुंपली (२). तेव्हां शरजालांनीं आकाश सर्व बाजूंनीं भरून गेल्यामुळें घनदाट सावली पडून सूर्यहि दिसेनासा झाला, आणि वाऱ्याचेंहि वाहणें बंद पडलें ( ३ ). ते दोघे वीर एकमेकांवर प्रहार करूं लागले तेव्हां जळणाऱ्या कळकांसारखा ताडताड असा प्रचंड शब्द, परपुरंजया जनमेजया, होऊं लागला ( ४ ). राजा, अर्जुनाच्या प्रहारांनीं अश्वत्थाम्याचे सर्व घोडे मरणाच्या पंथास लागल्या अगदीं भाबांवून जाऊन त्यांना कोणतीच दिशा समजेना ( ५ ).

ततो द्रौणिर्महावीर्यः पार्थस्य विचरिष्यतः ।
विवरं सूक्ष्ममालोक्य ज्यां चिच्छेद क्षुरेण ह ।
तदस्याऽपूजयन्देवाः कर्म दृष्ट्वाऽतिमानुषम् ॥ ६ ॥
द्रोणो भीष्मश्च कर्णश्च कृपश्चैव महारथाः ।
साधु साध्विति भाषन्तोऽपूजयन्कर्म तस्य तत् ॥ ७ ॥
ततो द्रौणिर्धनुः श्रेष्ठमपकृष्य रथर्षभम् ।
पुनरेवाऽहनत्पार्थं हृदये कङ्कपत्रिभिः ॥ ८ ॥
ततः पार्थो महाबाहुः प्रहस्य स्वनवत्तदा ।
योजयामास नवया मौर्व्या गाण्डीवमोजसा ॥ ९ ॥
ततोऽर्धचन्द्रमावृत्य तेन पार्थः समागमत् ।
वारणेनेव मत्तेन मत्तो वारणयूथपः ॥ १० ॥
ततः प्रववृते युद्धं पृथिव्यामेकवीरयोः ।
रणमध्ये द्वयोरेवं सुमहल्लोमहर्षणम् ॥ ११ ॥
तौ वीरौ ददृशुः सर्वे कुरवो विस्मयान्विताः ।
युध्यमानौ महावीर्यौ यूथपाविव संगतौ ॥ १२ ॥

नंतर रणांत फिरणाऱ्या त्या अर्जुनाचें बारीक छिद्र ( संधि ) पाहून त्या महावीर्यशाली द्रोणाच्या पुत्रानें एका क्षुर बाणानें त्याच्या धनुष्याची प्रत्यंचा तोडून टाकली. त्याचें तें अमानुष कर्म पाहून देवांनीं त्याची वाहवा केली (६). द्रोण, भीष्म, कर्ण आणि कृप ह्या महारथ्यांनींहि 'शाबास! शाबास!' म्हणून त्याच्या त्या कृत्याची प्रशंसा केली (७). नंतर अश्वत्थाम्यानें आपलें श्रेष्ठ धनुष्य खेंचून पुनः त्या रथिश्रेष्ठ पार्थाच्या छातीवर कंकपत्र बाणांनीं प्रहार केला(८). पण महाबाहु अर्जुनानें मोठ्यानें हंसून घाईघाईनें आपल्या गांडीवाला नवी प्रत्यंचा लाविली ( ९ ). आणि अर्धचंद्राकृति वळण घेऊन मत्तगजाशीं भिडणाऱ्या मत्तगजांच्या समूहाच्या अधिपतीप्रमाणें तो अश्वत्थाम्याशीं भिडला ( १० ). तेव्हां साऱ्या जगांत एकच वीर असलेल्या त्या दोघांचें त्या समरांगणांत अंगावर रोमांच उभे करणारें घनघोर युद्ध माजून राहिलें ( ११ ). मस्तीस आलेल्या हत्तीसारखे ते महावीर्यवान् वीर युद्ध करूं लागले असतां सर्व कौरव विस्मित होऊन त्यांकडे पाहूं लागले ( १२ ).

तौ समाजघ्नतुर्वीरावन्योन्यं पुरुषर्षभौ ।
शरैराशीविषाकारैर्ज्वलद्भिरिव पन्नगैः ॥ १३ ॥

अक्षयाविषुधी दिव्यौ पाण्डवस्य महात्मनः ।
तेन पार्थो रणे शूरस्तस्थौ गिरिरिवाऽचलः ॥ १४ ॥

अश्वत्थाम्नः पुनर्बाणाः क्षिप्रमभ्यस्यतो रणे ।
जग्मुः परिक्षयं तूर्णमभूत्तेनाधिकोऽर्जुनः ॥ १५ ॥

ततः कर्णो महाचापं विकृष्याऽभ्यधिकं तथा ।
अवाक्षिपत्ततः शब्दो हाहाकारो महानभूत् ॥ १६ ॥

ततश्चक्षुर्दधे पार्थो यत्र विस्फार्यते धनुः ।
ददर्श तत्र राधेयं तस्य कोपो व्यवर्धत ॥ १७ ॥

स रोषवशमापन्नः कर्णमेव जिघांसया ।
समैक्षत विवृत्ताभ्यां नेत्राभ्यां कुरुपुङ्गवः ॥ १८ ॥

तथा तु विमुखे पार्थे द्रोणपुत्रस्य सायकात् ।
त्वरिताः पुरुषा राजन्नपाजन्हुः सहस्रशः ॥ १९ ॥

मग त्या पुरुषश्रेष्ठांनीं रागानें जाळ सोडणारे जणूं सर्पच अशा सर्पाकार बाणांनीं एकमेकांस प्रहार करण्यास सुरवात केली (१३). महात्म्या पांडुपुत्राचे दोन्ही भाते अक्षय्य असल्यामुळें तो शूर कुंतीचा पुत्र रणामध्यें पर्वताप्रमाणें अढळ उभा होता (१४). (परंतु) युद्धांत अतिशय त्वरेनें बाण फेकणाऱ्या अश्वत्थाम्याच्या बाणांची पुंजी संपली, तेव्हां अर्जुनाची त्यावर सरशी झाली (१५). हें पाहून कर्णानें आपलें प्रचंड धनुष्य पूरापूर खेंचून टणत्कार केला, त्याबरोबर मोठाच हाहाःकार उडाला (१६). तेव्हां जिकडून धनुष्याचा शब्द ऐकूं येत होता तिकडे अर्जुनानें नजर फिरविली, तों राधेय कर्ण दृष्टीस पडला. त्याला पाहतांच अर्जुनाचा क्रोध वाढला (१७). आणि क्रोधवश झालेला तो कुरुपुंगव अर्जुन कर्णालाच ठार करण्याच्या इच्छेनें त्याजकडे डोळे वटारून पाहूं लागला (१८). अर्जुन अश्वत्थाम्याच्या बाणमर्यादेंतून निघून कर्णाकडे वळल्याचें पाहतांच हजारो लोकांनीं अश्वत्थाम्यास बाजूस काढलें (१९).

उत्सृज्य च महाबाहुर्द्रोणपुत्रं धनञ्जयः ।
अभिदुद्राव सहसा कर्णमेव सपत्नजित् ॥ २० ॥
तमभिद्रुत्य कौन्तेयः क्रोधसंरक्तलोचनः ।
कामयन्द्वैरथं तेन युद्धं वचनमब्रवीत् ॥ २१ ॥ [ १८४४ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनाश्वत्थामयुद्धे एकोनषष्टितमोऽध्यायः ॥ ५९ ॥

आणि शत्रुजित् अर्जुनानें अश्वत्थाम्यास सोडून देऊन एकदम कर्णावरच चाल केली ( २० ). रागानें डोळे लालगुंज झालेला तो कुंतीचा पुत्र त्यावर धांवून द्वैरथ युद्ध करण्याच्या इच्छेनें त्याला म्हणाला ( २१ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत उत्तरगोग्रहणप्रसंगीं अर्जुन व अश्वत्थामा यांच्या युद्धाविषयीं ५९ वा अध्याय संपला.

## अध्याय ६०

[ अर्जुन व कर्ण यांचें भाषण व युद्ध. ]

अर्जुन उवाच— कर्ण यत्ते सभामध्ये बहु वाचा विकत्थितम् ।
न मे युधि समोऽस्तीति तदिदं समुपस्थितम् ॥ १ ॥
सोऽद्य कर्ण मया सार्धं व्यवहृत्य महामृधे ।
ज्ञास्यस्यबलमात्मानं न चाऽन्यानवमन्यसे ॥ २ ॥

**अर्जुन** म्हणाला:—" कर्णा, युद्धांत माझ्या बरोबरीचा कोणी वीर नाहीं, इत्यादि पुष्कळ जी तूं आपली प्रौढी सभेमध्यें मिरविलीस, ती खरी करून दाखविण्याची वेळ येऊन ठेपली आहे ( १ ). तेव्हां, कर्णा, आज या महायुद्धांत माझ्याशीं दोन हात केल्यानंतर आपला कमजोरपणा तुला चांगला कळून येईल, आणि मग तूं दुसऱ्यांचा अपमान करणार नाहींस ( २ ).

अवोचः परुषा वाचो धर्ममुत्सृज्य केवलम् ।
इदं तु दुष्करं मन्ये यदिदं ते चिकीर्षितम् ॥ ३ ॥
यत्त्वया कथितं पूर्वं मामनासाद्य किञ्चन ।
तदद्य कुरु राधेय कुरुमध्ये मया सह ॥ ४ ॥
यत्सभायां स पाञ्चालीं क्लिश्यमानां दुरात्मभिः ।
दृष्टवानसि तस्याऽद्य फलमाप्नुहि केवलम् ॥ ५ ॥
धर्मपाशनिबद्धेन यन्मया मर्षितं पुरा ।
तस्य राधेय कोपस्य विजयं पश्य मे मृधे ॥ ६ ॥
वने द्वादश वर्षाणि यानि सोढानि दुर्मते ।
तस्याऽद्य प्रतिकोपस्य फलं प्राप्नुहि सम्प्रति ॥ ७ ॥
एहि कर्ण मया सार्धं प्रतियुध्यस्व सङ्गरे ।
प्रेक्षकाः कुरवः सर्वे भवन्तु तव सैनिकाः ॥ ८ ॥
**कर्ण उवाच**—ब्रवीषि वाचा यत्पार्थ कर्मणा तत्समाचर ।
अतिशेते हि ते वाक्यं कर्मैतत्प्रथितं भुवि ॥ ९ ॥

स्वधर्माचा उघड उघड त्याग करून तूं पुष्कळ कठोर भाषणें केलींस खरीं, परंतु तुला वाटतें त्याप्रमाणें हें युद्धाचें काम तुझ्या हातून रेटेलसें मला वाटत नाहीं ( ३ ). तुझा माझा हा सामना होण्यापूर्वीं कौरवांजवळ जें कांहीं बडबडलास तें आज, राधेया, खरें करून दाखीव ( ४ ). दुष्ट कौरव द्रौपदीचा सभेंत छळ करीत असतां जो तूं आनदानें पहात बसला होतास, त्या तुला त्याचें आज पूर्ण फळ मिळेल ( ५ ). धर्मपाशानें जखडून गेल्यामुळें जो कोप मी पूर्वीं आवरून धरिला होता, त्याचा विजय आज तूं रणामध्यें पहा ( ६ ). दुष्टबुद्धी कर्णा, अरण्यामध्यें बारा वर्षें राहून जे कष्ट आम्ही सोशिले त्यामुळें उत्पन्न झालेल्या क्रोधाचें फळ आज तुला मिळेल ( ७ ). कर्णा, चल ये, युद्धांत माझ्याशीं सामना कर आणि तुझ्या या सर्व कौरवसैनिकांना प्रेक्षक होऊं दे" ( ८ ).

**कर्ण म्हणाला**—" पार्था, तूं तोंडानें जेवढें बडबडत आहेस तेवढें खरें करून दाखीव. तुझें बोलणें करण्याहून अधिक असतें हें पृथ्वीवर प्रसिद्ध आहे (९).

यत्त्वया मर्षितं पूर्वं तदशक्तेन मर्षितम् ।
इतो गृह्णीमहे पार्थ तव दृष्ट्वा पराक्रमम् ॥ १० ॥
धर्मपाशनिबद्धेन यत्त्वया मर्षितं पुरा ।
तथैव बद्धमात्मानमबद्धमिव मन्यसे ॥ ११ ॥
यदि तावद्वने वासो यथोक्तश्चरितस्त्वया ।
तत्त्वं धर्मार्थवित्क्लिष्टः स मया योद्धुमिच्छसि ॥ १२ ॥
यदि शक्रः स्वयं पार्थ युध्यते तव कारणात् ।
तथापि न व्यथा काचिन्मम स्याद्विक्रमिष्यतः ॥ १३ ॥
अयं कौन्तेय कामस्ते न चिरात्समुपस्थितः ।
योत्स्यसे हि मया सार्द्धमद्य द्रक्ष्यसि मे बलम् ॥ १४ ॥
अर्जुन उवाच—इदानीमेव तावत्त्वमपयातो रणान्मम ।
तेन जीवसि राधेय निहतस्त्वनुजस्तव ॥ १५ ॥

पूर्वी जें तूं कांहीं सहन केलेंस तें तूं नामर्द होतास ह्मणून, पण आज जर कांहीं तुझा पराक्रम दिसून आला, तर मग आह्मी तुझें म्हणणें कबूल करूं (१०). धर्मपाशानें जखडल्यामुळें पूर्वी सहन केलेंस, आतांहि तूं बद्धच असून 'मी मोकळा आहें' असें उगाच मानीत आहेस; (११). ठरल्याप्रमाणें जरी तूं अरण्यांत राहिला असलास, तरी धर्मार्थ जाणणारा व कष्ट भोगलेला असूनहि तूं माझ्याशीं युद्ध करूं इच्छितोस (१२). पण अर्जुना, माझी सारी भिस्त माझ्या पराक्रमावर आहे. तुझ्या कैवारानें प्रत्यक्ष इंद्र जरी रणांत माझ्याशीं येऊन भिडला तरी मला त्याचें बिलकुल दुःख वाटणार नाहीं (१३). अर्जुना, माझ्याशीं सामना करण्याची बुद्धि नुकतीच तुला आठवली आहेसें वाटतें. तूं माझ्या बरोबर युद्ध करूं लागलास म्हणजे आज तुला माझें सामर्थ्य दिसून येईल" (१४).

**अर्जुन म्हणालाः**—"नुकताच कीं रे तूं रणांतून पळून गेलास, आणि म्हणून वांचलास ! पण, कर्णा, तुझा धाकटा भाऊ मारला गेला (१५).

भ्रातरं घातयित्वा कस्त्यक्त्वा रणशिरश्च कः ।
त्वदन्यः कः पुमान्सत्सु ब्रूयादेवं व्यवस्थितः ॥ १६ ॥
वैशम्पायन उवाच—इति कर्णं ब्रुवन्नेव बीभत्सुरपराजितः ।
अभ्ययाद्विसृजन्बाणान्कायावरणभेदिनः ॥ १७ ॥
प्रतिजग्राह तं कर्णः प्रीयमाणो महारथः ।
महता शरवर्षेण वर्षमाणमिवाऽम्बुदम् ॥ १८ ॥
उत्पेतुः शरजालानि घोररूपाणि सर्वशः ।
अविध्यदश्वान्बाह्वोश्च हस्तावापं पृथक्पृथक् ॥ १९ ॥
सोऽमृष्यमाणः कर्णस्य निषङ्गस्याऽवलम्बनम् ।
चिच्छेद निशिताग्रेण शरेण नतपर्वणा ॥ २० ॥
उपासङ्गादुपादाय कर्णो बाणानथाऽपरान् ।
विव्याध पाण्डवं हस्ते तस्य मुष्टिरशीर्यत ॥ २१ ॥
ततः पार्थो महाबाहुः कर्णस्य धनुरच्छिनत् ।
स शक्तिं प्राहिणोत्तस्मै तां पार्थो व्यधमच्छरैः ॥ २२ ॥

स्वतः रणधुरा सोडून ( पळणारा ) आपल्या भावाचा घात करवूनहि सज्जनांत अशा मोठ्या बाता सांगणारा पुरुष तुझ्यावांचून कोण सांपडणार आहे ? " ( १६ )

**वैशंपायन** म्हणाला:—असें बोलतच अजुन अपराजित बीभत्सु कवच फोडणारे बाण टाकीत कर्णावर घसरला ( १७ ). तेव्हां मेघाप्रमाणें बाणांची वृष्टि करणाऱ्या त्या अर्जुनाचा, महारथी कर्णानेंहि मोठ्या आनंदानें उलट शरवृष्टि करून सत्कार केला ( १८ ). नंतर चहूंकडे भयंकर शरजालें पसरून कर्णानें अर्जुनाच्या घोड्यांवर, बाहूंवर आणि हस्तकवचांवरहि वेगवेगळे बाण टाकून त्याला वेधिलें ( १९ ). अर्जुनाला तें सहन न होऊन त्यानें बारीक टोंकाच्या नतपर्व बाणानें कर्णाचा मोठा भाता लटकावण्याची दोरी तोडून टाकली ( २० ). कर्णानें दुसऱ्या लहान भात्यांतून बाण घेऊन अर्जुनाचे हातावर वेध केला, त्यामुळें त्याच्या मुठीचें त्राण फुटून गेलें (२१). महाबाहू पार्थानेंहि कर्णाचें धनुष्य तोडून टाकिलें, तेव्हां त्यानें शक्ति सोडिली. पण तीहि अर्जुनानें बाणानें तोडून टाकिली ( २२ ).

१ निषंग आणि उपासंग (मोठे व लहान हा भेद)=महातूणीर व क्षुद्रतूणीर (नी.)

ततोऽनुपेतुर्बहवो राधेयस्य पदानुगाः ।
तांश्च गाण्डीवनिर्मुक्तैः प्राहिणोद्यमसादनम् ॥ २३ ॥
ततोऽस्याऽश्वान् शरैस्तीक्ष्णैर्बीभत्सुर्भारसाधनैः ।
आकर्णमुक्तैरभ्यघ्नंस्ते हताः प्रापतन्भुवि ॥ २४ ॥
अथाऽपरेण बाणेन ज्वलितेन महौजसा ।
विव्याध कर्णं कौन्तेयस्तीक्ष्णेनोरसि वीर्यवान् ॥ २५ ॥
तस्य भित्वा तनुत्राणं कायमभ्यगमच्छरः ।
ततः स तमसाऽऽविष्टो न स्म किञ्चित्प्रजाज्ञिवान् ॥ २६ ॥
स गाढवेदनो हित्वा रणं प्रायादुदङ्मुखः ।
ततोऽर्जुन उदक्रोशदुत्तरश्च महारथः ॥ २७ ॥ [ १८७१ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि कर्णापयाने षष्टितमोऽध्यायः ॥ ६० ॥

तेव्हां कर्णाचे पुष्कळच पाठिराखे अर्जुनावर बसरले; पण आपल्या गांडीवापासून बाण सोडून अर्जुनानें त्या सर्वांस यमपुरीस पाठविलें (२३). नंतर महत् कार्य करणाऱ्या, धनुष्य पुरापूर खेंचून सोडलेल्या तीक्ष्ण बाणांनीं अर्जुनानें त्याच्या घोड्यांना वेध केला, तेव्हां ते घोडेहि मरून जमिनीवर पडले (२४). आतां दुसरा एक महातेजस्वी लखलखीत तीक्ष्ण बाण घेऊन, वीर्यवान् अर्जुनानें कर्णाच्या छातीवर मारिला, तो कर्णाचें कवच फोडून आंत खोल घुसला. तेव्हां कर्णाला गाढ मूर्च्छना येऊन त्याला कांहीं समजेनासें झालें !(२५-२६). अखेर त्या वेदना त्यास सोसवेनात ह्मणून युद्ध सोडून तो उत्तर दिशेस निघून गेला. हें पाहून अर्जुन व महारथ उत्तर ह्यांनीं मोठमोठ्यानें आनंदाच्या आरोळ्या ठोकल्या ( २७ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतलि गोहरण-उपपर्वांत कर्णाच्या पलायनाविषयीं ६० वा अध्याय संपला.

---

## अध्याय ६१

[ भीष्माचें भयंकर सैन्य पाहून घायाळ उत्तर आपली स्थिति अर्जुनास सांगतो. अर्जुन त्याला धीर देतो. ]

वैशम्पायन उवाच— ततो वैकर्त्तनं जित्वा पार्थो वैराटिमब्रवीत् ।
एतन्मां प्रापयाऽनीकं यत्र तालो हिरण्मयः ॥ १ ॥
अत्र शान्तनवो भीष्मो रथेऽस्माकं पितामहः ।
काङ्क्षमाणो मया युद्धं तिष्ठत्यमरदर्शनः ॥ २ ॥
अथ सैन्यं महद्दृष्ट्वा रथनागहयाकुलम् ।
अब्रवीदुत्तरः पार्थमपविद्धः शरैर्भृशम् ॥ ३ ॥
नाऽहं शक्ष्यामि वीरेह नियन्तुं ते हयोत्तमान् ।
विषीदन्ति मम प्राणा मनो विह्वलतीव मे ॥ ४ ॥
अस्त्राणामिह दिव्यानां प्रभावः सम्प्रयुज्यताम् ।
त्वया च कुरुभिश्चैव द्रवन्तीव दिशो दश ॥ ५ ॥

**वैशम्पायन** म्हणाला:—असा कर्णाचा पराजय करून अर्जुन उत्तराला म्हणाला-" तो सुवर्णमय पीतध्वज दिसत आहे त्या सेनेजवळ आपला रथ पोंचीव ( १ ). देवाप्रमाणें दिसत असलेला आमचा आजोबा शंतनूचा पुत्र भीष्म माझ्याशीं युद्ध करण्याकरितां तेथें रथावर उभा राहिला आहे " ( २ ). आतां रथ, गज, अश्व यांनीं चिकार भरून गेलेल्या त्या सैन्याकडे पाहून बाणांनीं घायाळ झाल्यामुळें घाबरून गेलेला तो उत्तर अर्जुनाला म्हणाला (३), "वीरा, हे तुझे वेगवान् घोडे आवरून धरण्यास आतां मला शक्ति उरली नाहीं; माझे प्राण अगदीं कासावीस होत आहेत; आणि मन विह्वल होऊन गेलें आहे ( ४ ). त्वां व कौरवांनीं सोडलेल्या दिव्य अस्त्रांचा प्रभाव नुकताच ( पाहून ) दाही दिशा जणूं [1] काय पळत आहेत ( ५ ).

१ मुक्तानां घेतलें पाहिजे. ' द्रवन्ति ' याचा कर्ता कोण ? अपपाठ दिसतो. ( नी ). मुग्ध आहे. दिशः द्रवन्ति असा संबंध घेतां येईल.

गन्धेन मूर्च्छितश्चाऽहं वसारुधिरमेदसाम् ।
द्वैधीभूतं मनो मेऽद्य तव चैव प्रपश्यतः ॥ ६ ॥
अदृष्टपूर्वः शूराणां मया सङ्ख्ये समागमः ।
गदापातेन महता शङ्खानां निःस्वनेन च ॥ ७ ॥
सिंहनादैश्च शूराणां गजानां बृंहितैस्तथा ।
गाण्डीवशब्देन भृशमशनिप्रतिमेन च ।
श्रुतिः स्मृतिश्च मे वीर प्रनष्टा मूढचेतसः ॥ ८ ॥
अलातचक्रप्रतिमं मण्डलं सततं त्वया ।
व्याक्षिप्यमाणं समरे गाण्डीवं च प्रकर्षता ।
दृष्टिः प्रचलिता वीर हृदयं दीर्यतीव मे ॥ ९ ॥
वपुश्चोग्रं तव रणे क्रुद्धस्येव पिनाकिनः ।
व्यायच्छतस्तव भुजं दृष्ट्वा भीर्मे भवत्यपि ॥ १० ॥
नाऽऽददानं न सन्धानं न मुञ्चन्तं शरोत्तमान् ।
त्वामहं सम्प्रपश्यामि पश्यन्नपि न चेतनः ॥ ११ ॥

वसा, रक्त व मेद यांच्या घाणीनें माझें मस्तक भणाणून गेलें आहे, आणि प्रत्यक्ष तूं माझ्या जवळ ( मला धीर देण्यासाठीं ) असतां माझें काळीज अगदीं फाटून गेलें आहे ( ६ ). रणभूमीवर शूरांचा हा असला सामना मीं कधींच पाहिला नव्हता. भयंकर गदापात, तसाच शंखांचा शब्द ( ७ ), शूरांचा सिंहनाद, हत्तींचें चीत्करणें आणि विजेच्या कडकडाटा-प्रमाणें तुझ्या गांडीवाचा भयंकर शब्द, ह्यांनीं माझें मन गोंधळून जाऊन माझी ऐकण्याची शक्ति व स्मरण-शक्ति नष्ट झाली आहे ( ८ ). तूं एकसारखें अलातचक्राप्रमाणें मंडल घेत आणि आपलें गांडीव धनुष्य ताणीत फिरत आहेस; त्यामुळें, वीरा, माझी नजर ठरत नसून माझें काळीज जणूं फाटत आहे ( ९ ). क्रुद्ध झालेल्या शंकराप्रमाणें रणभूमीवर तुझें उग्र रूप, आणि तूं युद्ध करीत असतां जें हस्तलाघव दृष्टीस पडतें, यांनीं माझी अगदीं गाळण उडाली आहे ( १० ). मला डोळे असूनहि भान नाहीसें झाल्यामुळें, तूं भात्यांतून बाण काढतोस केव्हां, ते धनुष्यास जोडतोस केव्हां आणि ते उत्तम बाण सोडतोस केव्हां, हें मी पाहत असूनहि मला कळत नाहीं ( ११ ).

अवसीदन्ति मे प्राणा भूरियं चलतीव च ।
न च प्रतोदं रश्मींश्च संयन्तुं शक्तिरस्ति मे ॥ १२ ॥
अर्जुन उवाच— मा भैषीः स्तम्भयाऽऽत्मानं त्वयाऽपि नरपुङ्गव ।
अत्यद्भुतानि कर्माणि कृतानि रणमूर्धनि ॥ १३ ॥
राजपुत्रोऽसि भद्रं ते कुले मत्स्यस्य विश्रुते ।
जातस्त्वं शत्रुदमने नाऽवसीदितुमर्हसि ॥ १४ ॥
धृतिं कृत्वा सुविपुलां राजपुत्र रथे मम ।
युध्यमानस्य समरे हयान्संयच्छ शत्रुहन् ॥ १५ ॥
वैशम्पायन उवाच— एवमुक्त्वा महाबाहुर्वैराटिं नरसत्तमः ।
अर्जुनो रथिनां श्रेष्ठ उत्तरं वाक्यमब्रवीत् ॥ १६ ॥
सेनाग्रमाशु भीष्मस्य प्रापयस्वैतदेव माम् ।
आच्छेत्स्याम्यहमेतस्य धनुर्ज्यामपि चाऽऽहवे ॥ १७ ॥
अस्यन्तं दिव्यमस्त्रं मां चित्रमद्य निशामय ।
शतह्रदामिवाऽऽयान्तीं स्तनयित्नोरिवाऽम्बरे ॥ १८ ॥

माझे प्राण अगदीं व्याकुळ होऊन, मला पृथ्वी फिरल्यासारखी दिसत आहे. चाबूक व घोड्यांचे लगाम धरण्याची शक्ति मला आतां मुळींच नाहीं" (१२).

**अर्जुन** म्हणाला:—" नरश्रेष्ठा भिऊं नकोस, धीर धर; तूंहि ह्या युद्धामध्यें अत्यद्भुत अशीं कामें केलीं आहेस ( १३ ). राजपुत्रा, तुझें कल्याण असो; शत्रूंचें दमन करण्याविषयीं प्रख्यात असलेल्या मत्स्यकुलामध्यें तूं जन्मला आहेस, तेव्हां असें हातपाय गाळणें तुला शोभत नाहीं ( १४ ). राजपुत्रा, धैर्य ठेव, आणि मी रणामध्यें युद्ध करूं लागलों म्हणजे तूं रथावर बसून रथाचे घोडे आवरून धर ( १५ ).

**वैशंपायन** म्हणाला:—ह्याप्रमाणें भाषण करून तो महाबाहु नरसत्तम रथिश्रेष्ठ अर्जुन उत्तरास म्हणाला:–( १६ ) "ह्या भीष्माच्या सेनेच्या समोर मला पोंचव, म्हणजे मी युद्धांत भीष्माचें धनुष्य व त्याची प्रत्यंचाहि तोडून टाकितों ( १७ ). आज मी दिव्य अस्त्रांचा प्रयोग कसा करतों तो चमत्कार पहा. अंतरिक्षांत मेघांतून निघणाऱ्या विजेप्रमाणें सोन्याच्या पाठीचें माझें गांडीव

सुवर्णपृष्ठं गाण्डीवं द्रक्ष्यन्ति कुरवो मम ।
दक्षिणेनाथ वामेन कतरेण स्विदस्यति ॥ १९ ॥
इति मां सङ्गताः सर्वे तर्कयिष्यन्ति शत्रवः ।
शोणितोदां रथावर्त्तां नागनक्रां दुरत्ययाम् ॥
नदीं प्रस्कन्दयिष्यामि परलोकप्रवाहिनीम् ॥ २० ॥
पाणिपादशिरःपृष्ठबाहुशाखानिरन्तरम् ।
वनं कुरूणां छेत्स्यामि शरैः सन्नतपर्वभिः ॥ २१ ॥
जयन्तः कौरवीं सेनामेकस्य मम धन्विनः ।
शतं मार्गा भविष्यन्ति पावकस्येव कानने ॥ २२ ॥
मया चक्रमिवाऽऽविद्धं सैन्यं द्रक्ष्यसि केवलम् ।
इष्वस्त्रे शिक्षितं चित्रमहं दर्शयिताऽस्मि ते ॥ २३ ॥
असम्भ्रान्तो रथे तिष्ठ समेषु विषमेषु च ।
दिवमावृत्य तिष्ठन्तं गिरिं भिन्द्यां स्वपत्रिभिः ॥ २४ ॥

धनुष्य सर्व कौरवांच्या दृष्टीस पडेल. 'डाव्या का उजव्या ? अर्जुन बाण सोडतो तरी कोणत्या हातानें ?' ( १८-१९ ) असे येथें जमलेले सर्व शत्रु माझ्याविषयीं तर्क करीत राहतील. रक्त हेंच पाणी, रथ हेंच भोंवरे आणि हत्ती हेच नक्र, अशी परलोकवाहिनी दुस्तर रणनदी मी आज ( येथें ) करतों. (२०). हात, पाय, शिर, आणि पृष्ठभाग ह्यांनीं गर्द झालेलें हें कौरवरूपी अरण्य मीं आज नतपर्व बाणांनीं खची करून टाकतों ! ( २१ ). मी एकटा धनुर्धारी वीर बाणांच्या मारानें ह्या कौरवी सेनेचा धुव्वा उडवूं लागलों म्हणजे रानांत लागलेल्या वणव्याप्रमाणें शेंकडों वाटा तयार होतील. माझ्या प्रहारांनीं विद्ध झालेलें हें सैन्य तेथल्या तेथेंच गिरक्या खात असलेलें तुझ्या दृष्टीस पडेल, आणि बाणांचा प्रयोग करण्याविषयीं माझ्या ठिकाणीं काय अद्भुत कौशल्य आहे तें मी तुला दाखवीन (२२-२३). 'सपाट प्रदेशांवर व खांचखळगे असलेल्या प्रदेशांवरूनहि जात असतां तूं न गडबडतां रथावर बैस. म्हणजे आकाशाला व्यापलेला पर्वतहि मी बाणांनीं फोडीन, मग कौरवसेनेची कथा काय ? ( २४ )

अहमिन्द्रस्य वचनात्सङ्ग्रामेऽभ्यहनं पुरा ।
पौलोमान्कालखञ्जांश्च सहस्राणि शतानि च ॥ २५ ॥
अहमिन्द्राद्दृढां मुष्टिं[1] ब्रह्मणः कृतहस्तताम् ।
प्रगाढे तुमुलं चित्रमिति[2] विद्धि प्रजापतेः ॥ २६ ॥
अहं पारे समुद्रस्य हिरण्यपुरवासिनाम् ।
जित्वा षष्टिं सहस्राणि रथिनामुग्रधन्विनाम्[3] ॥ २७ ॥
शीर्यमाणानि कूलानि प्रवृद्धेनेव वारिणा ।
मया कुरूणां वृन्दानि पात्यमानानि पश्य वै ॥ २८ ॥
ध्वजवृक्षं पत्तितृणं रथसिंहगणायुतम् ।
वनमादीपयिष्यामि कुरूणामस्त्रतेजसा ॥ २९ ॥
तानहं रथनीडेभ्यः शरैः सन्नतपर्वभिः ।
यत्तान्सर्वानतिबलान्योत्स्यमानानवस्थितान् ।
एकः सन्कालयिष्यामि वज्रपाणिरिवाऽसुरान् ॥ ३० ॥

मी पूर्वी इंद्राच्या सांगण्यावरून शेंकडों, हजारों, कालखंजांना व पौलोमांना ठार केलें आहे ( २५ ) मी इंद्रापासून दृढमुष्टि शिकलों, ब्रह्मदेवापासून हस्तकौशल्य, व प्रजापतीपासून संकटकाळीं अद्भुत युद्ध कसें करावें तें शिकलों हें लक्षांत ठेव (२६). समुद्राच्या पलीकडे हिरण्यपुरांत राहणाऱ्या भयंकर धनुर्धारी साठहजार महारथ राक्षसांचा पराजय करून ही विद्या मी शिकलों. पुरानें वाढलेल्या पाण्याच्या योगानें नदीचे कांठ ढांसळतात, त्याप्रमाणें हे कौरवांचे समूह मी भूमीवर पाडतांना तुझ्या दृष्टीस पडतील (२७–२८). ध्वज हेच वृक्ष, पायदळ हेंच तृण, रथी हे त्यांतील सिंहांचे कळप, अशा या कौरववनाला मी अस्त्ररूप अग्नीनें आग लावून देईन! ( २९ ) इंद्रानें असुरांचे धुडके उडविले, तसा मी एकटा युद्धाकरितां सज्ज उभे राहिलेल्या ह्या बलाढ्य कौरववीरांना नतपर्व बाणांनीं आश्रयभूत रथांवरून धडाधड पाडतों ( ३० ).

१ वोद्मि इति शेषः (नी.) २ ब्रह्मा आणि प्रजापति यांतील भेद पूर्वींहि आला आहे.
३ या श्लोकांतहि क्रियापद नाहीं. 'शिकलों' हें मागचें घ्यावें.

रौद्रं रुद्रादहं ह्यस्त्रं वारुणं वरुणादपि ।
अस्त्रमाग्नेयमग्नेश्च वायव्यं मातरिश्वनः ।
वज्रादीनि तथाऽस्त्राणि शक्रादहमवाप्तवान् ॥ ३१ ॥

धार्त्तराष्ट्रवनं घोरं नरसिंहाभिरक्षितम् ।
अहमुत्पाटयिष्यामि वैराटे व्येतु ते भयम् ॥ ३२ ॥

वैशम्पायन उवाच— एवमाश्वासितस्तेन वैराटिः सव्यसाचिना ।
व्यवगाहद्रथानीकं भीमं भीष्माभिरक्षितम् ॥ ३३ ॥

तमायान्तं महाबाहुं जिगीषन्तं रणे कुरून् ।
अभ्यवारयदव्यग्रः क्रूरकर्माऽऽपगासुतः ॥ ३४ ॥

तस्य जिष्णुरुपावृत्य ध्वजं मूलादपातयत् ।
विकृष्य कलधौताग्रैः स विद्धः प्रापतद्भुवि ॥ ३५ ॥

तं चित्रमाल्याभरणाः कृतविद्या मनस्विनः ।
आगच्छन्भीमधन्वानं चत्वारश्च महाबलाः ॥ ३६ ॥

रुद्रापासून रौद्रास्त्र, वरुणापासून वारुणास्त्र, अग्नी- पासून आग्नेयास्त्र वायूपासून वायव्यास्त्र, आणि तशींच इंद्रापासून वज्रादि अनेक अस्त्रें मला मिळालेलीं आहेत. वीररूपी सिंहांनीं रक्षण केलेलें हें भयंकर कौरवरूपी वन मी आज समूळ उध्वस्त करून टाकतों ! उत्तरा, तुझें भय जाऊं दे" ( ३१-३२ ).

**वैशंपायन** म्हणाले:—ह्याप्रमाणें अर्जुनानें उत्तराला धीर दिल्यावर, तो भीष्माच्या रक्षणाखालीं असलेल्या प्रचंड रथांच्या पथकांत शिरला (३३). तो महाबाहु अर्जुन रणांत कौरवांची धुळधाण उडवून देण्याच्या इच्छेनें येत आहे हें पाहून, दक्ष व क्रूरकर्मी भीष्म त्याला आडवा झाला ( ३४ ). तेव्हां अर्जुनानें त्याच्या सन्मुख होऊन व आपलें धनुष्य खेंचून सोनेरी फाळांच्या बाणांनीं त्याचा ध्वज मुळापासून तोडला, आणि तो तुटलेला ध्वज खालीं पडला ( ३५ ). तेव्हां तऱ्हेतऱ्हेचे पुष्पहार व अलंकार घातलेले, कृतविद्य आणि मनस्वी असे चार योद्धे त्या महाधनुर्धारी अर्जुनावर आले (३६).

दुश्शासनो विकर्णश्च दुस्सहोऽथ विविंशतिः ।
आगत्य भीमधन्वानं बीभत्सुं पर्यवारयन् ॥ ३७ ॥
दुश्शासनस्तु भल्लेन विद्ध्वा वैराटिमुत्तरम् ।
द्वितीयेनाऽर्जुनं वीरः प्रत्यविध्यत्तस्तनान्तरे ॥ ३८ ॥
तस्य जिष्णुरुपावृत्य पृथुधारेण कार्मुकम् ।
चकर्त गार्ध्रपत्रेण जातरूपपरिष्कृतम् ॥ ३९ ॥
अथैनं पञ्चभिः पश्चात्प्रत्याविध्यत्स्तनान्तरे ।
सोऽपयातो रणं हित्वा पार्थबाणप्रपीडितः ॥ ४० ॥
तं विकर्णः शरैस्तीक्ष्णैर्गृध्रपत्रैरजिह्मगैः ।
विव्याध परवीरघ्नमर्जुनं धृतराष्ट्रजः ॥ ४१ ॥
ततस्तमपि कौन्तेयः शरेणाऽऽनतपर्वणा ।
ललाटेऽभ्यहनत्तूर्णं स विद्धः प्रापतद्रथात् ॥ ४२ ॥
ततः पार्थमभिद्रुत्य दुस्सहः सविविंशतिः ।
अवाकिरच्छरैस्तीक्ष्णैः परीप्सुर्भ्रातरं रणे ॥ ४३ ॥

दुःशासन, विकर्ण, दुःसह आणि विविंशति, या चौघांनीं येऊन त्या भीमधन्व्या अर्जुनास घेरलें ( ३७ ). दुःशासनानें एका भल्ल बाणानें उत्तराला जखमी करून दुसऱ्या एका बाणानें अर्जुनाच्या छातींत घाय केला ( ३८ ). अर्जुनानें त्याच्याकडे मोर्चा फिरवून तीक्ष्ण धारेच्या व गिधाडांचीं पिसें लावलेल्या एका बाणानें त्याचें धनुष्य तोडिलें ( ३९ ). आणि लागलाच पांच बाणांनीं त्याच्या उरःस्थलीं प्रहार केला. तेव्हां पार्थाच्या त्या बाणांनीं घायाळ झालेला दुःशासन रण सोडून निघून गेला ( ४० ). नंतर धृतराष्ट्राचा पुत्र विकर्ण ( पुढें आला ) त्यानें तीक्ष्ण व सरळ जाणाऱ्या व गिधाडांचीं पिसें लावलेल्या बाणांनीं त्या शत्रुनाशक अर्जुनाला वेध केला ( ४१ ). तेव्हां त्यालाहि अर्जुनानें एका नतपर्व बाणानें कपाळावर जखम केली, त्यामुळें तो तात्काळ घायाळ होऊन रथांतून पडला ( ४२ ). नंतर आपल्या भावाची पाठ राखण्याच्या इच्छेनें दुःसह विविंशतीसह अर्जुनावर धांवून आला, आणि त्या उभयतांनीं अर्जुनाला तीक्ष्ण बाणांनीं छावून सोडिलें ( ४३ ).

तावुभौ गार्ध्रपत्राभ्यां निशिताभ्यां धनञ्जयः ।
विद्ध्वा युगपदव्यग्रस्तयोर्वाहानसूदयत् ॥ ४४ ॥
तौ हताश्वौ विभिन्नाङ्गौ धृतराष्ट्रात्मजावुभौ ।
अभिपत्य रथैरन्यैरपनीतौ पदानुगैः ॥ ४५ ॥
सर्वा दिशश्चाऽभ्यपतद्बीभत्सुरपराजितः ।
किरीटमाली कौन्तेयो [1]लब्धलक्षो महाबलः ॥ ४६ ॥[१९१७]

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि अर्जुनदुःशासनादियुद्धे एकषष्टितमोऽध्यायः॥ ६१ ॥**

परंतु अर्जुनानें गिधाडांचीं पिसें लाविलेल्या दोन तीक्ष्ण बाणांनीं त्या दोघांना एकदम वेध करून, त्यांचे घोडेहि मारून टाकिले (४४). तेव्हां घोडे मारलेले, व घायाळ झालेले, अशा त्या धृतराष्ट्रपुत्रांना त्यांच्या मागून धांवून आलेल्या लोकांनीं रथांत घालून लांब नेलें ( ४५ ). मग तो मुकुट व माला धारण करणांरा, महाबलिष्ठ, अपराजित, व नेम न चुकणारा कुंतीचा पुत्र, सर्व बाजूंनीं त्या कौरवसैन्यावर तुटून पडला ( ४६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत अर्जुन दुःशासन वगैरेंच्या युद्धाविषयीं ६१ वा अध्याय संपला.

---

## अध्याय ६२

[ अर्जुनाशीं कौरवांचें सामुदायिक युद्ध, व अर्जुनाच्या प्रभावाचें प्रदर्शन. ]

वैशम्पायन उवाच— अथ सङ्गम्य सर्वे ते कौरवाणां महारथाः ।
अर्जुनं सहिता यत्ताः प्रत्ययुध्यन्त भारत ॥ १ ॥
स सायकमयैर्जालैः सर्वतस्तान्महारथान् ।
प्राच्छादयदमेयात्मा नीहारेणेव पर्वतान् ॥ २ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—भारता, तेव्हां कौरवांचे सर्व महारथी संगनमत करून अर्जुनाशीं एकत्र लढूं लागले (१). तेव्हां धुक्यानें पर्वत झांकून जावे त्याप्रमाणें त्या अतर्क्यस्वरूप अर्जुनानें सर्व महारथ्यांना बाणांनीं सर्व बाजूंनीं आच्छादिलें (२).

---

१ लब्धलक्षः स्थिरलक्षः ( नी. )

नदद्भिश्च महानागैर्हेषमाणैश्च वाजिभिः ।
भेरीशङ्खनिनादैश्च स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ ३ ॥
नराश्वकायान्निर्भिद्य लौहानि कवचानि च ।
पार्थस्य शरजालानि विनिष्पेतुः सहस्रशः ॥ ४ ॥
त्वरमाणः शरानस्यन्पाण्डवः प्रबभौ रणे ।
मध्यन्दिनगतोऽर्चिष्मान् शरदीव दिवाकरः ॥ ५ ॥
उपप्लवन्ति वित्रस्ता रथेभ्यो रथिनस्तथा ।
सादिनश्चाऽश्वपृष्ठेभ्यो भूमौ चैव पदातयः ॥ ६ ॥
शरैः सञ्छिद्यमानानां कवचानां महात्मनाम् ।
ताम्रराजतलौहानां प्रादुरासीन्महास्वनः ॥ ७ ॥
छन्नमायोधनं सर्वं शरीरैर्गतचेतसाम् ।
गजाश्वसादिनां तत्र शितबाणात्तजीवितैः ॥ ८ ॥
रथोपस्थाभिपतितैरास्तृता मानवैर्मही ।
प्रनृत्यन्तीव संग्रामे चापहस्तो धनञ्जयः ॥ ९ ॥

( त्यावेळीं ) मोठमोठ्या हत्तींच्या ओरडण्यानें, घोड्यांच्या खिंकाळण्यानें आणि शंख व नौबती ह्यांच्या वादनानें तो बाणांचा आवाज फारच वाढला ( ३ ). अर्जुनाचे हजारों बाण लोखंडी कवच फोडून आणि माणसें व घोडे यांचीं शरीरें भेदून बाहेर निघाले ( ४ ). अर्जुन रणांत अत्यंत त्वरेनें एकसारखा बाण सोडीत असतां शरदतूंत मध्याह्न समयीं निर्मल किरण टाकणाऱ्या तेजस्वी सूर्याप्रमाणें शोभूं लागला ( ५ ). अर्जुनाच्या बाणांनीं जेर झालेले रथी, रथांतून उतरले, स्वार घोड्यांवरून खालीं आले आणि पायदळ जमिनीवर पडले ( ६ ). मोठमोठ्या योद्धयांचीं तांब्याचीं, लोखंडाचीं व रुप्याचीं कवचें बाणांनीं फुटून जाऊं लागल्यामुळें मोठा आवाज होऊं लागला ( ७ ). तीक्ष्ण बाणांनीं गतप्राण केलेल्या घोडेस्वारांच्या व हत्तींवरील योद्धयांच्या शरीरांनीं ती सर्व रणभूमि छावून गेली ( ८ ) ! ( तशीच ) रथोपस्थावरून खालीं भूमीवर पडणाऱ्या मनुष्यांनींहि रणभूमि भरली. आणि तो चापधारी धनंजय संग्रामांत जणुं नाचत आहे असें वाटलें ( ९ ).

श्रुत्वा गाण्डीवनिर्घोषं विस्फूर्जितमिवाऽशनेः ।
त्रस्तानि सर्वसैन्यानि व्यपागच्छन्महाहवात् ॥ १० ॥
कुण्डलोष्णीषधारीणि जातरूपस्रजस्तथा ।
पतितानि स्म दृश्यन्ते शिरांसि रणमूर्धनि ॥ ११ ॥
विशिखोन्मथितैर्गात्रैर्बाहुभिश्च सकार्मुकैः ।
सहस्ताभरणैश्चाऽन्यैः प्रच्छन्ना भाति मेदिनी ॥ १२ ॥
शिरसां पात्यमानानामन्तरा निशितैः शरैः ।
अश्मवृष्टिरिवाऽऽकाशादभवद्भरतर्षभ ॥ १३ ॥
दर्शयित्वा तथाऽऽत्मानं रौद्रं रुद्रपराक्रमः ।
अवरुद्धोऽचरत्पार्थो वर्षाणि त्रिदशानि च ॥
क्रोधाग्निमुत्सृजन्वीरो धार्त्तराष्ट्रेषु पाण्डवः ॥ १४ ॥
तस्य तद्दहतः सैन्यं दृष्ट्वा चैव पराक्रमम् ।
सर्वे शान्तिपरा योधा धार्त्तराष्ट्रस्य पश्यतः ॥ १५ ॥
वित्रासयित्वा तत्सैन्यं द्रावयित्वा महारथान् ।
अर्जुनो जयतां श्रेष्ठः पर्यवर्त्तत भारत ॥ १६ ॥

विजेच्या कडकडाटाप्रमाणें गांडीवाचा घोष ऐकून सर्व सैन्यें भयभीत झालीं, व त्यांनीं त्या महारणांतून पाय काढिला. कुंडलें आणि शिरस्त्राणें घातलेलीं, आणि सोन्याच्या माळा ( गळ्यांत ) असलेलीं शिरें रणभूमीवर जिकडे तिकडे पडलेलीं दिसूं लागलीं ( १०–११ ). बाणांनीं छिन्नभिन्न झालेलीं गात्रें, तसेंच धनुष्यांसह कित्येक हस्त व भूषणांसह बाहू, ह्यांच्या योगानें ती भूमि झांकून गेली ! (१२). भरतश्रेष्ठा, तीक्ष्ण बाणांनीं त्या रणभूमीवर आकाशांतुन पडणाऱ्या दगडांच्या वर्षावाप्रमाणें मस्तकें पडूं लागलीं. तेरा वर्षेपर्यंत अवरोध झालेला रुद्रपराक्रमी पार्थ, त्यावेळीं आपलें रौद्रस्वरूप प्रकट करून कौरवांवर आपला क्रोधाग्नी पाखडण्याकरितां रणांत स्वैर संचार करूं लागला ( १४ ). सैन्य जाळीत सुटलेल्या त्या अर्जुनाचा तो पराक्रम पाहून, ते सर्व योद्धे दुर्योधनाच्या देखत शांतिनिष्ठ झाले ( १५ ). ( नंतर ) तें सर्व सैन्य त्रस्त करून व महारथ्यांना उधळून लावून, तो विजयिश्रेष्ठ अर्जुन, भारता, परतला. ( १६ )

१ त्रिदशानि त्रीणि दश च ( नी. ).

प्रावर्त्तयन्नदीं घोरां शोणितोदां तरङ्गिणीम् ।
अस्थिशैवालसम्बाधां युगान्ते कालनिर्मिताम् ॥ १७ ॥
शरचापप्लवां घोरां केशशैवलशाद्वलाम् ।
तनुत्रोष्णीषसम्बाधां नागकूर्ममहाद्विपाम्[1] ॥ १८ ॥
मेदोवसासृक्प्रवहां महाभयविवर्धिनीम् ।
रौद्ररूपां महाभीमां श्वापदैरभिनादिताम् ॥ १९ ॥
तीक्ष्णशस्त्रमहाग्राहां क्रव्यादगणसेविताम् ।
मुक्ताहारोर्मिकलिलां चित्रालङ्कार बुद्बुदाम् ॥ २० ॥
शरसङ्घमहावर्तां नागनक्रां दुरत्ययाम् ।
महारथमहाद्वीपां शङ्खदुन्दुभिनिस्वनाम् ॥
चकार च तदा पार्थो नदीं दुस्तरशोणिताम् ॥ २१ ॥

युगांतीं कालानें उत्पन्न केलेल्या नदीप्रमाणें त्यानें एक घोर रक्ताची उत्पन्न केली. त्या नदींत अस्थि हेंच शेवाळ ( १७ ), धनुर्बाण हींच होडगीं, योद्धयांच्या मस्तकांवरील केस हेंच तीरावरील हिरवें गवत व शेवाळ असून, कवचें व शिरस्त्राणें ह्यांनीं ती नदी खडबडीत ( किनाऱ्यानें ) होती. हत्ती हींच जिच्यांतील कांसवें व मोठाले जलहत्ती ( मासे ) होते. ( १८ ), आणि मेद, रक्त व वसा हा तिचा प्रवाह होता. अशी ती भयंकर रूपाची व अत्यंत भयप्रद नदी होती. त्या नदीच्या तीरावर असलेल्या ( लांडगे, कोल्हे वगैरे ) श्वापदांच्या कळपांनीं ती निनादित झाली होती ( १९ ). तीक्ष्ण शस्त्रें हेच तिच्यांतील मोठाले मगर होते. शिवाय मांसभक्षक ( गिधाडें, कावळे, ससाणे वगैरे पक्ष्यांच्या ) कळपांनीं ती युक्त होती. झळकणारे मोत्यांचे हार ह्याच तिच्यांतील उचंबळणाऱ्या लाटा आणि चित्रविचित्र अलंकार हेच तिच्यांतील बुडबुडे होते ( २० ). शरसंघ हे मोठमोठे भोंवरे असून गज हेच त्या दुस्तर नदींतील नक्र होते. मोठमोठे रथ हे मोठमोठीं बेटें असून, शंख व दुंदुभि ह्यांच्या योगें ती नादित झाली होती. अशाप्रकारची दुस्तर रक्तनदी अर्जुनानें उत्पन्न केली होती (२१).

१ महाद्विपाः-जलगजाश्च यस्याम् ( नी. ) द्विप याचा अर्थ बेट होऊं शकत नाहीं. द्वीप पुढें २१ श्लोकांत आला आहे.

आददानस्य हि शरान्सन्धाय च विमुञ्चतः ।
विकर्षतश्च गाण्डीवं न कश्चिद्ददृशे जनः ॥ २२ ॥ [ १९३९ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि अर्जुनसंकुलयुद्धे द्विषष्टितमोऽध्यायः ॥ ६२ ॥

( पण ) अर्जुन युद्ध करीत असतां धनुष्याला बाण जोडितो केव्हां, धनुष्य ताणितो केव्हां, आणि बाण सोडतो केव्हां, हें लोकांस दिसत नव्हतें ( २२ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत अर्जुनाच्या संकुल युद्धाविषयीं ६२ वा अध्याय संपला.

## अध्याय ६३

[ सामुदायिक युद्धांत अर्जुन सर्वांस मोहित करतो. ]

---

वैशम्पायन उवाच—ततो दुर्योधनः कर्णो दुःशासनविविंशती ।
द्रोणश्च सह पुत्रेण कृपश्चापि महारथः ॥ १ ॥
पुनर्ययुश्च संरब्धा धनञ्जयजिघांसवः ।
विस्फारयन्तश्चापानि बलवन्ति दृढानि च ॥ २ ॥
तान्विकीर्णपताकेन रथेनाऽऽदित्यवर्चसा ।
प्रत्युद्ययौ महाराज समन्ताद्वानरध्वजः ॥ ३ ॥
ततः कृपश्च कर्णश्च द्रोणश्च रथिनां वरः ।
तं महास्त्रैर्महावीर्यं परिवार्य धनञ्जयम् ॥ ४ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर, दुर्योधन, कर्ण, दुःशासन, विविंशति पुत्रासह द्रोण व महारथि कृप ( १ ), हे क्षुब्ध झाले, आणि अर्जुनाला ठार करण्याच्या इच्छेनें आपल्या प्रबळ व बळकट धनुष्यांचा टणत्कार करीत पुनः त्यावर रागानें चालून गेले ( २ ). राजा, पताका फडकत असलेल्या आपल्या सूर्यासारख्या तेजस्वी रथावर बसलेला तो वानरध्वज अर्जुन त्यांना तोंड देण्याकरितां पुढें झाला ( ३ ). तेव्हां कृप, कर्ण व श्रेष्ठ रथी द्रोण ह्यांनीं त्या महापराक्रमी अर्जुनाला महान् अस्त्रांनीं घेरून टाकून ( ४ ),

शरौघान्सम्यगस्यन्तो जीमूता इव वार्षिकाः ।
ववर्षुः शरवर्षाणि पातयन्तो धनञ्जयम् ॥ ५ ॥
इषुभिर्बहुभिस्तूर्णं समरे लोमवाहिभिः ।
अदूरात्पर्यवस्थाप्य पूरयामासुराहताः ॥ ६ ॥
तथा तैरवकीर्णस्य दिव्यैरस्त्रैः समन्ततः ।
न तस्य द्व्यङ्गुलमपि विवृतं सम्प्रदृश्यते ॥ ७ ॥
ततः प्रहस्य बीभत्सुर्दिव्यमैन्द्रं महारथः ।
अस्त्रमादित्यसङ्काशं गाण्डीवे समयोजयत् ॥ ८ ॥
शररश्मिरिवाऽऽदित्यः प्रतस्थे समरे बली ।
किरीटमाली कौन्तेयः सर्वान्प्राच्छादयत्कुरून् ॥ ९ ॥
यथा बलाहके विद्युत्पावको वा शिलोच्चये ।
तथा गाण्डीवमभवादिन्द्रायुधमिवाऽऽनतम् ॥ १० ॥
यथा वर्षति पर्जन्ये विद्युद्विभ्राजते दिवि ।
द्योतयन्ती दिशः सर्वाः पृथिवीं च समन्ततः ॥ ११ ॥

उत्तम प्रकारचीं बाणजालें सोडून वर्षाकालाच्या मेघांप्रमाणें अर्जुनास पाडण्यासाठीं बाणांचे वर्षाव केले ( ५ ). आणि जवळ स्थिर होऊन त्या युद्धनिपुण वीरांनीं आपल्या सरळ जाणाऱ्या असंख्य बाणांनीं संग्रामामध्यें त्या अर्जुनाला झांकून टाकिलें ( ६ ). त्या योध्यांनीं अर्जुनावर दिव्य अस्त्रांचा इतका भडिमार केला कीं, त्याच्या भोंवतालीं दोन बोटें जागा देखील मोकळी राहिली नाहीं ( ७ ). तेव्हां महारथी अर्जुनानें हंसून सूर्योपम तेजस्वी दिव्य ऐंद्रास्त्र आपल्या गांडीव धनुष्यावर योजिलें ( ८ ). आणि शरवर्षाव करून त्या सर्व कौरवांना त्यानें झांकून टाकिलें. तेव्हां तो किरीटमाली बलाढ्य अर्जुन, शर हेच किरण असलेल्या सूर्याप्रमाणें समरांत चालला ( ९ ). त्याचें तें इन्द्र धनुष्यासारखें लवलेलें गांडीव जशी मेघांत वीज किंवा डोंगरांत वणवा त्याप्रमाणें (चमकणारें) झालें ( १० ). पर्जन्य वृष्टि होत असतां आकाशांत वीज जशी चमकून सर्व दिशा आणि चारी बाजूंनें पृथ्वी प्रकाशित करते ( ११ ),

१ पर्यवस्थाप्य-स्तब्धीकृत्य ( नी. ) कशास ? अर्थबोध होत नाहीं.

तथा दश दिशः सर्वाः पतद्गाण्डीवमावृणोत् ।
नागाश्च रथिनः सर्वे मुमुहुस्तत्र भारत ॥ १२ ॥
सर्वे शान्तिपरा योधाः स्वचित्तानि न लेभिरे ।
संग्रामे विमुखाः सर्वे योधास्ते हतचेतसः ॥ १३ ॥
एवं सर्वाणि सैन्यानि भग्नानि भरतर्षभ ।
व्यद्रवन्त दिशः सर्वा निराशानि स्वजीविते ॥१४॥ [१९५३]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरगोग्रहे अर्जुनसंकुलयुद्धे त्रिषष्टितमोऽध्यायः ॥६३॥

त्याप्रमाणें त्या गांडीवाच्या तेजानें दाही दिशा भरून गेल्या; आणि भारता, सर्व रथी व हत्ती यांना मूर्च्छा आली ( १२ ). ते सर्व योद्धे अगदीं शान्त होऊन गेले; आणि निर्बुद्ध झालेल्या त्या वीरांना कांहीं सुचेनासें होऊन त्यांनीं रणांतून पाय काढिला ( १३ ). याप्रमाणें, भरतश्रेष्ठा, पराजित झालेलीं तीं सर्व सैन्यें जीवाविषयीं निराश झाल्यानें सर्व दिशांस पळालीं ( १४ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरणउपपर्वांत उत्तरगोग्रह-प्रसंगीं अर्जुनाच्या संकुल युद्धाविषयीं ६३ वा अध्याय संपला.

## अध्याय ६४

[ भीष्म व अर्जुन यांचें युद्ध; देव पुष्पवृष्टि करतात; भीष्माची पीछेहाट होते. ]

वैशम्पायन उवाच— ततः शान्तनवो भीष्मो भारतानां पितामहः ।
वध्यमानेषु योधेषु धनंजयमुपाद्रवत् ॥ १ ॥
प्रगृह्य कार्मुकश्रेष्ठं जातरूपपरिष्कृतम् ।
शरानादाय तीक्ष्णाग्रान्मर्मभेदान्प्रमाथिनः ॥ २ ॥

वैशंपायन म्हणाला:—नंतर शंतनुपुत्र भरतांचा पितामह भीष्म, योध्यांचा संप्पा उडत राहिलेला पाहून, अर्जुनावर चालून गेला (१). त्यानें सुवर्णभूषित श्रेष्ठ धनुष्य आणि तीक्ष्ण अग्रांचे मर्मभेदक व विध्वंसक बाण घतले होते (२).

पाण्डुरेणाऽऽतपत्रेण ध्रियमाणेन मूर्धनि ।
शुशुभे स नरव्याघ्रो गिरिः सूर्योदये यथा ॥ ३ ॥
प्रध्माय शङ्खं गाङ्गेयो धार्त्तराष्ट्रान्प्रहर्षयन् ।
प्रदक्षिणमुपावृत्य बीभत्सुं समवारयत् ॥ ४ ॥
तमुदीक्ष्य समायान्तं कौन्तेयः परवीरहा ।
प्रत्यगृह्णात्प्रहृष्टात्मा धाराधरमिवाऽचलः ॥ ५ ॥
ततो भीष्मः शरानष्टौ ध्वजे पार्थस्य वीर्यवान् ।
समार्पयन्महावेगान् श्वसमानानिवोरगान् ॥ ६ ॥
ते ध्वजं पाण्डुपुत्रस्य समासाद्य पतत्रिणः ।
ज्वलन्तं कपिमाजघ्नुर्ध्वज ग्रनिलयांश्च तान् ॥ ७ ॥
ततो भल्लेन महता पृथुधारेण पाण्डवः ।
छत्रं चिच्छेद भीष्मस्य तूर्णं तदपतद्भुवि ॥ ८ ॥
ध्वजं चैवाऽस्य कौन्तेयः शरैरभ्यहनद्द्रुशम् ।
शीघ्रकृद्रथवाहांश्च तथोभौ पार्ष्णिसारथी ॥ ९ ॥

मस्तकावर शुभ्र छत्र असलेला तो नरश्रेष्ठ सूर्योदयीं जसा ( उदय ) पर्वत शोभतो तसा शोभूं लागला ( ३ ). नंतर धृतराष्ट्राचे पुत्रांना असान यावें म्हणून त्या गंगेच्या पुत्रानें आपला शंख फुंकून, उजव्या बाजूला वळून, अर्जुनाला गाठलें ( ४ ). भीष्म चाल करून आलेला पाहून त्या शत्रुवीरांस मारणाऱ्या कुंतीच्या पुत्राला फार समाधान वाटलें. त्यानें जलधारा सोडणाऱ्या मेघाचें स्वागत करणाऱ्या पर्वताप्रमाणें, भीष्माचें स्वागत केलें. (.५ ). नंतर त्या वीर्यवान् भीष्मानें फुसकारणाऱ्या सर्पाप्रमाणें आठ महावेगवान् बाण पार्थाच्या ध्वजावर टाकिले ( ६ ). त्यांनीं अर्जुनाच्या रथावर बसलेल्या प्रखरतेजस्वी वानराला आणि ध्वजाग्रीं बसलेल्या भूतगणांना वध केला ( ७ ). तेव्हां अर्जुनानें रुंद धारेच्या मोठ्या भल्ल बाणानें भीष्माचें छत्र छेदिलें, तें तत्काळ खालीं भुईवर पडलें ( ८ ). नंतर लागलींच अर्जुनानें भीष्माच्या ध्वजावर बाण टाकून त्वरेनें त्याचे अश्व, सारथि व पृष्ठरक्षक

अमृष्यमाणस्तद्भीष्मो जानन्नपि स पाण्डवम् ।
दिव्येनास्त्रेण महता धनंजयमवाकिरत् ॥ १० ॥
तथैव पाण्डवो भीष्मे दिव्यमस्त्रमुदीरयन् ।
प्रत्यगृह्णादमेयात्मा महामेघमिवाऽचलः ॥ ११ ॥
तयोस्तदभवद्युद्धं तुमुलं लोमहर्षणम् ।
भीष्मेण सह पार्थेन बलिवासवयोरिव ॥ १२ ॥
प्रैक्षन्त कुरवः सर्वे योधाश्च सहसैनिकाः ।
भल्लैर्भल्लाः समागम्य भीष्मपाण्डवयोर्युधि ।
अन्तरिक्षे व्यराजन्त खद्योताः प्रावृषीव हि ॥ १३ ॥
अग्निचक्रमिवाऽविद्धं सव्यदक्षिणमस्यतः ।
गाण्डीवमभवद्राजन्पार्थस्य सृजतः शरान् ॥ १४ ॥
ततः सञ्छादयामास भीष्मं शरशतैः शितैः ।
पर्वतं वारिधाराभिश्छादयन्निव तोयदः ॥ १५ ॥
तां स वेलामिवोद्भूतां शरवृष्टिं समुत्थिताम् ।
व्यधमत्सायकैर्भीष्मः पाण्डवं समवारयत् ॥ १६ ॥

बांनाहि बाणांनीं विद्ध केलें ( ९ ). तेव्हां तें सहन न होऊन भीष्मानें, हा पांडव आहे हें जाणत असूनहि, त्यास मोठ्या दिव्य अस्त्रानें झांकून टाकिलें ( १० ). अर्जुनानेंहि मोठ्या मेघाचें स्वागत करणाऱ्या पर्वताप्रमाणें दिव्य अस्त्र सोडून भीष्माचें स्वागत केलें ( ११ ). त्या दोघांमध्यें अंगावर रोमांच उठविणारा भयंकर संग्राम झाला; किंबहुना इंद्राचे व बलीचे दरम्यान जसें युद्ध झालें तसें अर्जुन व भीष्म यांचें युद्ध झालें (१२). तें युद्ध सर्व कौरववीर सैनिकांसह पाहूं लागले. त्या भीष्मार्जुनांच्या झटापटींत भल्ल-बाणांत घुसलेले भल्लबाण, वर्षाकालीं अंतरिक्षांत चमकणाऱ्या काजव्यांप्रमाणें चमकूं लागले ( १३ ). राजा, उजव्या व डाव्या दोन्ही हातांनीं बाण सोडणाऱ्या अर्जुनाचें तें गांडीव धनुष्य फिरत्या अलातचक्राप्रमाणें दिसूं लागलें (१४). नंतर जलधारांनीं पर्वताला छावून सोडणाऱ्या मेघाप्रमाणें अर्जुनाने भीष्माला शेंकडो तीक्ष्ण बाणांनीं आच्छादित केलें ( १५ ). ( परंतु ) उचंबळलेल्या ( समुद्राच्या ) भरतीप्रमाणें, एकाएकीं सुरू झालेल्या त्या शरवृष्टीस, भीष्मानें (आपल्या) बाणांनीं उडवून देऊन अर्जुनाचें निवारण केलें ( १६ ). (तेव्हां)

ततस्तानि निकृत्तानि शरजालानि भागशः ।
समरे च व्यशीर्यन्त फाल्गुनस्य रथं प्रति ॥ १७ ॥
ततः कनकपुङ्खानां शरवृष्टिं समुत्थिताम् ।
पाण्डवस्य रथात्तूर्णं शलभानामिवाऽऽयतिम् ।
व्यधमत्तां पुनस्तस्य भीष्मः शरशतैः शितैः ॥ १८ ॥
ततस्ते कुरवः सर्वे साधु साध्विति चाऽब्रुवन् ।
दुष्करं कृतवान्भीष्मो यदर्जुनमयोधयत् ॥ १९ ॥
बलवांस्तरुणो दक्षः क्षिप्रकारी धनंजयः ।
कोऽन्यः समर्थः पार्थस्य वेगं धारयितुं रणे ॥ २० ॥
ऋते शांतनवाद्भीष्मात्कृष्णाद्वा देवकीसुतात् ।
आचार्यप्रवराद्वाऽपि भारद्वाजान्महाबलात् ॥ २१ ॥
अस्त्रैरस्त्राणि संवार्य क्रीडन्तौ भरतर्षभौ ।
चक्षूंषि सर्वभूतानां मोहयन्तौ महाबलौ ॥ २२ ॥
प्राजापत्यं तथैवैन्द्रमाग्नेयं रौद्रदारुणम् ।
कौबेरं वारुणं चैव याम्यं वायव्यमेव च ।
प्रयुञ्जानौ महात्मानौ समरे तौ विचेरतुः ॥ २३ ॥

भीष्मानें तोडलेलीं तीं शरजालें परत अर्जुनाच्याच रथावर येऊन पडलीं (१७). लगेच अर्जुनाच्या रथावरून टोळधाडीप्रमाणें उसळलेली सुवर्णपुंखांच्या बाणांची वृष्टि भीष्मानें पुनः तीक्ष्णबाणांनीं उडवून लावली ( १८ ). ( तेव्हां ) ते सर्व कौरव, "शाबास ! शाबास ! " म्हणाले, आणि " अर्जुनाशीं भीष्मानें युद्ध चालविलें हें त्यानें दुष्करच कर्म केलें; ( कारण ) अर्जुन बलवान्, तरुण, दक्ष आणि चलाख हाताचा आहे; रणांत पार्थाचा वेग सहन करण्यास (१९–२०), शांतनव भीष्म, देवकीचा पुत्र कृष्ण किंवा आचार्यश्रेष्ठ महाबलिष्ठ भारद्वाज द्रोण, ह्यांशिवाय दुसरा कोण समर्थ आहे ? " असें म्हणाले ( २१ ). अस्त्रांनीं अस्त्रांचें निवारण करीत ते दोघे महाबल भरतश्रेष्ठ रणक्रीडा करीत असतां सर्व प्राण्यांच्या दृष्टीला मोहित करूं लागले ( २२ ). प्राजापत्य, तसेंच ऐंद्र, आग्नेय, दारुण, रौद्र, कौबेर, वारुण, याम्य व वायव्य या अस्त्रांचा प्रयोग करीत ते दोघे महात्मे रणांत संचार करूं लागले (२३).

विस्मितान्यथ भूतानि तौ दृष्ट्वा संयुगे तदा ।
साधु पार्थ महाबाहो साधु भीष्मेति चाऽब्रुवन् ॥ २४ ॥
नाऽयं युक्तो मनुष्येषु योऽयं संदृश्यते महान् ।
महास्त्राणां संप्रयोगः समरे भीष्मपार्थयोः ॥ २५ ॥
वैशम्पायन उवाच— एवं सर्वास्त्रविदुषोरस्त्रयुद्धमवर्त्तत ।
अस्त्रयुद्धे तु निर्वृत्ते शरयुद्धमवर्त्तत ॥ २६ ॥
अथ जिष्णुरुपावृत्य क्षुरधारेण कार्मुकम् ।
चकर्त्त भीष्मस्य तदा जातरूपपरिष्कृतम् ॥ २७ ॥
निमेषान्तरमात्रेण भीष्मोऽन्यत्कार्मुकं रणे ।
समादाय महाबाहुः सज्जं चक्रे महारथः ।
शरांश्च सुबहून्क्रुद्धो मुमोचाऽऽशु धनंजये ॥ २८ ॥
अर्जुनोऽपि शरांस्तीक्ष्णान्भीष्माय निशितान्बहून् ।
चिक्षेप सुमहातेजास्तथा भीष्मश्च पाण्डवे ॥ २९ ॥

त्यांजकडे पाहून विस्मित झालेले सर्व लोक, "महाबाहो अर्जुना, शाबास! भीष्मा, शाबास!" असें बोलून आणखी म्हणाले:— (२४) "भीष्मार्जुनांच्या युद्धांत जो हा महास्त्रांचा प्रयोग होत असलेला दिसतो तो मनुष्यांमध्यें योजिलेला नाहीं" (२५).

**वैशंपायन** म्हणाला:—याप्रमाणें सर्व अस्त्रें जाणणाऱ्या त्या दोघां वीरांमध्यें अस्त्रयुद्ध चाललें व तें झाल्यावर शरयुद्धास सुरुवात झाली (२६). आतां अर्जुनानें भीष्मावर वळून वस्तऱ्याप्रमाणें तिखट धारेच्या एका बाणानें त्याचें सुवर्णभूषित धनुष्य तोडून टाकिलें (२७). (परंतु) डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच महाबाहु भीष्मानें रणांत दुसरें धनुष्य घेऊन तें सज्ज केलें, आणि क्रुद्ध झालेल्या त्या महारथानें धनंजयावर पुष्कळ बाण टाकले (२८)! (उलट) अर्जुनानेंहि शिळेवर घासलेले अनेक तीक्ष्ण बाण भीष्मावर टाकिले; तसेच त्या महातेजस्वी भीष्मानेहि अर्जुनावर सोडिले; (२९).

तयोर्दिव्यास्त्रविदुषोरस्यतोर्निशिताञ्छरान् ।
न विशेषस्तदा राजँल्लक्ष्यते स्म महात्मनोः ॥ ३० ॥
अथाऽऽवृणोद्दश दिशः शरैरतिरथस्तथा ।
किरीटमाली कौन्तेयः शूरः शांतनवस्तथा ॥ ३१ ॥
अतीव पाण्डवो भीष्मं भीष्मश्चाऽतीव पाण्डवम् ।
बभूव तस्मिन्संग्रामे राजँल्लोके तदद्भुतम् ॥ ३२ ॥
पाण्डवेन हताः शूरा भीष्मस्य रथरक्षिणः ।
शेरते स्म तदा राजन्कौन्तेयस्याऽभितो रथम् ॥ ३३ ॥
ततो गाण्डीवनिर्मुक्ता निरमित्रं चिकीर्षवः ।
आगच्छन्पुङ्खसंश्लिष्टाः श्वेतवाहनपत्रिणः ॥ ३४ ॥
निष्पतन्तो रथात्तस्य धौता हैरण्यवाससः ।
आकाशे समदृश्यन्त हंसानामिव पङ्क्तयः ॥ ३५ ॥
तस्य तद्दिव्यमस्त्रं हि विगाढं चित्रमस्यतः ।
प्रेक्षन्ते स्माऽन्तरिक्षस्थाः सर्वे देवाः सवासवाः ॥ ३६ ॥

राजा, याप्रमाणें ते दिव्य अस्त्रें जाणणारे महात्मे, तीक्ष्ण बाण सोडीत असतां, त्या दोघांमध्यें सरसनीरस कोण, हें मुळींच उमगेना ( ३० ). नंतर अतिरथी किरीटमाली अर्जुनानें, त्याचप्रमाणें शूर भीष्मानें, बाणांनीं दाही दिशा भरून टाकिल्या ( ३१ ). राजा, अर्जुनानें भीष्मावर ताण केली, उलट भीष्मानेंहि अर्जुनावर कडी केली—तें एक लोकांत नवलच झालें (३२)! जनमेजया, अर्जुनानें भीष्माचे शूर रथरक्षक मारिले ते अर्जुनाच्या रथाभोंवतीं जमीनीवर निजले ( ३३ ). नंतर श्वेतवाहन अर्जुनाच्य गांडीव धनुष्यापासून पुच्छयुक्त असे शत्रूचा नायनाट करणारे बाण निघाले ( ३४ ). अर्जुनाच्यां रथांतून सुटणारे ते सुवर्णपिच्छ बाण आकाशांत हंसांच्या रांगांप्रमाणें दिसले ( ३५ ). अद्भुत रीतीनें बाण टाकणाऱ्या अर्जुनानें सोडलेलें तें दिव्य मोठें अस्त्रकर्म आकाशांत असलेले इंद्रासह देव पाहत होते ( ३६ ).

१ अस्त्र=बाणक्षेपणें. ( पुढील पानावरील टीप पहा. )

तं दृष्ट्वा परमप्रीतो गन्धर्वश्चित्रमद्भुतम् ।
शशंस देवराजाय चित्रसेनः प्रतापवान् ॥ ३७ ॥
पश्येमान्पार्थनिर्मुक्तान्संसक्तानिव गच्छतः ।
चित्ररूपमिदं जिष्णोर्दिव्यमस्त्रमुदीर्यतः ॥ ३८ ॥
नेदं मनुष्याः सन्दध्युर्नहीदं तेषु विद्यते ।
पौराणानां महास्त्राणां विचित्रोऽयं समागमः ॥ ३९ ॥
आददानस्य हि शरान्सन्धाय च विमुञ्चतः ।
विकर्षतश्च गाण्डीवं नाऽन्तरं समदृश्यत ॥ ४० ॥
मध्यंदिनगतं सूर्यं प्रतपन्तमिवाऽम्बरे ।
नाऽशक्नुवन्त सैन्यानि पाण्डवं प्रति वीक्षितुम् ॥ ४१ ॥
तथैव भीष्मं गाङ्गेयं द्रष्टुं नोत्सहते जनः ॥ ४२ ॥
उभौ विश्रुतकर्माणावुभौ तीव्रपराक्रमौ ।
उभौ सदृशकर्माणावुभौ युधि सुदुर्जयौ ॥ ४३ ॥

( त्या महायोध्यांत चाललेलें ) तें अद्भुत व विचित्र बाणक्षेपण पाहून संतुष्ट झालेला प्रतापवान् चित्रसेन गंधर्व इंद्राजवळ त्याची प्रशंसा करीत म्हणालाः–( ३७ ) 'पार्थानें सोडलेले हे एकमेकांस जणु चिकटून जात असलेले बाण पहा. दिव्यास्त्रप्रयोग करणाऱ्या या जिष्णूचें हें विचित्र प्रक्षेपकर्म[2] होय ( ३८ ). ह्या क्षेपणाचा प्रयोग मनुष्यें करूं शकत नाहींत; कारण हें त्यांना ठाऊक नाहीं. हा पुराणप्रसिद्ध महास्त्रांचा विचित्र समागम येथें झाला आहे ( ३९ ). अर्जुन भात्यांतून बाण घेतो, ते धनुष्याला जोडितो, आणि आपलें गांडीव खेंचून ते सोडतो, ह्या त्याच्या क्रियेमध्यें मुळींच अंतर दिसलें नाहीं ( ४० ). आकाशांत तळपणाऱ्या भर दुपारच्या सूर्याप्रमाणें या अर्जुनाकडे वर डोळा करून पहाण्यासहि सैन्यें समर्थ झालीं नाहींत ( ४१ ). त्याचप्रमाणें गांगेयभीष्माकडेहि पाहण्याचें धाडस कोणी करीना ( ४२ ). दोघेहि प्रख्यात पराक्रमी आहेत, दोघांचा पराक्रम मोठा तीव्र, दोघेहि एकमेकांच्या तोडीचे, व दोघेहि युद्धामध्यें जिंकले जाण्यास कठिण" ( ४३ ).

१ तं च्या ठिकाणी तत् पाहिजे.

२ अस्त्रं अस्त्राणां–बाणानां क्षेपणं कर्म ( नी. ) निराळा अर्थ. शब्दकूट आहे.

इत्युक्तो देवराजस्तु पार्थभीष्मसमागमम् ।
पूजयामास दिव्येन पुष्पवर्षेण भारत ॥ ४४ ॥
ततः शांतनवो भीष्मो वामं पार्श्वमताडयत् ।
पश्यतः प्रतिसंधाय विध्यतः सव्यसाचिनः ॥ ४५ ॥
ततः प्रहस्य बीभत्सुः पृथुधारेण कार्मुकम् ।
चिच्छेद गार्ध्रपत्रेण भीष्मस्याऽऽदित्यतेजसः ॥ ४६ ॥
अथैनं दशभिर्बाणैः प्रत्यविध्यत्स्तनान्तरे ।
यतमानं पराक्रान्तं कुन्तीपुत्रो धनञ्जयः ॥ ४७ ॥
स पीडितो महाबाहुर्गृहीत्वा रथकूबरम् ।
गाङ्गेयो युद्धदुर्धर्षस्तस्थौ दीर्घमिवाऽन्तरम् ॥ ४८ ॥
तं विसंज्ञमपोवाह संयन्ता रथवाजिनाम् ।
उपदेशमनुस्मृत्य रक्षमाणो महारथम् ॥ ४९ ॥ [ २००२ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि भीष्मापयाने चतुःषष्टितमोऽध्यायः ॥ ६४ ॥

राजा, चित्रसेनाचें हें भाषण ऐकून, इंद्रानें पार्थ व भीष्म यांच्या समागमाची, त्यावर दिव्यपुष्पांची वृष्टि करून, प्रशंसा केली ( ४४ ). नंतर सव्यसाची अर्जुन प्रतिसंधान करून वेध करीत असताहि तिकडे लक्ष न देतां भीष्मानें त्याच्या डाव्या बरगडींत प्रहार केला ( ४५ ). तेव्हां अर्जुनानें मोठ्यानें हंसून, रुंद धारेच्या गृध्रपिच्छ बाणानें सूर्यासारख्या तेजस्वी भीष्माचें धनुष्य तोडून टाकिलें ( ४६ ). आणि नंतर त्या धनंजयानें, शत्रूला पराजित करण्याविषयीं प्रयत्न करणाऱ्या भीष्माच्या उरावर, दहा बाण मारून जखम केली ( ४७ ). तेव्हां तो महाबाहु युद्धास न डगमगणारा, गांगेय भीष्म, पीडित झाल्यामुळें रथाच्या दांडीचा आधार घेऊन बराच वेळ स्तब्ध राहिला ( ४८ ). त्यास बेशुद्ध पाहून रथाचे घोडे धरणाऱ्या सारथ्यानें ( रथी मूर्च्छित झाला असतां त्याला रणांतून बाजूला घेऊन जावें–हा ) उपदेश लक्षांत आणून त्या महारथाचें रक्षण व्हावें म्हणून त्यास दूर नेलें ( ४९ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण–उपपर्वांत भीष्माच्या माघार घेण्याविषयीं ६४ वा अध्याय संपला.

## अध्याय ६५

[ अर्जुन व दुर्योधन यांचें युद्ध. ]

वैशम्पायन उवाच —

भीष्मे तु संग्रामशिरो विहाय पलायमाने धृतराष्ट्रपुत्रः ।
उत्सृज्य केतुं विनदन्महात्मा धनुर्विगृह्याऽर्जुनमाससाद ॥ १ ॥
स भीमधन्वानमुदग्रवीर्यं धनंजयं शत्रुगणे चरन्तम् ।
आकर्णपूर्णायतचोदितेन विव्याध भल्लेन ललाटमध्ये ॥ २ ॥
स तेन बाणेन समर्पितेन जाम्बूनदाग्रेण सुसंहितेन ।
रराज राजन्महनीयकर्मा यथैकपर्वा रुचिरैकशृङ्गः ॥ ३ ॥
अथाऽस्य बाणेन विदारितस्य प्रादुर्बभूवाऽसृगजस्रमुष्णम् ।
स तस्य जाम्बूनदपुङ्खचित्रो भित्त्वा ललाटं सुविराजते स्म ॥ ४ ॥
दुर्योधनश्चापि तमुग्रतेजाः पार्थश्च दुर्योधनमेकवीरः ।
अन्योन्यमाजौ पुरुषप्रवीरौ समौ समाजग्मतुराजमीढौ ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणाला:— लढाईची विनी सोडून भीष्मानें पलायन केलें, असें पाहताच महात्मा दुर्योधन धनुष्य घेऊन पताका फडकावीत व मोठमोठ्या आरोळ्या देत अर्जुनावर चालून आला ( १ ). शत्रुगणांत खुशाल संचार करीत असलेल्या त्या भयंकर धनुष्य धारण करणाऱ्या उग्रवीर्य अर्जुनास, त्यानें आकर्ण धनुष्य खेचून सोडलेल्या एका भल्ल बाणानें कपाळाचे मधोमध जखम केली ( २ ). राजा, तो सुवर्णपिच्छाचा अतिशय बळकट बाण कपाळांत रुतून बसला तेव्हां तो महत्कर्मा अर्जुन, कर एकच कळक असलेल्या व सुंदर एकच शिखर असलेल्या ( डोंगराप्रमाणें ) शोभूं लागला (३). बाणानें कपाळ फुटून त्यांतून उष्ण रक्त निघूं लागलें, आणि अर्जुनाच्या कपाळांत रुतून बसलेला तो सुवर्णपिच्छ बाणहि त्यायोगानें फार सुंदर दिसूं लागला ( ४ ). नंतर तो उग्रतेजस्वी दुर्योधन अर्जुनाशीं, आणि ( साऱ्या जगांत ) जो एकच वीर तो अर्जुन दुर्योधनाशीं—याप्रमाणें ते अजमीढ कुलोत्पन्न पुरुषप्रवीर

१ एकः पर्वा यस्मिन् ( नी. )

ततः प्रभिन्नेन महागजेन महीधराभेन पुनर्विकर्णः ।
रथैश्चतुर्भिर्गजपादरक्षैः कुन्तीसुतं जिष्णुमथाऽभ्यधावत् ॥ ६ ॥
तमापतन्तं त्वरितं गजेंद्रं धनंजयः कुम्भविभागमध्ये ।
आकर्णपूर्णेन महायसेन बाणेन विव्याध महाजवेन ॥ ७ ॥
पार्थेन सृष्टः स तु गार्ध्रपत्र आपुङ्खदेशात्प्रविवेश नागम् ।
विदार्य शैलप्रवरं प्रकाशं यथाऽशनिः पर्वतमिन्द्रसृष्टः ॥ ८ ॥
शरप्रतप्तः स तु नागराजः प्रवेपिताङ्गो व्यथितान्तरात्मा ।
संसीदमानो निपपात मह्यां वज्राहतं शृंगमिवाऽचलस्य ॥ ९ ॥
निपातिते दन्तिवरे पृथिव्यां त्रासाद्विकर्णः सहसाऽवतीर्य ।
तूर्णं पदान्यष्टशतानि गत्वा विविंशतेः स्यन्दनमारुरोह ॥ १० ॥
निहत्य नागं तु शरेण तेन वज्रोपमेनाऽद्रिवराम्बुदाभम् ।
तथाविधेनैव शरेण पार्थो दुर्योधनं वक्षसि निर्बिभेद ॥ ११ ॥

एकमेकाशीं भिडले ( ५ ). मग पर्वतासारख्या धिप्पाड मस्त हत्तीवर बसलेला विकर्णहि, हत्तीच्या पावलाचें रक्षण करणाऱ्या चार रथांसह, अर्जुनावर धावून आला ( ६ ). अतिशय वेगानें येऊन पडणाऱ्या त्या हत्तीला अर्जुनानें पुरापूर धनुष्य खेचून एका महावेगवान् मोठ्या लोखंडी फाळाच्या बाणानें गंडस्थळाच्या बरोबर मध्यावर प्रहार केला; तेव्हां उजाड ( वृक्षहीन ) पर्वत फोडून टाकणाऱ्या, इंद्रानें सोडलेल्या वज्राप्रमाणें तो अर्जुनानें सोडलेला गृध्रपिच्छ बाण हत्तीचें गंडस्थळ फोडून पिसासह आंत घुसला ( ७–८ ). तेव्हां जबर घावानें जखमी झालेला तो गजराज, अन्तरात्म्यांत व्यथा झाल्यामुळें थरथर कांपत गलितधैर्य होऊन, वज्राच्या तडाक्यानें पडणाऱ्या पर्वतशिखराप्रमाणें, जमिनीवर कोसळला ( ९ ). हत्ती जमिनीवर पडला तेव्हां, विकर्ण भिऊन जाऊन घाईघाईनें खालीं उतरला; आणि आठशें पावलें धांवत जाऊन विविंशतीच्या रथावर चढला ( १० ). त्या पर्वतासमान व मेघासमान हत्तीचा वज्रप्राय बाणानें वध केल्यानंतर अर्जुनानें तशाच एका बाणानें दुर्योधनासहि छातींत जखम केली (११).

ततो गजे राजनि चैव भिन्ने भग्ने विकर्णे च सपादरक्षे ।
गाण्डीमुक्तैर्विशिखैः प्रणुन्नास्ते योधमुख्याःसहसाऽपजग्मुः ॥ १२ ॥
दृष्ट्वैव पार्थेन हतं च नागं योधांश्च सर्वान्द्रवतो निशम्य ।
रथं समावृत्य कुरुप्रवीरो रणात्प्रदुद्राव यतो न पार्थः ॥ १३ ॥
तं भीमरूपं त्वरितं द्रवन्तं दुर्योधनं शत्रुसहोऽभिषङ्गात् ।
आस्फोटयद्योद्धुमनाः किरीटी बाणेन विद्धं रुधिरं वमन्तम् ॥ १४॥

अर्जुन उवाच—

विहाय कीर्तिं विपुलं यशश्च युद्धात्परावृत्य पलायसे किम् ।
न तेऽद्य तूर्याणि समाहतानि तथैव राज्यादवरोपितस्य ॥ १५ ॥
युधिष्ठिरस्याऽस्मि निदेशकारी पार्थस्तृतीयो युधि संस्थितोऽस्मि ।
तदर्थमावृत्य मुखं प्रयच्छ नरेन्द्र वृत्तं स्मर धार्त्तराष्ट्र ॥ १६ ॥

याप्रमाणें हत्ती ठार झाला, राजाच्या छातींत जखम झाली, आणि पादरक्षकांसह विकर्णाचाहि मोड झाला, असें पाहून गाण्डीवापासून सोडलेल्या बाणांनीं पीडित झालेल्या त्या प्रमुख प्रमुख वीरांनींहि रणांतून एकदम पळ काढला (१२). अर्जुनानें हत्ती मारला, आणि सर्व योद्धे पळत सुटले आहेत, असें पाहतांच कुरुमुख्य वीर आपला रथ फिरवून, अर्जुन नाहीं अशा मार्गानें रणभूमींतून पळूं लागला (१३). तो पराजित झालेला उग्ररूप दुर्योधन, बाणानें जखमी झाल्यामुळें रक्ताच्या गुळण्या टाकीत त्वरित पळ काढीत असलेला पाहून अर्जुनानें युद्धाच्या इच्छेनें दंड ठोकले[1] ( आणि म्हटलें )(१४).

अर्जुन म्हणाला:—"कीर्ति व विपुल यश यांची पर्वा न बाळगितां तूं रणांतून तोंड फिरवून पळ काढीत आहेस, हें काय? तुझीं जयवाद्यें कोठें वाजत नाहींत तीं?-राज्यभ्रष्ट केलेल्या युधिष्ठिरानें सांगितलेलें काम बजाविणारा, मी पृथेचा तिसरा पुत्र रणांत दंड ठोकून उभा आहें, तेव्हां नरेंद्रा, एकदां इकडे वळून मला तोंड तर दाखीव? अरे, धृतराष्ट्राच्या पुत्रा, आपल्या ( द्यूतादि ) पूर्व कृत्यांचें स्मरण कर ( १५–१६ ).

1 आस्फोटयत्-बाहुशब्दं कृतवान् ( नी. ).

**मोघं तवेदं भुवि नामधेयं दुर्योधनेतीह कृतं पुरस्तात् ।**
**नहीह दुर्योधनता तवाऽस्ति पलायमानस्य रणं विहाय ॥ १७ ॥**
**न ते पुरस्तादथ पृष्ठतो वा पश्यामि दुर्योधन रक्षितारम् ।**
**अपेहि युद्धात्पुरुषप्रवीर प्राणान्प्रियान्पाण्डवतोऽद्य रक्ष ॥ १८ ॥**

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोग्रहणपर्वणि उत्तरगोग्रहे दुर्योधनापयाने पञ्चषष्टितमोऽध्यायः ॥ ६५ ॥ २०२०**

पूर्वी तुझें ठेवलेलें नांव दुर्योधन (आज) या जगतांत फुकट गेलें ! कारण, युद्ध टाकून पळ काढणाऱ्या तुझ्या ठिकाणी दुर्योधनता तर कोठेंच दिसत नाहीं ! (१७). दुर्योधना, तुझें रक्षण करील असा कोणी तुझ्यापुढें किंवा तुझ्यामागें मला दिसत नाहीं. पुरुषप्रवीरा, ( तेव्हां ) या युद्धांतून अंग काढून जा. अर्जुनापासून आपल्या प्रिय प्राणांचें रक्षण कर ( १८ ). ”

• याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत दुर्योधनाच्या पलायनाविषयीं ६५ वा अध्याय संपला.

—:०:—

## अध्याय ६६

[ अर्जुनाचें सर्व कौरवांशीं युद्ध. ]



**वैशंपायन उवाच—**

**आहूयमानश्च स तेन संख्ये महात्मना वै धृतराष्ट्रपुत्रः ।**
**निवर्तितस्तस्य गिराङ्कुशेन महागजो मत्त इवाऽङ्कुशेन ॥ १ ॥**
**सोऽमृष्यमाणो वचसाऽभिमृष्टो महारथेनाऽतिरथस्तरस्वी ।**
**पर्याववर्ताऽथ रथेन वीरो भोगी यथा पादतलाभिमृष्टः ॥ २ ॥**

**वैशंपायन** म्हणाले:—महात्म्या अर्जुनानें दुर्योधनाची निर्भर्त्सना करून त्यास युद्धाकरितां आव्हान केलें, तेव्हां मदोन्मत्त हत्ती अंकुशानें जसा मागें वळतो, तसा तो अर्जुनाच्या वाक्प्रहारानें मागें वळला ( १ ). आणि पादतलानें ताडन केलेला सर्प प्रक्षुब्ध होऊन वेगानें धांवून येतो, त्याप्रमाणें महारथ अर्जुनाच्या भाषणानें क्रुद्ध झालेला तो अतिरथ दुर्योधन आपल्या रथांतून मोठ्या

तं प्रेक्ष्य कर्णः परिवर्त्तमानं निवर्त्य संस्तभ्य च विद्धगात्रम् ।
दुर्योधनस्योत्तरतोऽभ्यगाच्छत्पार्थं नृवीरो युधि हेममाली ॥ ३ ॥
भीष्मस्ततः शांतनवो विवृत्य हिरण्यकक्षस्त्वरयाऽभिषङ्गी ।
दुर्योधनं पश्चिमतोऽभ्यरक्षत्पार्थान्महाबाहुरधिज्यधन्वा ॥ ४ ॥
द्रोणः कृपश्चैव विविंशतिश्च दुःशासनश्चैव विवृत्य शीघ्रम् ।
सर्वे पुरस्ताद्वितितोरुचापा दुर्योधनार्थं त्वरिताऽभ्युपेयुः ॥ ५ ॥
स तान्यनीकानि निवर्त्तमानान्यालोक्य पूर्णौघनिभानि पार्थः ।
[1]हंसो यथा मेघमिवाऽऽपतन्तं धनंजयः प्रत्यपतत्तरस्वी ॥ ६ ॥
ते सर्वतः संपरिवार्य पार्थमस्त्राणि दिव्यानि समाददानाः ।
ववर्षुरभ्येत्य शरैः समंतान्मेघा यथा भूधरमम्बुवेगैः ॥ ७ ॥
ततोऽस्त्रमस्त्रेण निवार्य तेषां गाण्डीवधन्वा कुरुपुंगवानाम् ।
संमोहनं शत्रुसहोऽन्यदस्त्रं प्रादुश्चकारैन्द्रिरपारणीयम् ॥ ८ ॥

वेगानें धांवून आला ( २ ). दुर्योधन माघारा फिरला असें पाहून कर्णहि मागें फिरला, व कांहीं वेळ स्तब्ध राहून दुर्योधनाच्या डावीकडून त्याच्या मदतीकरितां अर्जुनावर घसरला ( ३ ). नंतर अश्वांवर सुवर्णाचीं खोगिरें असलेला भीष्म मागें परतला, व त्या शत्रुपराजयास समर्थ महाबाहुवीरानें धनुष्यास प्रत्यंचा चढवून, दुर्योधनाचें पाठीमागून रक्षण केलें ( ४ ). नंतर द्रोण, कृप, विविंशति व दुःशासन, हेहि तत्काळ मागें फिरले, व ते सर्व आपापलीं प्रचंड धनुष्यें ताणून दुर्योधनाच्या पुढें बिनीवर उभे राहिले ( ५ ). तुडुंब भरून चाललेल्या पाण्याच्या लोंढ्यासारखीं तीं सर्व सैन्यें परत वळलेलीं पाहून एकट्या अर्जुनानें, सूर्य जसा आपणावर चालून येणाऱ्या मेघपटलाला एकटा संतप्त करून सोडतो, तसें त्या सर्व सैन्यांना वेगानें संतप्त केलें ( ६ ). ते सर्व कौरववीर दिव्य अस्त्रांनीं चहूंकडून अर्जुनावर तुटून पडले, आणि मेघ जसे पर्वतावर जलधारांची वृष्टि करितात, तशी त्या योद्ध्यांनीं अर्जुनावर शरधारांची वृष्टि केली ( ७ ). तेव्हां गांडीवधारी कुरुकुलश्रेष्ठ इंद्रपुत्र अर्जुनानें त्यांच्या अस्त्रांचा अस्त्रांनींच नाश करून, शेवटीं संमोहन–नामक

१ हंसः=सूर्यः ( नी. )

ततो दिशश्चाऽनुदिशो विवृत्य शरैः सुधारैर्निशितैः सुपत्रैः ।
गाण्डीवघोषेण मनांसि तेषां महाबलः प्रव्यथयांचकार ॥ ९ ॥
ततः पुनर्भीमरवं प्रगृह्य दोर्भ्यां महाशङ्खमुदारघोषम् ।
व्यनादयत्स प्रदिशो दिशः खं भुवं च पार्थो द्विषतां निहन्ता॥ १०॥
ते शङ्खनादेन कुरुप्रवीराः संमोहिताः पार्थसमीरितेन ।
उत्सृज्य चापानि दुरासदानि सर्वे तदा शान्तिपरा बभूवुः ॥ ११ ॥
तथा विसंज्ञेषु च तेषु पार्थः स्मृत्वा च वाक्यानि तथोत्तरायाः ।
निर्याहि मध्यादिति मत्स्यपुत्रमुवाच यावत्कुरवो विसंज्ञाः ॥ १२ ॥
आचार्यशारद्वतयोः सुशुक्के कर्णस्य पीतं रुचिरं च वस्त्रम् ।
द्रौणेश्च राज्ञश्च तथैव नीले वस्त्रे समादत्स्व नरप्रवीर ॥ १३ ॥
भीष्मस्य संज्ञा तु तथैव मन्ये जानाति सोऽस्त्रप्रतिघातमेषः ।
एतस्य वाहान्कुरु सव्यतस्त्वमेवं हि यातव्यममूढसंज्ञैः ॥ १४ ॥

अनिवार्य अस्त्राचा प्रयोग केला ( ८ ). आणि आपले पाजवलेले सुपुंख बाण सर्व दिशांच्या व उपदिशांच्या ठिकाणीं भरूनें महाबल अर्जुनानें गांडीवाच्या टणत्कारानें शत्रूंचीं मनें व्यथित करून टाकिलीं ( ९ ). मग प्रचंड व मोठ्या आवाजाचा शंख दोन्ही हातांत घेऊन त्यानें वाजविला, तेव्हां त्याचा तो गंभीर ध्वनि दशदिशांत भरून पृथ्वी व आकाशही दणाणून गेलें ( १० ). त्या शंखाच्या नादानें कौरववीरांची अशी गाळण उडाली कीं, ते आपल्या हातांतलीं प्रचंड धनुष्यें टाकून उपरतिपूर्ण झाले ( ११ ). ह्याप्रमाणें कौरवाची अवस्था पाहतांच, अर्जुनास उत्तरेच्या शब्दांची आठवण झाली; व तो उत्तरास म्हणाला, “ शत्रुसैन्यांत जा, व कौरव मूर्छित पडले आहेत, तितक्यांत द्रोणाचार्य व कृपाचार्य ह्यांचीं तीं पांढरीं शुभ्र वस्त्रें, तसेंच कर्णाचें सुंदर पिवळें वस्त्र आणि अश्वत्थामा व दुर्योधन ह्यांचीं निळीं वस्त्रें सैन्यातून घेऊन ये ( १२-१३ ). ” भीष्ममात्र पूर्ववत् शुद्धीवर आहे असें मला वाटतें; कारण ह्या अस्त्राचा प्रतिकार कसा करावा, हें त्यास माहीत आहे; यासाठीं भीष्माचे अश्वांना डावी घालून तूं त्याच्या समोरून जा; कारण शुद्धींत असलेल्यांच्या समोर असें जावें” (१४). (अर्जुनाच्या सूचने-

१ विवृत्य-व्याप्य ( नी. ) हा अर्थ ओढून ताणून केलेला दिसतो.

रश्मीन्समुत्सृज्य ततो महात्मा रथादवप्लुत्य विराटपुत्रः ।
वस्त्राण्युपादाय महारथानां तूर्णं पुनः स्वं रथमारुरोह ॥ १५ ॥
ततोऽन्वशासच्चतुरः सदश्वान्पुत्रो विराटस्य हिरण्यकक्षान् ।
ते तद्व्यतीयुर्ध्वजिनामनीकं श्वेता वहन्तोऽर्जुनमाजिमध्यात् ॥ १६ ॥
तथाऽनुयान्तं पुरुषप्रवीरं भीष्मः शरैरभ्यहनत्तरस्वी ।
स चापि भीष्मस्य हयान्निहत्य विव्याध पार्थो दशभिः पृषत्कैः ॥ १७ ॥
ततोऽर्जुनो भीष्ममपास्य युद्धे विद्ध्वाऽस्य यन्तारमरिष्टधन्वा ।
तस्थौ विमुक्तो रथवृन्दमध्यान्मेघं विदार्येव सहस्ररश्मिः ॥ १८ ॥
लब्ध्वा हि संज्ञां तु कुरुप्रवीराः पार्थं निरीक्ष्याऽथ सुरेन्द्रकल्पम् ।
रणे विमुक्तं स्थितमेकमाजौ स धार्तराष्ट्रस्त्वरितं बभाषे ॥ १९ ॥
अयं कथं वै भवतो विमुक्तस्तथा प्रमथ्नीत यथा न मुच्येत् ।
तमब्रवीच्छान्तनवः प्रहस्य क्व ते गता बुद्धिरभूत्क्व वीर्यम् ॥ २० ॥

प्रमाणें) तो महात्मा उत्तर घोड्यांचे लगाम ठेवून रथांतून खालीं उतरला आणि द्रोणादि महात्म्यांचीं वस्त्रें हरण करून पुनः रथावर येऊन बसला (१५). नंतर त्यानें सुवर्णालंकारांनीं शृंगारलेल्या आपल्या चारही उत्कृष्ट घोड्यांना चालण्याविषयीं इषारा करतांच ते पांढरे घोडे कौरवांच्या ध्वजयुक्त सैन्यास ओलांडून अर्जुनाचा रथ रणभूमींतून घेऊन गेले (१६). ह्याप्रमाणें तो नरवीर अर्जुन निघून चालला असतां, भीष्मानें लागलींच मोठ्या आवेशानें त्याजवर बाण टाकिले; परंतु अर्जुनानें भीष्माच्या घोड्यांवर उलट बाण सोडून ते मारले, व दहा बाणांनीं भीष्मालाहि विद्ध केलें (१७). भीष्माचें निवारण केल्यावर गांडीवाच्या सहाय्यानें भीष्माच्या सारथ्यालाहि विद्ध केलें. नंतर, मेघ-समुदायाचें विदारण करून बाहेर पडणाऱ्या सूर्याप्रमाणें, रथसमुदायाचें विदारण करून बाहेर पडलेला तो पार्थ उभा राहिला (१८). पुढें शुद्धीवर आल्यावर, तो सुरेंद्रतुल्य अर्जुन एकटा युद्धास उभा आहे, असें शत्रूंच्या कचाट्यांतून मुक्त झालेल्या दुर्योधनानें पाहिलें व तो लगबगीनें कौरववीरांस म्हणाला (१९), "वीरांनो, हा कसा असा सोडलात? हा सुटणार नाहीं असा याचा समाचार घ्या." तेव्हां, भीष्म हंसून त्यास म्हणाला, "तुझें वीर्य व तुझी

१ येथें 'कुरुप्रवीरान्' असें पाहिजे.

शान्तिं परां प्राप्य यदास्थितोऽभूरुत्सृज्य बाणांश्च धनुर्विचित्रम् ।
न त्वेष बीभत्सुरलं नृशंसं कर्तुं न पापेऽस्य मनो विशिष्टम् ॥२१॥
त्रैलोक्यहेतोर्न जहेत्स्वधर्मं सर्वे न तस्मान्निहता रणेऽस्मिन् ।
क्षिप्रं कुरून्याहि कुरुप्रवीर विजित्य गाश्च प्रतियातु पार्थः ।
मा ते स्वकोऽर्थो निपतेत मोहात्तत्संविधातव्यमरिष्टबन्धम् ॥२२॥

**वैशम्पायन उवाच—**

दुर्योधनस्तस्य तु तन्निशम्य पितामहस्यात्महितं वचोऽथ ।
अतीतकामो युधि सोऽत्यमर्षी राजा विनिःश्वस्य बभूव तूष्णीम् ॥२३॥
तद्भीष्मवाक्यं हितमीक्ष्य सर्वे धनंजयाग्निं च विवर्धमानम् ।
निवर्त्तनायैव मनो निदध्युर्दुर्योधनं ते परिरक्षमाणाः ॥२४॥
तान्प्रस्थितान्प्रीतमनाः स पार्थो धनंजयः प्रेक्ष्य कुरुप्रवीरान् ।
अभाषमाणोऽनुनयं मुहूर्तं वचोऽब्रवीत्सम्परिवृत्य भूयः ॥२५॥

द्धि कोठें गेली होती? (२०) तूं आपलें विचित्र धनुष्य व बाण टाकून देऊन पराकाष्ठेची शांति धरून बसला होतास. पण अर्जुन घातुक कर्म करण्यास समर्थ नाहीं. ह्याचें मन पापकर्म करण्यास केव्हांहि उद्युक्त होत नाहीं (२१). त्रैलोक्याच्या प्राप्तीकरतां देखील हा स्वधर्म टाकणार नाहीं; आणि म्हणूनच हे सर्व वीर त्यानें मारले नाहींत. आतां लवकर कुरुदेशाची वाट धर आणि अर्जुनाला गाई जिंकून परत जाऊं दे. वेडेपणानें स्वतःचा अर्थ बिघडूं नये. परिणामावर दृष्टि देऊन जें कल्याणकारक कर्म असेल तें ह्या वेळीं करावें (२२)."

**वैशंपायन** म्हणाला:—आजोबाचें तें हितकर भाषण ऐकून दुर्योधनानें अर्जुनास जिंकण्याची इच्छा सोडिली, व संताप कमी करून सुस्कारे टाकीत तो अत्यंत असहिष्णु दुर्योधन गप्प राहिला (२३). दुर्योधनाचें रक्षण करणाऱ्या त्या सर्व कौरववीरांनीं, भीष्माचें म्हणणें श्रेयस्कर मानून, व अर्जुन अग्नीप्रमाणें भडकत चाललेला पाहून, रणभूमींतून परत जाण्याचा विचार केला. परत चाललेल्या त्या कुरुवीरांकडे प्रसन्न मुद्रेनें पाहात थोडावेळ न बोलतां, अनुनय वाक्यविन्यास अर्जुनानें त्यांजकडे पुन्हा वळून म्हटलें (२४-२५).

पितामहं शान्तनवं च वृद्धं द्रोणं गुरुं च प्रणिपत्य मूर्ध्ना ।
द्रौणिं कृपं चैव कुरूंश्च मान्याञ्छरैर्विचित्रैरभिवाद्य चैव ॥ २६ ॥
दुर्योधनस्योत्तमरत्नचित्रं चिच्छेद पार्थो मुकुटं शरेण ।
आमन्त्र्य वीरांश्च तथैव मान्यान्गाण्डीवघोषेण विनाद्य लोकान् ॥ २७ ॥
स देवदत्तं सहसा विनाद्य विदार्य वीरो द्विषतां मनांसि ।
ध्वजेन सर्वानभिभूय शत्रून्स हेममालेन विराजमानः ॥ २८ ॥
दृष्ट्वा प्रयातांस्तु कुरून्किरीटी हृष्टोऽब्रवीत्तत्र स मत्स्यपुत्रम् ।
आवर्तयाऽश्वान्पशवो जितास्ते याताः परे याहि पुरं प्रहृष्टः ॥ २९ ॥
देवास्तु दृष्ट्वा महदद्भुतं तद्युद्धं कुरूणां सह फाल्गुनेन ।
जग्मुर्यथास्वं भवनं प्रतीताः पार्थस्य कर्माणि विचिन्तयन्तः ॥ ३० ॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे समस्तकौरवपलायने षट्षष्टितमोऽध्यायः॥ ६६ ॥

त्यानें प्रथम वृद्ध पितामह भीष्म, व द्रोण गुरु ह्यांस मस्तकानें वंदन केलें; आणि नंतर अश्वत्थामा, कृपाचार्य व मोठमोठे सन्मान्य कौरववीर, ह्यांस चित्रविचित्र बाणांनीं अभिवंदन केलें (२६). नंतर त्यानें बाणानें दुर्योधनाचा रत्नखचित मुकुट विद्ध केला. याप्रमाणें मान्य वीरांची अनुज्ञा घेऊन, त्यानें गांडीव धनुष्याच्या घोषानें त्रैलोक्य दणाणून टाकिलें; व एकाएकीं देवदत्त वाजवून शत्रूंचीं अंतःकरणें विदीर्ण करून सोडलीं. याप्रमाणें सर्व शत्रूंचा पूर्ण पराभव करून सुवर्णमालेनें युक्त असलेल्या ध्वजासह तो अर्जुन आपल्या तेजानें झळकूं लागला (२७-२८). नंतर कौरव निघून चालले असें पाहून प्रसन्नपणें अर्जुन उत्तरास म्हणाला, "आतां घोड्यांस परत फिरव; तुझ्या गाई जिंकिल्या; शत्रू निघून गेले; आतां मोठ्या आनंदानें नगरास चल" ( २९ ). तें त्या कौरवांचें व अर्जुनाचें मोठें अद्भुत युद्ध पाहून देवहि आनंदित होऊन अर्जुनाच्या पराक्रमाची प्रशंसा करीत आपापल्या भवनांस निघून गेले ( ३० ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत सर्व कौरवांच्या पलायनाविषयीं ६६ वा अध्याय संपला.

# अध्याय ६७

[ शरण आलेल्या सैनिकांस अर्जुनाचें अभयवचन. ]

वैशम्पायन उवाच—ततो विजित्य संग्रामे कुरून्स वृषभेक्षणः[1] ।
समानयामास तदा विराटस्य धनं महत् ॥ १ ॥
गतेषु च प्रभग्नेषु धार्त्तराष्ट्रेषु सर्वतः ।
वनान्निष्क्रम्य गहनाद्बहवः कुरुसैनिकाः ॥ २ ॥
भयात्सन्त्रस्तमनसः समाजग्मुस्ततस्ततः ।
मुक्तकेशास्त्वदृश्यन्त स्थिताः प्राञ्जलयस्तदा ॥ ३ ॥
क्षुत्पिपासापरिश्रान्ता विदेशस्था विचेतसः ।
ऊचुः प्रणम्य संभ्रान्ताः पार्थ किं करवाम ते ॥ ४ ॥
अर्जुन उवाच—स्वस्ति व्रजत वो भद्रं न भेतव्यं कथञ्चन ।
नाऽहमार्ताञ्जिघांसामि भृशमाश्वासयामि वः ॥ ५ ॥

**वैशंपायन** म्हणालाः—वृषभेक्षण अर्जुनानें कौरवांना जिंकून विराट-राजाचें मोठें (गो) धन परत आणिलें (१). कौरवांची दाणादाण होऊन धृतराष्ट्राचे पुत्र परत हस्तिनापुरास गेल्यावर, कौरवांचे अनेक सैनिक चोहोंकडे वनांत पळून गेले होते, ते गहन वनांतून बाहेर आले (२). आणि भीतीनें गांगरून जाऊन अर्जुनापुढें निरनिराळ्या ठिकाणांतून जमा झाले. त्यांचे केस मोकळे सुटले असून, ते क्षुधेनें व तृषेनें अगदीं व्याकुळ झालेले असे हात जोडून उभे राहिले. परदेशांत असल्यामुळें त्यांची चित्त-वृत्ति अगदीं दीन झाली होती. नंतर त्यांनीं अर्जुनास प्रणाम करून म्हटलें, "पार्था, आम्हीं तुझ्याकरितां काय करावें ?" (३–४).

**अर्जुन** म्हणालाः—"तुमचें कल्याण असो; तुम्ही खुशाल परत जा; अगदीं भिऊं नका. मी आर्त झालेल्यांचा वध करूं इच्छित नाहीं. मी तुम्हांला पूर्ण आश्वासन देतों" (५).

---

१ वृषभेक्षणः श्रेष्ठदृष्टिः (नी.) यापेक्षां सरळ अर्थ बरा दिसतो.

वैशम्पायन उवाच—

तस्य तामभयां वाचं श्रुत्वा योधाः समागताः
आयुःकीर्तियशोदाभिस्तमाशीर्भिरनन्दयन् ॥ ६ ॥
ततोऽर्जुनं नागमिव प्रभिन्नमुत्सृज्य शत्रून्विनिवर्तमानम् ।
विराटराष्ट्राभिमुखं प्रयान्तं नाशक्नुवंस्तं कुरवोऽभियातुम् ॥ ७ ॥
ततः स तन्मेघमिवाऽऽपतन्तं[1] विद्राव्य पार्थः कुरुमेघसैन्यम् ।
मत्स्यस्य पुत्रं द्विषतां निहन्ता वचोऽब्रवीत्संपरिरभ्य भूयः ॥ ८ ॥
पितुः सकाशे तव तात सर्वे वसन्ति पार्था विदितं तवैव ।
तान्मा प्रशंसेर्नगरं प्रविश्य भीतः प्रणश्येद्धि स मत्स्यराजः ॥ ९ ॥
मया जिता सा ध्वजिनी कुरूणां मया च गावो विजिता द्विषद्भ्यः ।
पितुः सकाशं नगरं प्रविश्य त्वमात्मनः कर्म कृतं ब्रवीहि ॥ १० ॥

**वैशंपायन** म्हणाला:—अर्जुनाचें तें अभय वाक्य ऐकून सर्व योद्धे एकत्र झाले; व त्यांनीं त्यास, "तुझें आयुष्य, यश व कीर्ति हीं वृद्धिंगत होवोत," असे आशीर्वाद दिले ( ६ ). याप्रमाणें शत्रूंस सोडून देऊन पुढें अर्जुन विराटनगराकडे जाण्यास निघाला असतां, जणूं काय तो मदोन्मत्त गजच निर्धास्तपणें चालला आहे, असें त्या कौरव सैनिकांस वाटून त्याच्या समीप जाण्याची त्यांस छाती झाली नाहीं ( ७ ). मेघपटलाप्रमाणें चाल करून आलेल्या त्या कौरव-सैन्याचें निर्दालन करून टाकिल्यानंतर, अर्जुनानें उत्तरास घट्ट कवटाळून म्हटलें:—(८) "तुझ्या पित्याजवळ सर्व पांडव वास करीत आहेत ही गोष्ट तुला आतां माहीत झाली आहे; ( पण ) तूं नगरांत गेल्यावर ह्या गोष्टीचा बभ्रा करूं नको. तुझ्या बापाला ही गोष्ट समजल्यास तो अगदीं भयभीत होईल ( ९ ). कौरवांचें तें अफाट सैन्य मीं जिंकिलें, शत्रूपासून गाईहि मीं सोडविल्या, सारांश, येथें जें कांहीं घडलें तें सर्व तुझेंच कृत्य, असें नगरांत गेल्यावर तूं बापाला सांग (१०).

---

१ पुंस्त्वमार्धम् (नी.)

उत्तर उवाच—
यत्ते कृतं कर्म न पारणीयं तत्कर्म कर्त्तुं मम नास्ति शक्तिः ।
न त्वां प्रवक्ष्यामि पितुः सकाशे यावन्न मां वक्ष्यसि सव्यसाचिन् ॥ ११ ॥
वैशम्पायन उवाच—
स शत्रुसेनामवजित्य जिष्णुराच्छिद्य सर्वं च धनं कुरुभ्यः ।
श्मशानमागत्य पुनः शमीं तामभ्येत्य तस्थौ शरविक्षताङ्गः ॥ १२ ॥
ततः स वह्निप्रतिमो महाकपिः सहैव भूतैर्दिवमुत्पपात ।
तथैव माया विहिता बभूव ध्वजं च सैंहं युयुजे रथे पुनः ॥ १३ ॥
विधाय तच्चाऽऽयुधमाजिवर्धनं कुरूत्तमानामिषुधीः शरांस्तथा ।
प्रायात्स मत्स्यो नगरं प्रहृष्टः किरीटिना सारथिना महात्मना ॥ १४ ॥
पार्थस्तु कृत्वा परमार्यकर्म निहत्य शत्रून्द्विषतां निहन्ता ।
चकार वेणीं च तथैव भूयो जग्राह रश्मीन्पुनरुत्तरस्य ॥
विवेश हृष्टो नगरं महामना बृहन्नलारूपमुपेत्य सारथिः ॥ १५ ॥

उत्तर म्हणालाः—" तूं (आज) जें कृत्य केलेंस, तें दुसऱ्या कोणाच्याही हातून होण्यासारखें नाहीं. मला तर तें करण्याची मुळींच शक्ति नाहीं. तथापि जोंपर्यंत तुझी आज्ञा होणार नाहीं, तोंपर्यंत पित्याजवळ मी तुझी परिस्फुटता करणार नाहीं "( ११ ).

वैशंपायन म्हणालाः— कौरवसैन्याचा पराभव करून त्यांजपासून सर्व गोधन हिसकावून घेतल्यावर, बाणादिकांनीं क्षत झालेला तो विजशाली अर्जुन स्मशानानजीक येऊन पुनः शमीवृक्षाजवळ उभा राहिला ( १२ ). तेव्हां तो अग्नितुल्य महाकपि भूतगणांसह अंतरिक्षांत उड्डाण करून निघून गेला, त्याचप्रमाणें सर्व मायाहि नष्ट झाली, व पुनः उत्तराच्या रथावर ( तेंथें ठेविलेला) सिंहध्वज झळकूं लागला ( १३ ). नंतर उत्तरानें युद्धांत यशोवर्धन करणारें तें गांडीव धनुष्य, भाते व बाण, त्या शमीवृक्षावर जेथल्या तेथें ठेविले, व पुनः त्या महापराक्रमी अर्जुनानें सारथ्य स्वीकारल्यावर तो मोठ्या उल्हासानें आपल्या नगरास निघाला ( १४ ). मात्र उत्कृष्ट आर्य कर्म करून व शत्रूंस ठार मारून शत्रुसंहारक अर्जुनानें आपल्या केसांची पुनः तशीच वेणी बांधिली; आणि ( पूर्वीचें ) बृहन्नलारूप घेऊन त्या महात्म्यानें सारथि बनून घोड्यांचे लगाम पुनः हातांत घेतले, व तो आनंदित झालेला महामना अर्जुन नगरांत गेला (१५).

वैशम्पायन उवाच— ततो निवृत्ताः कुरवः प्रभग्ना वशमास्थिताः ।
हस्तिनापुरमुद्दिश्य सर्वे दीना ययुस्तदा ॥ १६ ॥
पन्थानमुपसंगम्य फाल्गुनो वाक्यमब्रवीत् ॥ १७ ॥
राजपुत्र प्रत्यवेक्ष समानीतानि सर्वशः ।
गोकुलानि महाबाहो वीर गोपालकैः सह ॥ १८ ॥
ततोऽपराह्णे यास्यामो विराटनगरं प्रति ।
आश्वास्य पाययित्वा च परिप्लाव्य च वाजिनः ॥ १९ ॥
गच्छन्तु त्वरिताश्चेमे गोपालाः प्रेषितास्त्वया ।
नगरे प्रियमाख्यातुं घोषयन्तु च ते जयम् ॥ २० ॥

वैशंपायन उवाच—
अथोत्तरस्त्वरमाणः स दूतानाज्ञापयद्वचनात्फाल्गुनस्य ।
आचक्षध्वं विजयं पार्थिवस्य भग्नाः परे विजिताश्चापि गावः ॥२१॥
इत्येवं तौ भारतमत्स्यवीरौ संमन्त्र्य संगम्य ततः शमीं ताम् ।
अभ्येत्य भूयो विजयेन तृप्तावुत्सृष्टमारोपयतां स्वभाण्डम् ॥ २२ ॥

**वैशंपायन** म्हणालाः—नंतर पराभव पावून विवश होऊन दीन झालेले ते सर्व कौरव युद्धापासून निवृत्त होऊन हस्तिनापुराकडे चालले ( १६ ). ( विराट नगरास जात असतांना ) मार्गांत अर्जुन उत्तरास म्हणाला, ( १७ ) " महाबाहो, वीरा, राजपुत्रा, हे गाईंचे सर्व कळप गोपालांसह परत आलेले पहा ( १८ ). आपण आतां घोड्यांना विसावा देऊं, आणि त्यांस पाणी पाजून व धुवून, तिसरे प्रहरीं नगरांत जाऊं ( १९ ). तूं आतां ह्या गोपालांस त्वरित नगरांत पाठव, व प्रिय वार्ता कळवून तुझ्या जयाची प्रसिद्धि होऊं दे " ( २० ).

**वैशंपायन** म्हणालाः—नंतर अर्जुनानें सांगितल्याप्रमाणें उत्तरानें मोठ्या त्वरेनें दूतांना आज्ञा केली, कीं विराटराजाचा जय झाला, शत्रूंची दाणादाण उडाली व गाई जिंकून आणिल्या म्हणून सांगा, व सर्वत्र जयघोष करा (२१). याप्रमाणें अर्जुन व उत्तर या भारत–मत्स्य वीरांनीं मसलत करून ते दोघेहि पुनः शमीवृक्षाजवळ आले, नंतर त्यांनीं मोठ्या आनंदानें, पूर्वीं टाकिलेले अलंकार वगैरे आपल्या शरीरांवर व रथावर चढविले ( २२ ).

स शत्रुसेनामभिभूय सर्वामाच्छिद्य सर्वं च धनं कुरुभ्यः।
वैराटिरायान्नगरं प्रतीतो बृहन्नलासारथिना प्रवीरः ॥२३॥ [२०७३]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
गोहरणपर्वणि उत्तरागमने सप्तषष्टितमोऽध्यायः ॥ ६७ ॥

नंतर तो वीर उत्तर, सारथि बृहन्नलेसह, सर्व शत्रुसैन्याचा पराभव करून व सर्व गोधन कौरवांपासून परत आणून, आनंदित मुद्रेनें विराटनगरास आला (२३).

यांप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण–उपपर्वांत उत्तराच्या
आगमनाविषयीं ६७ वा अध्याय संपला.

## अध्याय ६८

[ विराटाचा आनंद, उत्तराचें स्वागत, युधिष्ठिराच्या भाषणानें राजाचा संताप. ]

**वैशम्पायन उवाच-**

धनं चापि विजित्याऽऽशु विराटो वाहिनीपतिः।
विवेश नगरं हृष्टश्चतुर्भिः पाण्डवैः सह ॥ १ ॥
जित्वा त्रिगर्त्तान्संग्रामे गाश्चैवाऽऽदाय सर्वशः।
अशोभत महाराज सहपार्थः श्रिया वृतः ॥ २ ॥
तमासनगतं वीरं सुहृदां हर्षवर्द्धनम्।
उपासांचक्रिरे सर्वे सह पार्थैः परंतपाः ॥ ३ ॥
उपतस्थुः प्रकृतयः समस्ता ब्राह्मणैः सह।
सभाजितः ससैन्यस्तु प्रतिनन्द्याऽथ मत्स्यराट् ॥ ४ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—( इकडे ) विराटराजाहि गोधन जिंकून चारहि पांडवांसह आनंदानें परत नगरास आला ( १ ). युद्धामध्यें त्रिगर्तांस जिंकून व सर्व गाई परत आणल्यावर, महाराजा, पांडवांसह त्या विराटपतीचें तेज वाढल्यानें तो अधिक शोभूं लागला ( २ ). आप्तसुहृदांस मोठा हर्ष होऊन तो सिंहासनावर बसला असतां, पांडवांसह सर्व पराक्रमी वीर त्याच्या समीप बसले ( ३ ). सर्व प्रधानमंडळ व ब्राह्मणसमुदाय राजासंनिध उपस्थित झाला; त्यांनीं राजाचें अभिनंदन केलें. नंतर मत्स्यराजानें सैन्यासह

विसर्जयामास तदा द्विजांश्च प्रकृतीस्तथा ।
तथा स राजा मत्स्यानां विराटो वाहिनीपतिः ॥ ५ ॥
उत्तरं परिपप्रच्छ क यात इति चाऽब्रवीत् ।
आचख्युस्तस्य तत्सर्वं स्त्रियः कन्याश्च वेश्मनि ॥ ६ ॥
अन्तःपुरचराश्चैव कुरुभिर्गोधनं हृतम् ।
विजेतुमभिसंरब्ध एक एवातिसाहसात् ।
बृहन्नलासहायश्च निर्गतः पृथिवींजयः ॥ ७ ॥
उपयातानतिरथान्भीष्मं शांतनवं कृपम् ।
कर्णं दुर्योधनं द्रोणं द्रोणपुत्रं च षड्रथान् ॥ ८ ॥

**वैशंपायन उवाच—**

राजा विराटोऽथ भृशाभितप्तः श्रुत्वा सुतं त्वेकरथेन यातम् ।
बृहन्नलासारथिमाजिवर्धनं प्रोवाच सर्वानथ मन्त्रिमुख्यान् ॥ ९ ॥
सर्वथा कुरवस्ते हि ये चाऽन्ये वसुधाधिपाः ।
त्रिगर्तान्निःसृताञ्श्रुत्वा न स्थास्यन्ति कदाचन ॥ १० ॥

सभेचें विसर्जन करून प्रधानमंडळ व ब्राह्मणवर्ग ह्यांस जाण्यास आज्ञा केली ( ४-५ ). नंतर तो मत्स्यराजा सेनापति विराट विचारूं लागला: उत्तर कोठें गेला ? तेव्हां राजवाड्यातील स्त्रिया, मुली व अंत:पुरांतील लोक ह्यांनीं त्याला सर्व वर्तमान सांगितलें ( ६ ), "कौरवांनीं गाई हरण केल्यामुळें राजपुत्रास मोठा संताप आला, म्हणून बृहन्नलेला बरोबर घेऊन तो पृथिवींजय एकटाच मोठ्या साहसानें, चालून आलेल्या भीष्म, कृप, कर्ण, दुर्योधन, द्रोण व अश्वत्थामा सहा अतिरथांना जिंकण्यास गेला आहे" ( ७-८ ).

**वैशंपायन** म्हणाला:—विराटराजानें तें वर्तमान ऐकिलें तेव्हां त्यास मोठी काळजी उत्पन्न झाली; कीं, आपला पुत्र एक रथ बरोबर घेऊन व बृहन्नलेला सारथि करून कौरवसैन्यावर चालून गेला, तेव्हां मोठें तुंबळ युद्ध माजलें असेल. आतां त्यानें सर्व प्रमुख मंत्र्यांना म्हटलें, ( ९ ) "कौरव व इतर जे राजे आहेत ते त्रिगर्तांना निघालेले ऐकून कधींच ठरणार नाहींत ( १० ).

तस्माद्गच्छन्तु मे योधा बलेन महता वृताः ।
उत्तरस्य परीप्सार्थं ये त्रिगर्तैरविक्षताः ॥ ११ ॥
हयांश्च नागांश्च रथांश्च शीघ्रं पदातिसङ्घांश्च ततः प्रवीरान् ।
प्रस्थापयामास सुतस्य हेतोर्विचित्रशस्त्राभरणोपपन्नान् ॥१२॥
एवं स राजा मत्स्यानां विराटो वाहिनीपतिः ।
व्यादिदेशाऽथ तां क्षिप्रं वाहिनीं चतुरङ्गिणीम् ॥ १३ ॥
कुमारमाशु जानीत यदि जीवति वा न वा ।
यस्य यन्ता गतः षण्ढो मन्येऽहं स न जीवति ॥ १४ ॥

वैशम्पायन उवाच—

तमब्रवीद्धर्मराजो विहस्य विराटराजं तु भृशाभितप्तम् ।
बृहन्नला सारथिश्चेन्नरेन्द्र परे न नेष्यन्ति तवाऽद्य गास्ताः ॥१५॥
सर्वान्महीपान्सहितान्कुरूंश्च तथैव देवासुरसिद्धयक्षान् ।
अतीव जेतुं समरे सुतस्ते स्वनुष्ठितः सारथिना हि तेन ॥ १६ ॥

यासाठीं त्रिगर्तांच्या युद्धांत ज्यांस कांहीं इजा झाली नसेल, अशा योध्यांनीं मोठ्या सैन्यानिशीं उत्तराच्या रक्षणार्थ तिकडे जावें " ( ११ ). चित्रविचित्र शस्त्रें व आभरणें देऊन मोठमोठे योद्धे, अश्व, गज, रथ व पायदळाचे संघ, त्यानें आपल्या पुत्राकरितां ताबडतोब रवाना केले ( १२ ). याप्रमाणें तें चतुरंग सैन्य तिकडे चालवून वाहिनीपति मत्स्यांचा राजा विराट त्यास मोठ्या लगबगीनें म्हणाला:– (१३), "राजपुत्र जिवंत आहे कीं नाहीं ह्याचा लवकर शोध काढा; ज्याचा सारथि होऊन षंढ गेला आहे, तो जिवंत असेल असें मला वाटत नाहीं " ( १४ ).

**वैशंपायन** म्हणाला:—संतप्त झालेल्या त्या विराट राजाचे उद्गार ऐकून धर्मराजा त्यास हंसून म्हणाला, " नरेंद्रा, बृहन्नलेनें तुझ्या पुत्राचें सारथ्य पत्करिलें असल्यास आज तुझ्या गाई हरण करण्यास शत्रू समर्थ होणार नाहींत ( १५ ). बृहन्नला सारथ्य करीत असतां सर्व राजे, कौरव, तसेच देव, असुर, सिद्ध व यक्ष, ह्या सर्वांचा युद्धांत पराभव करण्यास तुझा पुत्र समर्थ आहे " ( १६ ).

वैशम्पायन उवाच—अथोत्तरेण प्रहिता दूतास्ते शीघ्रगामिनः ।
विराटनगरं प्राप्य विजयं समवेदयन् ॥ १७ ॥
राज्ञस्तत्सर्वमाचख्यौ मन्त्री विजयमुत्तमम् ।
पराजयं कुरूणां चाप्युपायान्तं तथोत्तरम् ॥ १८ ॥
सर्वा विनिर्जिता गावः कुरवश्च पराजिताः ।
उत्तरः सह सूतेन कुशली च परन्तपः ॥ १९ ॥
युधिष्ठिर उवाच—दिष्ट्या विनिर्जिता गावः कुरवश्च पलायिताः ।
नाऽद्भुतं त्वेव मन्येऽहं यत्ते पुत्रोऽजयत्कुरून् ॥ २० ॥
ध्रुव एव जयस्तस्य यस्य यन्ता बृहन्नला ।
वैशंपायन उवाच—ततो विराटो नृपतिः संप्रहृष्टतनूरुहः ॥ २१ ॥
श्रुत्वा स विजयं तस्य कुमारस्याऽमितौजसः ।
आच्छादयित्वा दूतांस्तान्मन्त्रिणं सोऽभ्यचोदयत् ॥ २२ ॥
राजमार्गाः क्रियन्तां मे पताकाभिरलंकृताः ।
पुष्पोपहारैरर्च्यन्तां देवताश्चापि सर्वशः ॥ २३ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—इतक्यांत उत्तरानें पाठविलेले दूत त्वरेनें विराट नगरांत येऊन दाखल झाले, व त्यांनीं उत्तराचा जय झाल्याबद्दल जाहीर केलें (१७). नंतर मंत्र्यानें राजाला सर्व बर्तमान कळविलें. मंत्री म्हणाला:— "आपणांस उत्कृष्ट विजय मिळाला, कौरवांची दाणादाण झाली व उत्तर नगरा-समीप आला आहे (१८). कौरवांस पराजित करून त्यानें गाई परत आणिल्या आहेत, व परंतप उत्तर सारथ्यासह खुशाल आहे (१९)."

**युधिष्ठिर** म्हणाला:—"आनंद ! गाई जिंकल्या गेल्या आणि सुदैवानें कौरव पराभूत झाले. तुझ्या पुत्रानें कौरवांना जिंकिलें यांत मला अद्भुत वाटत नाहीं. कारण ज्याचा सारथि बृहन्नला, त्यास जय हा मिळालाच पाहिजे (२०)!"

**वैशंपायन** म्हणाला:—विराट राजाला अत्यानंद होऊन त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले (२१). आपल्या पराक्रमी पुत्राच्या विजयाची बातमी ऐकून, त्यानें तें आनंदाचें वर्तमान सांगणाऱ्या दूतांना वस्त्रें अर्पण केलीं. नंतर मंत्र्यांना त्यानें सांगितलें, "नगरांतील राजमार्ग पताकांनीं अलंकृत करा. सर्व

कुमारा योधमुख्याश्च गणिकाश्च स्वलंकृताः ।
वादित्राणि च सर्वाणि प्रत्युद्यान्तु सुतं मम ॥ २४ ॥
घण्टावान्मानवः शीघ्रं मत्तमारुह्य वारणम् ।
शृङ्गाटकेषु सर्वेषु आख्यातु विजयं मम ॥ २५ ॥
उत्तरा च कुमारीभिर्बह्वीभिः परिवारिता ।
शृङ्गारवेषाभरणा प्रत्युद्यातु सुतं मम ॥ २६ ॥

**वैशम्पायन उवाच—**

श्रुत्वा चेदं वचनं पार्थिवस्य सर्वं पुरं स्वस्तिक[1]पाणिभूतम् ।
भेर्यश्च तूर्याणि च वारिजाश्च वेषैः परार्ध्यैः प्रमदाः शुभाश्च ॥ २७ ॥
तथैव सूतैः सह मागधैश्च नान्दीवाद्याः[2] पणवास्तूर्यवाद्याः ।
पुराद्विराटस्य महाबलस्य प्रत्युद्ययुः पुत्रमनन्तवीर्यम् ॥ २८ ॥

**वैशंपायन उवाच —**प्रस्थाप्य सेनां कन्याश्च गणिकाश्च स्वलंकृताः
मत्स्यराजो महाप्राज्ञः प्रहृष्ट इदमब्रवीत् ॥ २९ ॥

देवतांचें पुष्पोपहारांनीं अर्चन करा ( २२–२३ ). तरुण कुमार व मुख्य योद्धे आणि अलंकार घातलेल्या वारांगना सर्व वाद्यांसह माझ्या पुत्रास सामोऱ्या पाठवा ( २४ ). मत्त गजावर आरूढ होऊन मनुष्याला घंटा वाजवीत लवकर सर्व चव्हाट्यांवर माझा विजयघोष करूं द्या ( २५ ). आणि मनोहर वस्त्रभूषणांनीं सजून उत्तरा अनेक मुली जमवून राजपुत्रास सामोरी जाऊं द्या" (२६).

**वैशंपायन** म्हणाला:—विराटाची अशी आज्ञा होतांच नगरांतील सर्व लोकांनीं आरत्या, दहीं, दूर्वा वगैरे मंगल पदार्थ हातांत घेतले. त्याचप्रमाणें नौबदी, तुताऱ्या, शंख, व उत्कृष्ट अलंकार व वेष घातलेल्या शुभ तरुण स्त्रिया ( २७ ), आणि सूत व मागध ह्यांसह, व मंगल वाद्यें, जयाचीं वाद्यें व नगारे इत्यादिकांसमवेत, ते सर्व लोक नगरांतून त्या विजयशाली महापराक्रमी विराटपुत्राला सामोरे गेले ( २८ ).

**वैशंपायन** म्हणाला:—सैन्य, कन्या, व शृंगाराभरणांनीं सजलेल्या गणिका पुत्रास सामोऱ्या पाठविल्यावर महाबुद्धिमान् मत्स्यराज आनंदानें म्हणाला (२९),

१ स्वस्तिकं मंगलारार्तिकादि दधिदूर्वादिच पाणौ यस्य ( नी. )

२ नान्दीवाद्याः मङ्गलवाद्यानि, तूर्यवाद्याः जयवाद्यानि, ( नी. ) पुल्लिंग आर्ष आहे.

अक्षानाहर सैरन्ध्रि कङ्क द्यूतं प्रवर्त्तताम् ।
तं तथावादिनं दृष्ट्वा पाण्डवः प्रत्यभाषत ॥ ३० ॥
न देवितव्यं हृष्टेन कितवेनेति नः श्रुतम् ।
प्रियं तु ते चिकीर्षामि वर्त्ततां यदि मन्यसे ॥ ३१ ॥
विराट उवाच—स्त्रियो गावो हिरण्यं च यच्चाऽन्यद्वसु किंचन ।
न मे किंचित्तु रक्ष्यं ते अन्तरेणाऽपि देवितुम्[1] ॥ ३२ ॥
कङ्क उवाच—किं ते द्यूतेन राजेन्द्र बहुदोषेण मानद ।
देवने बहवो दोषास्तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥ ३३ ।
श्रुतस्ते यदि वा दृष्टः पाण्डवेयो युधिष्ठिरः ।
स राष्ट्रं सुमहत्स्फीतं भ्रातृंश्च त्रिदशोपमान् ॥ ३४ ॥
राज्यं हारितवान्सर्वं तस्माद् द्यूतं न रोचये ।
अथवा मन्यसे राजन्दीव्याम यदि रोचते ॥ ३५ ॥

"सैरंध्रि, फांसे घेऊन ये; कंका, द्यूत सुरूं होऊं दे." राजाचें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला, ( ३० ) "हर्षित झालेल्या जुगाऱ्याबरोबर द्यूत खेळूं नये, असें मी ऐकिलें आहे; ह्याउपर तुझी इच्छाच असली तर तुझें प्रिय करतों; होऊं दे द्यूत" ( ३१ ).

विराट म्हणाला:—" स्त्रिया, गाई, सुवर्ण, किंवा दुसरें यत्किंचित् धन, यांपैकीं माझें कांहीं नाहीं, तें द्यूताशिवाय तुझें आहे" ( ३२ ).

कंक म्हणाला:—"मानदा राजा, द्यूताशीं तुला काय कर्तव्य आहे ? द्यूतांत फार दोष आहेत; ह्यासाठीं तें वर्ज्य करावें ( ३३ ). पांडूचा पुत्र युधिष्ठिर तूं ऐकिला किंवा पाहिला असेल. त्यानें तें मोठें समृद्ध राष्ट्र व देवतुल्य बन्धु आणि सर्व राज्य द्यूतांतच घालविलें; म्हणून मला द्यूत आवडत नाहीं. पण इतक्या उपर तुला आवडत असेल तर खेळूं या" ( ३४–३५ ).

१ अन्तरेण देवितुम् विनापि द्यूतम् ( नी. )

**वैशम्पायन उवाच**—प्रवर्त्तमाने द्यूते तु मत्स्यः पाण्डवमब्रवीत् ।
पश्य पुत्रेण मे युद्धे तादृशाः कुरवो जिताः ॥ ३६ ॥
ततोऽब्रवीन्महात्मा स एनं राजा युधिष्ठिरः ।
बृहन्नला यस्य यन्ता कथं स न जयेद्युधि ॥ ३७ ॥
इत्युक्तः कुपितो राजा मत्स्यः पाण्डवमब्रवीत् ।
समं पुत्रेण मे षण्ढं ब्रह्मबन्धो प्रशंससि ॥ ३८ ॥
वाच्यावाच्यं न जानीषे नूनं मामवमन्यसे ।
भीष्मद्रोणमुखान्सर्वान्कस्मान्न स विजेष्यति ॥ ३९ ॥
वयस्यत्वात्तु ते ब्रह्मन्नपराधमिमं क्षमे ।
नेदृशं तु पुनर्वाच्यं यदि जीवितुमिच्छसि ॥ ४० ॥
**युधिष्ठिर उवाच**—यत्र द्रोणस्तथा भीष्मो द्रौणिर्वैकर्तनः कृपः ।
दुर्योधनश्च राजेन्द्रस्तथाऽन्ये च महारथाः ॥ ४१ ॥
मरुद्गणैः परिवृतः साक्षादपि मरुत्पतिः ।
कोऽन्यो बृहन्नलायास्तान्प्रतियुध्येत संगतान् ॥ ४२ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर द्यूत सुरू झालें असतां विराटराजा म्हणाला, "पहा, माझ्या पुत्रानें युद्धांत त्या तसल्या कौरवांसहि जिंकिलें" (३६). तेव्हां तो महात्मा युधिष्ठिर त्यास म्हणाला, "ज्याचा सारथी बृहन्नला, त्याला युद्धांत कसा बरें जय मिळणार नाहीं?" (३७) धर्मराजाचे हे उद्गार ऐकून मत्स्यराजा संतापला व त्यास म्हणाला, "ब्राह्मणाधमा, माझ्या पुत्राबरोबर त्या षंढाची प्रशंसा करितोस ? (३८) काय बोलावें व काय बोलूं नये याचें तुला मुळींच ज्ञान नाहीं. तूं खचित माझा उपमर्द करीत आहेस. त्या भीष्म द्रोणादिकांना माझा पुत्र कां बरें जिंकणार नाहीं ? (३९) ब्राह्मणा, तुझ्या मित्रत्वामुळें हा तुझा अपराध मी सहन करीत आहें, पण जर तुला जगण्याची इच्छा असेल, तर असलें भाषण पुनः करूं नको" (४०).

**युधिष्ठिर म्हणाला:**—"ज्या सैन्यांत द्रोण, भीष्म, अश्वत्थामा, कर्ण, कृप, दुर्योधन राजा व दुसरे अनेक महारथ आहेत (४१), त्या सैन्याशीं युद्ध करण्यास प्रत्यक्ष देवेंद्र देवगणांसह समर्थ नाहीं; मग त्या एकत्र जुळलेल्या कौरव सैन्याशीं बृहन्नलेशिवाय दुसरा कोण लढूं शकेल ! (४२)

यस्य बाहुबले तुल्यो न भूतो न भविष्यति ।
अतीव समरं दृष्ट्वा हर्षो यस्योपजायते ॥ ४३ ॥
योऽजयत्संगतान्सर्वान्ससुरासुरमानवान् ।
तादृशेन सहायेन कस्मात्स न विजेष्यते ॥ ४४ ॥
विराट उवाच—बहुशः प्रतिषिद्धोऽसि न च वाचं नियच्छसि ।
नियन्ता चेन्न विद्येत न कश्चिद्धर्ममाचरेत् ॥ ४५ ॥
वैशंपायन उवाच--ततः प्रकुपितो राजा तमक्षेणाऽहनद्भृशम् ।
मुखे युधिष्ठिरं कोपान्नैवमित्येव भर्त्सयन् ॥ ४६ ॥
बलवत्प्रतिविद्धस्य नस्तः शोणितमावहत् ।
तदप्राप्तं महीं पार्थः पाणिभ्यां प्रत्यगृह्णत ॥ ४७ ॥
अवैक्षत स धर्मात्मा द्रौपदीं पार्श्वतः स्थिताम् ।
सा ज्ञात्वा तमभिप्रायं भर्तुश्चित्तवशानुगा ॥ ४८ ॥

याच्या बाहुबळाची बरोबरी करील असा वीर मागेंहि झाला नाहीं, व पुढेंहि होणार नाहीं. समरांगण दृष्टीस पडलें म्हणजे ज्याला अतिशय आनंद होतो, ज्यानें देव, दैत्य व मनुष्यें ह्यांचे मोठमोठे समुदाय कैक वेळां जिंकिले, असा सहाय असल्यावर तुझा पुत्र कौरवांना कसा बरें जिंकणार नाहीं?" (४३-४४)

**विराट** म्हणाला:—"असें बोलूं नको म्हणून मी वरचेवर तुला सांगत असतांहि तूं बोलणें बंद करीत नाहींस. नियंता जर नसेल तर कोणीहि धर्माप्रमाणें वागणार नाहीं" ( ४५ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर संतापलेल्या राजा विराटानें, 'पुन्हां असें बोलतां कामा नये' असें म्हणून निर्भर्त्सना करीत, युधिष्ठिराच्या मुखावर मोठ्या जोरानें फांसा मारला ( ४६ ). तो फांसा जोरानें लागल्यामुळें त्याच्या नाकांतून रक्ताची धार लागली! परंतु तें रक्त भूमीवर पडण्याचे आधींच युधिष्ठिरानें आपल्या ओंजळींत धरिलें ( ४७ ), आणि पाठीमागें उभ्या असलेल्या द्रौपदीकडे पाहिलें. तेव्हां भर्त्याचा अभिप्राय जाणून

पात्रं गृहीत्वा सौवर्णं जलपूर्णमनिन्दिता ।
तच्छोणितं प्रत्यगृण्हाद्यत्प्रसुस्राव नस्ततः ॥ ४९ ॥
अथोत्तरः शुभैर्गन्धैर्माल्यैश्च विविधैस्तथा ।
अवकीर्यमाणः संहृष्टो नगरं स्वैरमागतः ॥ ५० ॥
सभाज्यमानः पौरैश्च स्त्रीभिर्जानपदैस्तथा ।
आसाद्य भवनद्वारं पित्रे संप्रत्यवेदयत् ॥ ५१ ॥
ततो द्वास्थः प्रविश्यैव विराटमिदमब्रवीत् ।
बृहन्नलासहायश्च पुत्रो द्वार्युत्तरः स्थितः ॥ ५२ ॥
ततो हृष्टो मत्स्यराजः क्षत्तारमिदमब्रवीत् ।
प्रवेश्यतामुभौ तूर्णं दर्शनेप्सुरहं तयोः ॥ ५३ ॥
क्षत्तारं कुरुराजस्तु शनैः कर्णमुपाजपत् ।
उत्तरः प्रविशत्वेको न प्रवेश्या बृहन्नला ॥ ५४ ॥
एतस्य हि महाबाहो व्रतमेतत्समाहितम् ।
यो ममाऽङ्गे व्रणं कुर्याच्छोणितं वाऽपि दर्शयेत् ।
अन्यत्र संग्रामगतान्न स जीवेत्कथंचन ॥ ५५ ॥

चागणाऱ्या द्रौपदीनें, पाण्यानें भरलेलें सुवर्णाचें तस्त हातीं घेऊन त्यांत तें नाकपुडींतून वाहणारें रक्त धरिलें ( ४८–४९ ). आतां इकडे ज्याच्यावर नानाप्रकारचीं सुगंधी द्रव्यें व फुलें लोक उधळीत आहेत असा तो उत्तर, मोठ्या आनंदानें मिरवत मिरवत शहराशीं आला ( ५० ). पौरजन, स्त्रिया व नगरांतील लोक त्याचा मोठा जयजयकार करीत असतां, तो राजवाड्याच्या द्वाराजवळ आला, व त्यानें, आपण आल्याचें पित्याकडे कळविलें ( ५१ ). द्वारपाळ वाड्यांत प्रवेश करून राजाला म्हणाला, " बृहन्नलेसह राजपुत्राची स्वारी द्वाराजवळ उभी आहे" ( ५२ ). नंतर हर्षभरित झालेला मत्स्यराजा आपल्या क्षत्त्यास म्हणाला, "त्या दोघांस लवकर आंत घेऊन ये; मी त्यांच्या भेटीची इच्छा करीत आहें" ( ५३ ). तेव्हां, कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर त्या सारथ्याच्या कानास लागून हळूच म्हणाला, "फक्त त्या उत्तराला आंत आण, बृहन्नलेला इकडे आणूं नको(५४). युद्धांत मी असल्याखेरीज जो मला जखम करील, किंवा रक्त काढून दाखवील, तो कसाहि जिवंत राहणार नाहीं,

न मृष्याद्भृशसंक्रुद्धो मां दृष्ट्वा तु सशोणितम् ।
विराटमिह सामात्यं हन्यात्सबलवाहनम् ॥ ५६ ॥

वैशम्पायन उवाच—ततो राज्ञः सुतो ज्येष्ठः प्राविशत्पृथिवींजयः ।
सोऽभिवाद्य पितुः पादौ कङ्कं चाऽप्युपतिष्ठत ॥ ५७ ॥

ततो रुधिरसंयुक्तमनेकाग्रमनागसम् ।
भूमावासीनमेकान्ते सैरंध्र्या प्रत्युपस्थितम् ॥ ५८ ॥

ततः पप्रच्छ पितरं त्वरमाण इवोत्तरः ।
केनाऽयं ताडितो राजन्केन पापमिदं कृतम् ॥ ५९ ॥

विराट उवाच— मयाऽयं ताडितो जिह्मो न चाप्येतावदर्हति ।
प्रशस्यमाने यच्छूरे त्वयि षण्ढं प्रशंसति ॥ ६० ॥

उत्तर उवाच— अकार्यं ते कृतं राजन्क्षिप्रमेव प्रसाद्यताम् ।
मा त्वां ब्रह्मविषं घोरं समूलमिह निर्दहेत् ॥ ६१ ॥

असा त्यानें कडक पण केला आहे ( ५५ ). त्यानें मला रक्तयुक्त पाहिलें तर तो अतिशय संतापेल, आणि अमात्य, सैन्य व वाहनें ह्यांसुद्धां विराटराजाला येथेंच ठार करील " ( ५६ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर विराटाचा ज्येष्ठ पुत्र भूमिंजय राजवाड्यांत आला. त्यानें पितृचरणीं अभिवंदन करून कंकालाही नमस्कार केला ( ५७ ). ( त्यावेळीं ) तो निरपराधी कंक मनामध्यें व्यग्र असून एकीकडे भूमीवर बसलेला होता व रक्तानें माखला होता ( ५८ ). तेव्हां, उत्तरानें मोठ्या लगबगीनें बापास विचारिलें, "राजा, ह्याला कोणी ताडन केलें ? हें पापकर्म करणारा कोण ?" ( ५९ ).

**विराट** म्हणाला:—"ह्या कुटिलाला मीच ताडन केलें, ह्याला ही शिक्षा अपुरीच आहे. कारण, तुझ्या शौर्याची प्रशंसा चालू असतां हा त्या षंढाची प्रशंसा करितो " ( ६० ).

**उत्तर** म्हणाला:—"राजा, हें तूं फार अयोग्य कर्म केलेंस. ह्याला लवकर प्रसन्न कर, नाहींतर हें घोर ब्रह्मविष तुला समूळ येथेंच जाळून टाकील"(६१).

वैशम्पायन उवाच— स पुत्रस्य वचः श्रुत्वा विराटो राष्ट्रवर्धनः ।
क्षमयामास कौन्तेयं भस्मच्छन्नमिवाऽनलम् ॥ ६२ ॥
क्षमयन्तं तु राजानं पाण्डवः प्रत्यभाषत ।
चिरं क्षान्तमिदं राजन्न मन्युर्विद्यते मम ॥ ६३ ॥
यदि ह्येतत्पतेद्भूमौ रुधिरं मम नस्ततः ।
सराष्ट्रस्त्वं महाराज विनश्येथा न संशयः ॥ ६४ ॥
न दूषयामि ते राजन्यद्वै हन्याददूषकम्[1] ।
बलवन्तं प्रभुं राजन्क्षिप्रं दारुणमाप्नुयात् ॥ ६५ ॥
वैशंपायन उवाच— शोणिते तु व्यतिक्रान्ते प्रविवेश बृहन्नला ।
अभिवाद्य विराटं तु कङ्कं चाप्युपातिष्ठत ॥ ६६ ॥
क्षामयित्वा तु कौरव्यं रणाद्युत्तरमागतम् ।
प्रशशंस ततो मत्स्यः शृण्वतः सव्यसाचिनः ॥ ६७ ॥
त्वया दायादवानस्मि कैकेयीनन्दिवर्धन ।
त्वया मे सदृशः पुत्रो न भूतो न भविष्यति ॥ ६८ ॥

पुत्राचें हें भाषण ऐकून, राज्याची वृद्धि करणाऱ्या विराटराजानें, भस्माच्छादित अग्नीप्रमाणें गुप्तरूपानें राहिलेल्या कुंतीपुत्र युधिष्ठिराची क्षमा मागितली (६२). 'क्षमा करावी' म्हणून राजा प्रार्थना करीत असतां युधिष्ठिर त्यास म्हणाला, "राजा, तुला मी केव्हांच याबद्दल क्षमा केली आहे; मला राग नाहीं (६३). पण जर कां हें माझ्या नाकांतील रक्त भूमीवर पडलें असतें, तर तुझा ह्या सर्व राष्ट्रासह नाश झाला असता यांत संशय नाहीं (६४). बलिष्ठ असून प्रभुत्व गाजवणाऱ्याला लवकर सन्ताप येतो. तूं राजा, निरपराध्याला ताडन केलेंस ह्यांत तुला मी दोष देत नाहीं" (६५).

वैशंपायन म्हणाला:—रक्त बंद झाल्यावर बृहन्नला आंत आली, व तिनें विराटराजास अभिनंदन करून कंकाला प्रणिपात केला (६६). युधिष्ठिराची क्षमा मागितल्यावर विराटराजा रणांतून विजयी होऊन आलेल्या उत्तराची बृहन्नलेसमक्ष प्रशंसा करूं लागला (६७). "कैकेयीचा आनंद वर्धन करणाऱ्या उत्तरा, आज तुझ्यामुळें मी पुत्रवान् झालों. मला तुझ्यासारखा पुत्र आजपर्यंत झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं (६८).

[1] यत् अदूषकं परापवादहीनं हन्यात् तत् ते कर्म न दूषयामि (नी.) अर्थ स्पष्ट नाहीं.

पदं पदसहस्रेण यश्चरन्नाऽपराध्नुयात् ।
तेन कर्णेन ते तात कथमासीत्समागमः ॥ ६९ ॥
मनुष्यलोके सकले यस्य तुल्यो न विद्यते ।
तेन भीष्मेण ते तात कथमासीत्समागमः ॥ ७० ॥
आचार्यो वृष्णिवीराणां कौरवाणां च यो द्विजः ।
सर्वक्षत्रस्य चाऽऽचार्यः सर्वशस्त्रभृतां वरः ।
तेन द्रोणेन ते तात कथमासीत्समागमः ॥ ७१ ॥
आचार्यपुत्रो यः शरः सर्वशस्त्रभृतामपि ।
अश्वत्थामेति विख्यातस्तेनाऽऽसीत्सङ्गरःकथम् ॥ ७२ ॥
रणे यं प्रेक्ष्य सीदन्ति हृतस्वा वणिजो यथा ।
कृपेण तेन ते तात कथमासीत्समागमः ॥ ७३ ॥
पर्वतं योऽभिविध्येत राजपुत्रो महेषुभिः ।
दुर्योधनेन ते तात कथमासीत्समागमः ॥ ७४ ॥
अवगाढा द्विषन्तो मे सुखो वातोऽभिवाति माम् ।
यस्त्वं धनमथाऽजैषीः कुरुभिर्ग्रस्तमाहवे ॥ ७५ ॥

जो सहस्रावधि नेम धरतांना एकहि नेम चुकत नाहीं, त्या कर्णाशीं तुझा कसा सामना झाला ? (६९) सर्व मानव लोकामध्यें ज्याची बरोबरी कोणीहि करूं शकत नाहीं, त्या भीष्माशीं तूं कसें युद्ध केलेंस ? (७०) जो ब्राह्मण यादववीर, कौरव व सर्व क्षत्रिय ह्यांचा गुरु आहे, व जो सर्व शस्त्रधारी योद्ध्यांत वरिष्ठ आहे, त्या द्रोणाशीं तूं कसें रण केलेंस ? (७१) आचार्यांचा पुत्र जो सर्व शस्त्रधाऱ्यांमध्यें शूर व महाविख्यात अश्वत्थामा, त्याच्याशीं तुझें युद्ध कसें झालें ? (७२) ज्याला पाहतांच सर्वस्व हिरावून घेतलेल्या वाण्यांप्रमाणें शत्रू अगदीं निराश होतात, त्या कृपाचार्याशीं तूं कशी टक्कर दिलीस ? (७३) जो राजपुत्र महान् बाणांनीं पर्वतालाहि विंधून टाकील, त्या दुर्योधनाशीं, बाबा, तूं कसा संग्राम केलास ? (७४) माझे शत्रू पराभूत झाले, व वायु मला सुखावह वाहत आहे; कारण तूं कौरवांनीं ग्रस्त केलेलें गोधन युद्धांत जिंकून आणिलेंस (७५).

१ पदं—बाणनिपातस्थानं लक्ष्यं (नी.) २ अवगाढाः पराभूताः (नी.)

तेषां भयाभिपन्नानां सर्वेषां बलशालिनाम् ।
नूनं प्रकाल्य तान्सर्वांस्त्वया युधि नरर्षभ ॥
आच्छिन्नं गोधनं सर्वं शार्दूलेनाऽऽमिषं यथा ॥ ७६॥ [२१४९]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि उत्तरगोग्रहे विराटोत्तरसंवादेऽष्टषष्टितमोऽध्यायः ॥६८॥

आमिष हरण करणाऱ्या वाघाप्रमाणें, त्या बलिष्ठ कौरवांना युद्धामध्यें भयभीत करून, जिंकून व हांकलून तूं आपलें सर्व गोधन छिनून घेतलेंस " ( ७६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत विराट व उत्तर यांच्या संभाषणाविषयीं ६८ वा अध्याय संपला.

## अध्याय ६९

[ विराट व उत्तर यांचें संभाषण. ]

उत्तर उवाच—न मया निर्जिता गावो न मया निर्जिताः परे ।
कृतं तत्सकलं तेन देवपुत्रेण केनचित् ॥ १ ॥
स हि भीतं द्रवन्तं मां देवपुत्रो न्यवर्त्तयत् ।
स चाऽतिष्ठद्रथोपस्थे[1] वज्रसंहननो युवा ॥ २ ॥
तेन ता निर्जिता गावः कुरवश्च पराजिताः ।
तस्य तत्कर्म वीरस्य न मया तात तत्कृतम् ॥ ३ ॥

उत्तर म्हणाला:—"मी गाई जिंकून आणिल्या नाहीत, व शत्रूंचा पराभवहि केला नाहीं. तें सर्व कोणी एका देवपुत्रानें केलें ( १ ). मी भिऊन पळावयास लागलों असतां त्या देवपुत्रानें मला मागें फिरविलें; आणि तोच वज्रासारख्या सुदृढ देहाचा तरुण रथांतील वीरस्थानीं उभा राहिला ( २ ). त्यानेंच त्या गाई जिंकून घेतल्या आणि कौरवांचा पराभव केला. तें ( सर्व ) त्या वीराचें कर्म ! बाबा, तें मीं केलें नाहीं ( ३ ).

१ रथोपस्थ-रथांतील वीराचें स्थान.

स हि शारद्वतं द्रोणं द्रोणपुत्रं च षड्रथान् ।
सूतपुत्रं च भीष्मं च चकार विमुखाञ्शरैः ॥ ४ ॥
दुर्योधनं विकर्णं च स नागमिव यूथपम् ।
प्रभग्नमब्रवीद्भीतं राजपुत्रं महाबलः ॥ ५ ॥
न हास्तिनपुरे त्राणं तव पश्यामि किंचन ।
व्यायामेन परीप्सस्व जीवितं कौरवात्मज ॥ ६ ॥
न मोक्ष्यसे पलायंस्त्वं राजन्युद्धे मनः कुरु ।
पृथिवीं भोक्ष्यसे जित्वा हतो वा स्वर्गमाप्स्यसि ॥ ७ ॥
स निवृत्तो नरव्याघ्रो मुञ्चन्वज्रनिभाञ्शरान् ।
सचिवैः संवृतो राजा रथे नाग इव श्वसन् ॥ ८ ॥
तं दृष्ट्वा रोमहर्षोऽभूदूरुकम्पश्च मारिष ।
स तत्र सिंहसङ्काशमनीकं व्यधमच्छरैः ॥ ९ ॥
तत्प्रणुद्य रथानीकं सिंहसंहननो युवा ।
कुरूंस्तान्प्रहसन्राजन् संस्थितान्हृतवाससः ॥ १० ॥

कृप, द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, भीष्म ( व दुर्योधन ) ह्या सहा रथ्यांना बाणांनीं विद्ध करून पराङ्मुख करणारा तोच देवपुत्र होय ( ४ ). यूथपति हत्तीप्रमाणें दिसणाऱ्या राजपुत्र दुर्योधनाला व विकर्णाला पराजयानें भ्यालेला पाहून तो महाबली म्हणाला:—( ५ ) ' कौरवपुत्रा, तुझी आतां हस्तिनापुरांत धडगत दिसत नाहीं; ह्यासाठीं पराक्रमानें[1] तूं जीवाचा बचाव कर ( ६ ). राजा, पलायन करून तुझी सुटका व्हावयाची नाहीं; म्हणून तूं युद्ध करण्याचेंच मनांत आण. जर तूं विजयी झालास तर पृथ्वीचा उपभोग घेशील, मारला गेलास तर स्वर्ग मिळविशील ' ( ७ ). त्याबरोबर तो नरशार्दूल (दुर्योधन) भुजंगासारखा रथावर फणफणत व वज्रतुल्य शर सोडीत अमात्यांसह मार्गे फिरला ( ८ ). आर्या, त्याला पाहून माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले व मी लटलटां कांपूं लागलों; परंतु तें सिंहासारखें (दुर्योधनाचें) सैन्य त्या देवपुत्रानें बाणांनीं उडवून दिलें ( ९ ). आणि राजा, सिंहासारख्या (टणक) शरीराचा तो तरुण, कौरवांचें महारथ्यांचें सैन्य जर्जर करून व त्यांचीं वस्त्रें हरण करून, हंसत उभा राहिला ( १० .

१ व्यायामेन–देशान्तरसंचारेण ( नी. ) पण यापेक्षां वरील अर्थ बरा दिसतो.

एकेन तेन वीरेण षडूथाः परिनिर्जिताः ।
शार्दूलेनेव मत्तेन यथा वनचरा मृगाः ॥ ११ ॥

विराट उवाच—क्व स वीरो महाबाहुर्देवपुत्रो महायशाः ।
यो मे धनमथाऽजैषीत्कुरुभिर्ग्रस्तमाहवे ॥ १२ ॥
इच्छामि तमहं द्रष्टुमर्चितुं च महाबलम् ।
येन मे त्वं च गावश्च रक्षिता देवसूनुना ॥ १३ ॥

उत्तर उवाच— अन्तर्धानं गतस्तत्र देवपुत्रो महाबलः ।
स तु श्वो वा परश्वो वा मन्ये प्रादुर्भविष्यति ॥ १४ ॥

वैशंपायन उवाच— एवमाख्यायमानं तु च्छन्नं सत्रेण पाण्डवम् ।
वसन्तं तत्र नाऽऽज्ञासीद्विराटो वाहिनीपतिः ॥ १५ ॥
ततः पार्थोऽभ्यनुज्ञातो विराटेन महात्मना ।
प्रददौ तानि वासांसि विराटदुहितुः स्वयम् ॥ १६ ॥

जशी एखाद्या मातलेल्या वाघानें वनांत फिरणाऱ्या मृगांची दाणादाण करावी, त्याप्रमाणें त्या एकट्या वीरानें त्या सहाहि रथ्यांची दाणादाण करून सोडली " ( ११ ).

**विराट** म्हणाला:—" कोठें आहे तो महायशस्वी महाबाहु वीर देवपुत्र ज्यानें कौरवांनीं हरण केलेल्या माझ्या गाई युद्ध करून परत जिंकून आणिल्या ? ( १२ ). ज्यानें माझ्या गाईंचें व तुझें रक्षण केलें, त्या महाबलवान् देवपुत्रास भेटावें व त्याचा गौरव करावा, अशी माझी इच्छा आहे " ( १३ ).

**उत्तर** म्हणाला:—" तो महाबलिष्ठ देवपुत्र तेथेंच गुप्त झाला. तो उद्यां किंवा परवां पुन्हां दिसेल असें मला वाटतें " ( १४ ).

**वैशंपायन** म्हणाला:—ह्याप्रमाणें, कपट वेषानें तेथें वसत असलेल्या अर्जुनाबद्दल उत्तर सांगत होता, तरी सैन्याधिपति विराटाला त्याची ओळख पटली नाहीं ( १५ ). नंतर महात्म्या विराटानें अनुज्ञा दिल्यावर, अर्जुनानें हरण करून आणिलेलीं वस्त्रें विराटाची कन्या उत्तरा हिला स्वतः दिलीं (१६).

उत्तरा तु महार्हाणि विविधानि नवानि च ।
प्रतिगृह्याऽभवत्प्रीता तानि वासांसि भामिनी ॥ १७ ॥
मन्त्रयित्वा तु कौन्तेय उत्तरेण महात्मना ।
इतिकर्तव्यतां सर्वां राजन्पार्थे युधिष्ठिरे ॥ १८ ॥
ततस्तथा तद्व्यदधाद्यथावत्पुरुषर्षभ ।
सह पुत्रेण मत्स्यस्य प्रहृष्टा भरतर्षभाः ॥ १९ ॥ [२१६८]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि गोहरणपर्वणि विराटोत्तरसंवादे एकोनसप्ततितमोऽध्यायः ॥ ६९ ॥

समाप्तं गोहरणपर्व ॥

(बृहन्नलेनें आणलेलीं) तीं नवीन व नानाप्रकारचीं उंचीं वस्त्रें घेऊन उत्तरेला आनंद वाटला ( १७ ). ( नंतर ) राजा युधिष्ठिरासंबंधानें पुढें जें कांहीं इष्ट कर्तव्य होतें, त्याची अर्जुनानें महात्म्या उत्तराशीं मसलत ठरविली ( १८ ). आणि तदनुरूप, राजा, सर्व कांहीं विराटपुत्राच्या साहाय्यानें त्यानें शेवटास नेलें. तेव्हां पांडवांना मोठा संतोष झाल ( १९ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील गोहरण-उपपर्वांत विराट व उत्तर यांच्या संभाषणाविषयीं ६९ वा अध्याय संपला.

## गोहरण-उपपर्व समाप्त



# वैवाहिकपर्व

## अध्याय ७०

[ अर्जुन विराट राजास पांडवांची ओळख पटवितो ]

वैशंपायन उवाच— ततस्तृतीये दिवसे भ्रातरः पञ्च पाण्डवाः।
स्नाताः शुक्लाम्बरधराः समये चरितव्रताः ॥ १ ॥
युधिष्ठिरं पुरस्कृत्य सर्वाभरणभूषिताः ।
द्वारि मत्ता यथा नागा भ्राजमाना महारथाः ॥ २ ॥
विराटस्य सभां गत्वा भूमिपालासनेष्वथ ।
निषेदुः पावकप्रख्याः सर्वे धिष्ण्येष्विवाऽग्नयः ॥ ३ ॥
तेषु तत्रोपविष्टेषु विराटः पृथिवीपतिः ।
आजगाम सभां कर्त्तुं राजकार्याणि सर्वशः ॥ ४ ॥
श्रीमतः पाण्डवान्दृष्ट्वा ज्वलतः पावकानिव ।
मुहूर्तमिव च ध्यात्वा सरोषः पृथिवीपतिः ॥ ५ ॥
अथ मत्स्योऽब्रवीत्कङ्कं देवरूपमिव स्थितम् ।
मरुद्गणैरुपासीनं त्रिदशानामिवेश्वरम् ॥ ६ ॥
स किलाऽक्षातिवापस्त्वं सभास्तारो मया वृतः ।
अथ राजासने कस्माद्रुपविष्टस्त्वलंकृतः ॥ ७ ॥

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर तिसरे दिवशीं त्या पांच पांडव बंधूंनीं स्नानें करून शुभ्रवस्त्रें परिधान केलीं, आणि योग्यकाळीं अज्ञातवासाचें व्रत समाप्त केलें ( १ ). सर्व अलंकारांनीं मंडित झालेले ते महारथ, युधिष्ठिरास पुढें करून, मत्त गजांप्रमाणें सभाद्वारासमीप झळकत उभे राहिले ( २ ). मग त्यांनीं विराटसभेंत प्रवेश केला, व तेथें राजेलोकांच्या आसनांवर ते स्थंडिलांवर मूर्तिमंत अग्नींप्रमाणें बसले ( ३ ). तेथें ते बसल्यावर ( कांहीं वेळानें ) विराटराजा राजकार्यें करण्याकरितां सभेंत आला ( ४ ). त्यानें त्या पांडवांकडे पाहिलें, आणि त्यांचें तें अग्नीसारखें देदीप्यमान तेज पाहून तो कांहीं वेळ विचार केल्यावर संतापला (५). मरुद्गणांनीं वेष्टित असलेल्या देवेंद्राप्रमाणें बसलेल्या देवरूप कंकास मत्स्यराज विराट म्हणाला:— ( ६ ) "फासे टाकणारा म्हणून वास्तविक तुला मी सभासद केलें; तो तूं अलंकार घालून राजासनावर काय म्हणून बसलास?" ( ७ )

वैशंपायन उवाच— परिहासेप्सया वाक्यं विराटस्य निशम्य तत् ।
स्मयमानोऽर्जुनो राजन्निदं वचनमब्रवीत् ॥ ८ ॥
अर्जुन उवाच—इन्द्रस्याऽर्द्धासनं राजन्नयमारोढुमर्हति ।
ब्रह्मण्यः श्रुतवांस्त्यागी यज्ञशीलो दृढव्रतः ॥ ९ ॥
एष विग्रहवान्धर्म एष वीर्यवतां वरः ।
एष बुद्ध्याऽधिको लोके तपसां च परायणम् ॥ १० ॥
एषोऽस्त्रं विविधं वेत्ति त्रैलोक्ये सचराचरे ।
न चैवाऽन्यः पुमान्वेत्ति न वेत्स्यति कदाचन ॥ ११ ॥
न देवा नाऽसुराः केचिन्न मनुष्या न राक्षसाः ।
गन्धर्वयक्षप्रवराः सकिन्नरमहोरगाः ॥ १२ ॥
दीर्घदर्शी महातेजाः पौरजानपदप्रियः ।
पाण्डवानामतिरथो यज्ञधर्मपरो वशी ॥ १३ ॥
महर्षिकल्पो राजर्षिः सर्वलोकेषु विश्रुतः ।
बलवान्धृतिमान्दक्षः सत्यवादी जितेन्द्रियः ॥
धनैश्च सञ्चयैश्चैव शक्रवैश्रवणोपमः ॥ १४ ॥

वैशंपायन म्हणालाः—राजा, विराटाचें तें औपरोधिक वाक्य ऐकून अर्जुन हंसत याप्रमाणें बोलला ( ८ ), "राजा, इंद्राच्या अर्ध्या आसनावर बसण्यास हा योग्य आहे. हा ब्राह्मणांचा भक्त आहे. हा विद्यावान्, दाता, यज्ञकर्ता असून सत्यप्रतिज्ञ आहे (९). हा केवळ मूर्तिमंत धर्म आहे. सर्व पराक्रमी पुरुषांमध्यें हा मुख्य आहे. लोकांत सर्वांहून हा अधिक बुद्धिमान् आहे. तपश्चर्येचें हा परम निधान आहे ( १० ). हा नानाप्रकारचीं अस्त्रें जाणतो; सर्व स्थावरजंगम त्रैलोक्यांत ह्याच्याप्रमाणें दुसरा कोणी हल्लीं जाणत नाहीं, व पुढेंहि जाणणार नाहीं ( ११ ). देव, असुर, मनुष्य, राक्षस, श्रेष्ठ गंधर्व व यक्ष, किन्नर, महोरग, ह्यांपैकीं (कोणी)याची बरोबरी करणार नाहीं (१२). हा दूरदर्शी, महातेजस्वी, नगरांतील व देशांतील लोकांस प्रिय, पांडवांमध्यें अतिरथी, यज्ञक्रिया व धर्माचरण यांत तत्पर व जितेंद्रिय आहे ( १३ ). हा महर्षीसमान राजर्षि सर्व लोकांत विख्यात आहे; हा बलवान्, धैर्यवान्, दक्ष, सत्यवादी व इंद्रियजेता असून इंद्राप्रमाणें व कुबेराप्रमाणें धनवान व

यथा मनुर्महातेजाः लोकानां परिरक्षिता ।
एवमेष महातेजाः प्रजानुग्रहकारकः ॥ १५ ॥
अयं कुरूणामृषभो धर्मराजो युधिष्ठिरः ।
अस्य कीर्तिः स्थिता लोके सूर्यस्येवोद्यतः प्रभा ॥ १६ ॥
संसरन्ति दिशः सर्वा यशसोऽस्य इवांऽशवः ।
उदितस्येव सूर्यस्य तेजसोऽनु गभस्तयः ॥ १७ ॥
एनं दशसहस्राणि कुञ्जराणां तरस्विनाम् ।
अन्वयुः पृष्ठतो राजन्यावदध्यावसत्कुरून् ॥ १८ ॥
त्रिंशदेवं सहस्राणि रथाः काञ्चनमालिनः ।
सदश्वैरुपसंपन्नाः पृष्ठतोऽनुययुस्तदा ॥ १९ ॥
एनमष्टशताः सूताः सुमृष्टमणिकुण्डलाः ।
अब्रुवन्मागधैः सार्धं पुरा शक्रमिवर्षयः ॥ २० ॥
एनं नित्यमुपासन्त कुरवः किंकरा यथा ।
सर्वे च राजन् राजानो धनेश्वरमिवाऽमराः ॥ २१ ॥

संचययुक्त आहे ( १४ ). महातेजस्वी मनु जसा लोकांचें रक्षण करणारा होता तसाच हा प्रजेवर अनुग्रह करणारा आहे (१५). हा कौरवश्रेष्ठ धर्मराज युधिष्ठिर होय. उदय पावणाऱ्या सूर्याच्या प्रकाशासारखी ह्याची कीर्ति नेहमीं लोकांत वाढत आहे ( १६ ). उगवलेल्या सूर्याच्या तेजाचे किरण दशदिशांस पसरतात, तसे ह्याच्या यशाचे किरण दशदिशांस पसरत आहेत ( १७ ). हा जोंपर्यंत कुरुदेशांत होता, तोंपर्यंत ह्याच्या स्वारीच्या मागून दहाहजार वेगवान् हत्ती चालत ( १८ ). तसेंच सुवर्णालंकारांनीं शृंगारलेले व उत्कृष्ट घोडे जोडलेले तीस हजार रथ यामागें चालत ( १९ ). ऋषींनीं जशी इंद्राची स्तुति करावी तशी, देदीप्यमान कुंडलें घातलेले आठशें सूत मागधांसह ह्याची पूर्वी स्तुति करीत ( २० ). राजा, देव जसे धनपति कुबेराच्या (सेवेंत) तसे कौरव व इतर राजे नोकरांसारखे ह्याच्या सेवेंत नित्य असत (२१).

एष सर्वान्महीपालान्करदान्समकारयत् ।
वैश्यानिव महाभागो विवशान्स्ववशानपि ॥ २२ ॥
अष्टाशीतिसहस्राणि स्नातकानां महात्मनाम् ।
उपजीवन्ति राजानमेनं सुचरितव्रतम् ॥ २३ ॥
एष वृद्धाननाथांश्च पङ्गूनन्धांश्च मानवान् ।
पुत्रवत्पालयामास प्रजा धर्मेण वै विभुः ॥ २४ ॥
एष धर्मे दमे चैव क्रोधे चापि जितव्रतः
महाप्रसादो ब्रह्मण्यः सत्यवादी च पार्थिवः ॥ २५ ॥
शीघ्रं तापेन चैतस्य तप्यते स सुयोधनः ।
सगणः सह कर्णेन सौबलेनाऽपि वा विभुः ॥ २६ ॥
न शक्यन्ते ह्यस्य गुणाः प्रसङ्ख्यातुं नरेश्वर ।
एष धर्मपरो नित्यमानृशंस्यश्च पाण्डवः ॥ २७ ॥
एवं युक्तो महाराजः पाण्डवः पार्थिवर्षभः ।
कथं नाऽर्हति राजार्हमासनं पृथिवीपते ॥२८॥ [२१९६]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि
वैवाहिकपर्वणि पाण्डवप्रकाशे सप्ततितमोऽध्यायः ॥ ७० ॥

स्वतंत्र किंवा परतंत्र असे सर्वच राजे ह्यानें आपले मांडलिक करून सोडले होते. त्या सर्वांना ह्याला वैश्यांप्रमाणें कर द्यावा लागत असे ( २२ ). ह्या सदाचरणी राजाच्या आश्रयास अठ्ठ्यायशी हजार महात्मे स्नातक असत (२३). वृद्ध, अनाथ, आंधळे व पांगळे अशा मनुष्यांचें ह्यानें पुत्राप्रमाणें पालन केलें आहे; ह्या सामर्थ्यवानानें धर्माप्रमाणें प्रजेचें रक्षण केलें आहे ( २४ ). हा धर्मशील, जितेंद्रिय, शांत, दयाळु, ब्राह्मणभक्त व सत्यवादी राजा आहे (२५). ह्याचें दु:सह तेज पाहून दुर्योधन, कर्ण, शकुनि व इतर पुढ्यांतील लोक यांसह तत्काळ तप्त होत होता (२६). नराधिपा, ह्याचे सर्व गुण वर्णन करणें अशक्य आहे. हा पांडव नेहमीं धर्मनिष्ठ व दयाशील असतो ( २७ ). याप्रमाणें नियमवान् असलेला महाराज नृपश्रेष्ठ युधिष्ठिर, पृथ्वीपति विराटा, राजासनावर बसण्यास योग्य कां नाहीं? " ( २८ )

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील वैवाहिक-उपपर्वांत पांडवांच्या प्रगट होण्याविषयीं ७० वा अध्याय संपला.

# अध्याय ७१

[ विराटराजा सर्व पांडवांचें स्वागत करतो. ]

विराट उवाच—यद्येष राजा कौरव्यः कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
कतमोऽस्याऽर्जुनो भ्राता भीमश्च कतमो बली ॥ १ ॥
नकुलः सहदेवो वा द्रौपदी वा यशस्विनी ।
यदा द्यूतजिताः पार्था न प्राज्ञायन्त ते क्वचित् ॥ २ ॥
अर्जुन उवाच—य एष बल्लवो ब्रूते सूदस्तव नराधिप ।
एष भीमो महाराज भीमवेगपराक्रमः ॥ ३ ॥
एष क्रोधवशान्हत्वा पर्वते गन्धमादने ।
सौगन्धिकानि दिव्यानि कृष्णार्थे समुपाहरत् ॥ ४ ॥
गन्धर्व एष वै हन्ता कीचकानां दुरात्मनाम् ।
व्याघ्रानृक्षान्वराहांश्च हतवांस्त्रीपुरे तव ॥ ५ ॥
यश्चाऽऽसीदश्वबन्धस्ते नकुलोऽयं परन्तपः ।
गोसंख्यः सहदेवश्च माद्रीपुत्रौ महारथौ ॥ ६ ॥

**विराट** म्हणाला:—"जर हा कुरुकुलोत्पन्न कुंतीचा पुत्र युधिष्ठिर आहे, तर मग ह्याचा बंधु अर्जुन कोणता ? तसाच बळवान् भीम कोणता ? ( १ ). त्याप्रमाणेंच नकुल, सहदेव किंवा यशस्विनी द्रौपदी कोणती ? ते पृथेचे पुत्र द्यूतांत जिंकले गेल्यापासून त्यांचें कांहींच वर्तमान कळलें नाहीं" ( २ ).

**अर्जुन** म्हणाला:—"नराधिपा, हा जो तुझा बल्लव नांवाचा आचारी आहे, तोच हा भयंकर वेग व पराक्रम ह्यांनीं शोभणारा भीमसेन होय ( ३ ). ह्यानेंच गंधमादन पर्वतावर क्रोधायमान झालेल्या ( कुबेरसेवकांना ) मारून द्रौपदीकरितां दिव्य सौगंधिक कमळें आणिलीं ( ४ ). त्या दुरात्म्या अनेक कीचकांचा वध करणारा गंधर्व तो हाच; व तुझ्या अंतःपुरांत वाघ, अस्वलें व डुकरें ह्यांना मारणारा हाच ( ५ ). तुझ्या अश्वांवर जो अधिकारी होता तोच हा शत्रूंना जर्जर करणारा नकुल होय; आणि तुझा जो मुख्य गोपाल, तोच हा सहदेव; हे दोन्ही माद्रीचे पुत्र महारथ आहेत (६).

शृङ्गारवेषाभरणौ रूपवन्तौ यशस्विनौ ।
महारथसहस्राणां समर्थौ भरतर्षभौ ॥ ७ ॥
एषा पद्मपलाशाक्षी सुमध्या चारुहासिनी ।
सैरन्ध्री द्रौपदी राजन्यस्याऽर्थे कीचका हताः ॥ ८ ॥
अर्जुनोऽहं महाराज व्यक्तं ते श्रोत्रमागतः ।
भीमादवरजः पार्थो यमाभ्यां चापि पूर्वजः ॥ ९ ॥
उषिताः स्मो महाराज सुखं तव निवेशने ।
अज्ञातवासमुषिता गर्भवास इव प्रजाः ॥ १० ॥
वैशम्पायन उवाच—यदाऽर्जुनेन ते वीराः कथिताः पञ्च पाण्डवाः ।
तदाऽर्जुनस्य वैराटिःकथयामास विक्रमम् ॥ ११ ॥
पुनरेव च तान्पार्थान्दर्शयामास चोत्तरः ॥ १२ ॥
उत्तर उवाच—य एष जाम्बूनदशुद्धगौरतनुर्महासिंह इव प्रवृद्धः ।
प्रचण्डघोणः पृथुदीर्घनेत्रस्ताम्रायताक्षः कुरुराज एषः ॥ १३ ॥

हे दोघे भरतकुलश्रेष्ठ, मनोहर वेष व आभरणें घातलेले, भाग्यशाली सुंदर असून सहस्रावधि महारथ्यांमध्यें श्रेष्ठ आहेत ( ७ ). जिच्याकरितां कीचकांचा वध झाला, ती ही जी, पद्मनयना, सिंहकटी, चारुहासिनी सैरंध्री, तीच द्रौपदी होय ( ८ ). महाराजा, मी स्वतः अर्जुन आहें ही गोष्ट तुला कळली आहे, हें उघड आहे. मी भीमापेक्षां लहान व नकुल-सहदेवांपेक्षां वडील आहें ( ९ ). महाराजा, तुझ्या वाड्यांत आम्हीं मोठ्या सुखानें दिवस काढिले. गर्भांत वास करणाऱ्या संततीप्रमाणें आम्ही आपल्या घरीं अज्ञातवास काढला" ( १० ).

**वैशंपायन** म्हणाला:—अर्जुनानें ते पांच पांडव वीर अमुक म्हणून सांगितले, तेव्हां उत्तरानें लागलींच अर्जुनाचा पराक्रम वर्णिला ( ११ ). आणि त्यानें पुनः ते पांचहि पांडव विराट राजास दाखविले ( १२ ).

**उत्तर** म्हणाला:—"जांबूनद सुवर्णाप्रमाणें ज्याच्या देहाची कांती गौर आहे, सिंहाप्रमाणें जो पुष्ट आहे, ज्याचा नाकाचा दांडा प्रचंड आहे, ज्याचे नेत्र विशाल व दीर्घ आहेत आणि ज्याचे नेत्रप्रांत ताम्र आहेत, तो हा कौरवाधिपति युधिष्ठिर होय (१३).

अयं पुनर्मत्तगजेन्द्रगामी प्रतप्तचामीकरशुद्धगौरः ।
पृथ्वायतांसो गुरुदीर्घबाहुर्वृकोदरः पश्यत पश्यतैनम् ॥ १४ ॥
यस्त्वेव पार्श्वेऽस्य महाधनुष्माञ्श्यामो युवा वारणयूथपोपमः ।
सिंहोन्नतांसो गजराजगामी पद्मायताक्षोऽर्जुन एष वीरः ॥ १५ ॥
राज्ञः समीपे पुरुषोत्तमौ तु यमाविमौ विष्णुमहेन्द्रकल्पौ ।
मनुष्यलोके सकले समोऽस्ति ययोर्न रूपे न बले न शीले ॥ १६ ॥
आभ्यां तु पार्श्वे कनकोत्तमाङ्गी यैषा प्रभा मूर्तिमतीव गौरी ।
नीलोत्पलाभा सुरदेवतेव कृष्णा स्थिता मूर्तिमतीव लक्ष्मीः ॥ १७ ॥
वैशंपायन उवाच— एवं निवेद्य तान्पार्थान्पाण्डवान्पञ्च भूपतेः ।
ततोऽर्जुनस्य वैराटिः कथयामास विक्रमम् ॥ १८ ॥
उत्तर उवाच— अयं स द्विषतां हन्ता मृगाणामिव केसरी ।
अचरद्रथवृंदेषु निघ्नंस्तांस्तान्वरान्रथान् ॥ १९ ॥

मस्तहत्तीप्रमाणें चालणारा, तापलेल्या सुवर्णाप्रमाणें शुद्ध गौरवर्णाचा, विशाल व दीर्घ स्कंध असलेला आणि पुष्ट व दीर्घ बाहूंचा, असा हा वृकोदर; याला पुनः पुनः पहा (१४). आतां ह्याच्या बाजूस, मोठें धनुष्य घेऊन बसलेला, नीलकांति असलेला, गजेंद्राप्रमाणें शोभणारा, सिंहासारखे उन्नत स्कंध असलेला व ऐरावताप्रमाणें चालणारा, हा कमलनेत्र अर्जुन होय (१५). तसेंच राजाच्या जवळ बसलेले हे दोघे जुळे वीरपुंगव, विष्णु व महेंद्र यांची बरोबरी करणारे, नकुल व सहदेव होत. बल, शील व रूप ह्यांमध्यें ह्यांची बरोबरी मनुष्य लोकांत कोणीही करणारा नाहीं (१६). आणि ह्यांच्या बाजूला, जिचें अंग सुवर्णोपम[1] देदीप्यमान आहे, जी प्रत्यक्ष मूर्तिमंत गौरी (?) प्रभा आहे, जिची अंगकांति नील कमलासारखी आहे, जी सुरांच्या देवतेसारखी प्रत्यक्ष लक्ष्मीप्रमाणें भासणारी, ही द्रौपदी होय" (१७).

**वैशम्पायन** म्हणाला:—ह्याप्रमाणें उत्तरानें पांचहि पांडव विराटराजास दाखवून दिल्यावर अर्जुनाचा पराक्रम त्यास सांगितला (१८).

**उत्तर** म्हणाला:—"सिंह ज्याप्रमाणें मृगांचा फन्ना करितो, त्याप्रमाणें ह्या अर्जुनानें शत्रूंना ठार केलें. त्या श्रेष्ठरथ्यांचा वध करीत त्या रथसैन्यामध्यें

१ कनकोपम पिंवळावर्ण न घेतां, देदीप्यमान वर्ण असा अर्थ घेतला पाहिजे; कारण पुढेंच द्रौपदीचा वर्ण नील दिला आहे.

अनेन विद्धो मातङ्गो महानेकेषुणा हतः ।

सुवर्णकक्षः संग्रामे दन्ताभ्यामगमन्महीम् ॥ २० ॥

अनेन विजिता गावो जिताश्च कुरवो युधि ।

अस्य शङ्खप्रणादेन कर्णौ मे बधिरीकृतौ ॥ २१ ॥

वैशंपायन उवाच— तस्य तद्वचनं श्रुत्वा मत्स्यराजः प्रतापवान् ।

उत्तरं प्रत्युवाचेदमभिपन्नो युधिष्ठिरे ॥ २२ ॥

प्रसादनं पाण्डवस्य प्राप्तकालं हि रोचये ।

उत्तरां च प्रयच्छामि पार्थाय यदि मन्यसे ॥ २३ ॥

उत्तर उवाच— आर्याः पूज्याश्च मान्याश्च प्राप्तकालं च मे मतम् ।

पूज्यन्तां पूजनार्हाश्च महाभागाश्च पाण्डवाः ॥ २४ ॥

विराट उवाच— अहं खल्वपि संग्रामे शत्रूणां वशमागतः ।

मोक्षितो भीमसेनेन गावश्चापि जितास्तथा ॥ २५ ॥

ह्या घुसला ( १९ ). ह्यानेंच युद्धामध्यें सुवर्णाची झूल घातलेल्या एका प्रचंड हत्तीवर एकच बाण टाकून त्याला ठार केलें, तेव्हां त्यानें दोन्ही दांत जमिनीस टेकिले ( २० ). ह्यानेंच गाई जिंकून आणिल्या व कौरवांना जिंकलें; ह्याच्या शंखनादानें माझे कान बहिरे झाले " ( २१ ).

वैशंपायन म्हणाला:—उत्तराचें तें भाषण ऐकून प्रतापशाली मत्स्यराजास युधिष्ठिराचा अपराध केलेला वाटून तो उत्तरास उत्तर देत म्हणाला(२२), "उत्तरा, ह्यासमयीं पांडुपुत्र युधिष्ठिराची कृपा संपादन करणें मला बरें वाटतें; आणि जर तुला मान्य असेल तर अर्जुनाला उत्तरा समर्पण करतों" (२३).

उत्तर म्हणाला:—"हे महाभाग्यवान् पांडव श्रेष्ठ, वंद्य व मान्य असेच आहेत. या पूजनास योग्य सत्पुरुषांचा यावेळीं असा सत्कार व्हावा हें मला योग्य वाटतें" ( २४ ).

विराट म्हणाला:—"मीहि खरोखर संग्रामामध्यें शत्रूंच्या तावडींत सांपडलों होतों, परंतु भीमसेनानें माझी सुटका केली व गाईंहि जिंकल्या ( २५ ).

एतेषां बाहुवीर्येण अस्माकं विजयो मृधे ।
एवं सर्वे सहामात्याः कुन्तीपुत्रं युधिष्ठिरम् ।
प्रसादयामो भद्रं ते सानुजं पाण्डवर्षभम् ॥ २६ ॥
यदस्माभिरजानाद्भिः किंचिदुक्तो नराधिपः ।
क्षन्तुमर्हति तत्सर्वं धर्मात्मा ह्येष पाण्डवः ॥ २७ ॥

वैशम्पायन उवाच—

ततो विराटः परमाभितुष्टः समेत्य[1] राजा समयं चकार ।
राज्यं च सर्वं विससर्ज तस्मै सदण्ड[2]कोशं सपुरं महात्मा ॥ २८ ॥
पाण्डवांश्च ततः सर्वान्मत्स्यराजः प्रतापवान् ।
धनंजयं पुरस्कृत्य दिष्ट्या दिष्ट्येति चाऽब्रवीत् ॥ २९ ॥
समुपाघ्राय मूर्द्धानं संश्लिष्य च पुनः पुनः ।
युधिष्ठिरं च भीमं च माद्रीपुत्रौ च पाण्डवौ ॥ ३० ॥
नाऽतृप्यद्दर्शने तेषां विराटो वाहिनीपतिः ।
स प्रीयमाणो राजानं युधिष्ठिरमथाऽब्रवीत् ॥ ३१ ॥

ह्या वीरांच्या पराक्रमानेंच आम्हांस युद्धांत जय मिळाला. ह्यासाठीं आपण सर्व प्रधानादिकांसह ह्या पांडवश्रेष्ठ धर्मराजाची अनुजांसह कृपा जोडूं. तुझें कल्याण असो (२६). जर आम्हांकडून अज्ञानामुळें धर्मराजाला उद्देशून कांहीं वावगा शब्द गेला असेल, तर तें सर्व त्यानें क्षमा करावें; कारण हा पांडव धर्मात्मा आहे" ( २७ ).

**वैशंपायन** म्हणाला:—नंतर विराटराजानें मोठ्या आनंदानें आपल्या पुत्रांशीं मिळून विचार ठरविला आणि सैन्यें व कोश यांसह व पुरासह राज्य त्या महात्म्यानें युधिष्ठिराला अर्पण केलें ( २८ ). त्यावेळीं तो प्रतापशाली विराटराजा, सर्व पांडवांना व विशेषेंकरून अर्जुनास अनुलक्षून म्हणाला, "मी किती दैववान् आहें बरें ! आज माझें भाग्यच उदयास आलें !" ( २९ ) नंतर त्यानें युधिष्ठिर, भीम, व माद्रीचे पुत्र नकुल व सहदेव ह्यांच्या मस्तकांचें अवघ्राण करून त्यांस पुनः पुनः आलिंगन दिलें ( ३० ). त्यांना पुनः पुनः पाहून त्याचें समाधान होईना. तेव्हां तो अखेरीस प्रेमातिशयानें धर्मराजास

१ समेत्य पुत्रेण समयं कृतवान् ( नी. ) २ दण्ड–सैन्य अर्थ घ्यावा. ( नी. ) मुग्ध आहे.

दिष्ट्या भवन्तः संप्राप्ताः सर्वे कुशलिनो वनात् ।
दिष्ट्या सम्पालितं कृच्छ्रमज्ञातं वै दुरात्मभिः ॥ ३२ ॥
इदं च राज्यं पार्थाय यच्चाऽन्यदपि किंचन ।
प्रतिगृह्णन्तु तत्सर्वं पाण्डवा अविशङ्कया ॥ ३३ ॥
उत्तरां प्रतिगृह्णातु सव्यसाची धनञ्जयः ।
अयं ह्यौपयिको[1] भर्त्ता तस्याः पुरुषसत्तमः ॥ ३४ ॥
एवमुक्तो धर्मराजः पार्थमैक्षद्धनंजयम् ।
ईक्षितश्चाऽर्जुनो भ्रात्रा मत्स्यं वचनमब्रवीत् ॥ ३५ ॥
प्रतिगृह्णाम्यहं राजन्स्नुषां दुहितरं तव ।
युक्तश्चाऽऽवां हि संबन्धो मत्स्यभारतयोरपि ॥ ३६ ॥ २२३२

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां विराटपर्वणि वैवाहिक-
पर्वणि उत्तराविवाहप्रस्तावे एकसप्ततितमोऽध्यायः ॥ ७१ ॥

म्हणाला, ( ३१ ) “आपण सर्वांनीं वनवास सुखरूपपणें पार पाडला, व त्या अधम कौरवांस कळूं न देतां अज्ञातवासाचे दिवसहि घालविले, हें मोठें सुदैव होय ( ३२ ). हें राज्य व इतर जें कांहीं माझें म्हणून आहे, तें सर्व मी पृथापुत्र धर्मराजाला अर्पण करीत आहें, तर पांडवांनीं तें निःशंकपणें स्वीकारावें ( ३३ ). माझी कन्या उत्तरा हिचा सव्यसाची अर्जुनानें स्वीकार करावा, कारण तिला हा पति उचित आहे” ( ३४ ). विराटाची प्रार्थना ऐकून युधिष्ठिरानें अर्जुनाकडे पाहिलें, तेव्हां अर्जुन भावाच्या पाहण्यावरून मत्स्यराजास म्हणाला, ( ३५ ) “राजा, तुझ्या कन्येचा मी सून म्हणून स्वीकार करतों. आपणां मत्स्य–भारतांचा वैवाहिक संबंध घडून येणें योग्य आहे” ( ३६ ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील वैवाहिक–उपपर्वांत उत्तरेच्या
विवाहाच्या प्रस्तावनेविषयीं ७१ वा अध्याय संपला.

१ औपयिकः उचितः ( नी. )

# अध्याय ७२

[ अभिमन्यु व उत्तरा यांचा विवाह ]

**विराट उवाच**—किमर्थं पाण्डवश्रेष्ठ भार्यां दुहितरं मम।
प्रतिग्रहीतुं नेमां त्वं मया दत्तामिहेच्छसि ॥ १ ॥
**अर्जुन उवाच**—अन्तःपुरेऽहमुषितः सदा पश्यन्सुतां तव।
रहस्यं च प्रकाशं च विश्वस्तां पितृवन्मयि ॥ २ ॥
प्रियो बहुतमश्चाऽऽसं नर्त्तको गीतकोविदः।
आचार्यवच्च मां नित्यं मन्यते दुहिता तव ॥ ३ ॥
वयस्थया तया राजन्सह संवत्सरोषितः।
अतिशङ्का भवेत्स्थाने तव लोकस्य वा विभो ॥ ४ ॥
तस्मान्निमन्त्रयेऽयं ते दुहितां मनुजाधिप।
शुद्धो जितेन्द्रियो दान्तस्तस्याः शुद्धिः कृता मया ॥ ५ ॥
स्नुषायां दुहितुर्वापि पुत्रे चाऽऽत्मनि वा पुनः।
अत्र शङ्कां न पश्यामि तेन शुद्धिर्भविष्यति ॥ ६ ॥

**विराट** म्हणाला:—"पांडवश्रेष्ठा, मीं अर्पण केलेल्या ह्या माझ्या कन्येचा 'भार्या' म्हणून स्वीकार करण्याची तुझी कां बरें इच्छा नाहीं?" ( १ ).

**अर्जुन** म्हणाला:—"तुझ्या अंतःपुरांत मी रहात असल्यामुळें तुझी कन्या नेहमीं माझ्या दृष्टीपुढें असे; आणि तिनें गुप्तपणें व उघडपणें माझ्यावर पित्याप्रमाणें विश्वास ठेविला ( २ ). गायनकलेंत निपुण असलेला मी नृत्याचा शिक्षक असल्यामुळें तुझ्या कन्येचें माझ्यावर अतिशय प्रेम होतें व ती मला नेहमीं गुरूप्रमाणें मानिते ( ३ ). राजा, वयांत आलेल्या तुझ्या कन्येसह मी एक वर्ष घालविलें आहे. यामुळें (तुझी कन्या जर मी वरिली तर ) तुझ्या मनांत किंवा लोकांत योग्य रीतीनें फाजिल शंका उत्पन्न होईल ( ४ ). म्हणून ( स्नुषा या नात्यानें अंगीकार करण्यासाठीं ) मी तुझ्या दुहितेसें मागणी घालीत आहे. इंद्रियजय व मनोनिग्रह करून राहिल्यानें शुद्धि होते ( ५ ). ही माझी सून झाली असतां मला किंवा माझ्या पुत्राला अथवा तुझ्या कन्येला कोणालाहि कोणताच दोष न लागतां लोकापवादाची भीतिहि उरणार नाहीं

१ अयमहं ते दुहितां ( दुहितरं ) निमंत्रये स्नुषात्वेन याचे, किंवा दूरे हिता दुहिता ( आकारान्त शब्द ) ( नी० )

अभिशापादहं भीतो मिथ्यावादात्परन्तप ।
स्नुषार्थमुत्तरां राजन्प्रतिगृण्हामि ते सुताम् ॥ ७ ॥
स्वस्रीयो वासुदेवस्य साक्षाद्देवशिशुर्यथा ।
दयितश्चक्रहस्तस्य सर्वास्त्रेषु च कोविदः ॥ ८ ॥
अभिमन्युर्महाबाहुः पुत्रो मम विशाम्पते ।
जामाता तव युक्तो वै भर्त्ता च दुहितुस्तव ॥ ९ ॥
विराट उवाच—उपपन्नं कुरुश्रेष्ठे कुन्तीपुत्रे धनञ्जये ।
य एवं धर्मनित्यश्च जातज्ञानश्च पाण्डवः ॥ १० ॥
यत्कृत्यं मन्यसे पार्थ क्रियतां तदनन्तरम् ।
सर्वे कामाः समृद्धा मे सम्बन्धी यस्य मेऽर्जुनः ॥ ११ ॥
वैशम्पायन उवाच— एवं ब्रुवति राजेन्द्रे कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
अन्वशासत्स संयोगं समये मत्स्यपार्थयोः ॥ १२ ॥
ततो मित्रेषु सर्वेषु वासुदेवे च भारत ।
प्रेषयामास कौन्तेयो विराटश्च महीपतिः ॥ १३ ॥

व त्यामुळें, मी शुद्ध राहिल्याचें सार्थक होईल ( ६ ). शत्रुतापना विराटा, मी अभिशापास व मिथ्यापवादास फार भितो, ह्यासाठीं तुझी कन्या उत्तरा हिचा मी सून म्हणून स्वीकार करितों ( ७ ). तो प्रत्यक्ष वासुदेवाचा भाचा असून जसा कांहीं देवकुमारच आहे. माझा पुत्र चक्रपाणि श्रीकृष्णाचा अत्यंत लाडका[1] असून तो सर्व अस्त्रांमध्यें प्रवीण आहे ( ८ ). तेव्हां राजा, माझा पुत्र महाबाहु अभिमन्यु हा तुला योग्य जांवई आणि तुझ्या कन्येला अनुरूप भर्ता आहे" ( ९ ).

**विराट** म्हणाला:—"कुरुश्रेष्ठा अर्जुना, तुझ्यासारख्या धर्मनिष्ठ व ज्ञानी पुरुषास हें उचितच होय ( १० ). कुंतीपुत्रा, जें तुला संमत असेल तें कर. ज्याअर्थी माझा व्याही अर्जुन होत आहे, त्याअर्थी माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले असें मी मानितों" ( ११ ).

**वैशंपायन** म्हणाला:— विराटाचें भाषण ऐकून युधिष्ठिरानें मत्स्यराजा व पांडव ह्यांमध्यें तो वैवाहिक संबंध सुमुहूर्तावर घडवून आणण्याविषयीं आपली मान्यता दिली ( १२ ). नंतर युधिष्ठिर व विराट राजा ह्यांनीं आपापल्या सर्व आप्त सुहृदांकडे व श्रीकृष्णाकडे निमंत्रणासाठीं दूत पाठविले ( १३ ).

---

१ संबंधी-व्याही (गुजराथी, हिंदींत समधी म्हणतात.)

ततस्त्रयोदशे वर्षे निवृत्ते पञ्च पाण्डवाः ।
उपप्लव्यं विराटस्य समपद्यन्त सर्वशः ॥ १४ ॥
अभिमन्युं च बीभत्सुरानिनाय जनार्दनम् ।
आनर्तेभ्योऽपि दाशार्हानानयामास पाण्डवः ॥ १५ ॥
काशिराजश्च शैब्यश्च प्रीयमाणौ युधिष्ठिरे ।
अक्षौहिणीभ्यां सहितावागतौ पृथिवीपती ॥ १६ ॥
अक्षौहिण्या च सहितो यज्ञसेनो महाबलः ।
द्रौपद्याश्च सुता वीराः शिखण्डी चाऽपराजितः ॥ १७ ॥
धृष्टद्युम्नश्च दुर्धर्षः सर्वशस्त्रभृतां वरः ।
समस्ताक्षौहिणीपाला यज्वानो भूरिदक्षिणाः ॥
वेदावभृथसम्पन्नाः सर्वे शूरास्तनुत्यजः ॥ १८ ॥
तानागतानभिप्रेक्ष्य मत्स्यो धर्मभृतां वरः ।
पूजयामास विधिवत्सभृत्यबलवाहनान् ॥ १९ ॥
प्रीतोऽभवद्दुहितरं दत्त्वा तामभिमन्यवे ।
ततः प्रत्युपयातेषु पार्थिवेषु ततस्ततः ॥ २० ॥

याप्रमाणें तेरावें वर्ष समाप्त झाल्यानंतर ते सर्व पांडव विराटाच्या उपप्लव्य नगरांत जाऊन राहिले ( १४ ). नंतर पांडुपुत्र अर्जुनानें अभिमन्यु व कृष्ण ह्यांस व आनर्त देशांतूनहि दाशार्ह मंडळीस आणविलें ( १५ ). युधिष्ठिरावर प्रेम करणारे काशिराज व शैब्य हे राजे बरोबर दोनदोन अक्षौहिणी सैन्य घेऊन तेथें आले ( १६ ). एक अक्षौहिणी सैन्यासह महाबल यज्ञसेन तेथें आला, आणि द्रौपदीचे वीर पुत्र, अपराजित शिखंडीसह दाखल झाले ( १७ ). तसाच सर्व शस्त्रधरांत श्रेष्ठ पराक्रमी धृष्टद्युम्न तेथें आला. त्या ठिकाणीं जमलेले सर्वहि राजे मोठे शूर असून धारातीर्थीं देह टाकण्यास तयार असे होते; सर्वहि पदरीं अक्षौहिणीसेना बाळगणारे होते; ते मोठमोठे यज्ञयाग करणारे असून विपुल दक्षिणा देणारे होते; आणि सर्वहिजण वेदमन्त्रांनीं यज्ञांत अवभृथ स्नान करणारे होते ( १८ ). तेथें आलेल्या भूपतींस पाहून महाधर्मनिष्ठ विराटराजानें सेवक, सैन्य, व वाहनें यांसह त्या सर्व राजांचा यथाविधि आदरसत्कार केला (१९). अभिमन्यूला आपली कन्या देण्याचें ठरवून त्यास फार आनंद झाला ( २० ).

तत्राऽगमद्वासुदेवो वनमाली हलायुधः ।
कृतवर्मा च हार्दिक्यो युयुधानश्च सात्यकिः ॥ २१ ॥
अनाधृष्टिस्तथाऽक्रूरः साम्बो निशठ एव च ।
अभिमन्युमुपादाय सह मात्रा परन्तपाः ॥ २२ ॥
इन्द्रसेनादयश्चैव रथैस्तैः सुसमाहितैः ।
आययुः सहिताः सर्वे परिसंवत्सरोषिताः ॥ २३ ॥
दश नागसहस्राणि हयानां च दशायुतम् ।
रथानामर्बुदं पूर्णं निखर्वं च पदातिनाम् ॥ २४ ॥
वृष्ण्यन्धकाश्च बहवो भोजाश्च परमौजसः ।
अन्वयुर्वृष्णिशार्दूलं वासुदेवं महाद्युतिम् ॥ २५ ॥
पारिबर्हं ददौ कृष्णः पाण्डवानां महात्मनाम् ।
स्त्रियो रत्नानि वासांसि पृथक्पृथगनेकशः ॥
ततो विवाहो विधिवद्ववृधे मत्स्यपार्थयोः ॥ २६ ॥
ततः शङ्खाश्च भेर्यश्च गोमुखाडम्बरास्तथा ।
पार्थैः संयुज्यमानस्य नेदुर्मत्स्यस्य वेश्मनि ॥ २७ ॥

तेथें आलेल्या राजांमध्यें वनमाली वासुदेव, बलराम, हृदीकपुत्र कृतवर्मा, युयुधान, सात्यकि ( २१ ), अनाधृष्टि, अक्रूर, सांब आणि निशठ हे सुभद्रेसह अभिमन्यूला घेऊन आले होते ( २२ ). तसेंच, इंद्रसेनादिक सेवक एक वर्षपर्यंत पांडवांपासून दूर राहिले होते, ते आपआपल्या व्यवस्थित ठेवलेल्या रथांसह जमून तेथें आले ( २३ ). त्यांबरोबर दहाहजार हत्ती, एक लाख घोडे, एककोटि रथ आणि एक निखर्व पायदळ, इतकें सैन्य होतें (२४). महातेजस्वी श्रीकृष्णाच्या मागोमाग मोठे पराक्रमी वृष्णि, अंधक, व भोज ह्या कुळांतील महान् महान् वीर तेथें जमले (२५). नंतर कृष्णानें महात्म्या पांडवांना पृथक् पृथक् स्त्रिया, रत्नें व वस्त्रें हा परिवार दिला. मग विराट व पांडव ह्यांमध्यें विवाहसमारंभ यथाविधि सुरू झाला ( २६ ). पांडवांशीं संबंध जुडत असलेल्या विराटाचे घरीं शंख, नगारे, संबळ, आडंबर, वगैरे मंगलवाद्यें वाजूं

उच्चावचान्मृगाञ्जघ्नुर्मेध्यांश्च शतशः पशून्।
सुरामैरेयपानानि प्रभूतान्यभ्यहारयन्॥ २८॥
गायनाख्यानशीलाश्च नटवैतालिकास्तथा।
स्तुवन्तस्तानुपातिष्ठन्सूताश्च सह मागधैः॥ २९॥
सुदेष्णां च पुरस्कृत्य मत्स्यानां च वरस्त्रियः।
आजग्मुश्चारुसर्वाङ्ग्यः सुमृष्टमणिकुण्डलाः॥ ३०॥
वर्णोपपन्नास्ता नार्यो रूपवत्यः स्वलंकृताः।
सर्वाश्चाऽभ्यभवन्कृष्णा रूपेण यशसा श्रिया॥ ३१॥
परिवार्योत्तरां तास्तु राजपुत्रीमलंकृताम्।
सुतामिव महेन्द्रस्य पुरस्कृत्योपतस्थिरे॥ ३२॥
तां प्रत्यगृह्णात्कौन्तेयः सुतस्याऽर्थे धनञ्जयः।
सौभद्रस्याऽनवद्याङ्गीं विराटतनयां तदा॥ ३३॥
तत्रातिष्ठन्महाराजो रूपमिन्द्रस्य धारयन्।
स्नुषां तां प्रतिजग्राह कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः॥ ३४॥

लागलीं ( २७ ). लहान मोठ्या मृगांचा व शेंकडों मेध्य पशूंचा वध झाला. सुरा मैरेय इत्यादि पेयांची रेलचेल उडाली ( २८ ). गवई, कथेकरी, नट, भाट, सूत, मागध इत्यादि मंडळी स्तुतिपाठ गाऊं लागली ( २९ ). मत्स्यकुलांतील सुंदर व श्रेष्ठ स्त्रिया ( वरपक्षाच्या वऱ्हाडणी ) उत्तम रत्नकुंडलें घालून सुदेष्णेला पुढें करून आल्या ( ३० ). त्या स्त्रिया वर्ण व रूप ह्यांनीं संपन्न व शृंगार भूषणांनीं अलंकृत जरी होत्या, तरी त्या सर्वांस द्रौपदीनें आपल्या रूपानें, कांतीनें व भाग्यानें मागें टाकिलें ( ३१ ). असो. त्या सर्वजणी अलंकार घातलेल्या, महेंद्रकन्येसारख्या राजकन्या उत्तरेच्या भोंवतीं जमून पुढें आल्या ( ३२ ). अर्जुनानें सौभद्र अभिमन्यू-करितां त्या सुंदर विराटकन्या उत्तरेचा अंगीकार केला ( ३३ ). त्या ठिकाणीं इंद्रासारखा रूपवान् कुंतीपुत्र महाराज युधिष्ठिर उभा होता, त्यानेंहि त्या विराटाच्या कन्येचा ‘सून’ म्हणून स्वीकार केला ( ३४ ).

१ अभ्यभवन्=अभिभूताः ( नीः ) पण त्यापेक्षां ‘अभ्यभवन्’ च्या जागीं ‘अभ्यभवत्’ समजावें.

प्रतिग्राह्य च तां पार्थः पुरस्कृत्य जनार्दनम् ।
विवाहं कारयामास सौभद्रस्य महात्मनः ॥ ३५ ॥
तस्मै सप्त सहस्राणि हयानां वातरंहसाम् ।
द्वे च नागशते मुख्ये प्रादाद्बहुधनं तदा ॥ ३६ ॥
हुत्वा सम्यक्समिद्धाग्निमर्चयित्वा द्विजन्मनः ।
राज्यं बलं च कोशं च सर्वमात्मानमेव च ॥ ३७ ॥
कृते विवाहे तु तदा धर्मपुत्रो युधिष्ठिरः ।
ब्राह्मणेभ्यो ददौ वित्तं यदुपाहरदच्युतः ॥ ३८ ॥
गोसहस्राणि रत्नानि वस्त्राणि विविधानि च ।
भूषणानि च मुख्यानि यानानि शयनानि च ॥ ३९ ॥
भोजनानि च हृद्यानि पानानि विविधानि च ।
तन्महोत्सवसङ्काशं हृष्टपुष्टजनायुतम् ॥
नगरं मत्स्यराजस्य शुशुभे भरतर्षभ ॥ ४० ॥ [ २२६२ ]

इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां विराटपर्वणि वैवाहिकपर्वणि उत्तराविवाहे द्विसप्ततितमोऽध्यायः ॥ ७२ ॥

समाप्तं चेदं विराटपर्व ॥ [आदिपर्वतः श्लोकसंख्या २५६२५]

( याप्रमाणें ) उत्तरेचा प्रतिग्रह केल्यावर युधिष्ठिरानें श्रीकृष्णास पुढाकार देऊन तिच्याशीं महात्म्या अभिमन्यूचा विवाह करविला (३५). विराटराजानें वायुतुल्य वेगाचे सात हजार घोडे व दोनशें उत्कृष्ट हत्ती आणि विपुल धन अभिमन्यूला दिलें ( ३६ ). अग्नीमध्यें हवन करून व ब्राह्मणांचें पूजन करून विराट राजानें आपलें राज्य, सैन्य, कोश, वगैरे सर्व कांहीं पांडवांस देऊन, आपणा स्वतःलाहि त्यास अर्पण केलें ( ३७ ). विवाहसंस्कार पूर्ण झाल्यावर, धर्म राजानें कृष्णानें तेथें (अहेराकरितां) आणिलेलें सर्व धन ब्राह्मणांना वाटलें (३८). हजारों गाई, विविधरत्नें, नानाप्रकारचीं वस्त्रें, श्रेष्ठ श्रेष्ठ अलंकार, वाहनें, शय्या ( ३९ ), आणि अनेक प्रकारचे स्वादिष्ट भक्ष्य, भोज्य, पेय वगैरे पदार्थ त्यासमयीं युधिष्ठिरानें ब्राह्मणांना दिले. राजा, जिकडे तिकडे आनंदी आनंद होऊन तें विराट नगर मोठ्या उत्सवानें गजबजून गेलें ( ४० ).

याप्रमाणें महाभारताच्या विराटपर्वांतील वैवाहिक-उपपर्वांत उत्तरेच्या विवाहाविषयीं ७२ वा अध्याय संपला.

विराटपर्व समाप्त झालें.

# परिशिष्ट

## या भागांत आलेल्या पारिभाषिक व कठिण शब्दांचा कोश.

**अक्षय्य**—(वि.) १ क्षय न पावणारें २ अनन्त.

**अग्निहोत्र**—(न.) १ शास्त्रोक्त अग्नि ठेवून होम करणें; २ अग्निकुंड.

**अंगद**—(न.) दंडांतील दागिना.

**अतिरथ**—(पु.) मोठा योद्धा.

**अद्वार**—(न.) द्वार नव्हे तें; भलता रस्ता [अ+द्वार.]

**अधिष्ठात्री**—(वि.) देखरेख करणारी, रक्षण करणारी.

**अनघ**—(वि.) निष्पाप. [अन्+अघ. अघ (न.)=पाप.]

**अनुचर**—(पु.) १ सोबती; २ सेवक.

**अनृत**—(वि.) खोटें.

**अभिशाप**—(पु.) १ शाप; २ आरोप; ३ निंदा, आळ.

**अभ्याकर्ष**—(पु.) कुस्तींत छातीवर बुक्की मारणें.

**अमित**—(वि.) अपरिमित, अमर्याद.

**अमोघदर्शन**—(वि.) ज्यांचें दर्शन फुकट जात नाहीं–कांहीं तरी फळ देतें असे. [अमोघ=फळ देणारें.]

**अरणी**—(स्त्री.) घर्षणानें अग्नि उत्पन्न करण्याचें लांकूड.

**अलातचक्र**—(न.) कोलीत हातांत धरून गरगर फिरविलें असतां दिसणारें वर्तुळ. [**अलात** (न.) =१ कोलीत; २ मशाल.]

**अवघ्राण**—(न.) हुंगणें.

**अवराध**—(पु.) अडथळा.

**अश्वबन्ध**—(पु.) मोतद्दार.

**ऊर्ध्वरेता**—(पु.) आजन्म ब्रह्मचारी.

**ऋषभ**—(पु.) १ बैल; २ सप्तस्वरांतील दुसरा स्वर.

**कक्षा**—(स्त्री.) १ कंबर; २ बाजू.

**कंक**—(पु.) एक प्रकारचा पक्षी. [याचीं पिसें बाणाला लावीत असत.]

**कपाल**—(पु. न.) १ डोक्याची करटी २ खापर; ३ पेला; ४ झांकण.

**कला**—(स्त्री.) तीस काष्ठांइतका काळ. [**काष्ठा** शब्द पहा.]

**काष्ठा**—(स्त्री.) अठरा निमेषांइतका काळ. [**निमेष** (पु.) म्हणजे, डोळे मिटावयास लागणारा वेळ.

१८ निमेष=१ काष्ठा,
३० काष्ठा=१ कला,
३० कला=१ क्षण,
१२ क्षण=१ मुहूर्त,
३० मुहूर्त=१ अहोरात्र.]

**कृष्णागरु**—(पु.) एक प्रकारचा चंदन.

**केयूर**—(पु. न.) वांकी; बाजूबंद.

**क्षुर**—(पु.) १ वस्तरा; २ एक प्रकारचा बाण.

**क्षुरप्र**—(पु.) नालाकृति अग्राचा बाण.

**गतासु**—(वि.) गतप्राण, ठार. [गत+असु. असु (पु.)=प्राण]

**गांधार**—(पु.) सप्तस्वरांपैकीं तिसरा स्वर.

**गृहमेध**—(पु.) गृहस्थधर्म (अग्निहोत्र इत्यादि.)

**ज्योत्स्ना**—(स्त्री.) चांदणें.

**तलत्राण**—(न.) चामड्याचा हातमोजा [तल (पु. न.)=तळवा.]

**तरस्वी**—(वि.) १ वेगवान् २ बलिष्ठ.

**तोमर**—(पु. न.) मुसळण्याच्या रवी-सारखें एक प्रकारचें शस्त्र.

**दुर्धर्ष**—( वि. ) १ अजिंक्य; २ दुर्गम; ३ गर्विष्ठ.
**दुर्योधन**—( वि. ) अजिंक्य.
**दृढमुष्टि**—( वि. ) १ ज्याची मूठ बळकट आहे असा; २ कृपण.
**द्वैरथ**—( न. ) दोन रथ्यांचें युद्ध.
**धूर्त**—( पु. ) जुगार खेळणारा.
**नतपर्व**—( वि. ) ज्याचा सांधा चपटा, सपाट, आहे असा ( बाण ). [ नत+पर्वन्. नत ( वि. )=चपटा, सपाट; पर्वन् ( न. )=सांधा, पेर. ]
**नाराच**—( पु. ) १ लोखंडी बाण; २ बाण.
**नितंब**—( पु. ) ( स्त्रियांचें ) ढुंगण.
**पणव**—( पु. ) ढोल, पडघम.
**पुंख**—( पु. न. ) बाणाचें मूळ.
**पृषत्क**—( पु. ) बाण.
**प्रतिग्रह**—(पु.) १ स्वीकार; २ दान
**प्रतिसंधान**—( न. ) पुन्हा जोडणें.
**प्रदोष**—( पु. ) १ तिनिसांज; २ सूर्यास्तानंतरच्या दोन घटिका; ३ रात्र.
**प्रास** ( पु. ) भाला.
**प्रस्थान**—( न. ) प्रयाण; निघणें.
**प्रोक्षण**—( न. ) १ शिंपडणें; २ पवित्र करणें.
**बल्लव**—( पु. ) १ गवळी; २ आचारी
**भल्ल**—( पु. ) १ एक प्रकारचा बाण; २ बाणाचें पातें, शल्य.
**भेरी**—( स्त्री. ) नौबद, नगारा.
**मनस्विन्**—( वि. ) १ शहाणा; २ सावध ३ तेजस्वी, बाणेदार.
**मनास्विनी**—( स्त्री. ) मानी स्त्री.
**मनोज्ञ**—( वि. ) सुंदर.
**मागध**—( पु. ) १ वैश्य व क्षत्रिय यांचे पुत्र; २ भाट.
**मूर्छना**—(स्त्री.) १ बेशुद्धि; २ (संगीतांत) स्वराचा चढउतार; ३ ( संगीतांत ) प्रत्येक दोन स्वरांमधले तीन तीन सूक्ष्म स्वरांश.
**मूर्धाभिषिक्त**—( वि. ) राज्याभिषेक केलेला.
**लक्ष्म**—( न. ) १ खूण; २ डाग.
**विपाठ**—( पु. ) रुंद फाळाचा बाण.
**विकर्ष**—( पु. ) ओढणें.
**विशिख**—( पु. ) बाण.
**वेदि** ( स्त्री. ) १ यज्ञांतील संस्कृत भूमि; २ यज्ञकुंड; ३ बहुलें.
**व्यंजना**—( स्त्री. ) १ गर्भितार्थ; २ व्याजोक्ति.
**शक्ति**—( स्त्री. ) एक प्रकारचें शस्त्र.
**शलभ**—( पु. ) १ टोळ; २ पतंग.
**श्यालक** ( पु. ) बायकोचा भाऊ, मेहुणा.
**संधि**—( पु. ) मैत्री, सख्य.
**समरदुर्जय**—( वि. ) युद्धांत अजिंक्य.
**सुव्रत**—( वि ) चांगल्या वर्तनाचा.
**सुव्रत**—( पु. ) ब्रह्मचारी.
**सूत**—( पु ) १ सारथि; २ सुतार; ३ स्तुतिपाठक; ४ पौराणिक; ५ क्षत्रिय व ब्राह्मणी यांचा पुत्र.
**सैरंध्री**—( स्त्री. ) २ अंतःपुरांतील दासी; २ परगृहीं काम करणारी स्वतंत्र स्त्री; ३ द्रौपदी.
**स्नातक**—( पु. ) १ ब्रह्मचर्यव्रत संपविलेला द्विज; २ भिक्षेला पात्र मनुष्य.
**स्रू किंवा स्रुवा**—( स्त्री. ) अग्नींत तूप इ. टाकण्याची वटपत्राच्या आकाराची लांकडी पळी.
**ह्री**—( स्त्री. ) लज्जा, विनय.

# सार्थ-महाभारत, विराटपर्व

---

## समालोचन

महाभारताच्या अठरा पर्वांपैकीं विराटपर्व हें चौथें असून तें आदिपर्व व वनपर्व यांहून फारच ल्हान आहे. किंबहुना सभापर्वाहूनहि तें लहान आहे; परंतु महत्वानें तें सभापर्वाइतकेंच मोठें आहे. यांत तत्वज्ञानाचा किंवा धर्माचा ऊहापोह, प्रसंग नसल्यानें नाहीं, हें खरें; पण पांडवांच्या इतिहाससंबंधानें अत्यंत महत्वाचा भाग म्हणजे भारतीयुद्धाचें प्रसिद्ध केलेलें कारण व तद्विषयक तंटा यांतच आहे. युद्धाला मोठ्या बलिष्ठ राष्ट्रांना सुद्धां कांहीं तरी कारण सांगावें लागतें. दुर्योधन भाऊबंदकीच्या द्वेषानें पांडवांस राज्य परत देण्यास तयार नव्हताच; पण राज्य न देण्यास कांहीं तरी सबब पुढें करावयास हवी होती. तेव्हां "तुम्ही १३ वर्षांच्या आंत प्रकट झालां म्हणून पुन्हा वनवास भोगा," असें त्यानें सांगितलें. पण पांडवांनीं १३ वर्षें चान्द्रमानानें पुरीं केलीं, असा निकाल भीष्मानें दिला. तेव्हां चान्द्रवर्षें कां धरावीं, हा महत्वाचा ऐतिहासिक प्रश्न, या पर्वांत उत्थित होतो. त्याचा विस्तृत विचार ज्योतिषशास्त्रदृष्ट्या व इतिहासदृष्ट्या आपणास या समालोचनांत शेवटीं करावा लागेल. या कारणानें या पर्वाचें महत्व फार मोठें आहे.

अज्ञातवास करण्याची शर्त ही मूळच्या पांडवांच्या इतिहासांत होती काय? कारण ही कल्पना कादंबरींतल्याप्रमाणें आहे. शकुनि जुवेबाज असला तरी कादंबरीकार नव्हता. त्यास ती सुचणें शक्य दिसत नाहीं. शिवाय द्रौपदीसारखी राज्यैश्वर्य भोगलेली आणि सहस्र बायकांत सुंदर असलेली स्त्री, सुदेष्णेला कशी ओळखूं आली नाहीं, वगैरे शंका उपस्थित होऊन हा कथाभाग मूळ व्यासकथेंत नसावा असें वाटतें. तरी पण तो फार जुना वैशंपायनाच्याच वेळचा असून त्यामुळेंच कीचकवधाची सुंदर गोष्ट या पर्वांत उत्पन्न झाली आहे, व नाटककारांनीं तिचा उपयोगहि केला आहे. शिवाय बृहन्नडेची चमत्कारिक कथा आणि विराटाचा पांडवांशीं वैवाहिक संबंध या कारणावरूनच उत्पन्न झाला असल्यामुळें, ही अज्ञातवासाची गोष्ट वैशंपायनाइतकी निःसंशय जुनी आहे. त्यामुळें महाभारतांत सर्वत्र दिसून येणारें कथारम्यत्व, व्यावहारिक शिक्षण आणि सुबोधभाषासौन्दर्य,

या पर्वांतहि दिसून येणारें आहे. राजदरबारांत दरबाऱ्यांनीं व नोकरांनीं कसें वागावें याबद्दल धौम्याचा राजकीय उपदेश, प्रत्यक्ष युधिष्ठिर कसा वागला व द्रौपदीस त्यानें कसें समजाविलें, इत्यादि व्यवहारदृष्टीनें नेहमींच्या संसारांत उपयोगी पडणारे प्रसंग यांत आहेत. तात्पर्य, हा अज्ञातवासाचा कथाभाग मागून प्रक्षिप्त झाला आहे, अशी जी कित्येकांची शंका आहे, ती योग्य नाहीं. प्रास्ताविका-दाखल इतकें सांगून आपण या पर्वाच्या समालोचनाच्या विषयांकडे वळूं.

## ग्रंथपरीक्षण.

विराटपर्वांत अध्याय ६७ आणि श्लोक २०५० आहेत, असें सौतीनें अ. २ आदिपर्व ( पर्वसंग्रहपर्व ) यांत सांगितलें आहे ( श्लोक २१६ ). हल्लीं छापलेल्या नीळकंठी प्रतींत अध्याय ७२ असून श्लोक २२७२ आहेत, हें निर-निराळ्या अध्यायांतील श्लोकांची बेरीज केल्यास दिसेल. प्रारंभींच सौतीनें ही काळजी घेतली कीं, जसें त्यानें मूळ २४००० भारताचें लक्षश्लोकात्मक महा-भारत बनविलें, त्याप्रमाणें पुढें कोणी तें आणखी वाढवूं नये म्हणून, प्रत्येक पर्वाची श्लोकसंख्या व अध्यायसंख्या ( Table of Contents रूपी ) दुसऱ्या अध्यायांत प्रथमच दिली. असें असतां प्रत्येक प्रतींत, प्रत्येक पर्वांत अधिक अध्याय कसे सांपडतात, व श्लोकहि अधिक कसे सांपडतात, हें एक गूढ आहे. अशा रीतीनें, अनुक्रमणिका प्रथम देऊन, भलतींच पानें किंवा विषय पुढें ग्रंथांत दिलेले आढळतील तर हल्लीं कोणीहि असें पुस्तक हातीं धरणार नाहीं. असो, हा प्रक्षेप स्पष्ट आहे तरी महाभारत म्हणून तो सौतीनंतर झालेला असूनहि लोकांनीं संग्रह करून ठेवला, व तो या पुस्तकांतहि वाचकांसमोर आम्हांस ठेवावा लागला आहे. कारण, कोणते अध्याय सौतीनंतरचे किंवा कोणते श्लोक प्रक्षिप्त हें सांगणें किंवा निश्चित करणें असंभाव्य, किंबहुना अशक्य, निदान धाडसाचें आहे. यासाठीं नीळकंठी प्रत जशीच्या तशी वाचकांसमोर ठेविली आहे. असें आहे तरी, कांहीं अध्याय व श्लोक सौतीनंतरचे प्रक्षिप्त कसे दिसतात, हें दाखवून देण्यासारखें आहे.

या पर्वांतील लहान लहान अध्याय तपासून पाहिले तर अध्याय २७ दहा श्लोकांचाच असून तो मागच्या किंवा पुढच्या अध्यायांत जाण्यासारखा आहे. अध्याय ४० केवळ आठ श्लोकांचा निराळा व्यर्थ दिसतो. अध्याय ६३ चौदा श्लोकांचा असून तोहि मागील अध्यायांत जाऊं शकतो. किंबहुना मागील अध्या-यांतील युद्धवर्णन फाजील, अनवश्यक असून त्यांत नदीचें रूपक पूर्वीं आलेलें पुन्हा

उगीच लांबविलेलें आहे. तें कोणातरी फाजिल प्रक्षेपकानें सौतीनंतर आंत घातलें आहे. तसेंच या पर्वांतील एकंदर युद्धवर्णनासंबंधें असें म्हणतां येतें कीं, त्यांतील वर्णनें तेच तेच दृष्टान्त देऊन उगीच फुगविलेलीं, आणि म्हणून नीरस झालेलीं दिसतात. त्याच त्याच उपमा पुन्हा पुन्हा प्रत्येक युद्धवर्णनांत येतात. वृत्रवासव, देवदानव, मेघपर्वत यांच्या युद्धासारखें युद्ध झालें, या उपमांत मौज नाहींच, पण अशा प्रसंगीं अल्पप्रतिभेबद्दल कवीची कींव येते. अतिशयोक्ति हा एक अलंकार आहे; पण अतिशयोक्तीचीहि जेव्हां अतिशयोक्ति होते, तेव्हां हा अलंकार दुसऱ्या अर्थानें, म्ह० 'पुरे बाबा' (अलं) अशा अर्थानें वाचकांस त्रास देतो. "सर्व आकाश बाणांनीं इतकें भरून गेलें कीं, सूर्य झांकून गेला," "वायूला सुद्धां फिरकण्यास जागा राहिली नाहीं," वगैरे वर्णनें थट्टाच वाटूं लागतात; आणि इतके बाण कशासाठीं सोडले याचेंहि आश्चर्य वाटतें. कारण शत्रुयोद्धा तर मरतच नाहीं. शिवाय नुसते पोकळींत बाण कशावरहि लक्ष न देतां कां मारीत, आणि असे बाण फुकट तरी कां दवडीत, ही पृच्छा होऊन कवीचे शब्द मात्र फुकट जात आहेत असें वाटूं लागतें. अध्याय ५६ हा निरर्थक तर आहेच, पण अतिशयोक्तीच्या अतिशयोक्तीनें भरला आहे. आकाशांत देव, गन्धर्व, यक्ष हे अर्जुन व कृप यांचें युद्ध पाहण्यास जमले व तेहि आपआपलीं विमानें घेऊन! (पण आकाशांत बाण भरले असल्यानें विमानें वरतीच तरंगून त्यांतून खालचें कांहींच दिसलें नसावें). त्यांत इन्द्राच्या विमानाचें वर्णन करतांना त्यास एक कोट सोन्याचे खांब होते असें म्हटलें आहे. पण एवढ्यावर सन्तुष्ट न होतां प्रक्षेपक श्लोकाच्या उत्तरार्धांत असें म्हणतो कीं, 'दुसरी एक कोट खांबाची रांग रत्नाची होती.' इन्द्राच्या विमानांत अनेक प्राचीन राजे (जे स्वर्गांत इन्द्रसभेंत बसत नाहींत असें सभापर्वांत आलें आहे) वसुमना, शिबि, मनु, पूरु, भानु (चालली राजांच्या नांवाची गर्दी) युद्ध पाहाण्यास आले होते, या वर्णनावरून तर हा प्रक्षेप सौतीनंतरचा ठरतो. कारण, शिवाय अनेक देवतांचीं विमानें होतीं, त्यांत यमाचेंहि होतेंच. त्याच्या विमानांत हे राजे बसावयास हवे होते. तात्पर्य, युद्धवर्णन सुटून या अध्यायांत देवांच्या विमानांचें, देवांचें व इन्द्राचें उगीच वर्णन लांबलचक आलें आहे. बहुधा हा सबंध अध्याय प्रक्षिप्त असावा; तो सौतीच्या हातचा खास नसावा.

पुढें भारतीयुद्धाच्या वर्णनांत भीष्म, द्रोण, कर्ण वगैरे पर्वांत, युद्धांची लांबलचक वर्णनें येणार आहेत, त्यांच्या समालोचनांत, युद्धें कशीं होत असत, इत्यादि

गोष्टींचें विवेचन येणारच आहे. येथें एवढ्याच गोष्टीचा उल्लेख जरूर आहे कीं, एकट्या अर्जुनानें हजारों सैनिकांनीं भरलेल्या कौरवसेनेशीं युद्ध केलें, तें बहुधा या तत्वावर कीं, त्यावेळीं रथीरथींचें युद्ध लागलें म्हणजे इतर सैनिक प्रेक्षक बनत.* या तत्वामुळेंच या भागांत संकुलयुद्धाचें फारसें वर्णन नाहीं. तथापि प्रत्येक प्रसिद्ध योद्ध्याशीं अर्जुनाचें द्वंद्वयुद्ध होण्याची अवश्यकता दिसत नाहीं; परंतु प्रक्षेपकानें असा हेतु धरून कृप, द्रोण, अश्वत्थामा, दुर्योधन, भीष्म व कर्ण ( याचें दोनदां प्रारंभीं व शेवटीं ) यांशीं निरनिराळ्या अध्यायांत अर्जुनाचें द्वन्द्वयुद्ध वर्णन केलें आहे; आणि तेंहि त्याच त्याच कल्पनांनीं व दृष्टांतांनीं केलें आहे. यामुळें हे युद्धाचे अध्याय ५३ पासून ६६ पर्यंतचे बहुतेक नीरस वाटतात. यांतील कांहीं अध्यायांत प्रक्षेपकास प्राचीनकाळच्या युद्धाच्या तऱ्हेची माहितीहि दिसत नाहीं. बाणांचीं ठराविक वर्णनें ' सुवर्णपुंख ' ' नतपर्व ' ' गार्ध्रपत्र ' ' शिलाशित ' वगैरे देऊन, मध्यें मध्यें भल्लबाणांची योजना केलेली आहे. मोठमोठे भाल्यासारखे बाण रथांत असत कीं नाहीं, याची शंकाच आहे. किंबहुना रथांत किंवा भात्यांत हजारों बाण असणें शक्यच नाहीं. अस्त्रसामर्थ्यानें हजारों बाण उत्पन्न होत असत अशी कल्पना केलेली आहे. अर्जुनाचें भाते अक्षय्य होते ही गोष्ट इतर पर्वांतहि सांगितलेली आहे. पण अशी दैवी शक्तीनें उत्पन्न होणारी बाणांची असंख्य संख्या दर युद्धाच्या वेळीं या पर्वांत वापरलेली दिसते, व यामुळें या युद्धवर्णनांच्या अध्यायांत बराच प्रक्षेप झाला असावा, निदान शंभर दोनशें श्लोकांचा तरी झाला असावा असें म्हणावें लागतें. अध्याय ५८ तर अगदींच त्याच त्याच कल्पनांनीं भरलेला आहे. द्रोण व अर्जुन यांचें युद्ध त्यांत वर्णिलें आहे, म्हणून हा मुद्दाम वाढविलेला निःसंशय दिसतो.

या युद्धवर्णनांतील श्लोकांत कित्येक जागीं आर्ष अक्षम्य प्रयोग आहेत, यावरूनहि हा सौतीनंतरचा प्रक्षेप दिसतो. अध्याय ६७श्लोक ८ यांत "आपतन्तं सैन्यं " असा प्रयोग होऊन " आपतन्तं पुंस्त्वमार्षम् " असें टीकाकारास म्हणावें लागलें. किंबहुना याच श्लोकांत मेघाची उपमा सैन्यास दोनदां दिलेली आहे. " मेघमिवापतन्तम् " असें पहिल्या चरणांत म्हणून दुसऱ्याच चरणांत "कुरुमेघ-सैन्यम् " असें म्हटलें आहे. कदाचित् येथें अपपाठ असेल. ( नी. ) येथें मुग्ध आहे. अ. ६१ श्लोक २६ मध्यें वेद्मि हें क्रियापद शेष म्हणून घ्यावें लागतें

* ग्रीक प्राचीन युद्धांतहि अशीच अट होती, असें होमरच्या ट्रोजन युद्धाच्या वर्णनावरून दिसतें.

सामान्यतः ' इति शेषः ' असें ( नी. ) म्हणतो तेथें तसा शेष सोपा व पुष्कळदां क्षम्य असतो; कारण तो शब्द गाळणें साहजिक असतें. पण ' वेद्मि ' किंवा ' शिकलों ' असा प्रत्येक ठिकाणीं शेष कवीची हीनशक्ति दाखवितो. किंबहुना स्पष्ट बोलणें म्हणजे कवि चुकला असें म्हणतां येतें. " दृढमुष्टिता इन्द्रापासून, कृतहस्तता ब्रह्मदेवापासून आणि तुमुलयुद्धांत चित्र ( युद्ध—हाहि शब्द शेष घ्यावा लागतो ) प्रजापतीपासून मी ( शिकलों ) हें जाण. " या श्लोकांत ' शिकलों ' हा शेष कसा सहज म्हणतां येईल ? ब्रह्मा आणि प्रजापति यांचा भेद कसा करावयाचा हा प्रश्न निराळाच. पुढील २७ व्या श्लोकांतहि असाच अपूर्ण प्रयोग आहे. ' अहं जित्वा ' पुढें अपेक्षित वाक्यपूरक क्रियापद नाहीं, तेव्हां ( नी. ) नें ' जित्वा ' याचा अर्थ ' जेतुं शक्तः ' असा करून त्यास कूटशब्द बनविला आहे. संस्कृत भाषेचें सामर्थ्य अगाध आहे, तरी असले प्रयोग कुरुचि उपत्न करतात, असें म्हटल्यास अयोग्य होणार नाहीं.

याच प्रकारचीं आणखी कांहीं उदाहरणें देतां येतील. ' पांडवांनां ' म्हणावयाचें असतां, " पंडूनां " असें आलें आहे. अ. ७ मध्यें ( प्रतिसंगृह्याण ) ' आसनं ' हा शेष घ्यावा लागतो (९). अ. ८ मध्यें 'लभामि' असा परस्मैपदी प्रयोग ४ मध्यें असून पुढच्या ५ व्याच श्लोकांत ' लभताम् ' असा आत्मनेपदी प्रयोग ठीक आहे. त्याचप्रमाणें या ४ थ्या श्लोकांत ' अस्य ' तीनदां आलें आहे. दोनदां तर ' नरर्षभस्य ' याकडेच घ्यावें लागतें.

## भिन्नभिन्न पाठ

पूर्वीं आदिपर्वारंभीं महाभारताच्या भिन्नभिन्न पाठांबद्दल माहिती दिलीच आहे, तिचा थोडक्यांत, येथें ग्रंथपरीक्षणांत, पुन्हा उल्लेख करणें अवश्य आहे. महाभारताचे चार पाठ आहेत असें मानतां येईल.

पहिला पाठः—मद्रासकडील दाक्षिणात्य पाठ. हा बराच फुगलेला आहे. याचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत. तामिल देशांतील कुंभकोणंची प्रत प्रसिद्ध झालीच आहे, त्यांत एक लक्षाहून अधिक बारा हजार श्लोक आहेत. दुसरी तेलंगण प्रत हल्लीं प्रसिद्ध होत आहे. यांतहि बहुतेक कुंभकोणं प्रतीप्रमाणेंच पुष्कळ प्रक्षेप आहे. तेलंगी कवि नन्नैय्यां ( इ. स. १०२२ ) यानें तेलगू भाषेंत महाभारत रचलें, तें या पाठाचें आहे असें म्हणतात. तसेंच वाडिराज यानें याच पाठावर टीका केली आहे.

दुसरा पाठः—" प्राचां. " याची कलकत्ता प्रत प्रसिद्ध झाली आहे.

तिसरा पाठः—औत्तरीय ( काश्मीरप्रत ). हा अलीकडे भांडारकर इन्स्टि-ट्यूटमधून हळूहळू प्रसिद्ध होत आहे. हा पाठ पुष्कळ कमी आहे.

चौथा पाठः—मध्यदेशीय. यांतच महाराष्ट्र पाठ घेतां येईल व याच पाठाची नीलकंठानें घेतलेली प्रत गणपत कृष्णाजीनें पोथीरूपानें छापिली.

या चारी पाठांचें तुलनात्मक कोष्टक महाभारताचे उपोद्घातांत आम्हीं दिलेंच आहे. येथें विराटपर्वासंबंधानें विस्तृत उल्लेख करूं.

मध्यदेशीय, प्राच्य व औत्तरीय पाठांत पर्वानुक्रमणींत विराटपर्वाचे ६७ अध्याय व २०५० श्लोक सांगितले आहेत; पण नीलकंठी छापील प्रतींत प्रत्यक्ष ७२ अध्याय आणि २२५० श्लोक आहेत. कलकत्ताप्रतींत अध्याय ७२ व श्लोक २३०६ आहेत, तेलंगणप्रत छापत आहे त्यांत असा घोटाळा ठेविला नाहीं. प्रक्षेप-कारानें श्लोक प्रत्यक्ष ३५०० केले इतकेंच नव्हे, तर पर्वानुक्रमणेकेंतील श्लोकांत बदल करून तीच संख्या दिली, ( त्रीणि श्लोकसहस्राणि पंचश्लोकशतानि च ). अर्थात् मध्यदेशीय पाठाहून अध्याय न वाढवितां सुमारें १३०० श्लोक वाढविले. तें कोठें कोठें, हा मनोरंजक प्रश्न येथें उपस्थित होतो.

प्रथम हें सांगणें प्राप्त आहे कीं, दाक्षिणात्यपाठांत दुर्गास्तोत्र ( अध्याय ६ ) मुळींच नाहीं. आम्हीं दाखविणार आहों कीं, हें दुर्गास्तोत्र येथें सौतीनंतरच प्रक्षिप्त झालेलें आहे. भीष्मपर्वांत दिलेल्या स्तोत्राहून तें भिन्न आहे. त्या स्तोत्रांत श्रीकृष्णभगिनीची कथा नाहीं आणि शेवटीं फलश्रुति नाहीं. असो, या अध्या-याचे ३५ श्लोक कमी असूनहि १३०० श्लोक दाक्षिणात्यप्रतींत वाढतात, ते कोठें याचें तुलनात्मक परीक्षण करतां, कोठें कथाभाग विशेष वाढविला आहे असें दिसत नाहीं. तर फक्त निरनिराळ्या वर्णनांत अधिक श्लोक घातले आहेत. उदाहरणार्थ देव द्रोणार्जुनयुद्ध पाहण्यास आकाशांत जमले तेव्हां त्यांची आपाप-सांतील भाषणें कल्पून आणखी घातलीं आहेत. येथें आपण नीलकंठी प्रत व तेलंगण प्रत यांचें अध्यायवार विस्तृत तुलनात्मक कोष्टक पुढें देऊं. चिकित्सित-प्रत विराटपर्वाची पाहण्यास मिळाली नाहीं, पण ती नीलकंठी प्रतीहून फारशी भिन्न नाहीं. कुंभकोणं प्रत आणि तेलंगण प्रत बहुधा एक आहे. पहिल्यांत अध्याय ७८ आहेत पण श्लोकांत फार वाढ नाहीं, ३५७५ आहेत. (भा. १ कोष्टक पहा.) तेव्हां येथें छापलेली मध्यदेशीय प्रत व तेलंगण प्रत यांची तुलना करणें पुरें

आहे. 'प्राचां' प्रतीचे पाठ भिन्न देण्यासारखे नी. देतो, त्यांची एकंदर तुलना करणें आम्हीं सोडून देतों. कारण दोहोंत फारसें अन्तर नाहीं हें वर दिलेल्या आकड्यांवरून दिसलेंच आहे.

## विराटपर्वाचें तुलनात्मक कोष्टक

| तेलंगण प्रत | | | नीलकंठी महाराष्ट्र प्रत | | |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय | मजकूर | श्लोकसंख्या | अध्याय | मजकूर | श्लोकसंख्या |
| १ | प्रारंभ एक ( जनमेजय प्रश्न ) | ४७ | १ | ,, | २८ |
| २ | ,, ( भीमार्जुन उत्तर ) | ३१ | २ | ,, | ३२ |
| ३ | ,, ,, | ४० | | | |
| ४ | ,, ( नकुलसहदेव ) | ३१ | ३ | ,, | २३ |
| ५ | ,, ( धौम्याचा उपदेश ) | ७८ | ४ | ,, | ५८ |
| ६ | काम्यकवनांतून बाहेर निघाले | ९५ | ५ | ,, | ३६ |

(प्रारंभ एक "ते वीरा बद्धनिंस्त्रिशा" वगैरे )

( १८० वर्षांची म्हातारी मेली तिचें प्रेत झाडास बांधलें हें दोन्हींत आहे. )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | ( दुर्गास्तव गाळला ) | | ६ | दुर्गास्तव | ३५ |
| ७ | युधिष्ठिराचा विराट नगरांत प्रवेश | ५३ | ७ | ,, | १८ |
| ८ | भीमाचा प्रवेश | २५ | ८ | ,, | १३ |
| ९–१०–११ | अर्जुन, नकुल, सहदेव | २३ | ९ | द्रौपदी | ३७ |
| | यांचा प्रवेश | १६ | १० | सहदेव | १६ |
| | | २६ | ११ | नकुल | १४ |
| १२ | द्रौपदीचा प्रवेश | ८५ | १२ | अर्जुन | १६ |

( येथें अध्याय मागें पुढें झाले आहेत. नी. पाठांत द्रौपदी प्रथम घातली आहे. तेलंगणपाठांत ८५ श्लोक व नी. ३७; द्रौपदीचें वर्णन वाढविलेलें आहे. " वल्कलाजिनसंवृता " हें वर्णन कां येतें? पुढें " वासश्च परिधायेकं " इत्यादि वर्णन दोन्हींत एक आहे. )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३ | प्रारंभ एक, विषय एक अधिक | ५४ | १३ | ,, | ४६ |
| १४ | सुर्योपस्थान | ४७ | १४ | ,, | ५२ |
| १५ | | ५७ | १५ | ,, | २१ |
| १६ | मत्स्य-सभेंत द्रौपदी–कीचकवाद भाषणें फार वाढविली आहेत | १७९ | १६ | ,, | ५१ |

पण मुख्य वाढ १४२ नंतर कीचकाची मूळची हकीकत या अध्यायांत दिली आहे ती वी. पाठांत नाहीं, पण तिची जरूरी दिसते. सूत स्त्रिया क्षत्रिय करीत, त्याप्रमाणें केकय राजानें सूत स्त्री केली, तिचा पुत्र म्हणून सुदेष्णेचा ( सावत्र ) भाऊ. पण केकयाला " सूतानामधिपो राजा " म्हटलें आहे तोहि सूतच दिसतो.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १७ | प्रारंभ एक शेवटहि एक | | १७ | अध्याय वाढले | २१ | |
| | द्रौपदी भीम संवाद | ११८ | १८ | | ३३ | १०१ |
| | | | १९ | | ४७ | |
| १८ | | ३२ | २० | ,, | ३१ | |
| १९ | द्रौपदी भीम संवाद | ५४ | २१ | ,, | ५१ | |
| २० | प्रारंभ एक शेवटहि एक | ९७ | २२ | ,, | ९४ | |
| २१ | भीम कीचकास ठार करतो | ५२ | २३ | ,, | ३४ | |
| २२ | | ३९ | २४ | ,, | ३० | |
| २३ | | ३६ | २५ | ,, | २१ | |
| २४ | गोग्रहण | २२ | २६ | ,, | १८ | |
| २५ | त्रिगर्त दक्षिणेस | ४४ | २७ | ,, | १० | |
| | हा अध्याय यांत नाहीं | | २८ | शान्तवनाचें भाषण | ३३ | |
| | | ३७६ | | | ३३० | |
| २६ | ततः शारद्वतः वगैरे | ६६ | २९ | ,, | १७ | ४४ |
| | प्रारंभ व शेवट एक | | ३० | | २७ | |
| २७ | | ५१ | ३१ | | ३५ | |
| २८ | प्रारंभ शेवट एक | ३० | ३२ | बिराट त्रिगर्त यांचें युद्ध | ३० | |
| २९ | | ५९ | ३३ | | ६१ | |
| ३० | यांत ३४ चे ३ श्लोक घेतले | २८ | ३४ | यांत वर्णिलें आहे. | १९ | |
| ३१ | | २१ | ३५ | | २२ | |
| ३२ | प्रारंभ शेवट एक | ६८ | ३६ | उत्तर-बृहन्नला | २४ | ६८ |
| | | | ३७ | | ३४ | |
| ३३ | | ७५ | ३८ | उत्तर व अर्जुन | ५१ | |
| ३४ | प्रारंभ शेवट बहुधा एक | ४७ | ३९ | ,, | १७ | |
| ३५ | बिंदवो जातरूपस्य हा श्लोक | २३ | ४० | ,, | ८ | |
| ३६ | या प्रतींत ३५ मध्यें नाहीं | २६ | ४१ | ,, | १० | |
| ३७ | | ४८ | ४२ | ,, | १७ | |
| | | | ४३ | ,, | २१ | |
| | | | ४४ | ,, | २५ | |
| | | २१९ | | | १४४ | |

| तेलंगण प्रत | | उत्तर गोग्रहणांतील युद्ध | महाराष्ट्र प्रत |
|---|---|---|---|
| ३८ प्रारंभ ४४ चे शेवटचे श्लोक घेऊन | ४४ | ४५ ,, | ४१ |
| ३९ प्रारंभ शेवट एक | ४३ | ४६ ,, | ३३ |
| ४० प्रारंभ शेवट एक दुर्योधनवाक्य | ३६ | ४७ ,, | ३४ |
| ४१ ,, ,, कर्णवाक्य | २७ | ४८ ,, | २३ |
| ४२ ,, ,, वरणवाक्य | २६ | ४९ ,, | २३ |
| ४३ कर्ण पुन्हा बोलतो | ३७ | ५० अश्वत्थामावाक्य | २८ |
| ४४ प्रारंभ शेवट एक भीष्मवाक्य | २२ | ५१ ,, | २२ |
| ४५ भीष्माचा निर्णय | ३२ | ५२ भीष्म वाक्यांत फरक आहे | २३ |
| व्यूहवर्णन (वज्रगर्भब्रह्ममुख) | | व्यूहाचें नांव नाहीं | |
| ४६ इन्द्र युद्ध पाहण्यास आकाशांत स्थूणाराजिसहस्र | २२ | | |
| ४७ प्रारंभ शेवट एक | २१ | ५३ ,, | २५ |
| ४८ निराळा मजकूर | ४७ | ५४ कृष्णार्जुनयुद्ध | ३६ |
| ४९ ,, | २८ | | |
| ५० ,, | ७२ | ५५ निराळा मजकूर | ३० |
| ५१ ,, | ७८ | ५६ ,, | १९ |
| | | ५७ ,, | ४३ |
| ५२ द्रोणार्जुनयुद्ध | ९८ | ५८ द्रोणार्जुनयुद्ध | ७६ |
| ५३ अश्वत्थामार्जुनयुद्ध | १६ | ५९ अश्वत्थामार्जुनयुद्ध | २१ |
| + + + | | ६० पुन्हा कर्णार्जुनयुद्ध | २७ |
| + + + | | ६१ भीमार्जुनयुद्ध | ४६ |
| ५४ संकुलयुद्ध ३४ श्लोकापासून पुढें एक शेवटहि तोच | ६० | ६२ ,, | २२ |
| | | ६३ × × | १४ |
| ५५ देवांचीं भाषणें भीष्मयुद्ध | ७३ | ६४ भीष्मयुद्ध | ४१ |
| ५६ पंचमहारथियुद्ध | २४ | ६५ भीष्मयुद्ध | १८ |
| ५७ पुन्हा भीष्मयुद्ध | ५५ | | |
| ५८ संकुलक | ५८ | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५९ दुर्योधनयुद्ध प्रारंभ एक श्लोक मोठ्या वृत्ताचे शेवटी भिन्न | ४५ | ६६ दुर्योधनयुद्ध | | ३० |
| ६० प्रारंभ एक शेवट थोडा भिन्न | २२ | ६७ | ,, | २३ |
| ६१ उत्तर अर्जुनाचा विजय | ८० | ६८ | ,, | ७६ |
| ६२ प्रवेश | ११ | ६९ उत्तर बृहन्नला प्रवेश | | १९ |
| | | वैवाहिकपर्व | | |
| ६३ पांची पांडव प्रकट होतात प्रारंभ | २३ | ७० | ,, | २८ |
| ६४ ,, एक | २६ | ७१ | ,, | ३६ |
| ६५ ,, | २२ | ७२ | ,, | ४० |
| ६६ ,, | ३३ | ततस्त्रयोदशेवर्षे या १४ व्या श्लोकापासून ६७ अध्याय मद्रासचा कांहीं एक | | |
| ६७ ( नी. ) मन्महोत्सकांशच्या पुढें ४ श्लोक | ५९ | | | |

## काव्यमीमांसा

याप्रमाणें या पर्वाचें ग्रंथदृष्ट्या परीक्षण केल्यावर त्याचें काव्यदृष्ट्या परीक्षण करूं. काव्याची मीमांसा करतांना चार मुख्य अंगांचें निरीक्षण करावें लागतें, भाषा, आणि भाषणें, वर्णनें आणि वस्तु. या रीतीनें यांतील काव्याचें महत्व तपासतां, या पर्वाचा विशेष दर्जा लागेल असें आम्हांस वाटत नाहीं. याची भाषा शुद्ध, सरळ व गंभीर, जशी इतर पर्वांत दिसते तशी नाहीं, हें मागील विवेचनावरून स्पष्ट झालेंच आहे. यांत व्यास-वैशंपायनांचें कर्तृत्व अबाधित नसल्यानें भाषेची शुद्धता, सरळता व गंभीरता ( भगवद्गीतेंत प्रतीत होणारी ) यांत नाहीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशुद्ध प्रयोग पुराणवजा जागजागीं दिसतात; आणि ते सौतीनंतरचे असावेत. कारण सौतीचा काळ आपण इ. स. पू. ३०० मानला आहे. यावेळीं संस्कृत भाषा जनसमाजाच्या बोलण्यांतून जरी गेली होती, तरी पंडित लोकांच्या घरीं ती वावरत होती, हें पतंजलीच्या महाभाष्यावरून सिद्ध आहे ( इ. स. पू. १५० ). तेव्हां पुढील सारखे अशुद्ध प्रयोग पौराणिककाळांतले ( इ. स. ५०० ) मानावे लागतात. अध्याय ३५ श्लोक १ मध्यें ' उपयात् ' 'उपायात्'चे जागीं आहे, आणि "हन्यताम्" "हन्यमानानाम्" च्या जागीं वापरलें आहे ( श्लोक ६ ). असले प्रयोग सौति करणार नाहीं; आणि छन्दासाठीं घालावे लागले असें म्हणावें तर, कवीचें रचनासामर्थ्य हीन ठरतें.

दुसरी गोष्ट ही कीं, सौतीनें या लहानशा पर्वांत आपलीं विशिष्ट खूण म्हणजे कूटशब्द व कूटश्लोक फारच वापरलेले आहेत. कूट हा एक शब्दालंकार मनोरम असून तो श्लेषाहून निराळा आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. सौतीच्याच लेखनांत मुद्दाम वापरलेला ( 'ग्रंथग्रंथिं तदा चक्रे' इत्यादि गणपतीचे आख्यानांत गणपतीस गोंधळांत टाकण्याकरितां) हा कूटशब्द–प्रयोग या पर्वांत फारच दिसतो, व जसें थोड्याशा भाजींत ज्यास्त तिखट पडून त्रास होतो, तसा वाचकांस त्रासदायक होतो. या कूटशब्दांची व श्लोकांची माहिती भाषान्तरांत ठिकठिकाणीं आम्हीं टीपेंत दिली आहे, तरी येथें सामान्य वाचकांकरितां त्यांची मुख्य मुख्य कांहीं उदाहरणें देऊं. शब्दाचा प्रसिद्ध अर्थ सोडून त्यास अप्रसिद्ध अर्थी वापरणें, हें कूटशब्दाचें इंगित आहे. अशा रीतीनें कूटशब्द प्रारंभापासूनच या पर्वांत जागजागीं घातले आहेत. पहिल्याच अध्यायांत ६ व्या श्लोकांत ' अरणीसहितम् ' असा शब्द असून सहितम् म्हणजे सह नसून मिथुन असा अर्थ आहे. १९ व्या श्लोकांत 'वक्ष्यामहे' याचा अर्थ ' बोलूं ' असा नसून निर्वोढुं ' शक्ष्यामहे वहेरिदं रूपम् ' ( नी. ) असा आहे. सुदर्शन म्हणजे युद्ध, हंस म्हणजे सूर्य, सुवर्ण म्हणजे चन्दन, जातरूप म्हणजे कीर्तिमान् ( सोनें नव्हे ), वगैरे आणखी शब्द सांगता येतील.*

पण याहिपेक्षां मनोरंजक कूट वाक्य, दोन अक्षरें जवळ आणून भलताच शब्दभास उत्पन्न करणें, ही एक आणखी कूटश्लोकांची टूम आहे, व याचें प्रसिद्ध उदाहरण " नदीजलंकेशवनारिकेतुः । जित्वावयं नेष्यति चाद्य गावः " ( ३९–१० ) हें आहे. नदीजलं, केशव, नारि, वयं, गावः, हे शब्द सहज ध्यानांत येणारे असून, ते या श्लोकांत आहेत असा भ्रम होतो. परंतु नदीज, लंकेश, वनारि, अव, यं, गाः, वः असे शब्द वास्तविक यांत आहेत. वयं आणि गावः ह्या प्रथमा असल्यानें " वयं जित्वा गावः नेष्यति " असा अपप्रयोग होईल, तेव्हां वाचक विचारांत पडतो; आणि खरी पदें अव, यं, गाः, वः लक्षांत येतात.

* आणखी मनोरंजक कूट शब्द पुढील प्रमाणें आहेत. १ सत्र म्हणजे कपट, २ ग्रामणीय म्हणजे ग्रामाधिकारी, ३ वन म्ह० घर, आलय, ४ प्रसन्नाग्र म्ह० साफ केलेल्या टोंकाचे, ५ दीप्तदिशा म्ह० आग्नेयी दिशा, ६ कल्याण म्ह० सोनें (३१–३२) आणि ७ आवर्त म्हणजे चन्द्र. हे नीलकण्ठानें दिलेले अर्थ कोशांत ( मोनियर विल्यम्स् वगैरे ) सांपडतात.

कदाचित् प्रथम आर्षत्वात् साधु असें कोणी म्हणेल ( पुल्लिंग आर्षम् प्रमाणें ); पण इतका अशुद्ध म्हणजे आर्ष ( खरा ) प्रयोग सौति करणार नाहीं, हें वाटून वाचक खरे शब्द शोधून काढीलच. असो, हा चित्रकाव्याचा एक स्वतंत्र भेद ‘ शब्दभ्रम ’ म्हणून मानतां येईल; आणि याचें हें एकच मनोरंजक उदाहरण मला तरी आठवतें; आणि सौतीच्या चित्रकाव्याची येथें प्रशंसा केल्यावांचून राहवत नाहीं.

खऱ्या कूटश्लोकाचें उदाहरण, प्रसिद्ध श्लोक “ **बिंदवो जातरूपस्य** शतं यस्मिन् निपातिताः । **सहस्रकोटिसौवर्णाः** कस्यैतद्धनुरुत्तमम् ” (४२)१ हें आहे. प्रथमार्धांत शतं म्हणून दुसऱ्यांत सहस्रकोटि एवढी प्रचंड संख्या कशी सांगितली, व जातरूपस्य व सौवर्ण एकाच अर्थी शब्द कसे येतात, असा वाचक बुचकळ्यांत पडतो; व शेवटीं जातरूपस्य म्हणजे जातकीर्तेः आणि सहस्रकोटि म्हणजे मजबूत टोकांचें ( धनुष्य ) असा अर्थ सुचतो. निदान टीकाकारानें सुचविलेला पटतो. हा श्लोक कूटश्लोकाचें उत्कृष्ट उदाहरण आहे, व असें उदाहरण अन्यत्र महाभारतांतहि सांपडणार नाहीं. एकच शब्द कूटार्थी वापरल्याचीं अनेक उदाहरणें सांपडतात, व तीं ४२ व्या अध्यायांत उत्तराच्या मुखांतच घातलेलीं आढळतात. “शलभा यत्र सौवर्णास्तपनीयविभूषिताः । सुवर्णमणिचित्रं च कस्यैतद्धनुरुत्तमम् ॥” (५). यांत सौवर्ण आणि तपनीय एकत्र आल्यानें मनुष्य बुचकळ्यांत पडतो, व सौवर्ण म्हणजे ‘चंदनाचे’ असा अर्थ ( नी. ) नें केलेला पाहून त्यास मौज वाटते. ७ व्या श्लोकांत हारिद्रवर्णाः व पीताः हे दोन्ही शब्द एकत्र आल्यानें ‘ पीताः ’ याचा अर्थ ( नी. ) ‘ कर्मारेण तेजनजलं पायिताः ’ असा केलेला पसंत वाटतो. ११ व्या श्लोकांत सायक शब्द खड्ग याअर्थी आहे, बाण या अर्थी नाहीं. ( नी. ) “ शरे खड्गे च सायकः ” असा अमराचा आधार देतो. पुढील श्लोकांत ‘ त्सरु ’ तलवारीची मूठ, ‘ फल ’ तलवारीचा फाळ, हे अप्रसिद्धार्थी शब्द आले आहेत. तसेंच पंचनख म्हणजे अज किंवा कूर्म असा अर्थ आहे. तात्पर्य, या एकाच ४२ व्या अध्यायांत अप्रसिद्धार्थी शब्दांची सौतीनें गर्दी करून दिली आहे.

या रीतीनें भाषेची मौज जरी सौतीनें साधली आहे, तरी भाषणांच्या दृष्टीनें त्यांत गौणत्व आहे. अशी कूटशब्दांची भाषा उत्तराच्या तोंडांत घातली आहे, हें फारच अरुचि उत्पन्न करणारें आहे. हा तरुण किंबहुना बहुतेक बाळ राजपुत्र कवि एकदम कसा बनतो, याचें वाचकांस आश्चर्य वाटतें. कौरवांचें प्रचंड सैन्य

पाहून घाबरलेल्या राजपुत्रास काव्य कसें सुचतें ? वास्तविक ही पांडवांच्या आयुधाचीं वर्णनें कवीनें स्वतंत्र दिलीं पाहिजे होतीं. उत्तराच्या भाषणांत दिलेलीं वाचतांना काव्यहानि झालेली वाटते. तसेंच पुढें उत्तराच्याच प्रश्नावरून अर्जुन स्वतःच आपल्या दहा नांवांची व्युत्पत्ति देऊन एकप्रकारची स्वतःची प्रशंसा करतो, हेंहि बरें दिसत नाहीं. युद्धाच्या प्रसंगाचीं भाषणें बरीं झालीं आहेत, व त्यांतहि कर्णाचें गर्वाचें भाषण स्वभावपरिपोष करितें हें बरें आहे. त्यानें केलेली द्रोणाची हेटाळणीहि अस्थानीं नाहीं, व दुर्योधनानें द्रोणाची क्षमा मागितली हाहि प्रसंग बरा आहे. तथापि युद्धप्रसंगींचीं हीं भाषणें ज्यास्त लांबलेलीं वाटतात. ४८ वा अध्याय केवळ कर्णाच्या वल्गनेचा आहे, तो मुख्यार्थानें पूर्वीच्या अध्यायांत आलाच आहे. असो, या प्रसंगींच्या भाषणांशिवाय इतर प्रसंगींचीं भाषणें या पर्वांत फारशीं नाहींत; तसे प्रसंगहि या पर्वाच्या कथेंत नाहींत. द्रौपदी-भीम संभाषण मनोरंजक आहे; पण द्रौपदीचेंहि भाषण अ. १८-२० मधील उगीच लांबलेलें दिसतें. सांगण्याचा मुख्यार्थ कांहीं वेळ लपविणें हें द्रौपदीला व बायकांच्या स्वभावानुरूप जरूर होतें, परंतु तें या अध्यायांत जितकें लांबलें आहे, तितकें अगदीं अस्थानीं आहे असें आम्हांस वाटतें. द्रौपदीनें या चार अध्यायांत जें वर्णन पतींच्या व स्वतःच्या दुःस्थितीचें केलें आहे, तें अप्रासंगिकहि वाटतें.* शिवाय द्रौपदीसारख्या पतिव्रतेनें "अशोच्यत्वं कुतस्तस्या यस्या भर्ता युधिष्ठिरः।" ( १८-१ ) असें आपल्या शोकाच्या आरंभीं म्हणावें हें खरोखर अयोग्य आहे. कदाचित् दुःखाच्या प्रसंगीं स्त्रिया-पतिव्रताहि स्त्रिया-संतापानें नवऱ्यास दोष देऊं लागतात, हा सामान्य स्त्री-स्वभाव येथें सौतीनें दाखविला असावा. पण याच द्रौपदीचें, राजसभेंत कीचकानें तिला लाथ मारिली तेव्हांचें, गुप्त पतींस उद्देशून केलेलें भाषण चांगलें तेजस्वी स्त्री-स्वभावास साजणारें आहे (अ. १६). इतर प्रसंगांचीं भाषणें मजेदार व स्वभावोद्बोधक आहेत; विशेषतः द्रौपदी व कीचक, सुदेष्णा व द्रौपदी, भीम व कीचक, यांचीं भाषणें योग्य विचाराचीं व लांबीचीं अशींच आहेत. उत्तरा व बृहन्नला यांचीं हीं भाषणें मनोवेधक आहेत. अर्जुनाची प्रशंसा न करतां उत्तरानें विराटास सांगितलेली युद्धाची हकीकत व द्रौपदी-युधिष्ठिर संवाद, राजस्वभावाचें व युधिष्ठिराच्या शांततेचें चांगलें परि-

---

* कांहीं श्लोकांत युधिष्ठिराच्या वैभवाचेंहि वर्णन असून त्यांतील कांहीं भाग पूर्वीं आलेले आहेत. उदाः-"अष्टाशीति सहस्राणि स्नातका गृहमेधिनः।" हा पूर्वीचाच श्लोक येथें घेतला आहे.

पोषण करणारा आहे. अर्जुनानें उत्तरेशीं विवाह करण्याचें नाकारून स्नुषा म्हणून तिचा परिग्रह करतांना आपल्या भाषणांत जें कारण दिलें आहे, तें योग्य असून भाषण थोडक्यांत असल्यानें चांगलें आहे. पांडवांच्या सद्वर्तनास व आत्म-संयमनास तें पोषक आहे. असो, योग्य भाषणें हें महाकाव्याच्या उत्तमत्वाचें एक महत्वाचें लक्षण आहे. तें जरी इतर पर्वांइतकें या पर्वांत नाहीं, तरी सौतीच्या कवित्वाचें हें अंग या पर्वांतहि चांगलें निदर्शनास येतें.

काव्याचें तिसरें अंग मनोवेधक वर्णनें हें आहे. या पर्वांत तशीं वर्णनें फारशीं नाहींत. किंबहुना तशा वर्णनास जागाहि या पर्वांत नाहीं. निसर्गाची शोभा वर्णन करण्याचे प्रसंग यांत फारसे नाहींत. युद्धाचें वर्णन प्रत्यक्ष पाहून सर्व भागांच्या निरनिराळ्या हालचाली युद्धोपयोगी कशा केल्या गेल्या तें दाखविणारी पानपतची बखर जशी मनोरंजक व प्रत्यक्ष युद्ध डोळ्यासमोर उभें करणारी झाली आहे, तसें वर्णन या पर्वांतील दोन्ही युद्धांच्या वर्णनांत नाहीं. तथापि विराट–त्रिगर्त युद्धांत कांहींसें कौशल्य दिसून येतें. उत्तर गोग्रहणांतील अर्जुन–कौरव युद्ध काल्पनिक व अतिशयोक्तीनें भरलेलें आहे, हें आम्हीं प्रारंभींच दाखविलें आहे. शहरांची, सभागृहांची, किंवा राजसभांचींहि वर्णनें यांत शक्य तितकीं करण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु तसा प्रसंग थोडाच उत्पन्न होतो. पांडवांच्या वेषांचीं वर्णनें बरीं आहेत. विशेष लक्षांत ठेवण्यासारखें पांची पांडवांचें वर्णन अध्याय ७१ मध्यें उत्तराच्या मुखानें केलें आहे, तें ऐतिहासिक व खरें दिसतें. निदान एवढ्या प्रचण्ड ग्रंथांत तें कोठें तरी येणें जरूर होतें. युधिष्ठिर रंगानें गोरा, शरीरानें उंच, मोठ्या दीर्घ नेत्रांचा आणि विशेष लक्षांत येण्यासारख्या प्रचंड व दीर्घ नासिका–घोणाचा होता. असें नाक सम्राटराजांच्या विशिष्ट लक्षणांपैकीं एक सांगितलेलें आहे. भीमहि सुवर्णगौर, प्रचण्ड शरीराचा व रुंद छातीचा होता. अर्जुन मात्र काळा म्हणजे श्याम ( नीलहि नव्हे ), उंच, हत्तीसारखा चालणारा, पण सडपातळ व लांवटांग्या होता. [ हे दोन शब्द या श्लोकांत (१५) नाहींत; पण ते एके ठिकाणीं महाभारताच्या शेवटीं शेवटीं आले आहेत, ते मुद्दाम आम्हीं येथें घालतों; ते येथें येणें अवश्य व बृहन्नडेच्या क्लीब रूपाला पोषक होते. ] नकुलसहदेवांचें वर्णन विशेष नसून नकुल सुंदर होता, एवढीच गोष्ट ठराविक येथें सांगितली आहे; पण कादंबरीकार जितकें तपशीलवार वर्णन नायिका–नायकांचें देतो, तितकें येथें मुळींच नाहीं. द्रौपदीच्या वर्णनांत तर कांहींच मौज नाहीं.

किंबहुना येथील श्लोकांत (१७) तिचा रंग नीळ सांगून सोन्याच्या रंगासारखा तेजस्वी असें विरोधी वर्णन ठराविक शब्द (कनकोत्तमांगी) घालण्याच्या भरांत केलें आहे. द्रौपदीच्या सौन्दर्याचें वर्णन याहिपेक्षां विस्तृत करण्याचा प्रयत्न अध्याय ९ मध्यें सुदेष्णेच्या मुखानें केला आहे. पण तेथेंहि ठराविक उपमांशिवाय ठराविक सुन्दर स्त्रीलक्षणें प्रसिद्ध असलेल्या अन्य ग्रंथांतील जशींच्यातशीं घेतलीं असल्यानें एका प्रकारानें कूटश्लोक उत्पन्न झाला आहे;* त्यामुळें सौन्दर्याची खरी कल्पना मूर्तिमंत वाचकांसमोर उभी राहत नाहीं. तथापि अध्याय ३७ मध्यें उत्तरा बृहन्नलेकडे सारथ्य करण्यासाठीं सांगण्यास धांवत गेली, त्यावेळेस तिच्या सौन्दर्याचें वर्णन ठराविक शब्दांनीं व तऱ्हेनें केलें असलें तरी तीन श्लोकांतच सरस वठलें आहे. असो, स्त्रियांचें विशिष्ट तऱ्हेचें सौन्दर्य व वैयक्तिक भेद वठेल असें वर्णन करणें नेहमींच कठीण असतें.

द्रौपदीच्या रूपास सौतीनें एक अनुपम मार्मिक उपमा दिली आहे, तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. “ काश्मीरीव तुरंगमी ” (९–११). द्रौपदी काश्मीरी घोडीप्रमाणें सुरेख होती, या वाक्यांत आलेली उपमा आश्चर्यकारक वाटेल! पण त्यांत स्वारस्य आणि वस्तुनिरीक्षण फार खोल आहे. काश्मीरांतील स्त्रियांची रूपाबद्दल ख्याति आहे, पण काश्मीरांतील घोडी सुंदर असते हें निदान हल्लीं तरी प्रसिद्ध नाहीं. तथापि उत्तरेकडील घोडीं प्राचीनकाळापासून त्यांच्या निरनिराळ्या उत्तम गुणाबद्दल प्रसिद्ध आहेत, व सभापर्वांतील उत्तर दिग्विजयांत तित्तिरकल्माष, किंवा शुकवर्ण घोडे नजराण्यांत आले आहेत; पण तेथेंहि काश्मीरांतील घोडीचा उल्लेख नाहीं. स्त्रियांच्या सुश्लिष्ट सौंदर्यास घोडीची आकृति क्वचित्‌च उपमान होईल, पण अशी एखादी घोडी खरोखरच कधीं कधीं पाहण्यांत येते. निदान माझ्या पाहाण्यांत ग्वालेरीस एक आली होती.

शेवटीं आपल्यास काव्याच्या वृत्त अथवा संविधानक या अंगाचा विचार करावयाचा आहे. संविधानक गुंतागुंतीचें पण अत्यंत मनोवेधक व चमत्कृतियुक्त असावें लागतें, त्याप्रमाणें या पर्वांतील वृत्त आहे हें खरें; पण असलें चमत्कृतियुक्त वृत्त संभाव्य कोटींतील पाहिजे हें उघड आहे. पांडवांशीं अज्ञातवासाचा करार केला गेला असेल हें संभाव्य नाहीं, हें आम्हीं प्रारंभीं म्हटलेंच आहे.

* नोच्चगुल्फा संहतोरुस्त्रिगंभीरा षडुन्नता । रक्ता पञ्चसु रक्तेषु हंसगद्गद-भाषिणी ॥ ( ९ ) १०

याशिवाय पांडव व द्रौपदी गुप्तवेषानें राहणें शक्य नव्हतें, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. युधिष्ठिर फासे खेळणारा कंक ब्राह्मण झाला तरी, त्यास त्याच्या विशिष्ट ठेवणीच्या उंच नासाघोणावरून मत्स्यराज विराटानें किंवा त्याच्या दरबारी मंडळीनें न ओळखणें असंभवनीय आहे. राजसूयाच्यावेळीं विराट इन्द्रप्रस्थास गेलाच असला पाहिजे. त्याचप्रमाणें प्रचण्डशक्तीचा भीम बल्लव म्हणून राहत असतां ओळखला न जाणें शक्य नाहीं. कारण मल्लास विशेष वस्त्रांनीं झाकतांहि येत नाहीं. नकुलसहदेव घोडेस्वारांवर व गाईंच्या कळपांवर असल्यानें कदाचित् नेहमीं पाहण्यांत येत नसतील; पण सर्वांत अत्यंत कठीण सोंग अर्जुनाचें होतें. निर्विवाद शूर धनुर्धारी वीरास, निःशंकनीय अनिर्भेद्य षंढाचें सोंग घेऊन त्याप्रमाणें हावभाव करणें अशक्य होतें; तशांत राजकन्या व सरदारकन्या यांच्या घोळक्यांत सदोदित राहून त्यांस नृत्य, गाणें, वादित्र ही शृंगारोपयोगी कला शिकवावयाचें काम त्यानें करावयाचें होतें. हें अमानुष असंभाव्य मनोनिग्रहाचें काम त्यास एका शापामुळें करतां आलें असें वनपर्वांतील एका कथेंत आलें आहे. शापकथा नेहमीं काल्पनिक असते, तेव्हां अर्जुनाचा मनोनिग्रह अप्रतिम होता असेंच म्हणावें लागतें. पण षंढांचें रूप त्यास कसें घेतां आलें याचा विचार पडतो. ही गोष्ट खरी कीं, कित्येक षंढ ( हिजडे ) विलक्षण उंच आणि हाडापेराचे मजबूत असतात, व ते निःस्तन आणि निर्नितंबहि असतात. याशिवाय त्याकाळीं क्षत्रिय डोक्यावर लांब केस राखीत असावे, त्या केसांची वेणीहि बनवितां येईल. बाहूंवर व मनगटाला पडलेले धनुष्याचे घट्टे पुष्कळ कचकड्याच्या बांगडया घालून झांकता येतील, कानांत कुंडलें घालतां येतील; पण मिशा वाढतील त्याला उपाय काय ? अर्जुनास मिशा नव्हत्या, तो खाडू होता, असें कोठेंसें उल्लिखित आहे. देवांस मिशा नसतात, नरनारायण देव होते. ( गुप्त हजामतहि करतां येईल, पण स्त्रियांच्या सहवासांत न्हावी मिळणें कठीण ). याहीपेक्षां खरें कठीण काम म्हणजे स्त्रियांचे किंबहुना नपुसकांचे हावभाव नेहमीं कसे करतां येतील ! अर्जुन बृहन्नला होऊन अन्तऽपुरांत राहणें, ही गोष्ट अशक्य व केवळ कवि-कल्पित असून मूळ पांडवांच्या इतिहासांत ती नसावी, अशी शंका बळकट येते. एवढी गोष्ट खरी कीं, ही कल्पना सौतीच्या काळास योग्य आहे; कारण चंद्रगुप्ताच्या अन्तःपुरांत वर्षवर ( हिजडे ) होते असें पुष्कळ ठिकाणीं वर्णन सांपडतें.

* वलयैश्छादयिष्यामि बाहू किणकृताविमौ । कर्णयोः प्रतिमुच्याहं कुण्डले ज्वलनप्रभे ॥ पिनद्धकंबुः पाणिभ्यां ॥ वेणीकृतशिरा राजन् ॥ (२)२६-२७.

याहून कठीण प्रश्न द्रौपदीचा आहे. ती अत्यंत सुंदर असल्यानें दासी होऊं शकत नव्हती. कदाचित् सैरन्ध्री नांवाच्या दासी अत्यंत सुंदर असून ' रक्षित ' असत ( याबद्दल पुढें सामाजिक परिस्थितींत विशेष विचार करूं ); पण त्याहि दास्यकर्म करीत असल्यानें त्यांच्या शरीरावर, विशेषतः हातावर, घट्टे वगैरे खुणा असावयाच्याच. पूर्वी म्हटल्याप्रमाणें विराटानें द्रौपदीस राजसूय-प्रसंगीं पाहिलेंच असलें पाहिजे. शिवाय पांच नवीन तेजस्वी पुरुष आणि एक अत्यंत सुंदर स्त्री नोकर होऊन विराटाच्या येथें राहिले आहेत, ही गोष्ट लोकांस व दुर्योधनाच्या हेरांस संशय घेण्यास पुरेशी होती. कदाचित् अर्जुनाचें षण्ढ होणें हें असला संशय तोडणारें झालें असेल.

असो, हा अज्ञातवासाचा कथाभाग असंभाव्य असला तरी त्यामुळें या पर्वांतील कथानकास अपूर्व रंग चढला आहे हें खरें. कीचकाचें मनोरंजक संविधानक यामुळेंच उत्पन्न झालें, आणि कीचकवध हा विषय नाटककारांस उत्तम संविधानक म्हणून घेतां आला. भीमानें कीचकास नृत्यशाळेंत ठार मारलें हें संभवनीय आहे; पण कीचकाच्या भावाबंदांनीं द्रौपदीस धरून स्मशानांत नेलें, व तेथें भीमानें झाड उपटून त्या सर्वांस ठार मारलें आणि द्रौपदीस सोडविलें, ही अतिशयोक्तीची आणखी वाढ आहे. हा कीचकांस मारणारा भीम आहे, हें लोकांस गंधर्वाच्या भीतीमुळें आपले डोळे मिटून धरल्यानें समजलें नाहीं असें म्हणतां येईल हें खरें.

याप्रमाणें या पर्वाचें ग्रंथदृष्ट्या व काव्यदृष्ट्या परीक्षण केल्यावर आपल्यास असा निश्चय होतो कीं, हा ग्रंथ जरी वैशम्पायन व व्यास यांच्या वेळचा नसला तरी तो सौतीच्या वेळचा म्हणजे इ. स. पू. ३०० सुमाराचा, चंद्रगुप्तमौर्याच्या वेळची परिस्थिति दाखविणारा आहे. त्यांत सौतीनंतरहि थोडासा म्हणजे सुमारें एकदशांश ( २२७१ श्लोकांत सुमारें २२० ) भाग अधिक आहे, हें आपण प्रारंभीं पाहिलेंच आहे. हा प्रक्षेप झाला असला तरी सामान्यतः यांतील परिस्थिति सौतीच्या वेळची आहे, असें समजण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट लक्षांत ठेवून आपण समालोचनाच्या निरनिराळ्या अन्य विषयांकडे वळूं.

( प्रथमारंभीं आदिपर्वाच्या समालोचनांत दाखविल्याप्रमाणें गणपत कृष्णाजी प्रतींत या पर्वांत ७२ अध्याय व २२७१ श्लोक आहेत, गोपाळ नारायण प्रतींत ७२ अध्याय व २२७२ श्लोक आहेत आणि कुंभकोणप्रतींत ७८ अध्याय व ३५७५ श्लोक आहेत. )

## सामाजिक परिस्थिति

पहिली बाब सामाजिक परिस्थितीची होय, व त्यांत पहिली गोष्ट स्त्रियांचे विवाह व शिक्षण हीं साहजिकच पुढें येते. या काळांत स्त्रियांचें लग्न लहानपणीं होत नव्हतें, ही गोष्ट उत्तरेच्या वर्णनावरून स्पष्ट आहे. ती निदान १६ वर्षांची तरी असावी असें तिच्या वर्णनावरून दिसतें. तिच्या वयाच्या शहरांतील अविवाहित मुली नृत्य व गायन शिकण्यास सरकारवाड्यांत येत असत, यावरून साधारणपणें सर्वत्र प्रौढविवाह प्रचारांत असलेला दिसतो; आणि वरिष्ठ वर्गाच्या प्रौढ मुलींस गाणें व नाचणें हें शिकणें जरूर मानलें जाई. अर्थात् इतर साधारण शिक्षणविषय, लिहिणें वाचणें वगैरे, शिकविले जात हें उघड आहे.

हें नृत्य शिकविण्याकरितां एक नृत्यागार स्वतंत्र बांधलेलें होतें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अलीकडे मुलींस नृत्य शिकविणें वाईट असा समाजाचा समज झाल्यानें, सरकारवाड्यांत, कोणत्याहि राज्यांत, नृत्यागार सांपडणार नाहीं. प्राचीनकाळीं म्हणजे चन्द्रगुप्तकालापर्यंत अशीं नृत्यागारें सर्वत्र असावीत. इतिहासांत अर्वाचीनकाळांत दक्षिणेंत विजयानगर येथें नृत्यागार असल्याचा दाखला मिळतो; पण त्यांत नाचणाऱ्या मुली देवीस वाहिलेल्या दिसतात, राजकन्या किंवा वरिष्ठसमाजांतील कन्या दिसत नाहींत. हल्लीं नृत्यकला तंजावरकडे विशेष अभ्यासिली जाते. हें नृत्य वैयक्तिक असे किंवा सांघिक, हा एक मनोरंजक प्रश्न आहे. बहुधा दोन्ही प्रकारचें नृत्य बृहन्नला शिकवीत असावी. कालिदासाच्या मेघदूतांत उज्जनीच्या महाकाळेश्वरासमोर सांघिक नृत्य होत असल्याचें सुंदर वर्णन आहे. हल्लीं गोवें प्रांतांत मात्र शंकर-पूजेंत सांघिक नृत्य शिल्लक आहे. पूर्वकाळीं सर्वत्र हा प्रचार असे; पण त्यांत नाचणाऱ्या वेश्या असत असें दिसतें.

हें नृत्यगीतवादन शिकविण्यास बृहन्नलेची म्हणजे हिजड्याची योजना होई, ही एक आश्चर्याची गोष्ट आहे. मालविकाग्निमित्रांत कालिदासानें मालविकेस नृत्यादि शिकविणारे दोन म्हातारे, गणदास व हरदत्त, असे पुरुष योजिले आहेत; पण सौतीनें बृहन्नलेची योजना केली, यावरून त्याकाळीं पडद्याची विशेष काळजी घेत असत असें दिसतें. अन्तःपुरांत वाटेल त्या पुरुषास जातां येणें शक्य नव्हतें. राजांच्या स्त्रिया समाजांत उघड येत असत किंवा नाहीं हा प्रश्न संदिग्ध दिसतो. तथापि अन्तःपुरांत पुरुष जाऊं नयेत, अशी काळजी

घेतल्याचा दाखला चंद्रगुप्ताच्याहि दरबारांत ग्रीक लेखावरून व कथासरित्सागरा-वरून मिळतो. बृहन्नला म्हणजे स्त्रीच दिसते, कारण वेणीकृतशिरा असें तिचें वर्णन दोनतीनदां आलें आहे. अर्जुन स्वर्गांत नृत्यगीत शिकला होता; पण हातांत व बाहूंवरहि कचकडयाच्या बांगडया, हें हिजडयांचें हल्लीं जें स्वरूप आहे तें तेव्हांहि होतें. अध्याय २ मध्यें अर्जुन आपल्या वेषाचें काम सांगताना " बायकां-सारख्या गोष्टी सांगेन; गीत, नृत्य, व विविधवादित्र पुरस्त्रियांना शिकवीन; लोकांचे उत्तम आचार व मोठमोठीं कृत्यें वर्णन करीन " असें म्हणतो ( श्लो. २८,२९,३० ). " युधिष्ठिराच्या गृहांत द्रौपदीची मी परिचारिका होतें, असेंहि सांगेन " या वाक्यावरून सर्व राजगृहांत असल्या दासी असत, आणि इन्द्रप्रस्थांतहि पुरस्त्रिया राजगृहांत नृत्यादि शिकत असें दिसतें.

विराटाचे दरबारांत जातांना ( अर्जुन ) बृहन्नलेचें जें वर्णन अ. २१ चे आरंभीं केलें आहे, त्यावरून तें स्पष्टपणें हिजडयाचें आहे. ( स्त्रीणामलंकारधरो बृहत्पुमान् ). कानांत मोठालीं कुंडलें व बाहूंवर मोठीं कचकडयाचीं वलयें हें त्याचें विशिष्ठ लक्षण होतें. अजूनहि बायकांचें अलंकार व बांगडया हिजडे घाल-तात, पण ते बायकांचीं लुगडीं नेसत नाहींत, धोतर नेसतात; पण बायकां-सारखें नेसतात. बृहन्नलेचें वस्त्र तांबडें होतें असें पुढें वर्णन आहे.* कांहीं विशिष्ट रंग त्या त्या जातीचे किंवा धंद्याचे दर्शक असत, व हल्लीं असतात हें प्रसिद्धच आहे.

बृहन्नलेच्या परिस्थितीहून अत्यंत भिन्न परिस्थिति द्रौपदीच्या सैरन्ध्री वेषाची आहे. हल्लीं सैरन्ध्री नांव समाजांत शिल्लक नाहीं, आणि हा धंदाहि शिल्लक नाहीं. राजेरजवाडयांत दासी, बटकी, पोरी वगैरे असतात; पण त्यांचा भिन्नवेष सामान्य बायकांहून निराळा असत नाहीं. चंद्रगुप्ताच्या काळीं अशा सैरन्ध्री समाजांत असत किंवा नाहीं, हें सांगता येत नाहीं. सैरन्ध्री होऊन द्रौपदी सुदेष्णेकडे गेली, तेव्हां तिचें वर्णन अध्याय ९ चे प्रारंभीं पुढीलप्रमाणें केलें आहे. " सर्व केस वरती गांठ मारून ' जुगूहे दक्षिणेपार्श्वे ' उजव्या बाजूला झाकले" कशानें तें वर्णन नाहीं. पारशी स्त्रिया केस दिसूं नयेत म्हणून डोक्यावर फडकें बांधतात, तसें फडकें केसांवर बांधलें असें वाटतें. दुसरी गोष्ट " एकं वासः परिधाय " ' एकच वस्त्र नेसून ' या वर्णनांत उत्तरीय तिनें टाकलें असें सुचविलें आहे. जसें सभापर्वांत ' एकवस्त्रा ' हें द्रौपदीचें विशेषण, तिचें विटाळसेपण

* दीर्घां वेणीं विधुन्वानः साधु रक्ते च वाससी ( अ. ३८-३१ )

सुचवितें, तसें तेंच विशेषण, येथें तिचें दासीपण सुचवितें. दासी उत्तरीय घेत नसत असा रिवाज असावा; पण एकच वस्त्र गुजराती तऱ्हेनें डोक्यावरून व खांद्यावरून घेतलेलें असावें. कारण स्तनप्रांत उघडा असणें अशक्य आहे, व तसें वर्णनहि नाहीं. दक्षिणेंत मद्रासेकडे मात्र असा प्रकार अद्याप आहे असें म्हणतात.

' परिधायैकं सुमलिनं महत् ' यांतील महत् म्हणजे लांब असा अर्थ घेऊन आपल्यास दक्षिणेंतील स्त्रियांच्या १६ हात लांब लुगडयाची कल्पना येते. पण उत्तरीयाप्रमाणें नेसलेल्या लुगडयाचाच पदर डोकीवर घेऊन उत्तरेकडील स्त्रिया, गुजराथ, पंजाब, बिहार वगैरे देशांतील, इतकें लांब लुगडें वापरीत नाहींत. हल्लीं ज्या स्त्रिया उत्तरीय घेतात त्या, नेसण्याचें लुगडें किती लांब वापरतात ही गोष्ट चौकशी करण्यासारखी आहे. असो.

पुरुषांचीं वस्त्रें अन्यत्र वर्णिल्याप्रमाणें दोन असत, एक नेसावयाचें व दुसरें उत्तरीय. तिसरें उष्णीव डोक्यावर गुंडाळलेलें असे. हें उत्तरीय अंगांत चिलखत घातल्यावरहि रथीवीर अंगावर घेत असें मानावें लागतें. कारण अ. ६६ मध्यें अर्जुनानें संमोहनास्त्रानें कौरवांस मूर्च्छित केलें, आणि उत्तरेनें मागितल्याप्रमाणें बाहुल्या करण्याकरितां कौरववीरांचीं वस्त्रें खेचून आणण्यास अर्जुनानें उत्तरास सांगितलें. येथें वर्णन करतांना द्रोण व कर्ण यांचीं वस्त्रें पांढरीं फेक ( सुशुक्ले ), कर्णाचें पिवळें, अश्वत्थामा व दुर्योधन यांचें नीळें म्हटलें आहे. ( १३ ). अर्थात् हीं वस्त्रें नेसलेलीं नव्हतीं, उत्तरीयेंच होतीं असें मानलें पाहिजे. हीं रंगी बेरंगी वस्त्रें असत, आणि म्हणून त्यांच्या बाहुल्या बनवितांनां मुलींना मौज वाटे. उत्तरा लहान होती असें अनुमान यावरून काढणें जरूर नाहीं. कारण मोठ्याच मुली बाहुल्या बनवूं शकतात, व हल्लींहि बनवितात. शत्रुवीरांचीं उत्तरीयें त्यांस युद्धांत जिंकून आणणें, व त्याच्या क्षत्रिय कन्यांनीं बाहुल्या बनविणें, ही एक वीरता वाढविण्याची युक्ति प्राचीनकाळीं असावी; अर्थात् हें वर्णन केवळ कादंबरी नाहीं असें म्हणतां येतें.

" कृत्वा वेषं च सैरन्ध्रयाः " या वाक्यांत आणखी कोणता वेष सूचित होतो, हें समजत नाहीं. ' अन्नासाठीं नोकर राहणारी, ' असें पुढें तिनें म्हटलें आहे ( ५ अ. ९ ). यावरून ती केवळ दासी होती ; पण भोगांगना नव्हती. तिचें गन्धर्वपति होते, या म्हणण्यावरून लौकिकांत कोणी पति नव्हता, हें आश्चर्यकारक आहे. अर्थात् भुजिष्या या शब्दाचा अर्थ ( श्लोक १७ व १८

अध्याय ३ ) भरणाची इच्छा करणारी एवढाच घेतला पाहिजे. " मी केस विंचरूं व बांधूं जाणते, गंध उगाळते व फुलांच्या माळा तयार करते." हें सैरन्ध्रीचें काम असे ( १८ ). पण अशा सैरन्ध्री दासी मालकिणीचें उष्टें खात ( हल्लींहि खातात ), व त्यांचे पाय धूत व हल्लीं धुतात. द्रौपदीनें या दोन गोष्टी मी करणार नाहीं, व त्यामुळें माझे गुप्त गन्धर्वपति रुष्ट होतील असें सुदेष्णेस स्पष्ट सांगितलें, व त्याप्रमाणें तिनें मान्यहि केलें. ( या गोष्टीवरून व तिच्या रूपावरून ही द्रौपदी आहे, द्रौपदीची दासी नाहीं, हें कोणाच्याहि ध्यानांत आलें असतें. अर्थात् द्रौपदी अज्ञात राहूंच शकत नव्हती, हें आमचें म्हणणें येथें आणखी दृढ होतें ).

डोक्यावर बांधलेले केस फडक्यानें झांकलेले व एकच वस्त्र, हें सैरन्ध्रीचें लक्षण, आणि लांब वेणी, तांबडी दोन वस्त्रें, कानांत कुण्डलें व हातांत कंबुवलयें, हें नृत्य शिकविणाऱ्या बृहन्नलेचें लक्षण सांगितलें आहे. त्याचप्रमाणें बल्लवाचें म्हणजे स्वयंपाक्याचें लक्षण, हातांत कालथा,* पळी, व कोशरहित चकचकित सुरा ( मांस कापण्यासाठीं ) आणि काळें वस्त्र हें होतें, असें वर्णन आहे. ( अ. ८ श्लोक २ ). हल्लींच्या धंदेवाल्या बहुतेक आचाऱ्यांजवळहि पळी कालथा असतो, पण काळें वस्त्र किंवा सुरा असत नाहीं. बल्लवांना मांस व दुग्धादि खावयास मिळत असल्यानें ते मल्लहि असत, व हत्ती, बैल, किंवा मल्ल यांशीं कुस्त्याहि खेळत. निदान भीमानें तशी प्रतिज्ञा केली होती. हत्ती, वाघ, मस्त बैल यांशीं नुसत्या हातांनीं सामना करणारे वीर त्यावेळीं समाजांत होते. किंबहुना चंद्रगुप्ताच्या समकालीन अन्यदेशीय समाजांत रोम, ग्रीस, वगैरे देशांत gladiators म्हणजे व्याघ्रादि पशूशीं कुस्ती खेळणारे मल्ल असत, व त्यांचे प्राणान्तिक तमाशे मोठमोठ्या बांधलेल्या आखाड्यांत हजारो प्रेक्षकांसमोर होत. ही मल्लयुद्धाची आवड ग्रीक-रोमन लोकांप्रमाणें भारती आर्यांना प्राचीन-काळापासून असे. विशेषतः मागील भागांत वर्णन केल्याप्रमाणें, चन्द्रवंशी आर्य मल्लविद्येचे फार अभिमानी होते, व अद्याप आहेत. दिल्ली, गुरगांव, मथुरा, अलाहाबाद, बिहार इत्यादि प्रान्तांत मल्लयुद्धाचा शोक अद्यापहि आहे; आणि तो मराठ्यांत ( हेंहि चन्द्रवंशी आर्य मुख्यतः आहेत ), पुणें, सातारा, कोल्हापुर प्रान्तांत अद्याप जागृत आहे. निरनिराळ्या उत्सवप्रसंगानें निरनिराळ्या

* खजाचे दोन तीन अर्थ ( नी. ) देतो. मन्थनदण्ड, अंगारानुक्षेपण किंवा हस्ताकार पिष्टविकार-प्रमथनदण्ड खजाथन्यप्रहस्तयोः ( विश्वः )

ठिकाणीं सर्व देशांतील मल्ल चढाओढीनें जमत व जमतात, आणि आपआपल्या देशाचे व प्रान्ताचें नांव गाजवीत व गाजवितात. मत्स्यनगरांत (हाहि चन्द्रवंशी आर्यांचाच एक वसाहत-भाग होता) याप्रमाणें त्यावेळीं ब्रह्मदेवाच्या उत्सव प्रसंगानें मल्ल चोहींकडून येत, आणि अजिंक्यपत्र घेऊन जाण्याचा प्रयत्न करीत, असें दिसतें. यावेळीं भीमरूपी बल्लवानें मत्स्यदेशाची अब्रू राखली (अ. १३ श्लो. १४–१६). हीं मल्लयुद्धें पुष्कळ वेळां प्राणान्तिकहि होत असत. विशेषतः क्षत्रियांत एकमेकाचें राज्य एकट्या राजांच्या मल्लयुद्धानें जिंकलें जाई, ही गोष्ट भीम–जरासंध युद्ध किंवा श्रीकृष्ण व कंसचाणूर यांचें युद्ध, यावरून लक्षांत येईल. भीमानें हें काम केलें म्हणून त्याची विशेष तारीफ झाली, आणि गोग्रहणाच्या वेळीं त्रिगर्तांशी युद्ध करण्यास विराटानें भीमासहि बरोबर घेतलें.

या मल्लयुद्धाचें वर्णन १३ व्या अध्यायांत श्लोक १४ पासून ३६ पर्यंत केलेलें आहे. ते मनोहर व हल्लींच्या प्रसिद्ध कीकडासिंग वगैरे मल्लांच्या युद्धाप्रमाणें बहुतेक आहे. मल्लयुद्धांत, सौतीच्या वेळेपासून आतांपर्यंत, फारसा फरक झालेला नाहीं. मात्र हल्लींचीं युद्धें प्राणान्तिक होत नाहींत. जीमूत नांवाचा मल्ल, मला कोण कुस्ती देतो म्हणून रंगांत पुढें आला, तेव्हां कोणी उत्तर देईना व पुढें येईना. तेव्हां विराटानें बल्लवास हुकूम केला. एवढ्या मोठ्या मल्लाशीं कसें खेळावें, म्हणून बतावणी करीत, आढे वेढ घेत, पण 'महाराजांची आज्ञा मान्य' असें म्हणत, भीम रंगणांत उतरला, व दण्ड थोपटून प्रथम महाराजांस मुजरा करून जीमूतास वन्दन करीत युद्धांत घुसला, हें वर्णन मनोवेधक आहे. पुढील श्लोकांत अनेक पेचांचीं नांवें आहेत; तीं संस्कृत असून हल्लीच्या कोणत्या पेचांचीं वाचक आहेत हें सांगता येत नाहीं. प्राचीनकाळापासून जपानी जीजुत्सूप्रमाणें ही विद्या भारती आर्यांनीं उत्कर्षास पोंचविली आहे, व हल्लीं कोणत्याहि देशांत इकडील प्रख्यात मल्लाचीच सरशी होत आली आहे. असो, असे अनेक पेच केल्यावर भीमानें थकलेल्या जीमूतास उचलून डोक्याभोंवतीं शंभरदा गरगर फिरविलें, (ही अतिशयोक्ति क्षम्य होय), आणि प्रेक्षकांच्या प्रचण्ड टाळ्यांच्या गजरांत त्यानें जीमूतास जमिनीवर आपटून ठार मारिलें. अर्थात् देशाची व नगराची अब्रू वाचल्यामुळें विराटराजा खुष झाला, व त्यानें भीमास मोठें बक्षिस दिलें.

पारशांचा रुस्तम, ग्रीकांचा हरक्युलीस, किंवा रोमनांचा राम्युलस, या सारखा भारती आर्यांचा भीमसेन, बल्लव म्हणजे प्रत्यक्ष सूद व सुपरिंटेंडेंट आफ

किंचन झाला, हें सांगितल्यावर आपण नकुल-सहदेव यांकडे वळूं. नकुल चाबुकस्वार होऊन विराटाच्या येथें राहिला, हें सांगताना या धंद्याचा निराळा वेष होता हें दिसून येत नाहीं; पण भीमासंबंधें जशी मल्लविद्या सौतीनें वर्णिली, त्याप्रमाणें नकुलाच्या प्रसंगानें अश्वविद्या वर्णिली नाहीं. भारती आर्य घोड्यांचे भोक्ते व स्वार वैदिककाळापासून आहेत. निदान मागच्या १९ व्या शतकापर्यंत होते. आतां बहुतेक अश्वविद्या मोटारींच्या पाण्यांत बुडाली असें म्हणावें लागतें. प्राचीन काळीं अश्वचिकित्सा चांगली ऊर्जितदशेस आली होती. व अश्वांचीं लक्षणें किती बारकाईनें पाहिलीं जात व त्यावरून अश्वपरीक्षा किती चांगली होई, हें ग्वालेरच्या माहितीवरून मला सांगता येईल. असो, आतां इंग्रेजी अश्वचिकित्सेपुढें प्राचीनकाळचे प्रसिद्ध ग्वालेरचे अश्वकोविद बाबासाहेब आपटे ह्यांचें नांव सुद्धां कोणास आठवणार नाहीं. राजेलोक स्वतः किंवा त्यांचे भाऊबंद या विद्येंत प्राचीनकाळीं प्रवीण असत, आणि नकुल हा खरोखरच युधिष्ठिराच्या राज्यांत अश्वशाळेवर व अश्वचिकित्सेवर प्रधान अधिकारी असावा. तो म्हणतो, " युधिष्ठिरानें मला घोड्यांवर नेमिलें होतें. मी घोडयांची प्रकृति ओळखतो, त्यांना मी शिक्षण देतों, त्यांना योग्य चाली वगैरे शिकवून त्यांचे दुर्गुण काढतो, दुष्ट घोडयांना वठणीवर आणतो, आणि घोडयांचें सर्व चिकित्सित जाणतो. माझें वाहन चमकणार नाहीं. मला कोणतीच घोडी वाईट नाहीं, मग घोडा कोठून असेल ? " या लहान वर्णनांत अश्वविद्यासार सौतीनें दिलें आहे, व यावरून चन्द्रगुप्ताच्याकाळीं ही विद्या कशी उत्कर्षस्थितींत व लोकप्रिय होती हें दिसेल.

सहदेवाच्या गोपाळ होण्यासंबंधाची हकीकत ज्यास्त विस्तृत व मनोवेधक आहे. ' गोपानां । कृत्वा वेषमनुत्तमम् ' या वाक्यावरून प्रथम हें दिसतें कीं, गोपांचाहि वेष निराळा असे. तो कसा होता हें येथें सांगितलेलें नाहीं. तसेंच " तेषां भाषां समास्थाय " यावरून गोपांची भाषाहि निराळी होती हें सिद्ध होतें. हे गोप वैश्य होते, हेंहि अध्याय १० श्लोक ५ मध्यें स्पष्ट आहे; आणि वैश्यांचा हल्लीं धंदा जरी केवळ व्यापार न व्याजबट्टा राहिला आहे, तरी ख्रिस्तपूर्वकाळांत कृषि—गोरक्ष्य—वाणिज्य ( भगवद्गीता ) हे तीन धंदे वैश्य करीत. गाईंचे कळप मोठमोठ्या गुरचरणांत चारून समाजाला दुध—दही—लोणी पुरविणें हें काम वैश्यांचें होतें. नंदगोप हा वैश्य होता, व व्रजांतील गवळणी वैश्य होत्या, हें आपण विसरतों. असो, सौतीच्या वेळीं ( इ. स. पू. ३०० ) हे वैश्य गोप

संस्कृत भाषा बोलत नव्हते हें ठीकच आहे. पाणिनिकालांत सर्वच लोक-ब्राह्मण क्षत्रिय-वैश्य-शूद्र संस्कृत बोलत. त्यानंतर बौद्धकाळांत पालीभाषा (प्रथम प्राकृत) उत्पन्न झाली; त्याचें कारण आम्ही अन्यत्र ( History of Sanskrit Litarature, Vedic Period) दिलें आहे. आश्चर्य हें कीं, सौति येथें कोणत्याहि प्राकृत भाषेचें नांव घेत नाहीं, किंबहुना 'प्राकृत' शब्दहि वापरीत नाहीं. "तेषां भाषां समाश्रित्य" म्हणजे गोपांची विशिष्ट लकब एवढाच अर्थ घ्यावा असें आम्हास वाटतें. या कालानंतर लवकरच चार प्राकृत भाषा देशभेदानें, महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी व पैशाची, उत्पन्न झाल्या असा तर्क होतो. वार्तिककार वररुचि याच कालांत झाला. त्याच्या वार्तिकांत प्राकृतांचा उल्लेख नाहीं, यावरून प्राकृत व्याकरणकार वररुचि याहून भिन्न ( इ. स. पू. १०० बु. ) नंतर उत्पन्न झाला असावा. असो, "भाषां चैषां समास्थाय" या शब्दावरून उत्पन्न झालेली शंका येथें नमुद करून आपण पुढें जाऊं.

गोरक्षणाचेंहि शास्त्र व कर्म चांगलें प्रगतीस गेलें होतें, व देशांत सर्वत्र, हजारों किंबहुना लाखो गाई असत, ही गोष्ट नकुलाच्या भाषणावरून स्पष्ट दिसते. आणि सांगण्यासारखी दुसरी गोष्ट ही कीं, येथें म्हशींचा उल्लेख मुळींच नाहीं. त्यांचें दुध व तूप पुढें हिंदुस्थानांत शिरलें. तें स्वस्त पडत असल्यानें अलीकडे म्हशींनीं गाई मारल्या, व त्याबरोबर भारती आर्यांचे बौद्धिक व शारीरिक तेजहि मारलें. असो, युधिष्ठिर वगैरे राजेहि आपली स्वतंत्र गाईंचीं खिल्लारें बाळगीत व दुग्धदुभत्याचा पुरवठा राजवाड्याबरोबर ब्राह्मणादि गरीब लोकांनाहि करीत. 'युधिष्ठिराच्या, शंभर शंभराचा एक कळप, याप्रमाणें ८ लक्ष गाई आहेत; दुसरा एक लाखाचा आणि तिसरा दोन लाखाचा अशीं तीन खिल्लारें आहेत, मी त्यावर गोसंख्य अधिकारी होतों. दहा योजनें विस्तीर्ण अशा गुरचरणींत त्या चारीत होतों. मागें काय झालें, हल्लीं काय होतें व पुढें काय होणार, तें मी जाणतों गाई लवकर कशा वाढवाव्या, त्यांचें रोग-निवारण कसें करावें, ही कला मला अवगत आहे. त्याचप्रमाणें वृषभांची उत्तम लक्षणें मी जाणतो. उत्तम वृषभ कोणता "येषां मूत्रमुपाघ्राय अपि वंध्या प्रसूयते" ( वंध्या स्त्री किंवा गाय ) तें मी जाणतों.' नकुलानें केलेल्या या वर्णनावरून गाईच्या रक्षणाचें शास्त्र त्यावेळीं उन्नत दशेस पोंचलें होतें असें दिसतें. विराटानें आपल्या निरनिराळ्या वर्णांच्या कळपांनीं एक लाख गाई त्याच्या स्वाधीन केल्या, असें पुढें म्हटलें आहे. यावरून

गाईंचा रंगहि गुणदृष्ट्या महत्वाचा असतो, हें आपल्या लक्षांत येतें; म्हणूनच कपिला गाईची महती आहे.

वरील वर्णनावरून समाजांतील धंदे व त्या त्या धंद्याची विशिष्ट विद्या व पोषाक याविषयीं आपल्यास या पर्वांत मनोरंजक माहिती मिळते. खाण्यापिण्या-संबंधानें पाहतां क्षत्रिय सुरा पीत, व ही सुरा विशिष्ट प्रकारची राजवाडयांतच बनत असे, हें सैरन्ध्री–सुदेष्णा–संवादावरून ( अ. १५ ) दिसतें. ब्राह्मण सुरा पीत नसावे, पण ब्राह्मण मांस खात हें निर्विवाद आहे. युधिष्ठिर कंक भटजी होऊन विराटाचा सोंगट्या खेळणारा नोकर ( अक्षावाप ) झाला, तो सरकार-वाडयांत जेवीत नसे असें दिसतें. पण त्यास सर्वप्रकारचीं 'उत्तम मांसें' बल्लव विकीत असे, असें अध्याय १३ श्लोक ७ यांत स्पष्ट म्हटलें आहे. विकीत असे असें म्हणण्याचें तात्पर्य हें कीं, कंक बल्लवाचा मान्य वडील बन्धु आहे हें कोणाच्या नजरेस येऊं नये. त्याचप्रमाणें सहदेव सुद्धां पांडवांनां दधि, क्षीर, व घृत पुरवीत असे. तेव्हां मुख्य अन्न गोरस असलें तरी क्षत्रिय–वैश्यांसह ब्राह्मण मांस खात असत हें उघड आहे. हीच गोष्ट मागील सभापर्वांतील ब्राह्मणभोजनावरूनहि सिद्ध झाली आहे.[1]

"वीणेव मधुरालापा गान्धारं साधु मूर्च्छती" ( अ. १७–१४ ) या श्लोकार्द्धांत, त्यावेळीं गायनशास्त्राचीहि चांगली प्रगति झाली होती, हें सिद्ध होतें. वादित्रामध्यें मृदंग आणि गायनसाधनामध्यें वीणा हीं दोन वाद्यें हिंदुस्था-नांत प्राचीनकाळापासून चालत आलेलीं आहेत. किंबहुना या वाद्यांच्या विद्या सौतीच्या काळींच उन्नत दशेस पोंचल्या होत्या असें म्हणतां येतें. भरतमुनीचें शास्त्र फार जुनें आहे. श्रौतसूत्रांत निरनिराळ्या प्रकारच्या वीणा आणि मृदंग उल्लिखित आहेत, व सप्तसुरांचेंहि ज्ञान त्यावेळीं चांगलें होतें. वीणा षड्जसुरांत लाविलेली असते हें प्रसिद्धच आहे, पण या षड्जांतून मूर्च्छनेनें गान्धारस्वर निघतो हें पुष्कळांना ठाऊक नसेल. मूर्छनेंत म्हणजे स्वराच्या पुढील हेलकाव्यांत निराळे सूर ऐकूं येतात, हा सिद्धान्त हल्लींच्या पाश्चात्यांच्या गानशास्त्रांत (Vibrations) व्हायब्रेशन्स म्हणजे तारेची आंदोलनें मोजण्याचीं यंत्रें निघाल्यानें स्थापित झालाच आहे. पण ही गोष्ट केवळ कान देऊन पूर्वाचार्यांनीं जाणलीं होतीं.

१ ब्राह्मणवैश्यांची मांसनिवृत्ति बौद्धधर्मातून उत्पन्न होऊन हिंदुधर्माचा जेव्हां जय श्रीमच्छंकराचार्यांच्या वेळेस झाला तेव्हांपासून आतांपर्यंत पंचद्रविडांतच चालू आहे.

गान्धार शब्दांत द्व्यर्थ* आहे, असें कोणास म्हणतां येईल हें खरें; आणि श्लेषाचें हें ( एकच कां होईना ) उदाहरण आपल्यास ओढून ताणून येथें धरतां येईल. पण नीलकंठानेंहि तसा अर्थ येथें केला नाहीं. त्यानें " गान्धारं स्वरविशेषं मूर्छती मूर्छयन्ती " एवढाच अर्थ दिला आहे. गान्धार मूर्छनेत निघाल्याशिवाय वीणेचा आवाज गोड लागत नाहीं, आणि शुद्ध षड्ज लागला असेल तरच गान्धारमूर्छना होते, हें वीणास्वरज्ञांस माहित आहे. म्हणून ' मधुरालापा ' याचेंच स्पष्टीकरण " गाधारं साधु मूर्छती " या शब्दानीं केलेलें आहे.

जातिभेदासंबंधानें विशेष सांगण्यासारखे या पर्वांत दिसत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार मुख्य वर्णांचा भेद चालूच होता; पण मध्यंतरी उपवर्ण उत्पन्न झाले होते कीं नाहीं, हें स्पष्ट होत नाहीं. कीचकांस सूतपुत्र म्हटलें आहे, यावरून सूत ही निराळी जात झाली होती; आणि ते सारथ्याचेंहि काम करीत व क्षत्रियाचेंहि काम करीत. कर्णहि सूतपुत्रच होता. कीचक सुदेष्णेस बहीण म्हणतो, पण ती मानलेली बहीण होती. तिला कैकेयी म्हटलें आहे, यावरून ती कैकेय राजाची मुलगी होती. रामाची सावत्र माता कैकेयीच होती. पंजाबांतील स्त्रिया अजूनहि सुन्दर असून दारू पिणाऱ्या आहेत. पंजाबी लोकांचा हा दुर्गुण महाभारतांत पुढें कर्णपर्वांत कर्णानें शल्याची निर्भर्त्सना करतांना सांगितला आहे. राजपुत्री हें विशेषण नेहमीं द्रौपदी, कैकेयी, उत्तरा यांना लावलेलें आढळतें. उत्तराlाहि राजपुत्र म्हटलें आहे. यावरून आम्हीं पूर्वी म्हटल्याप्रमाणें राजपूत व इतर क्षत्रिय असा भेद यापूर्वींच उत्पन्न झाला होता; आणि राजपुत्र हें सामान्यनाम सौती-इतकें तरी जुनें आहे (इ. स. पू. ३००). 'बल्लवजातीयः' असा शब्दहि एके ठिकाणीं आला आहे. यावरून मान्य वैदिक कर्में करणारे ब्राह्मण आणि स्वयंपाकी ब्राह्मण, असा भेदहि उत्पन्न झालेला दिसतो; परंतु तसा भेद हल्लीं तरी नाहीं. ब्राह्मण बहुतेक पाणके व स्वयंपाकीच हल्लीं असले तरी सावकार ब्राह्मण व भिक्षुक ब्राह्मण अजून निराळे पडलेले नाहींत. " सूदकर्मणि हीने त्वमसमे भरतर्षभ । ब्रुवन् बल्लवजातीयः कस्य शोकं न वर्धयेः ॥ " ( १९–२ ) या श्लोकांत बल्लवजाति सांगितली ती कदाचित् ब्राह्मण वर्ण नसेल. त्यावेळीं ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्य, शूद्राचे हातचे खात असत. बल्लव निदान वैश्यहि असूं शकतील. क्षत्रिय मात्र नसावेत. " अप्रैषीद्राजपुत्री मां सुराहारीं तवान्तिकम् ॥ " ( अ. १६–४ ) या सैरन्ध्रीच्या वाक्यांत राजपुत्री हा शब्द यौगिक अर्थानें ' राजाची मुलगी ' अशा

* गान्धार म्हणजे युद्ध असें कित्येक समजतात.

अर्थानें अभिप्रेत नाहीं. कारण दारू मागण्यास पाठविलें या क्रियेंत त्याचें स्वारस्य नाहीं; पण राजपूत या रूढ अर्थानें जातिवाचक शब्द येथें बरा दिसतो. "सा हता सूतपुत्रेण राजपत्नी यशस्विनी " ( अ. १७–१ ) या वाक्यांत राजपत्नी असा निराळा शब्द आहे, आणि यौगिक अर्थानें म्हणजे 'राजाची बायको' या अर्थानें येथें योग्य येतो. 'सूतपुत्रानें राजाच्या पत्नीस लाथ मारली' हा महान् अपराध झाला असें ध्वनित होतें. तात्पर्य राजपूत ही निराळी पोटजाति क्षत्रियांत होती, आणि बल्लव जात ब्राह्मणांत किंवा वैश्यांत निराळी होती असें दिसतें.

सामाजिक स्थितीसंबंधें शेवटली गोष्ट सांगण्यासारखी अशी कीं, पांडवांनीं श्मशानाजवळील शमीवृक्षावर आपलीं शस्त्रास्त्रें ठेविलीं, तेव्हां त्या झाडाला एक शव बांधलें असें वर्णन आहे. हें शव कोणाचें होतें व तें त्यांस कसें सांपडलें, हा प्रश्न आहे; कारण याबद्दल येथें कांहींच सांगितलें नाहीं ( अ. ५–३१ ). तेव्हां अशीच कल्पना करणें प्राप्त आहे कीं, अंत्यविधि दोन्हीं प्रकारानें त्यावेळीं होत असे. अग्निसात् प्रेत करणें किंवा तसेंच, गृध्रादि पक्षी खातील या हेतूनें, श्मशानांत टाकून देणें, या दोन्ही चाली प्रचलित असाव्या. प्रेत पुरणें किंवा टाकून देणें, अशी दोन्ही प्रकारची चाल प्राचीन आर्यांत सर्व देशांत होती, व हल्लीं आहे. अग्निसंस्कार हा प्रकार हिंदुस्थानांतच आर्य आल्यावर त्यांनीं सुरू केला असा इतिहास सांपडतो. पण कित्येक वेळां येथेंहि प्रेतें टाकून देत. विदुराच्या देहाची अशीच व्यवस्था केल्याचें पुढें वर्णन आहे. तो जीवन्मुक्त होता, आणि जीवन्मुक्ताची अशी व्यवस्था करीत. कांहीं रानटी लोकांतहि प्रेत टाकून देण्याची चाल असावी. पांडव अज्ञातवासास निघाले तेव्हां त्यांनीं 'लुब्धक' पारधी बनून लोकांस असें सांगितलें कीं, " ही आमची १८० वर्षांची म्हातारी आहे, आणि आमच्यांत ही अशी चाल आहे " ( अ. ५–३३,३४ ). तेव्हां सौतीच्या वेळीं रानटी शिकारी लोकांत अशी चाल असावी आणि म्हणूनच पांडवांचें म्हणणें लोकांस–धनगर व गुराखी वगैरेस–मान्य झालें. पण हें शव श्मशानांत पूर्वीं कोणीतरी टाकून दिलेलें असलें पाहिजे. कारण प्रत्यक्ष पांडवांबरोबर कोणी म्हातारी नव्हती. १८० वर्षांची म्हातारी हें सांगणेंहि पटलें यांत नवल नाहीं. सौतीच्या वेळीं म्हणजे ग्रीकांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं दोन–दोनशें वर्षांचे म्हातारे हिंदुस्थानांत होते, व ते पाहिल्याचें ग्रीक इतिहासकारांनीं लिहूनहि ठेविलें आहे. विशेषतः अरण्यांत राहणारे लोक, तपस्वी वगैरे, मोठे दीर्घायुषी असत, असा पुरावा मिळतो. त्याचप्रमाणें ग्रीकांनीं तक्षशिलामधील लोक प्रेतें गिधाडाकडून

खाववितात असें वर्णन केलें आहे. यावरून अशी चाल पंजाबांत त्यावेळीं शिल्लक होती हें सिद्ध आहे. ( महाभारत उपसंहार पृ. ४१९ पहा ).

## विवाहांत पुरुषांचें वय

उत्तरेचा विवाह प्रौढ वयांत झाला तरी अभिमन्यूचा विवाह बालपणातच झाला असें कोणी म्हणेल; पण हा विवाह अपवादक होता. अर्जुनास स्वतः उत्तरेशी विवाह करणें अप्रशस्त वाटलें; पण विराटराजानें आपण होऊन देऊं केलेली कन्या नाकारणें राजकीयदृष्ट्या पसंत वाटेना म्हणून त्यानें सून म्हणून तिला पत्करलें. ( याच संबंधामुळें पांडवांचें राज्य मागणें, व न मिळाल्यास युद्ध करणें, या गोष्टीस मदत झाली हें उघड आहे ). अर्जुनानें अभिमन्यूचा विवाह केला, त्यावेळीं त्याचें वय १६ वर्षांवर थोडें अधिक असावें. तो युद्धांत मारला गेला, त्यावेळीं उत्तरा गरोदर होती; हें लक्षांत घेतलें म्हणजे त्याचें वय १८ वर्षांचें तरी असावें. १६ पासून १८ पर्यंत राजांचे पुत्र विवाहास व विवाहानंतर तात्काळ गर्भाधान करण्यास योग्य असतात, हें प्रसिद्ध असून हल्लींहि अनुभवास येणारें आहे. विवाहविधींतच चतुर्थी-कर्माचा अन्तर्भाव पूर्वकाळीं प्रत्यक्ष होता, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हल्लींप्रमाणें ते केवळ नांवास होत नव्हते. पण अर्जुनाच्या पुत्राचा हा विवाह अपवादकच होय, हें इतर महाभारतांतील विवाहवर्णनांवरून दिसून येईल. श्रीकृष्णचरित्रांत आम्हीं कृष्ण व अर्जुन यांच्या आयुष्यांतील ठळक गोष्टींच्या ज्या मित्या ऐतिहासिकदृष्ट्या दिल्या आहेत, त्यांतून कांहीं वृत्तांच्या मित्या येथें देण्यासारख्या आहेत.

| इ. स. पू. | वृत्त | श्रीकृष्णाचें वय | अर्जुनाचें |
|---|---|---|---|
| ३१८५ | कृष्ण जन्म | + | |
| ३१६७ | कंसवध | १८ | जन्म |
| ३१६० | रुक्मिणीविवाह | २५ | ७ |
| ३१५८ | प्रद्युम्नजन्म | २७ | ९ |
| ३१४२ | द्रौपदीस्वयंवर | ४३ | २५ |
| ३१२० | सुभद्राहरण | ६५ | ४७ |
| ३११८ | अभिमन्युजन्म | ६७ | ४९ |
| ३११७ | राजसूय | ६७ | ५० |
| ३११५ | हस्तिनापुरीं द्यूत | ६९ | ५२ |
| ३१०२ | भारतीयुद्ध | ८३ | ६५ |

वरील आंकडे ठोकळ व अनुमानसिद्ध जरी आहेत तरी त्यावरून असें स्पष्ट होतें कीं, अभिमन्यूचें लग्न जरी १६ व्या वर्षी झालें, तरी अर्जुनाचा व श्रीकृष्णाचा प्रथम विवाह २५ च्या सुमारें झाला. अर्थात् त्याकाळीं किंबहुना सौतीच्या काळापर्यंत, पुरुषांचे व स्त्रियांचे विवाह प्रौढ वयांत म्हणजे अनुक्रमें २५ व १६ चे सुमारें होत असत, व वैद्यशास्त्राप्रमाणें यापूर्वी झालेली गर्भधारणा " कुक्षिस्थः स विपद्यते " यांत सांगितल्याप्रमाणें सशक्त होत नाहीं.

याच प्रसंगानें आणखी एका गोष्टीचा उलगडा येथें करूं. या पर्वांत अ. ४३-६ मध्यें अर्जुन म्हणतो कीं, हें गांडीव धनुष्य मजजवळ ६५ वर्षे आहे. " पार्थः पञ्च च षष्टि च वर्षाणि श्वेतवाहनः ॥ ( धनुरधारयत् ) " पण जर अर्जुनाचें वयच ६५ वर्षांचें यावेळीं होतें तर ६५ वर्षें गाण्डीव त्यानें धारण केलें हें संभवनीय नाहीं. कदाचित् " ६५ वर्षांचा मी " हें धनुष्य धारण करतो असा अर्थ करतां येईल; पण मागील संदर्भावरून ( " शक्रानें इतकीं वर्षें, सोमानें इतकीं वर्षें, वरुणानें इतकीं वर्षें हें धनुष्य धारण केलें " ) येथें वर्षसंख्या धनुष्यधारणाची पाहिजे आहे. तेव्हां नी. नें अशी युक्ति सुचविली आहे कीं, वर्ष म्हणजे पाऊस, एक संवत्सरांत दोन पाऊस पडतात, तेव्हां ६५ वर्षें म्हणजे ३२॥ वर्षें घ्यावीं. याचा हिशोब मागील तो असा देतो. १३ वर्षें वनवास व अज्ञातवास, १२ वर्षें पूर्वीचा प्रतिज्ञा-वनवास ज्यांत उलूपीशी वगैरे विवाह झाले; आणि ७॥ वर्षें अन्य राजसूय वगैरे. वरील कोष्टकांत आम्ही खांडवदाहाचें वर्ष दिलें नाहीं; पण तें इंद्रप्रस्थ-स्थापनेनंतर लवकरच असावें. इंद्रप्रस्थ-स्थापना द्रौपदीस्वयंवरानंतर झाली, त्याचें वर्ष आम्ही ३१४० इ. स. पू. दिलें आहे, यावेळीं अर्जुनाचें वय २७ होतें. यानंतर ४-५ वर्षांनीं खांडवारण्य जाळून पांडवांनीं आपल्या राज्याचा विस्तार केला, तेव्हां अर्जुनाच्या ३२ व्या वर्षी त्यास गांडीव मिळालें असें धरतां येईल. व गोग्रहणप्रसंगीं त्याचें वय ६४ पुरें होऊन ६५ वें लागलेलें असावें. या रीतीनें हें गूढ सौतीनें सोडविलें; पण प्राचां मतें याचे निराकरण दुसरेंच आहे. असो, अर्जुनाचें वय भारतीयुद्धप्रसंगीं ६५ होतें हें द्रोणपर्वांत निश्चित आहे. तेव्हां येथें सौतीनें असा संख्यावाचक कूटशब्द घातला आहे कीं, त्यामुळें प्राचां, उदीचां व दक्षिणात्य पंडित, हे सर्वच डोकें खाजवीत बसले आहेत.

आणखी शंका उत्पन्न करणारी गोष्ट अशी कीं, माझे पांच गन्धर्वपति आहेत या सैरन्ध्रीच्या बोलण्यावर लोकांचा किंवा सुदेष्णेचा विश्वास कसा बसला याचें आश्चर्य वाटतें. अगोदर मनुष्याला गन्धर्व, हिमालयापलीकडचे आकाशांतील किंवा स्वर्गांतील, पति होणें अशक्य, आणि तेहि पुन्हा पांच ! तेव्हां पाण्डव गुप्त झालेले हिचे पति आहेत, अशी शंका आलीच पाहिजे. परंतु ज्याअर्थी अशी शंका आली नाहीं, त्याअर्थी भूत, पिशाच, यक्ष, राक्षस, गन्धर्व, सर्प वगैरे अमानुषयोनि लोकांसंबंधानें त्याकाळीं ज्यास्त श्रद्धा होती, असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं.

## धार्मिक परिस्थिति

या विषयावर या पर्वांत विशेष सांगण्यासारखें नाहीं. आर्यांचा वैदिक धर्म विशेषतः यज्ञयाग व अग्निहोत्र असें, हें पूर्वीच्या पर्वांतून दिसलेलें येथें आलें आहे. पांडवाच्या बरोबर त्यांची प्रत्येकाचीं अग्निहोत्रें वनवासांत होतीं; त्यांनीं धौम्यपुरोहिताबरोबर तीं पाञ्चालनगरास पाठविलीं, यावरून धर्मराज कंक ब्राह्मण झाला, तेव्हां त्यास अग्निहोत्राची जरूरी पडली नाहीं असें सिद्ध होतें. अर्थात् सामान्य परिस्थितींतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अग्निहोत्र ठेवीतच असें नाहीं. याचवेळीं मूर्तिपूजा सुरू झाली होती असें आम्हीं सभापर्वाच्या समालोचनांत (पा. २४) दाखविलेंच आहे. या मूर्तिपूजेंत पंचायतनपूजा अद्याप आली नव्हती, तरी विष्णु, शिव, सूर्य, देवी व गणपति, यांची पूजा किंवा भक्ति यापूर्वींच सुरू झालेली दिसते. त्यांत या पर्वांत सूर्य आणि देवी यासंबंधानें सांगण्यासारखे स्वतंत्र दोन प्रसंग आहेत. कीचकाच्या घरीं जाण्याचा भयंकर प्रसंग आला, त्यावेळीं द्रौपदीनें सूर्याची स्तुति केली, असें वर्णन ( अध्याय १५–१९ ) आहे. येथें नुसतें " उपातिष्ठत सा सूर्यं मुहूर्तमबला ततः । " एवढेंच म्हटलें आहे; परंतु सूर्याची लौकिक स्तुति ( उपस्थान ) येथें दिलें नाहीं. बहुधा सूर्याचें प्रसिद्ध वैदिक उपस्थान येथें अभिप्रेत असावें. सूर्यानें प्रसन्न होऊन एक राक्षस तिच्या रक्षणासाठीं तिच्या पाठोपाठ पाठविला, व त्यानें कीचकास धक्का मारून खालीं पाडलें असेंहि नंतर वर्णन आहे. सूर्याप्रमाणें देवीचीहि पूजा व भक्ति सुरू असल्याचें गमक याच पर्वांत पूर्वींच्या एका अध्यायांत आहे. पांडव अज्ञात वासा-

करितां जाऊं लागले तेव्हां युधिष्टिरानें देवीची स्तुति केली, असें अध्याय ६ च्या प्रारंभीं म्हटलें आहे, व "दुर्गा त्रिभुवनेश्वरी" चें प्रसिद्ध स्तोत्रहि दिलें आहे. वास्तविक या स्तोत्राची किंवा दुर्गेच्या स्तुतीची येथें कांहीं जरूरी नव्हती; कारण दुर्गा संकटांतून तारणारी आहे ही सामान्य कल्पना जुनी दिसत नाहीं. शिवाय द्रौपदी संकटसमयीं पुढें सूर्याचा स्तव करीत आहे. तसेंच हें एक पांडवांचें कुलदैवत होतें असेंहि दिसत नाहीं. हेंच दुर्गास्तोत्र पुढें भीष्मपर्वांत लढाई सुरू होण्याच्या पूर्वीं अर्जुनाच्या मुखांत सौतीनें घातलें आहे. (सौति स्वतः दुर्गाभक्त दिसतो). या स्तोत्रांत देवीच्या महात्म्याची बहुतेक सर्व प्रसिद्ध असलेलीं अंगें आहेत. परंतु प्रारंभींच तिला कृष्णभगिनी 'नंदगोपकुले जाता' म्हटलें आहे अर्थात् येथें श्रीकृष्णकथेपैकीं प्रारंभींचा भाग, ज्यांत यशोदेला झालेली मुलगी वसुदेवानें कृष्णाच्या ऐवजीं आणून ठेविली, आणि ती कंसानें दगडावर आपटली असतां आकाशांत निघून गेली, या कथेचा उल्लेख आहे. ("शिलातलविनिक्षिप्तामाकाशं प्रति गामिनीम्"). यावरून असा तर्क करितां येतो कीं, कृष्ण-समकालीन पांडवाच्या कथेंतील हें दुर्गास्तोत्र नसावें (इ. स. पू. ३१००). परंतु तें सौतीच्या वेळेस दुर्गाभक्ति प्रचलित झाल्यावर उत्पन्न झालेलें असावें. या स्तोत्रांत 'महिषासुरनाशिनी' हें विशेषण तर आहेच, पण "विन्ध्ये चैव नगश्रेष्ठे तव स्थानं च शाश्वतम्" यांत विन्ध्यवासिनीहि तिला स्पष्ट म्हटलें आहे. हल्लीं डोंगरावर मिर्झापुराजवळ देवीचें मंदिर प्रसिद्धच आहे. "कालि कालि महाकालि" असेंहि तिला संबोधिलें आहे (१७). आणि 'सीधुमांसपशुप्रिये' असेंहि म्हटलें आहे, तेव्हां कलकत्याच्या निदान बंगाल–आसाममधील देवीचें येथें स्मरण दिसतें. अर्थात् हें स्तोत्र पांडवकालीन नसून सौतिकालीन आहे हें उघड आहे. "कान्तारेष्ववसन्नानां मग्नानां च महार्णवे। दस्युभिर्वा निरुद्धानां त्वं गतिः परमा नृणाम्॥ जलप्रतरणे चैव कान्तारेष्वटवीषु च। ये स्मरन्ति महादेवी न च सीदन्ति ते नराः" ॥ २०–२१, या श्लोकांवरून किंवा "प्रवासे नगरे चापि संग्रामे शत्रुसंकटे। अटव्यां दुर्गकान्तारे सागरे गहने गिरौ। ये स्मरिष्यन्ति मां राजन् यथाहं भवता स्मृता॥" यावरून, तसेंच या स्तोत्राला नेहमींच्या स्तोत्रासारखी फलश्रुतिहि दिली आहे त्यावरून, हें स्तोत्र लोकप्रिय झालेले होतें; आणि देवी देवता विशेषतः कठिणप्रसंगीं पूजण्याची व स्तवण्याची होती असें म्हणतां येतें. किंबहुना शिव व दुर्गा यांचीं स्थानें अरण्यांत व डोंगरांत असून, या मुळांत अनार्यांच्या देवता असाव्या असा तर्क होऊं शकतो. असो, शिव, विष्णु,

सूर्य व देवी यांच्या भक्तीचा व पूजेचा उल्लेख महाभारतांत आहे. गणपतीच्या भक्तीचा उल्लेख महाभारतांत प्रारंभीच्या कथेशिवाय दिसत नाहीं.

याच प्रकरणांत आपण आर्यांतील गोत्रपद्धतीचा विचार करूं. प्राचीन-काळापासून, निदान श्रौतसूत्रकाळापासून, ब्राह्मणक्षत्रियांत गोत्रपद्धति प्रचलित आहे; आणि ती निदान ब्राह्मणांनीं आतांपर्यंत अबाधित जशीच्यातशीं चालविली आहे. ब्राह्मणक्षत्रियांत एकच गोत्रप्रवर आहेत, तेव्हां गोत्रऋषि हा वंशोत्पादक किंवा वंशाचा गुरु, हा प्रश्न हल्लीं विवादित आहे. याबद्दल मध्ययुगीन भारत भाग २ यांत क्षत्रियांच्या गोत्रांचा विचार करतांना गोत्रें क्षत्रियांचींहि वंशोत्पत्ति-सूचक आहेत असें आम्हीं दाखविलें आहे. यासंबंधानें विशेष अडतें असें गोत्र वैयाघ्रपद्य हें आहे. ब्राह्मणांना प्राचीनकाळापासून " किं गोत्रोऽसि ". हा प्रश्न ब्राह्मणत्वाची चिकित्सा करतांना नेहेमीं होतो. ( छान्दोग्योपनिषत् पहा ) त्याप्रमाणें विराटराजानें कंकभट्टास विचारलें तेव्हां युधिष्ठिरानें " मी वैय्याघ्रपद्य आहे. " असें उत्तर दिलें ( ७-१२ ). पण " वैय्याघ्रपद्यः पुनरस्मि विप्रः । " या उत्तरांत धर्मानें आपलें मूळ क्षत्रिय गोत्र सांगितलें किंवा नवीन कल्पित गोत्र ब्राह्मण-वेषांतलें सांगितलें, हा प्रथम प्रश्न पुढें येतो. युधिष्ठिरानें आपलें क्षत्रिय गोत्रच सांगितलें असाच निकाल द्यावा लागतो. एक तर युधिष्ठिर खोटें बोलणार नाहीं. दुसरें ब्राह्मण-क्षत्रियांचीं एकच गोत्रें होतीं व आहेत. गोत्र खोटें सांगितलें असें ठरेल तर पुढचे प्रश्न उपस्थित होत नाहींत. पण खरें क्षत्रिय गोत्र सांगितलें असें मानलें तर पुढचा प्रश्न असा कीं, " व्याघ्रपाद " ऋषि पांडवाच्या किंबहुना कौरवांच्या वंशांत कुरुपूर्वी दिसत नाहीं. ही वंशावळ महाभारतांतच दिली आहे. बरें पुरोहित गोत्र मानलें तर पांडवांचा पुरोहित धौम्य होता आणि धौम्य आणि वैय्याघ्रपद्य एका प्रवरांतले नाहींत. जयपुरच्या हल्लींच्या विद्वान् धर्म-मंत्र्यानें याज्ञवल्क्याच्या वचनाच्या आधारें मिताक्षरेनें दिलेलें मत ग्रहण करून एवढें आणखी सांगितलें कीं, हें पुरोहित गोत्र अगदीं प्राचीन काळीं घेतलेलें असून तें पुढें कधीं बदलत नाहीं. पुरोहित नवीन घेतला तरी बदलत नाहीं. ( म. यु. भारत भाग ३ परिशिष्ट पहा ). त्या मताप्रमाणें मानलें तरी पांडवांच्या पूर्वजांनीं हा नवीन पुरोहित केला असें दिसत नाहीं. भरताचा किंबहुना दुष्यन्ताचा पुरोहित कण्व होता आणि भरताचें गोत्र कण्व असावें. कौरव कोणतें गोत्र लावीत हें महाभारतांत उल्लिखित नाहीं. भीष्माच्या गोत्राचा उल्लेख एके ठिकाणीं सांपडतो,

वसिष्ट—शक्ति—पराशर या परिणालिकेनें व्यास आणि त्यापासून धृतराष्ट्र व पांडु, तेव्हां पराशर गोत्र पांडवांचें असावें. परंतु तें नाहीं. कदाचित् पांडवांनीं हिमालयांतील जशी बहुपतिकत्वाची चाल डोंगरी ब्राह्मणक्षत्रियांपासून उचलली, त्याप्रमाणें हें नवीन गोत्रहि डोंगरी लोकांकडून घेतलें असेल, असो हा विवाद मिटणें दुरापास्त दिसतें; पण वैयाघ्रपद्य हें या पर्वांत सांगितलेलें गोत्र अद्याप पांडववंशीय तवर वगैरे रजपूत चालवितात ( मध्य यु. भा. २ ).

## राजकीय परिस्थिति

याप्रमाणें या पर्वांत दिसून येणाऱ्या अनेक सामाजिक गोष्टी नमुद केल्यावर आपण त्यांतील राजकीय गोष्टीकडे वळूं. राज्यें म्हणजे राष्ट्रें त्याकाळीं लहान असत हें अन्यत्र आम्हीं सांगितलेंच आहे, व या राज्यांतील क्षत्रिय बहुधा एका वंशाचे किंवा कुळीचे असत. विराटराजाचा मत्स्य देश लहान असून त्यांतील क्षत्रिय मत्स्य, चंद्रवशी क्षत्रियांच्या एका शाखेंतील होते, व त्यावरून देशास मत्स्य नांव पडलें होतें. सभापर्वाच्या समालोचनांत आम्हीं नकाशा जोडला आहे, त्यावरून या देशाचें स्थान लक्षांत येईल. विराटनगरी या राजधानींत ( स्वतंत्र नांव राजधानीचें कोठें आलेलें दिसत नाहीं ) विराट या नांवाचा मत्स्य राजा यावेळीं राज्य करीत होता. त्यास वाहिनीपति असें जागजागीं म्हटलें आहे, याचें कारण काय हें लक्षांत येत नाहीं. राजा हा सेनेचा मालक किंबहुना सेनापति अथवा चालक नेहमीं असावयाचाच, असा तेव्हां नियम होता; त्याप्रमाणें विराट स्वतः सेना घेऊन युद्धास निघाला. कीचक त्याचा सेनापति मंत्री होता. त्यास वाहिनीपति म्हटलें असतें तरी हरकत नव्हती. असा तर्क होतो कीं, विराटराजाजवळ मोठें सैन्य होतें आणि म्हणून त्यास वाहिनीपति असें उपपद लावीत असत. असो, विराट राजा अनियंत्रित सत्तेचा होता यांत शंकाच नाहीं; आणि वध—शिक्षा देण्याचा त्याचा अधिकार अप्रतिहत होता; पण ब्राह्मण अपराध्यास मात्र वध—शिक्षा देत नसत, त्यांस हद्दपारीची शिक्षा द्यावी, असा सर्वत्र नियम असे. अ. ७,२५ यांत विराट कंकास म्हणतो, "तुझा जो अपराध करील त्यास मी वधाची शिक्षा देईन, आणि ब्राह्मण अपराध करील त्यास हद्दपार करीन." ब्राह्मणांस देहान्त शिक्षा देऊं नये असा मनुस्मृतींतहि नियम आहे.

याप्रमाणें राजा जरी अनियंत्रित सत्तेचा उपभोग घेई, तरी त्यास सभेंत मंत्री व सभासद यांचा सल्ला विचारावा लागे. राजसभेंत मंत्री व सभासद

असतच, पण प्रजेपैकीं कांहीं विशिष्ट लोक, ब्राह्मण, वैश्य व जानपद सभेंत असत असें दिसतें. 'जानपद' शब्दानें नगराबाहेरच्या प्रदेशांतील गांवांचे पाटील घेतले पाहिजेत. वाटेल त्यास सभेंत राजाकडे येण्याचा अधिकार होता, मग तो फिर्यादी असो किंवा कोणी कांहीं मागणारा अर्जदार असो. विराटाच्या सभेंत कंक व बल्लव बेधडक पोंचले. नकुल व सहदेव आणि द्रौपदी बाहेरच टेहळत राहिले असें वर्णन आहे. सुदेष्णेनें प्रासादांतून द्रौपदीस बाहेर पाहिलें, यावरून राजवाड्याचा एक भाग सार्वजनिक रस्त्याला लागून होता असें दिसतें. त्या वाड्यांतच रस्त्यास लागून असलेल्या दुसऱ्या सभेंत न्यायासाठीं राजा रोज बसे, व यामुळें अर्जदारांस त्याकडे पोंचण्यास फारशी अडचण पडत नसे. राजानें रोज राजसभेंत सकाळीं येऊन बसावें व अर्जदारांस भेटून प्रजेस न्याय द्यावा, असा मन्वादि स्मृतींतून नियम आहे.

राजे लोक त्यावेळीं द्यूत फार खेळत व अक्षावाप हा एक प्रतिष्ठित अधिकारी राजाजवळ नेहमी असे. वेळ घालविण्यास द्यूत मोठें साधन आहे हें खरें, तरी राजांनीं अक्ष, स्त्रिया, पान, मृगया इत्यादि व्यसनापासून दूर रहावें, असा इषारा सर्व नीतिग्रंथांत दिलेला आहे. द्यूत खेळण्यासाठीं एक निराळा महाल राजवाड्यांत असे; येथें स्त्रिया व दासी सुद्धां येत असत असें दिसतें. एरवी शेवटच्या द्यूत-प्रसंगीं विराटानें कंकास फासा मारला व त्याच्या कपाळांतून रक्त येऊं लागलें तेव्हां तेथें सैरंध्री होती या गोष्टीचें समर्थन करतां येणार नाहीं. "अक्षानाहर सैरन्ध्री कंक द्यूतं प्रवर्तताम" (६८-३०) या वाक्यावरून तर सैरन्ध्रि प्रारंभापासूनच तेथें होती. यावरून द्यूताचा महाल आणि अन्तःपुर लागूनच असत असें दिसतें. अन्तःपुरांत बागेंत मोठमोठे वृक्ष असत (९-२४).

विराटपर्वांतील सर्वांत उत्तम अध्याय म्हणजे राजदरबारांत मंत्र्यांनीं व अधिकाऱ्यांनीं कसें वागावें याविषयीं धौम्यानें युधिष्ठिरादि पांडवांस अज्ञातवासारंभीं उपदेश केला तो अध्याय ४ होय (१२-४९). सभापर्वांत नारदानें युधिष्ठिरास राजांच्या कर्तव्याविषयीं जो उपदेश कच्चिदध्यायांत केला त्याच्या खालोखाल हा उपदेश महत्वाचा आहे, व राजाधिकाऱ्यांनीं कोणत्या रीतीनें वागावें हें यांत उत्तम सांगितलें आहे. हें हल्लींच्याहि मंत्रिवर्गास, नोकरांस व ब्रिटिश राज्यांतील अधिकाऱ्यांसाहि लागू आहे. याचा समग्र भाग येथें देणें शक्य नाहीं. पण त्यांतील मुख्य मुख्य गोष्टी सांगून त्यावेळच्या राजकीय दरबाऱ्यांचें चित्र

रेखाटतां येईल. पहिली गोष्ट ही कीं, राजदरबारांत वागणाऱ्यानें मानापमानाचे गाठोडें बाजूला टाकलें पाहिजे, आणि आपलें कर्तव्य इमानानें व दक्षतेनें बजाविलें पाहिजे ( १२–२२ ). दरबारांत त्याच ठिकाणीं बसावें, जें आपल्याकरितां ठरलें असेल, किंवा जेथें बसलें असतां दुसरा येऊन ऊठ म्हणणार नाहीं अशा जागीं बसावें ( १३ ). आपण राजप्रिय आहों असें समजून राजाच्या यानांत, पर्यंकावर, पीठावर, हत्तीवर, किंवा रथावर ( बोलावल्यावांचून ) बसूं नये. ज्याठिकाणीं बसलें असतां किंवा ज्याच्याशीं संसर्ग केला असतां शंका येईल तेथें बसूं नये किंवा त्याशीं मैत्री करूं नये. ( हल्लीच्या काळीं राजनिष्ठांना हा महत्वाचा उपदेश आहे ). विचारल्याशिवाय राजाला कधींहि सल्ला देऊं नये ( १६ ). आणि विचारल्यावर किंवा अन्यप्रसंगीं राजाशीं असत्य बोलूं नये. विचारल्यावांचून किंवा सांगितल्यावांचून बोलूं नये किंवा कांहीं करूं नये, आंधळ्यासारखे दरबारांत असावें. प्रमाद, गर्व, संताप, हीं वर्ज्य करावीं. अप्रमत्त राहून राजाला प्रिय आणि हित असेल तेंच करावें. राजाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूस बसावें. समोर किंवा मागें कधींहि बसूं नये. मागचें स्थान रक्षण करणाऱ्या रक्षकांचें ( Bodyguards ) असतें, व पुढील उपदेशकांचें असतें म्हणून तें सदा वर्ज्य असतें ( २९ ). मी शूर किंवा बुद्धिमान् किंवा विद्वान आहे, असा गर्व कधीं दाखवूं नये; पण राजाहून पराक्रम ज्यास्त करून दाखवावा. ओंठ, हात, मांड्या, यांचा क्षेप ( हालविणें इत्यादि ) करूं नये व ढेंकर, थुंकी, बोलणें सावकाश करावें ( ३५ ). मोठ्यानें हसूं नये. राजा किंवा राजपुत्र यांचें नेहमीं ( पाठीमागें ) स्तुतियुक्त वर्णन करावें. विनाकारण गैर मर्जी झाली तरीहि राजाची निंदा करूं नये, म्हणजे पुन्हां संपत्ति मिळेल ( ४० ). राजाला प्रजेवर जबरदस्ती करण्याविषयीं जो उद्युक्त करतो, तो आपल्या स्थानावर टिकणार नाहीं. किंबहुना मारला जाईल ( ४२ ). राजासारखा पोषाक करूं नये, व त्याशीं फार लगटहि करूं नये. त्यानें कोणती सल्ला विचारली किंवा सांगितली तर ती प्रकट करूं नये ( ४८ ). आणि सर्वांत महत्वाचा उपदेश हा कीं, जें काम राजानें सांगितलें असेल त्यांत ( राजाचा किंवा प्रजेचा ) पैसा खाऊं नये ( ४९ ). याप्रमाणें जे कधीं नोकर होऊन वागले नाहींत व जे नेहमीं राजे म्हणून वावरले, त्यांस राजा कधीं नसलेल्या व नोकर म्हणून सदोदित वागलेल्या धौम्यानें महत्वाचा उपदेश केला, हें योग्यच झालें. व त्याप्रमाणें पांडव, विशेषतः

युधिष्ठिर व द्रौपदी, वर्षभर नोकर होऊन ओळख पडूं न देतां राहिले, हें आश्चर्य होय. प्रत्यक्ष अलीकडच्या इतिहासांत शिवाजी महाराजांनीं नोकराला मालक करून व आपण त्याचा नोकर होऊन तीन महिने अज्ञातचर्या हिंदुस्थानभर रानावनांत पायांनीं फिरत, आपणांस ओळखूं न देतां काढली, यावरून हें अज्ञातवासांत पांडवाचें राहणें अशक्य नाहीं असें जरी मानलें तरी तें आश्चर्यकारक आहे यांत शंका नाहीं.

या उपदेशाच्या विरुद्ध युधिष्ठिरानें शेवटीं आचरण केलें, व राजपुत्राची प्रशंसा न करतां तो बृहन्नलेचीच स्तुति करीत राहिला. याचें प्रायश्चित्त त्यास कसें भोगावें लागलें हें कवीनें मोठ्या खुबीनें दाखविलें आहे. कदाचित् असेंहि म्हणतां येइल कीं, युधिष्ठिरानें प्रकट होण्याची वेळ आलीच आहे, असें पाहूनच बृहन्नलेच्या स्तुतीला अर्थात् परिस्फोटाला प्रारंभ केला. कोणत्याहि प्रसंगीं धर्मराजानें गैरशिस्त वर्तन केलें नाहीं. कीचकाचें दुवर्तनहि पोटांत घालून त्यानें द्रौपदीस योग्य इषारा दिला, व तिनेंहि राजदरबारची ज्यास्त हेटाळणी केली नाहीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

या वेळच्या द्रौपदीच्या गाऱ्हाण्यांत राजाच्या इनसाफाचीहि थोडीशी परीक्षा झालेली दाखविली आहे. अन्यायाची फिर्याद नेण्याचें स्थान राजदरबार आहे, ही राजकीय परिस्थिति त्यावेळची स्पष्ट दिसतेच; पण राजदरबारांतहि आरोपी फिर्यादीच्या पाठोपाठ येऊन तिला लाथ मारतो, याबद्दल विराटानें कीचकास शासन केलें पाहिजे होतें. अर्थात् त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचें हेंहि चित्र यांत उभें केलें आहे कीं, दरबारांत कोणीतरी अति प्रबल अधिकारी होतो, व त्याचें पारिपत्य राजाहि करूं शकत नाहीं, किंवा करूं इच्छित नाहीं. तथापि विराटानें न्याय करण्याचा आंव थोडासा आणून "आपण पूर्ण चौकशी केल्याशिवाय कांहीं करूं शकत नाहीं, केवळ सैरन्ध्रीकरितां सेनापतीवर ठपका ठेवूं शकत नाहीं. तुमच्या दोघांचीं पूर्वी काय बोलणीं झालीं, हें जाणल्याशिवाय मला कांहीं करतां येत नाहीं." असें म्हणून थोडासा दोषारोप द्रौपदीवरही केला.

शेवटच्या प्रसंगीं युधिष्ठिराचें रक्त जमिनीवर पडल्यास मोठा अनर्थ होईल, यासाठीं कंकानेंहि ओंजळीत रक्त धरलें, व सैरन्ध्रीनें घाईघाईनें तस्त पुढें केलें. या वर्णनांत राजाचें रक्त सांडणें हा किती भयंकर गुन्हा समजला जात होता हें दाखविलें आहे. राजावर हल्ला करणें किंवा त्यास जखम करणें किंवा ठार

मारणें, महापातक व निंद्य समजलें जाई. राजा एक ईश्वरी विभूति, विष्णूचा अंश असलेली पूज्य व्यक्ति आहे, असें सर्व स्मृतिशास्त्रांत सांगितलेंच आहे, व पुढें राजधर्म–प्रकरणांत शांतिपर्वांतहि येणार आहे. दुर्वतनी राजावरहि हल्ला करणें पातक समजलें जाई. ही राजनिष्ठा हिंदुस्थानच्या बहुधा सर्व इतिहासभर आपल्यास दिसते. श्रीकृष्णानें मात्र जुलमी कंसास ठार मारलें, पण हें त्यावेळेस प्रत्यक्ष बंडच होतें; किंबहुना ही नवीन कल्पना होती, लोकांस मान्यहि नव्हती. या कल्पनेनें कृष्णानें भीष्माचा पुढें भीष्मपर्वांत शस्त्र–धारणप्रसंगीं निषेध केला तेव्हां भीष्मानें ठराविक सर्वमान्य उत्तर " राजा परं दैवतम् " हेंच दिलें.

## सैन्यवर्णन

या पर्वांत युद्धाचीं अनेक वर्णनें आलीं असून सैन्यासंबंधानें कित्येक विषय वाचकांसमोर ठेवतां येण्यासारखे असल्यानें या समालोचनांत सैन्यवर्णन हा एक नवीन भाग घेऊं. प्राचीन राज्यें लहान होतीं तरी त्यांत मोठमोठालीं सैन्यें असत व या सैन्यांत बहुधा क्षत्रिय असत. कांहीं थोडे ब्राह्मणहि असत. विराट· राजा जेव्हां त्रिगर्तांशीं झगडण्यास सैन्य घेऊन निघाला, तेव्हां त्याच्या सैन्याचें वर्णन अध्याय ३१ यांत विस्तारानें केलें आहे. सैन्याचीं प्रसिद्ध चार अंगें असत. रथ, हत्ती, घोडे आणि पायदळ. विराटाबरोबर ८००० रथ, १००० हत्ती आणि ६०००० घोडे निघाले असें ३४ व्या श्लोकांत वर्णन आहे. पायदळाची संख्या दिली नाहीं, किंबहुना त्याचा उल्लेखहि केला नाहीं. पायदळ सैनिकाजवळ तल-वारी, भाले, परशु वगैरे हत्यारें असत पण अंगावर चिलखतें नसत; घोडदळांतील लोकांजवळहि तलवारी व भाले असत. हीं दोन्हीं अंगें अलीकडच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत, तेव्हां त्याविषयीं ज्यास्त विवेचनाची जरूर नाहीं. पण हत्ती आणि रथ हीं दोन अंगें अलीकडे नष्ट झालीं आहेत. हत्ती मुसलमानांच्या स्वाऱ्यांपर्यंत होते; पण रथ तेव्हांहि नव्हते. अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळीं रथ होते, असें पुढील वर्णनावरून दिसेल. हत्ती तर होतेच, आणि भारती सैन्याचा मोठा भर गजदळावर असे. या अंगाचा भयंकरपणा अलेक्झांडरच्या कल्पकतेनें नाहींसा झाला. त्यानें विशिष्ट लांब तलवारी ग्रीक शिपायांच्या हातांत देऊन त्यांस गज-सैन्यावर हल्ला करण्यांत तरबेज केलें. या लांब तलवारींनीं ते हत्तीच्या सोंडा उतरीत व सोंड उतरताच हत्ती बहुधा परत फिरून आपल्याच सैन्याचा चुराडा करीत. असो, गजदळाचें वर्णन करतांना नेहमीं " प्रभिन्नकरटामुखः " आणि " षष्टिहायनाः " ही विशेषणें यायचींच. हत्तीचें पूर्ण आयुष्य १२० वर्षें धरलें

आहे, व त्यांच्या शक्तीची पूर्ण वाढ ६० व्या वर्षी होते, यामुळें 'साठा और पाठा' अशी म्हण हत्तीसंबंधें व मनुष्यासंबंधें पडली आहे, कारण (मनुष्याचीहि पूर्ण वाढ ज्योतिषशास्त्रांत व वैद्यशास्त्रांत ६० मानली आहे).

पण पायदळ, घोडदळ, गजदळ याहूनहि महत्वाचें चौथें अंग प्राचीन-काळच्या सैन्यांत रथदळ हें होतें. हल्लीच्या पाश्चात्य सैन्यांत तीन अंगें, इनफंट्री, कॅव्हलरी व आर्टिलरी (तोफखाना हत्तीच्या स्थानीं) होतीं, व आतांपर्यंत आहेत, त्यांत Tauks अथवा रथ हें चौथें अंग नुकतेंच उत्पन्न झालें आहे. पण याहूनहि भयंकर सामर्थ्याचें अंग म्हणजे आकाशांतील विमानें अगदीं अली-कडे उत्पन्न होणार आहे. म्हणजे आतां three arms च्या ऐवजी five arms होतील. आतांपर्यंतच्या इतिहासांत लढायांचीं वर्णनें म्हणजे पायदळ, घोडदळ व तोफखाना यांच्या हालचाली सेनापति कसे करीत, व त्यांची शत्रुसैन्याशीं युद्धें कशीं होत, हें विस्तारानें सांगणें होतें. महाभारतांतील लढायांच्या वर्णनांत ह्या हालचाली फार थोड्या सांगितल्या जातात. बहुतेक सर्व वर्णनें रथींच्या द्वन्द्व-युद्धाचीं व रथीनें एकट्यानें हजारो घोडदळ किंवा पायदळ कसें मारलें यांचींच येतात. रथींचें एवढें प्रचण्ड सामर्थ्य होतें कीं नाहीं, हा प्रश्न अस्त्रांच्या योगानें ज्यास्त कठीण झाला आहे. हल्लीं विमानांतून टाकलेले बांब हे इतके भयंकर आहेत कीं, एकच विमान म्हणजे दहा पांच योद्धे सर्व मुंबईचा फडशा पाड-तील; पण हें अस्त्र-सामर्थ्य मंत्राचें नसून तंत्राचें आहे. भावियुद्धांत या अस्त्रांचा कसा भयंकर उपयोग केला जाईल याची पाश्चात्यराष्ट्रांस काळजी लागली आहे; कारण आतांपर्यंत झालेल्या युद्धांत मशीनगन्स व टॉक्स यांचाच उपयोग होऊन अनुभव आला आहे. पण विमानांची लढाई परस्पर कशी होईल, आणि विमानांचे हल्ले सैन्यास तसेंच गरीब अयुध्यमान लोकांस कसे ठार करील, याचा अनुभव याव-याचा आहे. बहुधा पाश्चात्यलोकांत होऊं घातलेल्या नवीन आपसांतील युद्ध-करारांत, बांबचा उपयोग निशस्त्र अयुध्यमान लोकांवर करूं नये, अशी अट घातली जाईल. अशा प्रकारच्या कांहीं अटी रथियुद्धांत व अस्त्रयुद्धांत महा-भारतकाळींहि होत्या, त्यांचा ऊहापोह पुढील पर्वांचे वेळीं होईल. सध्या रथ कसे असत, आणि रथी कसें युद्ध करीत, हें या पर्वांतील अनेक वर्णनांवरून आपण पाहूं.

महाभारत उपसंहार यांत या विषयाचा विस्तृत ऊहापोह याच पर्वांतील कित्येक वर्णनांवरून आम्हीं केला आहे, त्यांतील कांहीं भाग घेऊन येथें अधिक

जरूर तें विवेचन करूं. रथ किती मोठे असत याची कल्पना रथास दोनच चाकें असत यावरून करितां येईल. रथास चार चाकें असत अशी माझी व कित्येकांची कल्पना होती व आहे, पण ती चुकीची आहे. लढाऊ रथ नेहमीं दोन चाकी असत, मग तो इंद्राचा कां असेना. रथाला घोडे मात्र चार असत हें निर्विवाद आहे. उत्तर आपल्या रथाच्या घोडयांचें वर्णन करतांना ते घोडे कसे होते, व कसे जोडले होते हें सांगतो ( ४५–२१,२३ ). श्रीकृष्णाच्याहि रथाला चार घोडे होते, व त्यांचीं नांवें शैब्य, सुग्रीव, बलाहक व मेघपुष्प, अशीं होतीं. ( अमरकोश, पुराणें, महाभारत ), "त्यांच्यासारखे माझे हे चार घोडे आहेत," असें उत्तर म्हणतो. "उजव्या धुराला जोडलेला सुग्रीव, डाव्या धुराला जोडलेला मेघपुष्प, उजव्या पार्ष्णिधुराला जोडलेला बलाहक आणि डाव्याला जोडलेला शैब्य" असें या वर्णनाचें तात्पर्य आहे. तेव्हां दोन मागें व दोन पुढें जोडीत हें सिद्ध आहे. दोन एका बाजूला, दोन दुसऱ्या बाजूला, असे चार घोडे जोडले जात नसत हें उघड आहे. रथांत बरेंच सामान भरलेलें असल्यानें चार घोडे जरूर असावे. पण दोन पुढें व दोन मागें असे जोडलेल्या घोडयांना योग्य रीतीनें आवरणें व चालविणें कठीण होतें. त्यावेळीं रुंद व पक्या सडका नव्हत्या, किंबहुना युद्धभूमींत केव्हांहि असत नाहींत. तेव्हां वाटेल तिकडे रथ जोरानें व वेगानें हाकून नेणें ही एक कठीण कला होती; आणि म्हणूनच सारथ्याचें काम रथ्याइतकेंच कठीण असे. अर्थात् सारथ्याचा दर्जाहि मोठा होता, व कृष्णासारखे किंवा शल्यासारखे राजे सारथि होत. बहुधा दोन सारथि असत; एक रथावर पुढें लगाम धरून व दुसरा पार्ष्णि सारथी रथाच्या मागे, हल्लीं जसे चार घोड्याच्या गाडींत आपण पाहतों तसेंच बसत. पुढच्यास कठिण जागीं मदत करण्यास आणि तो मेल्यास त्याची जागा घेण्यास पार्ष्णि सारथ्याची फार मदत होई. पार्ष्णिसारथी असलाच पाहिजे असें मात्र नव्हतें. उत्तराच्या रथाला कोणी पार्ष्णिसारथि नव्हता. त्याचप्रमाणें रथावर बगल हल्ला ( flank attack ) होऊं नये म्हणून दोन्ही बाजूस चक्ररक्षक ( हे बहुधा घोडेस्वार किंवा रथी असत ) चालत. रथाचे चाक एक जरी तोडलें तरी तो रथ फुकट जाई, म्हणूनहि चक्ररक्षकांची योजना असे. पण प्रसंगीं ते नसले तरी चाले.

याप्रमाणें घोडे, सारथी व चक्ररक्षक सांगितल्यावर प्रत्यक्ष रथाकडे आपण वळूं. याची रचना कशी असे याची कल्पना होत नाहीं. कारण दोन चाकांवर फारसा मोठा रथ असणें शक्य नाहीं; पण जागजागीं रथाला नगराकार हें विशे-

षण येतें. रथांत निदान चार पांच धनुष्यें, त्यांच्या दोऱ्या, व हजार पांचशें मोठें धाकटे बाण ठेवावे लागत. हल्लीं ammunition म्हणजे गोळे, बाण, दारु वगैरे नेणाऱ्या गाडया तोफखान्याच्या मागें चालतात, तशा रथामागें चालत नसत असें वाटतें. अलीकडच्या युद्धांत जेथें तिरंदाजांची पलटण असते तेथें बाणांच्या कैच्या नेणाऱ्या गाडया निराळ्या मागें चालत, तशा रथांच्यामागें चालण्याचें वर्णन महाभारतांत क्वचित् प्रसंगीं सांपडतें. अध्याय ३१ मध्यें विराटाच्या सैन्याचें बरेंच लांब वर्णन आहे, त्यांत बाणांच्या गाडया सांगितल्या नाहींत. रथांतच हें शस्त्रसमूहाचें ओझें असे. "सोपस्करेषु शुभ्रेषु महत्सु च महारथाः" (११-१७) या वाक्यावरून शस्त्रसामग्री ठेवण्याइतके रथ मोठे असत. त्यांचा रंग शुभ्र म्हटला आहे; कदाचित् सरदारांचे व राजांचे रथ हस्तिदंती असतील, पण सोन्याचा परिष्कार सर्वांवर केलेला असे, हें जागजागीं 'हेमपरिष्कृत' वगैरे दिलेल्या विशेषणांवरून सिद्ध होतें. किंबहुना कवीच्या डोक्यांत व प्रत्यक्ष हिंदुस्थानांत (यावेळीं) सोनें इतकें विपुल होतें कीं, रथ, घोड्यांचें सामान, रथदण्डध्वज, तसेंच सर्व प्रकारचे बाण (हेमपुंखान्) यावर सोन्याचा परिष्कार केलेला असे. वास्तविक पहातां अशा परिष्काराची कांहीं अवश्यकता नव्हती. बाणांच्या मागील पिसांत सोनें घालणें (म्हणजे सोन्याचे धागे जसे हल्लीं मोठ्या लोकांकरितां तयार केलेल्या हारांत सोनेरी धागे घालतात तसे) केवळ मोठेपणाचें सूचक होय. त्याचप्रमाणें बाणांच्या पुढील लोखंडी फाळावर सोन्याचें काम करणें, किंवा धनुष्याच्या दांडयावरहि निरनिराळ्या प्रकारच्या सुवर्णाच्या आकृति काढणें, ही कव्युक्तिच नसावी; पण रथांच्या चाकांवर, दांडयावर, घोडयांच्या सामानावर किंबहुना निरनिराळ्या तलवारी, ढाली, कवचें यांवर सोन्यांचीं कामें करणें, त्याकाळीं लोकांत प्रिय होतें, व मोठेपणाचें चिन्ह होतें. सुवर्ण मुबलक असल्यानें हें त्याकाळीं

असो, प्रत्येक रथाला ध्वज असे व त्यावर निरनिराळे चिन्ह प्रत्येक रथाचें असे. हें चिन्ह म्हणजे प्रत्यक्ष लाकडी आकृति किंवा केवळ ध्वजपटावर काढलेलें चिन्ह याविषयीं संशय राहतो. हा ध्वज काढतां येण्यासारखा असे. अध्याय ४६-२ मध्यें उत्तराच्या रथाचा ध्वज सिंह होता, तो शमी वृक्षापाशीं अर्जुनानें काढून ठेविला आणि नवीन वानरध्वज लावला. याचें वर्णन "कांचनं सिंहलाङ्गूलं ध्वजं वानरलक्षणम्" असें श्लोक ३ मध्यें केलें आहे. येथें सुवर्णपरिष्कारच मानला पाहिजे. कारण सर्वच कांचनमय ध्वज फारच जड होईल. वानर जरीच्या

पटाकर चित्रांत काढला होता किंवा प्रत्यक्ष लाकडी वानर होता, हें निश्चित होत नाहीं. या वानराला शेपटी मात्र सिंहाची होती. पण हा ध्वज सपताक दिव्यरूप सोपासंग असा आकाशांतून रथावर उतरला असें श्लो. ५ मध्यें वर्णन आहे. पुढील युद्ध-वर्णनांत निरनिराळ्या वीरांची निरनिराळीं ध्वजचिन्हें दिलीं आहेत. (भीष्माचें सिंह व द्रोणाचें कमंडलु चिन्ह होतें ). हीं चिन्हें दुरून पाहूनच हा अमक्याचा रथ असें ओळखूं येई. राष्ट्राचें निशाण निराळें असल्याचें कोठें वर्णन नाहीं. प्रत्येक रथांचे ध्वज मात्र वर्णिलेले आहेत. अर्जुनाच्या ध्वजावर प्रत्यक्ष वानर व इतर अद्भुत प्राणी बसलेले असत, ही कवि-कल्पना अधिक होय.

रथांत ध्वजाचा दांडा आलेला असे, तो बहुधा मध्यावर असावा. कारण प्रसंगविशेषीं रथी या दांड्याचा आश्रय घेऊन उभा राही. रथांत रथी उभा राहूनच बाण सोडी, पण घेरी आल्यास खालीं न बसतां किंवा न पडतां त्यास या ध्वजाच्या दांड्याचा आसरा घेतां येत असे. सारथ्याची बसायाची जागा पुढें होती, आणि रथी बसूं इच्छील तेव्हां त्याची बसावयाची जागा मागें जरा खोलगट असे, म्हणून तीस रथोपस्थ म्हणत. रथाच्या निरनिराळ्या अंगाचीं निरनिराळीं नावें पुढें द्रोणपर्वांत आलीं आहेत तेव्हां त्यांची ज्यास्त ओळख पुढें देऊं.

बाण निरनिराळ्या आकाराचे लहान मोठे असत. सर्वांत मोठा बाण म्हणजे भल्लबाण; त्याचें फाळ मोठें असावें, व लांबीहि मोठी असावी. तो सर्वंध लोखंडाचा असावा. बाण कोणत्या लाकडाचे असत हें समजत नाहीं. त्यांना पिसें असत. ( भल्लबाण पिसाशिवाय असावा ). हीं पिसें कां लावीत हें ध्यानांत येत नाहीं. बाणाचा तोल राहून सरळ जावा असा त्याचा परिणाम असावा. सर्वांत भयंकर बाण म्हणजे गिधाडाचीं पिसें लावलेला. गिधाडपक्षी मांसभक्षक असल्यानें असा बाण शत्रूचें मांस खाईलच अशी कल्पना असावी. बाणांचीं टोकें सर्व पोलादाचीं असत; आणि तीं सहाणेवर घासून मुद्दाम लढाईच्या अगोदर तीक्ष्ण करीत असावे. अर्थात् “ शिलाशित ” हें विशेषण अशा बाणांनां मुद्दाम दिलेलें असतें. बाणाच्या काठीवर, पुढच्या फाळावर, व पिसांत सर्वत्र सोन्याचा परिष्कार असे. फाळ ‘ नतपर्वणा ’ या शब्दावरून समोर नसतां वळविलेला म्हणजे टोक वळवून तीन बाजूंनीं फाडणारा, म्हणजे अंगांत घुसलेला ओढून काढतांनाहि मांस फाडणारा कधीं कधीं असे. कदाचित् सर्वच बाण नतपर्व असत.

धनुष्यें कशांचीं म्हणजे कोणत्या लाकडाचीं असत हें कोठें सांगितलेलें नाहीं. वेळूचीं असावींत असा तर्क होईल, पण वेळूचीं ओढतांना लवकर मोडतील आणि फार दिवस टिकणार नाहींत. धनुष्य उचलण्यास जडहि असे. धनुष्याची काठी रुंद असे, व त्यावर नानाप्रकारचें सोन्याचें काम केलेलें असे. पांडवांचीं धनुष्यें उत्तरानें शमीवरून काढलीं तेव्हां त्याच्या मुखानें प्रत्येक पांडवाच्या धनुष्याचें निराळें वर्णन कूट श्लोकांत अ. ४२ मध्यें केलें आहे. त्यांतील कांहीं वर्णन येथें देण्यासारखें आहे. अर्जुनाच्या धनुष्याच्या पाठीवर सुवर्णबिंदु शंभर होते. भीमाच्या धनुष्याच्या पाठीवर लढाईस तयार असे सोन्याचे हत्ती काढले होते. तिसऱ्या युधिष्ठिराच्या धनुष्याच्या पाठीवर सुवर्णाचे इन्द्रगोप किडे काढले होते. चौथ्या नकुलाच्या धनुष्यावर सुवर्णाचे तीन सूर्य बसविले होते आणि पांचव्या धनुष्याच्या पाठीवर सुवर्णरेखामिश्रित चंदनाचे शलभ दाखविले होते. हें धनुष्य सहदेवाचें होतें. ( असें निरनिराळ्या भावांचें धनुष्य कोणतें होतें तें अ. ४२ मध्यें स्पष्ट केलें आहे ). याचप्रमाणें प्रत्येक पांडवाचे बाणहि निरनिराळ्या स्वरूपांचे होते. व प्रत्येकाचें खड्ग अथवा तलवार निरनिराळ्या चिन्हांनीं अंकित असल्याचें अध्याय ४२ व ४३ वरून स्पष्ट दिसतें.

धनुष्यांची काठी बहुतेक मनुष्याच्या उंचीइतकी लांब असे व त्याची दोरी ( प्रत्यंचा ) ही कमी लांबीची असे. अर्थात् धनुष्य वांकवून त्यावर दोरी चढविणें हें काम मोठ्या ताकतीचें असे. यासाठीं धनुष्याचीं टोकें ( कोटि ) हीं दोरीची ताण सहन करण्यास समर्थ अशींच असावीं लागत. दोरी चढविलेलें, ( सज्ज ) धनुष्य, आणखी वाकवून दोरी कानापर्यंत खेंचून बाण सोडीत. अर्थात् धनुष्याची काठी व दोरी, दोन्ही फारच मजबूत असावीं लागत. दोरी कशाची असे हें कोठें सांगितलेलें नाहीं. यामुळें इतकें खेंच सहन करणारें लांकुड किंवा दोरी कशाची असे, ही माहिती आपल्यास मिळत नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें धनुष्यबाणाशिवाय, प्रसंग-विशेषीं रथ्यांस रथाखालीं उतरून तलवारीनें किंवा गदेनें युद्ध करावें लागे. यासाठीं त्याजवळ रथांत दोन्ही हत्यारें असत. या तलवारी उत्तम पोलादाच्या असत ; आणि तीक्ष्णधार केलेल्या असत. त्यांजवर व त्यांच्या म्यान्यावर निरनिराळें शोभाकाम केलेलें असून प्रत्येक वीराचीं निराळीं चिन्हें असत. अ. ४३ मध्यें पांची पांडवाच्या बाणांचींहि निराळीं चिन्हें दिलीं आहेत, तीं सोडून आपण त्यांच्या तलवारी कशा निराळ्या

सांगितल्या आहेत तें पाहूं. अर्जुनाच्या खड्गाच्या पाठीवर भेकीचें चित्र होतें आणि त्याचें ताडहि भेकी ( बेडकी ) सारखें होतें ( १५ ). भीमाच्या तलवारीचा कोश व्याघ्राच्या कातड्याचा होता, आणि धर्माचा खड्ग सुवर्णानें चित्रित केलेला होता. नकुलाचा खड्ग, पांचनख कोशांत चित्र युद्धासाठीं ठेवलेला होता. ( पांचनख व निहित दोन्ही शब्द कूट दिसतात २२ ). सहदेवाची तलवार गव्यकोशांत ठेवलेली होती. तलवारीच्या पातेचें निराळें वर्णन देतां येईना, तेव्हां म्याम्याचे निराळें स्वरूप दाखविलें आहे.

आतां कवचांचीं वर्णनें निराळीं देऊं. विराटाच्या भावानें आंतून पोलादाचे आणि बाहेरून सुवर्णाचें असें कवच युद्धाच्यावेळीं घातलें; त्याच्या दुसऱ्या भावानें पाऱ्यानें मढविलेलें कवच घातलें. खुद्द विराटराजानें शतसूर्य, शतावर्त ( शतचन्द्र ) शतबिंदु व शताक्षिमत् असें कवच घातलें. शिवाय ज्याच्या सबंध विस्तारभर शंभर सौगंधिक कमळें काढलीं होतीं, असें कवच सूर्यदत्तानें घातलें. शंभर डोळे काढलेलें पांढरें कवच, आंतून पोलादाचें, विराटाच्या पुत्रानें घातलें. हीं भिन्न वर्णनें कवीच्या डोक्यांतून निघालेलीं नसून त्यावेळेस लोकांची इतकी भिन्न आवड आणि कारागिराची कुशलता, सोनें व पोलाद यांचीं कामें करण्यांत झालेली होती, हें दाखविण्याचा हेतु आहे. किंबहुना कवि-कल्पना आणि प्रत्यक्ष कारागिरी यांचा नित्यसंबंधाचें हें द्योतक आहे. कवचें रथींच घालीत असें नसून सारथ्यालाहि घालावीं लागत. कारण, त्याजवर बाण प्रथम टाकले जात. घोडेस्वार व पायदळ सैनिक मात्र कवचें घालीत नसत. रथाच्या घोड्यांवर कवचें असलेलीं दिसत नाहींत; कारण या वजनानें त्यांची गति कुंठित होईल. यामुळें रथाचे घोडे अनेक वेळां प्रथम मारले जात. वास्तविकपणें हत्तींच्या कपाळावर व सोंडेवर कवचें असलीं पाहिजेत. कारण सोंड तरवारीनें उतरणें, किंवा कपाळांत बाण-भल्ली-बाण-मारणें, हा हत्तीवर हल्ला करण्याचा सोपा व सहज मार्ग असतो; पण हत्तींना कवच असल्याचें वर्णन वाचल्याचें स्मरत नाहीं.

याप्रमाणें रथ व रथी यांचें तपशीलवार वर्णन दिल्यावर, रथी युद्ध कसें करीत असे तें पाहूं. बहुधा महाभारतांतील युद्धवर्णनांत रथींचीं द्वंद्वयुद्धेंच वर्णिलीं आहेत. पण संकुलयुद्धांत रथी काय कला करीत, हें मुख्यतः पाहाणें आहे. कारण अलीकडच्या सैन्यांत रथ नाहींत. अलीकडच्या सैन्यांत तोफखाना, घोडदळ व पायदळ हीं तीन अंगें असतात. प्रथम तोफखान्यानें पुष्कळसा संहार

झाल्यावर घोडदळाचा हल्ला ( cavalry charge ) पायदळावर होतो, व त्यास शत्रुचें घोडदळच प्रथम आडवें होतें. पानिपतच्या प्रसिद्ध लढायांत घोड दळांचा परपरावर हल्ला, हाच शेवटचा प्रसंग नेहमीं दिसतो. पूर्वकाळीं बंदुका नव्हत्या. हल्लीं पायदळ ( infantry ) हेंच मुख्य अंग बंदुकामुळें झालें आहे. हजार पांचशें यार्ड गोळी फेकणाऱ्या बंदुका निघाल्यापासून पायदळावर घोड-दळानें हल्ला करणें कठीण झालें आहे. असो, युद्धाची कला फार गुंतागुंतीची व मुल्की लेखकांच्या परिचयाबाहेरची असल्यानें या विषयांत मिलिटरी दृष्टीनें पाहणें कठीण आहे. तथापि अध्याय ३२ मध्यें त्रिगर्ताचें व मत्स्याचें जें युद्धवर्णन केलें आहे, तें बहुतेक सौतीच्या मुलकी दृष्टीचेंच दिसतें. रथी रथीशीं भिडले, हत्ती हत्तींशीं, घोडे घोड्यांशी, पायदळ पायदळाशीं, रक्तानें भूमि भरली, प्रथम धुळ उडली, पण पुढें रक्तानें जमीन भिजल्यानें धुळ उडेनाशीं झाली, बाणांनीं आकाश व्यापलें, हजारों मुंडकीं जमिनीवर पडलीं, रथ तुटून पडले, वगैरे ठराविक लढाईचें वर्णनच या अध्यायांत आहे. संकुल युद्धांत घोडदळ पायदळावर कसें घसरतें व त्याचा प्रतिकार पायदळानें कसा केला हें वर्णन कोठेंच नाहीं. ग्रीकांचें पोरसाशीं झालेल्या युद्धाचें वर्णन ग्रीक इतिहासकारांनीं केलें आहे, त्यांत पाय-दळाच्या ( Phalanx )जवळ लांब भाले दिले होते, व त्याच्या पुढें केलेल्या मजबूत टोकांवर घोडदळ आदळून फुटून जाई, असें वर्णन आहे. आपल्या फौजी कौशल्यानें शिकंदरानें लांब भाल्यांनीं घोडदळ नामोहर केलें व लांब तरवारींनीं गजदलहि परतवलें. घोडदळ त्याजवळ थोडें होतें, हत्ती मुळींच नव्हते, आणि रथ तर त्याहून नव्हते. पौरसच्या रथदळाच्या हल्ल्याच्या युद्धांत कसा फजिता झाला, याचें वर्णन ग्रीक इतिहासकारानें केलेलें आम्हीं महाभारत उपसंहारांत दिलें आहे. त्याचा जरूर तेवढा उतारा येथें देऊं, म्हणजे रथसंकुल युद्धांत ते किती उपयोगी किंवा निरुपयोगी होतें हें कळेल. कर्टियस या ग्रीक इतिहासकारानें शिकंदराचें पौरस ( पौरव ) राजाशीं पंजाबांत वितस्ता नदी काठीं युद्ध झालें, त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे. "पोरस राजाने शंभर रथ व चार हजार घोडे ग्रीकांस अडविण्यास पुढें पाठविले. हे रथ चार घोडे ओढीत होते व प्रत्येकांत सहा माणसें होतीं. दोन माणसें ढाली घेऊन उभीं होतीं, दोन दोन्ही बाजूस धनुष्यें घेऊन उभीं होतीं, तसेच दोन सारथि होते. हे हातघाईच्या वेळीं पागा ठेऊन भाले फेंकीत. पण हे रथ यावेळीं फारसे उपयोगी पडले नाहींत.

कारण पाऊस फार पडून जमीन निसरडी झाली होती. भिजलल्या जमिनींत रथांचीं चाकें रुतूं लागलीं आणि रथांचें वजन फार असल्यानें ते चालेनासे झाले. तेव्हा शिकंदरानें त्यांवर पायदळ व घोडेस्वार यांचा हल्ला करविला. इतक्यांत सारथ्यांनीं रथ काढून लढाईच्या मध्यभागीं धांवडत आणले. कित्येक ग्रीक शिपाई पडले, परंतु उंच नीच जागेवरून व मेलेल्या शिपायांच्या अंगावरून जाताना रथांस धक्के बसले; त्यामुळें त्यांचे सारथी पडले. कांहींचे घोडे उधळले व त्यांनीं कांहीं रथास खड्यांत व कांहींस नदींत फेंकून दिलें. कांहीं थोडेबहुत राहिले त्यांवर बाणांचा मारा झाला. तेव्हां घोडे परत फिरून ते पोरसच्या सैन्यांत घुसले. ”
उपसंहार पान ५१६ वरील वर्णन शिकंदराच्या वेळचें म्हणजे सौतीच्या वेळचें आहे. अर्थात् त्यास रथांची व रथयुद्धाच्या अडचणीची प्रत्यक्ष माहिती होती. रथयुद्धांस गर्तरहित आणि अपंक अशी मैदानी जमीन उत्तम, हें पुढें त्यानें शांतिपर्वांत भीष्म मुखानें वर्णन केलेंच आहे. अशी जमीन पंजाबांत आहे; पण सर्वांत उत्तम कुरुक्षेत्रांत आहे. मत्स्यदेशांत म्हणजे जयपुराजवळहि आहे. रथांचे संकुलयुद्ध चाललें असतां सारथ्याच्या कौशल्याची किती आवश्यकता आहे, हें वरील वर्णनावरून ध्यानांत येईल. पौरसाच्या युद्धाच्या वेळी दुर्दैवानें पाऊस पडला व युद्धभूमींत चिखल झाला, तसा अर्जुन–कर्णाच्या युद्धाच्या वेळीं कुरुक्षेत्रांतहि एका अपवादक ठिकाणीं खड्डा होता; त्यांत कर्णाच्या रथाचें एक चाक गेलें, आणि रथ अडकला, असें पुढें येणारच आहे. धांवणाऱ्या रथांतून बाण मारणें ही कलाहि त्यावेळीं योद्धयांनीं संपादलेली असे. परंतु रथ उलटला म्हणजे रथी विरथ होई, आणि चारी बाजूनें मोकळा पडून मारला जाई.

असो, संकुलयुद्धवर्णन केल्यावर विराट व त्रिगर्तराजा यांचें द्वैरथ म्हणजे द्वन्द्वयुद्धहि अ. ३३ यांत थोडेसें वर्णन केलें आहे. त्रिगर्तराजाचे बंधु व विराट यांच्या द्वन्द्वयुद्धांत त्रिगर्तबंधूंनीं रथाखालीं उडी टाकून गदा घेऊन विराटाच्या रथाचे घोडे मारले व सारथी मारला, तेव्हां विराट विरथ होऊन खालीं पडला. त्यास त्यांनीं सदेह उचलून आपल्या रथांत ठेवून परत चालविला. राजास ठार न करतां जिवंत ठेवून पकडून नेणें, हें एका प्रकारें दयेचें काम होय. विराटास ठार मारणें योग्य नाहीं, अशी त्यांची राजनीतियुक्त समजूत होती. असो, चारी पांडवांनीं यानंतर विराटाच्या सैन्यावर हल्ला करून हजारों वीर मारून विराटास सोडवून आणलें. येथें एकएकट्या रथीनें पदाति अश्व वगैरेंवर

हल्ला केला तो इतका कीं, धर्मानें एक हजार वीर मारले. भीमानें दहा हजार, नकुलानें सात हजार आणि सहदेवानें तीन हजार मारले ! ही अतिशयोक्ति क्षम्य आहे. किंवा धर्मानें म्हणजे त्याबरोबरच्या सैन्यानें असा अर्थ घ्यावा. सैन्याच्या सेनापतीचें नांवच बहुधा युद्धवर्णनांतून येतें.

पण उत्तरगोग्रहणप्रसंगीं एकटा अर्जुन कौरवसैन्याशीं युद्ध करीत होता, या वर्णनावरून याठिकाणींहि अस्त्रकल्पनाच करावी लागते. रथीच अस्त्रें जाणत व सोडीत असें एकंदर सर्व ठिकाणच्या वर्णनांवरून सिद्ध होतें. रथ्यांना अस्त्रविद्या विशिष्ट गुरूशीं शिकावी लागे, व हे गुरु बहुधा ब्राह्मण असत. कारण अस्त्रविद्या ही वेदमंत्रयुक्त होती असें दिसतें. भीष्म, कर्ण वगैरे परशुरामापाशीं अस्त्रविद्या शिकले, व पांडव–कौरव द्रोणापाशीं व कृपापाशीं शिकले. ही अस्त्रविद्या खरी होती किंवा कविकल्पना, यासंबंधानें येथें उहापोह आम्हीं करीत नाहीं. तो पुढें अनेक प्रसंगीं करणें प्राप्तच आहे. परंतु येथें एवढेंच सांगावयाचें कीं, ही अस्त्रविद्या रथ्यांसच येत असे. यांत शेवटीं अर्जुनानें सम्मोहनास्त्र सोडून सर्व कौरवांस बेशुद्ध केलें असें वर्णन आहे. हल्लीच्या पाश्चात्ययुद्धांतहि tear gas म्हणजे डोळ्यांतून सारखे अश्रु काढणारा वायु ज्यांतून निघतो, असें गोळे वापरण्यांत येऊं लागले आहेत. जरी अलीकडच्या नवीन युद्ध–नियमांत असे गोळे वापरूं नये असें ठरवूं पहात आहे, तरी ही मूळ कल्पना संमोहनासारख्या अस्त्रावरूनच निघाली आहे; आणि ती जरी मंत्रशास्त्राची नसून तंत्रशास्त्राची आहे, तरी मंत्रशक्ति मान्य केल्यास, अस्त्रें संभवनीय आहेत असें म्हणतां येईल.

एकंदरीनें जरी वरप्रमाणें अतिशयोक्तीचीं वर्णनें पुष्कळ असलीं तरी महाभारतकालीं म्हणजे सौतीच्या वेळींहि भारती वीरांच्या ताकतीची व धनुर्विद्येची कमाल होती, हें ऐतिहासिकरीत्या निश्चित आहे. शिकंदराच्या वेळीं आलेल्या ग्रीकांनीं भारतीयांचें गौरवपर वर्णन केलें आहे. अलेक्झांडरचा शत्रु पोरस ( पौरव ) राजा उंच ताकददार असा पुरुष होता. तो पाहतांच त्याविषयीं आदर वाटे. भारतीधनुर्धारीहि इतक्या जोरानें बाण फेकीत कीं, तसे ग्रीकांत इतरत्र आढळले नाहींत. त्यांचीं धनुष्येंहि लांब व मोठीं आणि बाणही पल्लेदार असत. वगैरे प्रशंसापर वर्णन ग्रीक इतिहासकारांनीं लिहून ठेविलें आहे. अर्जुनानें एकट्यानें कौरवसैन्यास गोंधळांत टाकून गाई सोडविल्या ही गोष्ट केवळ असंभाव्य नाहीं. रथावरून झपाट्यानें निरनिराळ्या जागीं पोंहोंचून निशाणबाजीनें

मोठमोठ्या फौजेच्या तुकड्यांवर मारा करतां येतो, व गजसैन्यहि गडबडून टाकतां येणें शक्य आहे. धनुष्याची कसरत प्राचीनकाळीं किती सातत्यानें करीत, याचा पुरावा पृथ्वीराजापर्यंत ( इ. स. १२००) मिळतो. बाणानें तवे फोडून टाकण्याचें सामर्थ्य भारती वीरांच्या ठिकाणीं तोंपर्यंत होतें.

अशी कसरत करतांना बोटांना व बाहूंना सारखें घर्षण होई, त्याचें संरक्षण करण्यासाठीं अंगुलित्राण व बाहुत्राण घालीत असत. ' बद्ध-गोधांगुलित्राणः ' या विशेषणावरून गोधा ( पाल )या जनावराच्या कातड्याचें अंगुलित्राण करीत. हें कातडें अतिशय चिवट व न फाटणारें असून हलकें आणि पातळहि असतें. तरीसुद्धां बाहूंना घट्टे पडावयाचेच; व ते बृहन्नलेनें कचकड्याच्या बांगड्यांनीं झांकून टाकले होते.

## भोगौलिक माहिती.

या पर्वांत फारशी भौगोलिक माहिती नाहीं. मुख्य वृत्त बहुतेक विराट नगरांतच असल्यानें तशी माहिती देण्याचा प्रसंगच या पर्वांत थोडा आला आहे. विराट नगरास पांडव कसे पोंचले हें सांगतांना प्रथम थोडीशी भौगोलिक माहिती दिली आहे, व त्यांत थोडासा पूर्वींच्या माहितीशीं विरोध आहे. वनवासाच्या शेवटीं पांडव द्वैतवनांत होते. द्वैतवन हिमालयाच्या पायथ्याशीं सरस्वती नदीच्या उगमाजवळ आहे. अज्ञातवास कोठें करावा या प्रश्नासंबंधानें विचार चालला तेव्हां अर्जुन म्हणाला, "कुरु देशाभोंवती पांचाल, चेदि, मत्स्य, शूरसेन, पटच्चर दशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, शाल्व, युगन्धर, कांति, सुराष्ट्र, अवंति इत्यादि देश आहेत ( १-१३ ) सभापर्वाच्या समालोचनांत दिग्विजयाच्या वर्णनावरून आम्ही दोन हिंदुस्थानचे नकाशे, पूर्व-दक्षिण व उत्तर-पश्चिम असे दिले आहेत. त्यावरून पाहतां अर्जुनानें उत्तर-पश्चिमकडच्या देशांचें नांव न घेतां केवळ दक्षिणकडचेच देश सांगितले. बहुधा उत्तर-पश्चिमेकडील लोक दुर्योधनाला अनुकूल होते, हें पुढें युद्ध-प्रसंगीं दिसेलच. दक्षिणेकडे जे लोक सांगितले, त्यांत नवराष्ट्र, मल्ल व युगन्धर हीं नांवें नवीन आहेत. त्यांचें ठिकाण निश्चित होत नाहीं. युधिष्ठिरानें मत्स्य देश पसंत केला. याचें कारण सांगतांना विराट राजा पांडवांना अनुकूल असून वृद्ध आहे, असें म्हटलें, कुंति व सुराष्ट्र इकडे त्याचे संबंधीच होते. तेथे अज्ञात राहणें शक्यच नव्हते. मत्स्य राजा विराट अनुरक्त आणि वृद्ध ( फसण्यासारखा होता) तो युधिष्ठिरास ओळखत होता असें पुढील एका श्लोकांतील त्याच्या भाषणावरून

सिद्ध होतें. पण तो सबंधी नसल्यानें व वृद्ध असल्यानें, आपणास गुप्तवेशांत तो ओळखणार नाहीं असें ठरवून युधिष्ठिरानें पसंत केला.

मत्स्यदेशांस पांडव कसे गेले याचें वर्णन अध्याय ५ चे आरंभीं पुढील-प्रमाणें आहे. प्रथम ते " कालिंदी ( यमुना ) तीरानें चालले. दक्षिण किनाऱ्यानें आपलें राज्य पाहात दशार्णाच्या उत्तरेस आणि पांचालाच्या दाक्षिणेनें, यकृल्लोम व शूरसेन यांच्यामधून मत्स्यदेशांत वनांतून शिरले." ( ५-१,६,७ ) मागील भागांतील नकाशा पाहिला असतां इन्द्रप्रस्थाजवळ त्यांनीं यमुनानदी उतरली असावी, तेव्हां दशार्णाच्या उत्तरेस व पांचालाच्या दक्षिणेस, असा त्यांचा रस्ता ठरतो. पुन्हा मथुरेच्या वर त्यांनीं यमुना उतरली असावी. यकृल्लोम व शूरसेन हा देश वरील नकाशांत दिलेला नाहीं. वरील वर्णन नीट समजून येण्यासाठीं एक गोष्ट आणखी लक्षांत ठेविली पाहिजे. तीही कीं, त्या काळच्या लहान लहान राज्यांच्या सरहद्दीवर जंगलें असत व हीं जंगलें कोणाच्याच मालकीचीं नसत. यांत, गरीब लोक, शिकारी, किंवा वानप्रस्थ खुशाल राहत असत. या वनांतूनच पांडव प्रवास करीत " लुब्धका वयं " असें सांगत मत्स्यदेशाच्या सरहद्दीवर ते पोंचले. हल्लींच्या रेल्वेच्या रस्त्यानेंहि मथुरेवरून जयपुरास रस्ता सरळ जातो. तेथें जवळच विराटनगर होतें.

आतां गोग्रहणासंबंधानें भौगोलिक परिस्थिति कशी होती तें पाहूं. वरील नकाशांत त्रिगर्त, सिंध नदीच्या व सतलजेच्या बेचंगळ्यांत दाखविले आहेत. हे त्रिगर्त मत्स्य देशांत पश्चिमेकडून येऊन विराट नगराच्या दक्षिणेकडील बाजूनें जाऊन त्यांनीं गाई घेरल्या. या उलट दिशेनें म्हणजे उत्तरेकडे कौरवांनीं दुसरे दिवशीं गोग्रहण केलें. हस्तिनापूर मत्स्यदेशाच्या ईशान्येस ( पूर्वोत्तर) आहे. तेव्हां कौरवांना इशान्येकडून येऊन विराटनगराच्या उत्तरेस गोग्रहण करणें सरळ व सोपें पडलें. अध्याय ३० श्लोक २५ मध्यें त्रिगर्त आग्नेय दिशेस गेले असें वर्णन आहे ( दिशं वन्हेः ) तें बरोबर आहे. त्रिगर्त देशाहून मत्स्यदेश आग्नेय दिशेसच आहे. हें सभापर्वांत दिलेल्या नकाशावरून दिसून येईल. तसेंच अ.४६-७ मध्यें अर्जुन, कौरवांशीं युद्ध करण्यास उत्तरेकडे गेला, असें जें वर्णन आहे तेंहि बरोबर आहे.

# ऐतिहासिक माहिती.

## चांद्रवर्ष व सौरवर्ष.

या पर्वांत ऐतिहासिक माहिती, इतर देशांची किंवा काळाची, मुळींच मिळत नाहीं, तरी पांडवांच्याच संबंधें, विशेषतः भारतीयुद्धाच्या कारणासंबंधानें, अत्यंत महत्वाचा प्रश्न याच पर्वांत उपस्थित होत आहे. उत्तरगोग्रहणाच्या वेळीं अर्जुन प्रकट झाला, तेव्हां तो १३ वर्षांच्या आंत झाला कीं काय, हा प्रश्न दुर्योधनानें उत्पन्न केला; आणि द्रोणाच्या विनंतीवरून भीष्मानें त्याचें उत्तर असें दिलें कीं, जरी १३ सौरवर्षें संपली नाहींत, तरी "चान्द्रवर्षें तेरा पुरीं झालीं. कारण १३ वर्षांत, पांच वर्षांस दोन महिने याप्रमाणें, पांच महिने १२ रात्री (द्वादश क्षपाः म्हणजे दिवसच केवळ छन्दोभंग–भयानें क्षपा शब्द वापरला आहे ) ज्यास्त होतात" या उत्तरानें तीन चार महत्वाचे व गुंतागुंतीचे प्रश्न उपस्थित होतात. १ वनवास सुरु कधीं झाला म्हणजे कोणत्या महिन्यांत ? २ अज्ञातवास उत्तरगोग्रहणप्रसंगीं संपला त्यावेळीं कोणता महिना होता ? ३ चान्द्रवर्ष कां मानावें? कराराच्या वेळीं काय ठरलें होतें? ४ पांडव चान्द्रवर्ष मानीत होते कीं काय? असल्यास याची परंपरा होती काय ? सौतीच्या वेळीं कोणती पद्धत होती? हा विषय भारतीयुद्धाच्या इतिहासांत अत्यंत महत्वाचा असल्यानें, व तो खोल ज्योतिषविषयक इतिहासाचाहि असल्यानें वाचकांसमोर विस्तारानें मांडला पाहिजे.

१ द्यूत हस्तिनापुरांत कोणत्या महिन्यांत झालें याचा उल्लेख सौतीनें सभापर्वांत कोठेंच केला नाहीं. किंबहुना सौतीनें मुद्दाम कालविषयक जीं कूटें महाभारतांत घातलीं आहेत त्यापैकीं हें एक आहे. भारतीयुद्ध मार्गशीर्ष शुद्ध १३ स सुरू झालें कीं ११ स, याबद्दल विद्वान लोक अजून वाद घालीत आहेत. तो प्रश्न भीष्मपर्वांत येणार आहे. त्याच्या विवेचनाच्या वेळीं नीलकंठानें भारतसावित्री या नांवाच्या ग्रंथाधारें पांडवांच्या चरित्रांतील निरनिराळ्या मित्या दिल्या आहेत. भारतसावित्री हा ग्रंथ पुष्कळ अलिकडचा पण मान्य आहे. तो श्लोकबद्ध असून त्याच्या प्रती निरनिराळ्या संग्रहांत पाहावयास मिळतात. त्यांत या द्यूताची मिती दिवाळी म्हणजे आश्विन वद्य अमावास्या दिली आहे. दिवाळींत फाशांनीं द्यूत जरूर खेळावें, असा सांप्रदाय तेव्हांपासून आतांपर्यंत टरलेला आहे. हा सांप्रदाय पूर्वींहि होता; आणि त्याप्रमाणें कौरव, पांडवांशीं, त्या दिवशीं द्यूत खेळले,

अशी कल्पना आहे. ती जरी आपण टाकली तरी, या पर्वांतील वर्णनाशीं आणि भीष्माच्या भाषणाशीं ही मिति जुळते हें खरें. तेव्हां आश्विन अमावास्येस द्यूत झालें, आणि कार्तिक शु. १ ला पांडव वनवासास निघाले, असा पहिल्या प्रश्नाबद्दल निर्णय देतां येतो.

२ दुसऱ्या प्रश्नासंबंधें या पर्वांत अध्याय ३० मध्यें शेवटीं असें वर्णन आहे कीं, सुशर्म्यानें वद्य सप्तमीस गाई धरल्या, आणि कौरवांनीं दुसऱ्या दिवशीं अष्टमीस धरल्या. पण महिना कोणता हें कूट सौतीनें कायम ठेवलें. आणखी एका अध्यायांत ऋतु ग्रीष्म होता असें म्हटलें आहे. अर्थात् ज्येष्ठ वद्य अष्टमीला अर्जुन प्रकट झाला असें ठरतें. कारण आषाढ धरला तर पुढें लवकरच उत्तरेचा विवाह झाला आहे, तो आषाढांत होणार नाहीं. पण "विवाहः सार्व काल-मित्येके" या आश्वलायन सूत्राप्रमाणें आषाढांतहि होऊं शकेल. शिवाय उत्त-रायण विवाहाला उक्त आहे. तें हल्लीं ज्येष्ठांत होतें; पण पूर्वी भारतीयुद्धकालांत श्रावणांत होत होतें. असो, कांहीं मानलें तरी ज्येष्ठ किंवा आषाढ या महिन्यांत वद्य अष्टमीस अर्जुन प्रकट झाला असें ठरतें. तेव्हां नेहमीच्या सौरवर्षाच्या मानानें १३ वर्षें अश्विन अमावास्येस संपणार, त्या अगोदर चार महिने किंवा तीन महिने आणि ८ दिवस अर्जुन प्रकट झाला, अशी दुर्योधनाची समजूत झाली. 'माझें कांहीं चुकतें आहे कीं काय,' असें म्हणून दुर्योधनानें हा प्रश्न कौरव मंडळीपुढें टाकला. त्याचा निर्णय भीष्मानें चान्द्रवर्षें धरून उलट दिला.

३ अर्थात् तिसरा प्रश्न उपस्थित असा होतो कीं, चान्द्रवर्ष कां घ्यावें? सर्वत्र चालू असलेलें सौरवर्ष कां घेतलें नाहीं? कराराच्या वेळीं अमुक वर्ष मानावें असा प्रश्न उपस्थित झालाच नाहीं. तेव्हां हा चान्द्रवर्ष मानण्याचा प्रकार भीष्मानें एकाएकीं उपस्थित केला कीं काय? पांडवांची तरफदारी करून असा निकाल दिला, असें म्हणतां येत नाहीं. पांडव जर नेहमीं चान्द्रवर्ष मानणारे असतील, तर न्यायाधीशास असें म्हणता येईल कीं, वादी प्रतिवादीमध्यें वर्ष कोणतें मानावें याबद्दल करार झाला नाहीं. अर्थात् जो जें वर्ष मानीत असेल त्यानें तें वर्ष घ्यावें. दुर्योधन हरता तर त्यास तेरा सौर वर्षें काढावीं लागतीं. कारण कौरव नेहमीं सौर वर्ष पाळीत होते. पांडव हरले; ते नेहमी चान्द्रवर्ष पाळीत यामुळें त्यांनीं तेरा चांन्द्र वर्षें पाळावीं, असाच निर्णय न्यायाचा होईल. तेव्हां भीष्मानें निःपक्षपातानेंच

निकाल दिला असें मानलें पाहिजे. अर्थात् पांडव नेहमी चान्द्रवर्ष पाळीत होते असें मानावें लागतें.

४ तेव्हां चौथ्या प्रश्नासंबंधानें, पांडव पूर्वीपासून चान्द्रवर्ष मानीत होते हीं गोष्ट अशी सकारण मानतां येईल कीं, पांडव हे जरी कौरव वंशांतीलच होते तरी त्यांचें वास्तव्य जन्मापासून हिमालयांत असल्यानें त्यांच्या चालीरीति भिन्न झाल्या होत्या. एकाच स्त्रीस एकाहून अधिक नवरे असल्याची चाल त्यांच्यांत विशिष्ट होती. "हा आचार कुलक्रमागत आहे" असें आदिपर्वांत कुन्तीनें म्हटलें आहे. ह्याचप्रमाणें ही विशिष्ट चाल चान्द्रवर्षें मोजण्याची, कौरवाहून निराळी, हिमालयातील लोकांकडून त्यांत आली असावी.

५ आतां पांचवा प्रश्न असा कीं, हिंदुस्थानांत चान्द्रवर्षें मानण्याची परंपरा होती काय? या संबंधानें फारच विस्तृत माहिती आम्ही महाभारत उपसंहार ह्या ग्रंथांत दिली आहे. ती व इतर माहिती इतिहासाधारें वाचकांसमोर ठेवूं. प्रथम गोष्ट ही कीं, प्रारंभापासून महिने बहुतेक सर्वत्र चान्द्र होते. पौर्णिमा व अमावास्या व चन्द्राची वाढ आणि क्षीणता हीं तात्काळ मनुष्याच्या लक्षांत येतात. त्यामुळें महिने चान्द्र प्रथम सुरू होतात. वर्षाची कल्पनाहि ऋतूंच्या पर्यायावरून मनुष्यास येते. दिसेंबरांत थंडी आणि जुलै महिन्यांत उन्हाळा, हा ऋतुपर्याय नेहमींच लक्षांत येतो. अर्थात् सौरवर्ष सूर्याच्या उत्तर दक्षिण गतीवर अवलंबून ठरतें. दुर्दैवानें सौतीप्रमाणें परमेश्वरानें कालांत कूट प्रश्न घातले आहेत. एका सौर वर्षांत बारा चान्द्र महिने बरोबर बसत नाहींत. भीष्मानें म्हटल्याप्रमाणें ज्योतिषांत व्यतिक्रमात् "पंचमे पंचमे वर्षे द्वौ मासावुपजायतः" "चन्द्रसूर्याच्या विषम गतीनी दर पांच वर्षांनीं दोन महिने म्हणजे एक ऋतु मागें पडतो." प्रारंभीं वैदिक काळांत महिन्याचा ऋतूशींच संबध होता व महिन्यांचीं नावें मधु माधव (वसंत) अशीं होतीं. हींच नावें ऋग्वेदादि वैदिक संहितांत आहेत. महिन्यांची पौर्णिमा कांहीं ठराविक नक्षत्रावर होते, हें मागून लक्षांत येऊन चैत्र–वैशाख वगैरे नाक्षत्र नांवाचे महिने मागून प्रसिद्ध झाले. याचा काळ शं. बा. दीक्षित यांच्या मताप्रमाणें इ. स. पू. दोन हजार असा आहे; म्हणजे प्रत्यक्ष भारतीयुद्ध झालें त्यावेळीं हीं नावें नव्हतीं. त्यावेळीं ऋतु–संबंद्ध मधु–माधव हींच नांवें प्रचारांत होतीं. तेव्हां वैदिक काळीं चान्द्रमहिने आणि सौरऋतु दोन्ही महत्वाचे होते. दोहोंचा मेळ वैदिक ऋषींनीं कसा घातला होता हें आपण पाहूं.

सौरवर्षाचे दिवस ३६५¼ इतके असून, वर अपूर्ण शेष कांहीं राहतोच. चांद्रवर्षाचे दिवस ३५४ वर थोडा अपूर्ण शेष इतके आहेत. तेव्हां दोघांचा मेळ घालणें फार कठिण आहे, हें उघड आहे. हें काम निरनिराळ्या लोकांनीं कसें केलें, तें प्रथम पाहूं. ज्यू, आरब, इजिपशियन, या लोकांनीं असा प्रयत्नच केला नाहीं, त्यांनीं चान्द्रवर्षच मानलें. मुसलमान संस्कृतानें व उत्पत्तीनें त्यांचेच वंशज असून चान्द्रवर्षच मानतात. पारशांनीं वर्षाचे ३६० दिवस मानून १२ महिने ३० दिवसांचे मानले, व पांच दिवस अधिक राहतात ते पुण्यदिवस पेटेटीचे मानले; पण यांतहि सौरवर्ष अपूर्ण राहतेंच. रोमन लोक प्राचीन काळीं वर्षाचे दहाच महिने मानीत, म्हणून शेवटचा महिना त्यांच्यांतील दिसेम्बर (दहावा) अजून बाकी आहे. पुढचे दोन महिने सूर्य क्षितीजाखालीं गडप होई; तो पुन्हा वर आला म्हणजे मार्च महिना सुरू करीत. यामुळें पौर्णिमा अमावास्या यांची निश्चित तारीख राहत नाहीं. महिने ढोबळ असत. पुढें सौर वर्ष पुरें करण्यासाठीं न्यूमा राजानें दर दोन वर्षांनीं २२ दिवस कोठेंतरी घालण्याचा क्रम सुरू केला, आणि धर्मगुरु वाटेल त्या ठिकाणीं हे अधिकाचे २२ दिवस घालीत. रोमन बादशहाच्या वेळेस हल्लींचें इंग्रजी सिव्हिल वर्ष मानूं लागले, व ज्यूलियस व आगस्टस या दोन बादशहांच्या नांवानें दोन महिने घालून ३६५। दिवसांचें सौरवर्ष पुरें केलें. महिन्याचे दिवस २८, २९, ३०, ३१ असे निरनिराळे ठरविले. हल्लीं पाश्चात्य सर्व खिश्चनराष्ट्रांत हीच वर्षपद्धति सुरू आहे. ग्रीक लोकांतहि असेंच प्रारंभीं वर्ष लहान होतें तें सोलननें पुरें केलें.

याप्रमाणें पाश्चात्य देशांतील चान्द्रमास, सावनमास, सावनवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्याच्या प्रयत्नांचा इतिहास दिल्यानंतर, भारती आर्यांनीं काय केलें, याच्या इतिहासाकडे वळूं. हिंदुस्थानांत भारती आर्यांनीं प्रारंभापासूनच चान्द्रमास मानले. कारण चान्द्र महिन्याच्या अमावास्या व पौर्णिमा, त्याचप्रमाणें अष्टका, इत्यादि दिवशीं इष्टि प्रत्येकाच्या अग्निहोत्रावर व्हावयाच्या असत. पण वैदिक ऋषि वसंतादि ऋतुहि मानीत, व त्यावेळच्याहि विशिष्ट इष्टि असत. तेव्हां चान्द्रमहिने व ऋतुपर्याय दाखविणारें सौरवर्ष ठरविणें जरूर पडलें. सूर्याच्या दक्षिणोत्तर गतींत विषुव दिनीं महत्वाचे यज्ञ होत. यामुळें चान्द्रवर्षाचा ऋतूशीं मेळ घालण्यासाठीं, अनुभवानें पांच चान्द्रवर्षांचें एक युग मानून, युगांत दोन महिने

म्हणजे एक सबंध ऋतु बदलीत. याचाच अनुवाद भीष्माच्या वाक्यांत "पंचमे पंचमे वर्षे दौ मासावुपजायतः" असा आहे. ( ३६५¼×५ = १८२६¼ दिवस आणि ३५४×५=१७७०, अन्तर ५६¼ दिवस म्हणजे सुमारें दोन चान्द्र महिने). हे दोन महिने प्रथम एकदमच घालीत असावे. म्हणजे हेमन्त ऋतु संपल्यावर एक ऋतु ( चान्द्र महिने दोन ) निनांवी ठेवीत असावे, किंवा अधिक हेमन्त मानीत असावे. वेदांगज्योतिषाचे वेळेस म्हणजे इ. स. पू. १४०० च्या सुमारें किंवा अगोदर, ५ वर्षांच्या युगांत ३० महिन्यानंतर एक महिना या रीतीनें अधिक महिने घालण्याची पद्धति ज्यास्त शुद्ध अमलांत आली. वेदांग ज्योतिषाचा काल वैशंपायनाच्या भारतानंतरचा ( सुमारें इ. स. १२०० पू.) आहे, म्हणून भीष्माच्या भाषणांत दोन अधिकांचा उल्लेख आहे. ही पद्धत सौतीपर्यंत चालू होती. हल्लीं सर्वत्र प्रचारांत असलेली राशीवर बसविलेली अधिक महिना घालण्याची पद्धत, सिद्धान्त–ग्रंथांनीं घालून दिली. महाभारताच्या कालीं सूर्याच्या बारा संक्रान्तीच ज्ञात नव्हत्या. राशीचें नांव महाभारतांत कोठेंहि नाहीं; व सिद्धान्त–ग्रंथ इ. स. पू. ३०० नंतरचे असून, राशी ग्रीकांपासून इकडच्या ज्योतिर्गणितांत आल्या आहेत. या विषयासंबंधे शं. बा, दीक्षित यांचा व माझा मतभेद आहे. त्याविषयीं येथें जास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. ही संक्रांतीवर बसविलेली नवीन अधिकाची पद्धति हिंदुस्थानांत हल्लीं सर्वत्र चालू आहे.

पण वेदांगज्योतिषाची पद्धत वैशंपायनानंतरची असली तरी, पांच वर्षांचें युग व सौरवर्ष जमून घेण्यासाठीं पांच वर्षांनीं दोन महिने अधिक ही पद्धति सर्व हिंदुस्थानांत पूर्वीं चालू असली पाहिजे. अर्थात् वर्ष सर्वत्र सौर होतें. मग चान्द्र वर्षाची परंपरा हिंदुस्थानांत कोठें व कशावरून होती, याचा पुरावा आपल्यास प्राचीन वाङ्मयांत पाहिला पाहिजे. या दृष्टीनें वैदिक वाङ्मयाचा विचार करितां वैदिक संहितांच्याकाळीं, म्हणजे भारतीयुद्धकाळीं, कोठें कोठें चान्द्रवर्ष प्रचारांत असलें पाहिजे, असा पुरावा मिळतो. त्याचा आपण आतां विचार करूं.

ऋग्वेदमंत्रकाळीं प्रथम ठोकळ मानानें ३० दिवसांचा महिना आणि ३६० दिवसाचें वर्ष ( १२ महिन्याचें ) अशी पद्धति असावी. कारण अनेक ऋग्वेद-सूक्तांत १२ अरे आणि ३६० खिळे असलेल्या कालचक्राचें वर्णन आहे. प्राचीन काळीं ऋतूहि महत्वाचे होते; व 'मधुश्च माधवश्च वसन्तः' असे सहा ऋतु धरीत. हें ऋतुचक्र मानूं लागले, तेव्हां वर्षाला तेरावा चौदावा महिना, बैलाला वशिंड वर येतें

तसा फुटतो,असें ऋग्-मंत्रांत म्हटलें आहे. या वाढीमुळें अधिक मास घालण्याची पद्धति सुरू झाली; पण कित्येक लोक हे अधिक महिने मानीत नसत. यामुळें वर्षांचे तीन प्रकार झाले. १ केवळ चान्द्रवर्ष व चान्द्र महिने, पौर्णिमा अमावास्या दाखविणारें, २ सावन, म्हणजे नुसते दिवस सूर्योदयापासून सूर्योदयापर्यंत मुख्य धरून ३० दिवसांचा महिना आणि बारा महिन्यांचें आधारें ३६० दिवसांचें वर्ष. ३ सौरवर्ष, अधिक महिना घालून ऋतूंशीं मेळ घातलेलें वर्ष. ( महिने मात्र चान्द्र). अशीं तीन प्रकारचीं वर्षें निरनिराळ्या ऋषिकुलांत चालूं लागलीं असेंहि दिसतें. वैदिक काळांत हल्लींचा आठवडा नसून षडह असे, आणि पांच षडह मिळून ३० दिवसांचा महिना होई. चान्द्र महिना ठोकळ मानानें २९॥ दिवसाचा असतो. त्यामुळें कांहीं षडहानंतर अमावास्या साधण्यासाठीं एक दिवस सोडावा लागे. तेव्हां दिवस सोडावा कीं न सोडावा, असा वाद प्रथम वैदिकांत सुरू झाला. याचा उल्लेख " उत्सृज्या नोत्सृज्या इति मीमांसन्ते ब्रह्मवादिनः " या तैत्तिरीय संहितेच्या एका अनुवाकांत आहे. या अनुवाकावरून त्यावेळीं चान्द्र-वर्ष कित्येक मानीत, हें निःसंदेह ठरतें. " अमावास्ययाहि मासान्संपाद्य अहरुत्सृजन्ति । अमावास्ययाहि मासान् संपादयन्ति ॥ " अमावास्येवर मास संपावे असा आग्रह कित्येकांचा झाला. हा अनुवाक ' गवामयन ' या संवत्सर-सत्रासंबंधानें आहे. यांतील माहितीवरून तर संवत्सर-सत्र चान्द्रवर्षांचें असूं शकतें म्हणजे केवळ अमावास्येवर संपणारे बारा महिने यांत धरीत असें ठरतें. याला आणखी आधार शतपथ ब्राह्मण काण्ड ११, १-१० यांत सांपडतो ( महाभारत उपसंहार पृष्ठ १६६ ). तैत्तिरीय संहिता व शतपथ ब्राह्मण, यांचा काळ आणि भारती युद्धाचा काळ, जवळजवळ तोच आहे ( इ. स. पू. ३१०० व ३००० ). तेव्हां पांडव चान्द्रवर्ष मानणारे असावे, या म्हणण्यास वरील वचनांवरून पुष्टि मिळते.

वेदांग ज्योतिषानंतर नवीन पद्धति, म्हणजे ३० चान्द्र महिन्यानंतर एक अधिक महिना, व पुढील ३० चान्द्र महिन्यानंतर दुसरा अधिक धरण्याची तऱ्हा, सर्वत्र सुरू झाला. ती ज्योतिषसंहिताकालापर्यंत चालली. तेव्हांपासून अलीकडे, सूर्यसंक्रांति ज्या चान्द्र महिन्यांत नाहीं तो अधिक, अशी दोन्हीं चान्द्र व सौर पक्षास धरून नवी पद्धति झाली, तीच हल्लीं चालू आहे. त्यामुळें आपल्यास चान्द्र कीं सौर वर्षासंबंधें तंटा कसा पडला याचें आश्चर्य वाटतें. भीष्माचें वाक्य वेदांग-ज्योतिषापूर्वीचें आहे, असें आम्हीं वर म्हटलेंच आहे. म्हणजे वैशंपायनाच्या भार-

ताच्या वेळचें आहे. आणि पांच वर्षांचें युग हें थेट तैत्तिरीय संहितेच्याहि पूर्वीचें आहे. कारण पांच वर्षांचीं पांच निराळीं नांवें इदावत्सर, संवत्सर, वगैरे तैत्तिरीय संहितेंत येतात. इतकेंच नव्हे, त्यावेळीं भीष्माच्या वाक्याप्रमाणें दोन महिने एकदम अधिक धरीत असावे. कारण मधु, माधव, इत्यादि बारा नांवांबरोबर दोन अधिकांची निराळीं नांवें 'संसर्प' व 'मलिम्लुच' दिलेलीं आहेत. असे अधिक धरतां धरतां कधीं कधीं ऋतु पुढें जात, तेव्हां क्षय मास धरीत. त्याचें नांव 'अंहस्पति.' अशीं तीन आणखीं नांवें तैत्तिरीय संहितेंत आहेत.

शेवटची सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, पूर्वी सांगितल्याप्रमाणें मार्गशीर्ष, चैत्र, इत्यादि मासनांवें या पूर्वीच्या संहिता-काळांत प्रचारांत आलीं नव्हतीं. हीं नांवें शं. बा. दीक्षित यांच्या मतें इ. स. पू. २००० चे सुमारास उत्पन्न झालीं. त्या त्या पौर्णिमेला तीं तीं नक्षत्रें असतात हें समजून येऊन हीं नांवें उत्पन्न झालीं आहेत. अर्थात् भारतीयुद्ध-काळीं चैत्र-वैशाखादि मासनांवें नव्हतीं. यावरून अनुद्यूत अश्विन महिन्यांत झालें, किंवा अर्जुन ज्येष्ठ महिन्यांत प्रकट झाला, असें मास-नांव दिलेलें नाहीं. त्या काळीं ऋतु प्रधान होते. त्या अन्वयें भारतांत ग्रीष्म ऋतूंत अर्जुन प्रकट झाला असें सांगितलें आहे. त्याची उपपत्ति अशी लावतां येते. अर्जुनादि पांडव शरदांत वनवासास गेले, ते शरदापूर्वीं ग्रीष्मांत कसे प्रकट होऊं शकतात? असा दुर्योधनाचा प्रश्न; आणि भीष्मानें त्रैराशिक मांडून पांच वर्षाला २ महिने किंवा एक ऋतु तर १३ वर्षांला ५ महिने आणि बारा दिवस, म्हणजे दोन ऋतु, सुमारें १॥ महिना असा हिशोब सांगितला. अर्थात् ग्रीष्म व वर्षा असे दोन ऋतु मागें जाऊन १॥ महिन्यापूर्वीच चान्द्र वर्षांनीं त्यांचा अज्ञातवास संपला, असें भीष्माचें उत्तर पडलें*. तें दुर्योधन मानीना म्हणून अखेरीस भारतीयुद्ध झालें.

---

* अ. ५२ श्लो. ५ मध्ये तेलंगण प्रतींत 'सर्वमेतद् प्रत ध्रुवं ज्ञात्वा ततो बीभत्सुरागतः' या ऐवजी 'पूर्वेद्युरेव निवृत्तस्ततो बीभत्सुरागतः' असा पाठ आहे; म्हणजे अर्जुन प्रकट झाला त्याच्या पूर्व दिवशीं अज्ञातवास संपला असें म्हटलें आहे. पण तें चूक वाटतें. अर्जुन ८ मीला प्रकट झाला, तेव्हां सप्तमी ज्येष्ठ वद्य दिवशीं तेरा वर्षें संपलीं, असा अर्थ होतो. आश्विन अमावास्येला द्यूत झालें, तेव्हांपासून चान्द्र तेरा वर्षें वैशाख अमावास्येला संपतील. ५ महिने १२ दिवस असा हिशोब धरला तर वैशाख वद्य ३ स संपतील. पण चान्द्रवर्ष अमावास्येलाच संपतें, हें उघड आहे.

पांडव प्रकट झाल्यानंतर उपप्लव्य नांवाच्या मत्स्य देशाच्या उत्तर सरहद्दीवरील गांवांत जाऊन राहिले, व तेथें श्रीकृष्णादि यादव आल्यावर अभिमन्यूचा विवाह ज्येष्ठ वद्यांत किंवा आषाढ शुद्धांत झाला. व नंतर कौरवांशीं युद्ध करण्यासाठीं सैन्य व साथीदार मिळविण्याचा उद्योग सुरू झाला.

याप्रमाणें पांडव चान्द्रवर्ष पाळणारे होते व त्यामुळें युद्ध उपस्थित झालें, हा अत्यन्त महत्वाचा विषय या पर्वांत आला आहे. तेव्हां 'विराटोद्योगसारवान्' या शब्दांत महाभारतरूपी वृक्षाचें सार विराटपर्व आहे, या प्रारंभींच्या म्हणण्याची प्रतीति आपणास येते. पांडव कौरवांचेच भाऊबंद असून त्यांच्यांत बहुपतिकत्वाची चाल व चान्द्रवर्ष–गणना ह्या दोन भिन्न चाली कशा आल्या, याचें उत्तर आम्हीं वर दिलेंच आहे कीं, या चाली हिमालयांतील लोकांच्या, त्या लोकांत फार दिवस राहिल्यानें, कुंती व पांडव यांस चिकटल्या. हिमालयांत बहुपतिकत्वाची चाल अद्याप आहे. पण चान्द्रवर्ष हिमालयांतील लोकांत चालतें कीं काय, ही माहिती देता येत नाहीं. किंबहुना ज्योतिषविषयक गोष्टी निरनिराळ्या प्रांतांत कालप्रवाहांत इतक्या बदलून गेल्या आहेत कीं, हल्लीं पंजाबांत कित्येक ठिकाणीं चान्द्र महिनेहि चालत नाहींत, बंगाल्याप्रमाणें सौर महिने; तेहि संक्रान्तीच्या राशीवरून ठरणारे महिने चालतात. पण चान्द्रवर्ष हें मनुष्याच्या प्रगतींतील पहिलें व जुनें वर्ष आहे हें उघड आहे. सौरवर्ष व चान्द्रवर्ष यांचा मेळ घातलेली पद्धति पुष्कळ नंतरची आहे. तेव्हां हिमालयांतील अप्रौढ लोकांत चान्द्रवर्ष भारतकाळीं चालू असणें पुष्कळ संभवनीय आहे. हल्लीं मुदतीच्या कायद्यांत स्पष्ट नियम आहे कीं, निरनिराळ्या कालपद्धतीचा पक्षकारांतील व्यवहार असला तरी, मुदत इंग्रेजी सिव्हिल वर्षाप्रमाणें मोजली जाईल. तसा नियम द्यूतप्रसंगीं कौरव पांडवांत नसल्यानें तेरा वर्षें पाळणें, तीं चान्द्र कीं सौर, हा तंटा उपस्थित झाला, आणि त्यामुळें कित्येक लाख लोक मारले गेले.

चिंतामण विनायक वैद्य.

---

# परिशिष्ट १

## विराटपर्वांतील महत्त्वाच्या विशेषनामांची

# सूची

**सूचना**—विशेषनामापुढें प्रथम थोडक्यांत कथेचा संदर्भ देऊन, त्यापुढें अध्या-याचा आंकडा कौंसांत आणि श्लोकांचे आंकडे कंसाबाहेर दिले आहेत.

**अभिमन्यु**—अभिमन्यु व उत्तरा यांचा विवाह ( ७२ ).

**अर्जुन**—अर्जुन बृहन्नलारूपानें विराट राजाकडे राहतो ( ११ ). बृहन्नला-रूपी अर्जुनाचा द्रौपदीशीं संवाद (२४) १७–२५; उत्तराचें सारथ्य करण्याची बृहन्नलेची तयारी ( ३६ ) १०–१३ व (३७); [ उत्तरा बृहन्नलेस बाहुलीकरितां कौरव वीरांची वस्त्रें आणण्यास सांगते (३७)२८–३१]; शत्रुसैन्य पाहून घाबर-लेल्या उत्तरास बृहन्नला धीर देते (३८); बृहन्नलारूपी अर्जुनाची द्रोणाकडून प्रशंसा (३९); अर्जुन उत्तराकडून शमी-वृक्षावरचीं शस्त्रास्त्रें काढवितो (४०-४१); शस्त्रास्त्रांविषयीं उत्तराचे अर्जुनास प्रश्न (४२); अर्जुनाचें उत्तर (४३); अर्जुन उत्त-राला पांडवांची ओळख पटवितो (४४); [अर्जुनाचीं दहा नांवें ( ४४ ) ७–२२]; अर्जुन उत्तराला धीर देतो व आपल्या षंढत्वाचें खरें कारण सांगतो (४५); उत्त-राला अर्जुन धीर देतो (४६); अर्जुन दुर्यो-धनानें पळविलेल्या गाईंस मागें वळवितो (५३); अर्जुनाकडून युद्धांत शत्रुंतपाचा वध व कर्णाचा पराभव ( ५४ ); अर्जुन उत्तरास कौरव योद्धयांची माहिती देतो ( ५५ ); अर्जुनाकडून कृपाचा पराभव ( ५७ ); द्रोणाचा पराभव ( ५८ ); अश्वत्थाम्याचा पराभव( ५९ ); कर्णाशीं पुन्हा युद्ध व कर्णाचा पुन्हा पराभव (६०;) अर्जुनाचें दुःशासनादिकांशीं युद्ध ( ६१ ); अर्जुनाचें कौरवांशीं संकुल युद्ध (६२–६३); अर्जुनाकडून भीष्माचा पराभव ( ६४ ); अर्जुनाचें दुर्योधनाशीं युद्ध व दुर्योधनाचा पराभव ( ६५ ); अर्जुनाकडून कौरवांवर संमोहनास्त्राचा प्रयोग (६६); अर्जुनाचा उत्तरास सल्ला ( ६७ ); बृहन्नलारूपी अर्जुन राजकन्या उत्तरेला कौरववीरांचीं वस्त्रें देतो (६९) १५–१७; अर्जुन उत्तरेचा स्नुषा म्हणून स्वीकार करितो ( ७१–७२ ). [ पुढें **युधिष्ठिरादि पांडव** पहा. ]

**अश्वत्थामा**—उत्तरगोग्रहणप्रसंगीं अश्व-त्थाम्याचा कर्णास उपरोधात्मक उपदेश ( ५० ); अर्जुनाकडून पराभव ( ५९ ).

**उत्तर** ( विराटराजाचा पुत्र )—उत्तर-गोग्रहणाची वार्ता गोप राजपुत्र उत्तरास सांगतो ( ३५ ); सारथि नसल्याबद्दल उत्तराची तक्रार ( ३६ ); बृहन्नलेस सारथि म्हणून घेऊन उत्तर स्वारीवर निघतो ( ३७ ); कौरवसैन्य पाहून उत्त-

# परिशिष्ट २

## महाभारत् विराटपर्व-अध्याय १-७२ यांतील

# निवडक सुभाषित

**टीप**—प्रत्येक सुभाषिताच्या मथळ्यावर जे आंकडे दिले आहेत त्यात पहिलो आकडा क्रमांकाचा आहे. आणि कंसांत दिलेल्या आंकड्यांपैकीं पहिला आंकडा अध्यायाचा दर्शक असून त्यापुढील आंकडा श्लोकाचा दर्शक आहे.

### कोणांत कोण श्रेष्ठ.

१ ( २-१५ )

**सूर्यः प्रतपतां श्रेष्ठो द्विपदां ब्राह्मणो वरः ।**
**आशीविषश्च सर्पाणामग्निस्तेजस्विनां वरः ॥ १५ ॥**

( तेजस्वी पदार्थांमध्यें सूर्य श्रेष्ठ, मनुष्यांत ब्राह्मण, सर्पांत ज्याच्या दाढात विष आहे तो श्रेष्ठ, तेजस्वी पदार्थांमध्यें अग्नि हा श्रेष्ठ आहे )

२ ( २-१६ )

**आयुधानां वरं वज्रं ककुद्मी च गवां वरः ।**
**ह्रदानामुदधिः श्रेष्ठः पर्जन्यो वर्षतां वरः ॥ १६ ॥**

( आयुधांमध्यें वज्र व बैलांमध्यें कोशिंडवाला बैल श्रेष्ठ होय; जलाशयांमध्यें सागर, व वृष्टि करणाऱ्यांमध्यें पर्जन्य श्रेष्ठ आहे )

३ ( २-१७ )

**धृतराष्ट्रश्च नागानां हस्तिष्वैरावतो वरः ।**
**पुत्रः प्रियाणामधिको भार्या च सुहृदां वरा ॥ १७ ॥**

(नागांमध्यें धृतराष्ट्र व गजांमध्यें ऐरावत श्रेष्ठ होत; प्रियवस्तूंमध्यें पुत्र अधिक व सुहृदांमध्यें भार्या वरिष्ठ होय )

## सेवकानें राजाशीं कसें वागावें.

४ ( ४-१३ )

**दृष्टद्वारो लभेद्द्रष्टुं राजस्वेषु न विश्वसेत् ।**
**तदेवाऽऽसनमन्विच्छेद्यत्र नाऽभिपतेत्परः ॥ १३ ॥**

( राजास भेटावयाचें असल्यास द्वारपाळामार्फत परवानगी आणून भेटावें. राजाच्या खाजगींतील माणसांवर विश्वास ठेवूं नये. दुसरा कोणी जेथें बसावयास येणार नाहीं, अशाच जागेवर बसावें )

५ ( ४-१४ )

**यो न यानं न पर्यङ्कं न पीठं न गजं रथम् ।**
**आरोहेत्संमतोऽस्मीति स राजवसतिं वसेत् ॥ १४ ॥**

( मी राजाच्या मर्जींतला आहें असें समजून जो राजाच्या पालखींत, पलंगावर उच्चासनावर, हत्तीवर किंवा रथांत बसणार नाहीं त्यानेंच राजगृहीं रहावें )

६ ( ४-१५ )

**यत्र यत्रैनमासीनं शङ्केरन्दुष्टचारिणः ।**
**न तत्रोपविशेद्यो वै स राजवसतिं वसेत् ॥ १५ ॥**

( ज्या ज्या ठिकाणीं बसल्यानें आपणांविषयीं दुष्ट हेर शंका घेतील अशा स्थानीं जो बसणार नाहीं, तोच मनुष्य राजगृहीं राहण्यास योग्य आहे )

७ ( ४-१६-१७ )

**न चाऽनुशिष्याद्राजानमपृच्छन्तं कदाचन ।**
**तूष्णीं त्वेनमुपासीत काले समभिपूजयेत् ॥ १६ ॥**
**असूयन्ति हि राजानो जनाननृतवादिनः ।**
**तथैव चाऽवमन्यन्ते मन्त्रिणं वादिनं मृषा ॥ १७ ॥**

( राजानें विचारल्यावांचून त्यास मसलत कधींहि सांगूं नये. त्याच्याजवळ मुकाट्यानें स्वस्थ बसावें; योग्य समयीं त्याची स्तुति करावी; परंतु ती स्तुति मिथ्या असूं नये. कारण राजेलोक मिथ्या भाषण करणाऱ्यांचा द्वेष करतात; तसेंच खोटें बोलणाऱ्या मंत्र्यांचा अपमान करितात )

८ ( ४-१८ )

**नैषां दारेषु कुर्वीत मैत्रीं प्राज्ञः कदाचन ।**
**अन्तःपुरचरा ये च द्वेष्टि यानहिताश्च ये ॥ १८ ॥**

( सुज्ञानें केव्हांहि राजस्त्रियांशीं, अंतपुरांतील माणसांशीं, व राजा ज्यांचा द्वेष करितो, किंवा जे त्याचा द्वेष करितात, त्यांशीं मैत्री करूं नये )

९ ( ४-१९ )

**विदिते चाऽस्य कुर्वीत कार्याणि सुलघून्यपि ।**
**एवं विचरतो राज्ञि न क्षतिर्जायते क्वचित् ॥ १९ ॥**

( अगदीं क्षुल्लक कामें असलीं तरी तीं राजाला कळवून करावींत. राजाजवळ त्याप्रमाणें वागणाऱ्याची कधींहि नुकसानी होत नाहीं )

१० ( ४-२० )

**गच्छन्नपि परां भूमिमपृष्टो ह्यनियोजितः ।**
**जात्यन्ध इव मन्येत मर्यादामनुचिन्तयन् ॥ २० ॥**

( एखाद्या उत्कृष्ट स्थानीं आपण नित्य बसत असलों, तरी तेवढ्यावरच त्या स्थानीं आपण होऊन बसूं नये. राजानें तें दाखवून तेथें ' बसा ' म्हणून सांगितलें तरच तेथें बसावें; तोंपर्यंत, एखाद्या जन्मापासून आंधळा असणाऱ्या मनुष्याप्रमाणें आपणांस तें स्थान दिसत नाहीं, असेंच मर्यादेचा विचार करून मानावें )

११ ( ४-२१ )

**न हि पुत्रं न नप्तारं न भ्रातरमरिंदमाः ।**
**समतिक्रान्तमर्यादं पूजयन्ति नराधिपाः ॥ २१ ॥**

( मर्यादा उल्लंघन करणारा पुत्र असो, नातु असो, किंवा बंधु असो, त्यास विजयशाली राजे चाहत नाहींत )

१२ ( ४-२२ )

**यत्नाच्चोपचरेदेनमग्निवद्देववच्चिह ।**
**अनृतेनोपचीर्णो हि हन्यादेव न संशयः ॥ २२ ॥**

( अग्नीप्रमाणें किंवा देवाप्रमाणें राजाची सेवा दुरून व मानपूर्वक करावी. असत्यानें त्यांच्याशीं वागल्यास निःसंशय ते प्राणच घेतील )

१३ ( ४-२३ )

यच्छन्दतोऽनुयुञ्जीत तत्तदेवाऽनुवर्तयेत् ।
प्रमादमवलेपं च कोपं च परिवर्जयेत् ॥ २३ ॥

( राजानें जशी आज्ञा केली असेल तसेंच काम करावें; किंवा जें विचारलें असेल तेवढ्याचेंच उत्तर द्यावें; त्याच्या आज्ञेकडे दुर्लक्ष करूं नये. प्रमाद, अहंकार आणि क्रोध हे टाळावे )

१४ ( ४-२४ )

समर्थनासु सर्वासु हितं च प्रियमेव च ।
संवर्णयेत्तदेवाऽस्य प्रियादपि हितं भवेत् ॥ २४ ॥

( सर्व गोष्टींचें समर्थन करतांना, राजाला प्रिय व हितकर असेंच भाषण करावें; दोन्ही न साधल्यास, प्रिय भाषण न करितां, परिणामी हितकर असेंच भाषण करावें )

१५ ( ४-२५ )

अनुकूलो भवेच्चाऽस्य सर्वार्थेषु कथासु च ।
अप्रियं चाऽहितं यत्स्यात्तदस्मै नाऽनुवर्णयेत् ॥ २५ ॥

( कोणतेंहि कृत्य उपस्थित झालें असतां, किंवा कोणतीहि गोष्ट निघाली असतां आपण राजाला अनुकूल असावें. त्यास जी गोष्ट आवडणार नाहीं, किंवा जिच्यापासून त्याचें अहित होणार आहे, अशी गोष्ट करण्याविषयीं राजास सल्ला देऊं नये )

१६ ( ४-२६ )

नाऽहमस्य प्रियोऽस्मीति मत्वा सेवेत पण्डितः ।
अप्रमत्तश्च सततं हितं कुर्यात्प्रियं च यत् ॥ २६ ॥

( माझ्यावर राजाची मर्जी आहे असें समजून शहाण्या मनुष्यानें त्याची सेवा करूं नये, तर नेहमी सावध राहून त्यास हितकारक व आवडणारें असेंच कृत्य करीत जावें )

१७ ( ४-२७ )

नाऽस्याऽनिष्टानि सेवेत नाऽहितैः सह संवदेत् ।
स्वस्थानान्न विकम्पेत स राजवसतिं वसेत् ॥ २७ ॥

( राजास अनिष्ट अशा गोष्टी जो करीत नाहीं, त्याच्या शत्रूशीं मसलत करीत नाहीं व आपल्या घालून दिलेल्या मर्यादा जो उल्लंघीत नाहीं, तोच राजगृहीं वास करण्यास योग्य होय )

१८ ( ४-२८ )

दक्षिणं वाऽथ वामं वा पार्श्वमासीत पण्डितः ।
रक्षिणां ह्यात्तशस्त्राणां स्थानं पश्चाद्विधीयते ॥ २८ ॥

( शहाणपणानें राजाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूस बसावें; शस्त्रधारी रक्षकांचें स्थान राजाच्या पाठीमागील बाजूसच असतें )

१९ ( ४-२९ )

नित्यं हि प्रतिषिद्धं तु पुरस्तादासनं महत् ।
न च संदर्शने किंचित्प्रवृत्तमपि सञ्जयेत् ॥ २९ ॥

( राजाच्या समोर असणारें मोठें आसन नेहमीं वर्ज्य समजावें. राजाच्या समक्ष वेतन किंवा बक्षीस जें कांहीं चाललें असेल त्यांत आसक्त होऊं नये )

२० ( ४-३० )

अपि ह्येतद्दरिद्राणां व्यलीकस्थानमुत्तमम् ।
न मृषाऽभिहितं राज्ञां मनुष्येषु प्रकाशयेत् ॥ ३० ॥

( फुशारकी मिरविणें हें दरिद्री लोकांनासुद्धां नावडतें असतें. राजाचे मुखांतून एखादें अनृत भाषण निघालें, तर तें लोकांत प्रसिद्ध करूं नये )

२१ ( ४-३१ )

असूयन्ति हि राजानो नराननृतवादिनः ।
तथैव चाऽवमन्यन्ते नरान्पण्डितमानिनः ॥ ३१ ॥

( जे लोक राजाचें असत्य बाहेर काढतात, त्यांचा राजांकडून द्वेष होतो-त्याचप्रमाणें आपल्यास पंडित मानणाऱ्या पुरुषांचाहि राजेलोक अपमान करितात )

२२ ( ४-३२ )

शूरोऽस्मीति न दृप्तः स्याद्बुद्धिमानिति वा पुनः ।
प्रियमेवाऽऽचरन्राज्ञः प्रियो भवति भोगवान् ॥ ३२ ॥

( मी शूर आहें, किंवा शहाणा आहें, अशी घमेंड मारूं नये. जी गोष्ट राजाला प्रिय असेल, तीच करीत त्यास प्रिय होऊन ऐश्वर्य उपभोगावें )

२३ ( ४-३३ )

ऐश्वर्यं प्राप्य दुष्प्रापं प्रियं प्राप्य च राजतः ।
अप्रमत्तो भवेद्राज्ञः प्रियेषु च हितेषु च ॥ ३३ ॥

( राजप्रसादानें दुर्लभ ऐश्वर्य आणि प्रिय प्राप्त झालें तरी, राजाला जें प्रिय व हितकर असेल तेंच करण्याविषयीं सावध असावें )

२४ ( ४–३४ )

**यस्य कोपो महाबाधः प्रसादश्च महाफलः ।**
**कस्तस्य मनसाऽपीच्छेदनर्थं प्राज्ञसंमतः ॥ ३४ ॥**

( ज्याचा कोप मोठी पीडा करणारा व ज्याची कृपा मोठें भाग्य देणारी, त्याचें वाईट करणें हें कोणता सुज्ञ पुरुष मनांत आणील ? )

२५ ( ४–३५ )

**न चोष्ठौ न भुजौ जानू न च वाक्यं समाक्षिपेत् ।**
**सदा वातं च वाचं च ष्ठीवनं चाऽऽचरेच्छनैः ॥ ३५ ॥**

( ओठ चावणें, हातपाय व गुढघे चाळविणें व पुटपुटणें, हीं कृत्यें करूं नयेत; आणि थुंकणें, ढेकर देणें, दुसऱ्याशीं भाषण करणें, हीं नेहमीं हळूच करावा )

२६ ( ४–३६–३७ )

**हास्यवस्तुषु चाऽन्यस्य वर्तमानेषु केषुचित् ।**
**नाऽतिगाढं प्रहृष्येत न चाऽप्युन्मत्तवद्धसेत् ॥ ३६ ॥**
**न चाऽतिधैर्येण चरेद्गुरुतां हि व्रजेत्ततः ।**
**स्मितं तु मृदुपूर्वेण दर्शयेत प्रसादजम् ॥ ३७ ॥**

( दुसऱ्या कोणा राजसेवकाची थट्टा चालली असतां आनंदित होऊं नये; आणि उन्मत्तासारखें हसूं नये, किंवा त्याप्रसंगीं धैर्यानें काष्ठासारखें बसूं नये; तर संतोष झाला असें दाखवित, संतोष दाखविणारें किंचित् स्मित करावें ).

२७ ( ४–३८ )

**लाभे न हर्षयेद्यस्तु न व्यथेद्योऽवमानितः ।**
**असंमूढश्च यो नित्यं स राजवसतिं वसेत् ॥ ३८ ॥**

( लाभ झाला असतां जो आनंदित होत नाहीं, किंवा अपमानानें जो खिन्न होत नाहीं, जो आपलें काम नित्य एकाग्र मनानें करितो, त्यानें राजगृहीं राहावें )

२८ ( ४–३९ )

**राजानं राजपुत्रं वा संवर्णयति यः सदा ।**
**अमात्यः पण्डितो भूत्वा स चिरं तिष्ठते प्रियः ॥ ३९ ॥**

( जो अमात्य राजाची किंवा राजपुत्राची सदोदित स्तुति करितो, ता पंडित अमात्य होऊन राजाला नेहमीं प्रिय होतो )

२९ ( ४-४० )

**प्रगृहीतश्च योऽमात्यो निगृहीतस्त्वकारणैः ।**
**न निर्वदति राजानं लभते संपदं पुनः ॥ ४० ॥**

( जो अमात्य प्रथम अनुग्रह होऊन नंतर विनाकारण दंडित झाला तरी राजाची निंदा करणार नाहीं, तो पुन्हा ऐश्वर्य मिळवील )

३० ( ४-४१ )

**प्रत्यक्षं च परोक्षं च गुणवादी विचक्षणः ।**
**उपजीवी भवेद्राज्ञो विषये योऽपि वा भवेत् ॥ ४१ ॥**

( ज्याची उपजीविका राजावर अवलंबून असेल किंवा ज्यास राजाच्या मुलुखांत राहावयाचें असेल, त्यानें शहाणपणानें राजाच्या समक्ष किंवा त्याच्या पाठीमागें त्याचें गुणवर्णनच करावें )

३१ ( ४-४२--४३ )

**अमात्यो हि बलाद्भोक्तुं राजानं प्रार्थयेत यः ।**
**न स तिष्ठेच्चिरं स्थानं गच्छेच्च प्राणसंशयम् ॥ ४२ ॥**
**श्रेयः सदाऽऽत्मनो दृष्ट्वा परं राज्ञा न संवदेत् ।**
**विशेषयेच्च राजानं योग्यभूमिषु सर्वदा ॥ ४३ ॥**

( जो मंत्री राजाला जुलमानें राज्य भोगण्यास (कांहीं निमित्तानें लोकांस शिक्षा देण्यास ) सांगतो, तो आपल्या पदावर फार वेळ टिकत नाहीं; व त्यावर प्राणसंकट येतें. अमात्यानें नेहमीं आपल्या हिताकडे लक्ष ठेवून, दुसरा कोणी राजास सल्ला मसलत देणार नाहीं अशाविषयीं जपावें. युद्धाच्या किंवा कसरतीच्या स्थानीं त्यानें राजापेक्षांहि अधिक काम करावें )

३२ ( ४-४४ )

**अम्लानो बलवाञ्छूरश्छायेवाऽनुगतः सदा ।**
**सत्यवादी मृदुर्दान्तः स राजवसतिं वसेत् ॥ ४४ ॥**

(जो सदोदित उत्साही, बुद्धिबलानें युक्त, व शूर असून नित्य छायेप्रमाणें राजामागें जातो; व जो सत्य भाषण करणारा, सौम्य आणि जितेंद्रिय असतो, त्यानेंच राजगृहीं वसती करावी ).

३३ ( ४-४५ )

**अन्यस्मिन्प्रेष्यमाणे तु पुरस्ताद्यः समुत्पतेत् ।**
**अहं किं करवाणीति स राजवसतिं वसेत् ॥ ४५ ॥**

(एखाद्या कामाकरितां, राजानें दुसऱ्यास हांक मारली असतां, जो आपण होऊन पुढें होतो, व ' महाराज, मी काय करूं ? ' असें म्हणतो, त्यानें राजगृहीं राहावें )

३४ ( ४-४६ )

**आन्तरे चैव बाह्ये च राज्ञा यश्चाऽथ सर्वदा ।**
**आदिष्टो नैव कम्पेत स राजवसतिं वसेत् ॥ ४६ ॥**

( खासगींतील घरदार वगैरे संभाळण्याकरितां, किंवा बाहेर युद्धादिकामासाठीं राजानें आज्ञा केली असतां, जो निर्भय रीतीनें तें कार्य करतो, त्यानेंच राजगृहीं राहावें )

३५ ( ४-४७ )

**यो वै गृहेभ्यः प्रवसन्प्रियाणां नाऽनुसंस्मरेत् ।**
**दुःखेन सुखमन्विच्छेत्स राजवसतिं वसेत् ॥ ४७ ॥**

( राजाज्ञेनें घरांतून निघून प्रवासास आरंभ केला म्हणजे, ज्यास स्त्रीपुत्र, किंवा अन्नपानादिक प्रिय वस्तूंचें स्मरण होत नाहीं, व जो प्रवासादि त्रासांतच सुखाचा अपेक्षा करितो, तोच राजगृहीं राहण्यास योग्य होय )

३६ ( ४-४८ )

**समवेषं न कुर्वीत नोच्चैः सन्निहितो वसेत् ।**
**न मन्त्रं बहुधा कुर्यादेवं राज्ञः प्रियो भवेत् ॥ ४८ ॥**

( राजासारखा वेष करूं नये; त्याच्या समीप श्रेष्ठ आसनावर बसूं नये; आणि मसलत बाहेर फोडूं नये. अशानेंच राजाला मनुष्य प्रिय होतो )

३७ ( ४-४९ )

**न कर्मणि नियुक्तः सन्धनं किंचिदपि स्पृशेत् ।**
**प्राप्नोति हि हरन्द्रव्यं बन्धनं यदि वा वधम् ॥ ४९ ॥**

( कांहीं अधिकारावर राजानें नेमिल्यास, अगदीं थोड्या धनासमुद्धां शिवूं नये. द्रव्य खाणारा कैद होतो अथवा वध प्राप्त करून घेतो )

३८ ( ४-५० )

**यानं वस्त्रमलंकारं यच्चाऽन्यत्संप्रयच्छति ।**
**तदेव धारयेन्नित्यमेवं प्रियतरो भवेत् ॥ ५० ॥**

( वाहन, वस्त्र, अलंकार, अथवा दुसरें जें कांहीं राजा देईल तेंच नेहमीं धारण करावें. अशा रीतीनें जो वागतो तो राजास फार आवडतो )

## दैव व कर्म

( द्रौपदी व भीम यांचा संवाद )

३९ ( २०-३ )

**अनित्या किल मर्त्यानामर्थसिद्धिर्जयाजयौ ॥**

( मनुष्यांचा द्रव्यलाभ किंवा जयापजय हे खरोखर अनित्य आहेत )

४० ( २०-४ )

**चक्रवत्परिवर्तन्ते ह्यर्थाश्च व्यसनानि च ॥**

( धनें व दुःखें चक्राप्रमाणें फिरत असतात असा विचार करावा )

४१ ( २०-५ )

**पराजये च हेतुश्च स इति प्रतिपालये ॥**

( ज्या कारणानें मनुष्यांचा जय होत असतो, त्याच कारणानें त्याचा पराजयहि घडून येतो )

४२ ( २०-६ )

**दत्त्वा याचन्ति पुरुषा हत्वा वध्यन्ति चाऽपरे ।**
**पातयित्वा च पात्यन्ते परैरिति च मे श्रुतम् ॥ ६ ॥**

( जे देतात, त्यांनाच पुढें याचना करण्याचा प्रसंग येतो; जे दुसऱ्याचा नाश करतात ते दुसऱ्याकडून वध पावतात; आणि ज्यांनीं ( पूर्वी अनेकांस ) दडपलें, ते खालीं दडपले जातात, असें मी ऐकिलें आहे )

४३ ( २०-७ )

**न दैवस्याऽतिभारोऽस्ति न चैवाऽस्याऽतिवर्त्तनम् ।**
**इति चाप्यागमं भूयो दैवस्य प्रतिपालये ॥ ७ ॥**

(दैवाला दुष्कर असें कांहीं नाहीं, व त्याच्या विरुद्धहि कोणी जाऊं शकत नाहीं. म्हणून सुदैव पुन्हा येण्याची मी वाट पहात आहे )

४४ ( २०-८ )

**स्थितं पूर्वं जलं यत्र पुनस्तत्रैव गच्छति ।**
**इति पर्यायमिच्छन्ती प्रतीक्षे उदयं पुनः ॥ ८ ॥**

(जेथें पूर्वी जल असतें तेथेंच तें पुन्हा जातें, यासाठीं पुनः भाग्योदय होईल अशी आशा धरून मी त्या काळाची मार्गप्रतीक्षा करीत आहें )

४५ ( २०-९ )

**दैवेन किल यस्याऽर्थः सुनीतोऽपि विपद्यते ।**
**दैवस्य चाऽऽगमे यत्नस्तेन कार्यो विजानता ॥ ९ ॥**

( नीतीनें वागणाऱ्याचें कार्य केवळ दैवयोगानें बिघडलेलें असतें; तो शहाणा असेल तर त्यानें दैवाचें आनुकूल्य संपादण्याचा प्रयत्न करावा )

---

## पूर्वकालच्या पतिव्रता पतीशीं कशा वागल्या.

( भीमाचा द्रौपदीस उपदेश )

४६ ( २१-१० )

**पुरा सुकन्या भार्या च भार्गवं च्यवनं वने ।**
**वल्मीकभूतं शाम्यन्तमन्वपद्यत भामिनी ॥ १० ॥**

( पूर्वी भृगुवंशांत उत्पन्न झालेल्या च्यवनाची स्त्री सुकन्या, ही वनांत आपल्या वारुळरूप झालेल्या पतीचें सांत्वन करीत त्याबरोबर राहिली होती )

४७ ( २१-११ )

**नारायणी चेन्द्रसेना रूपेण यदि ते श्रुता ।**
**पतिमन्वचरद्वृद्धं पुरा वर्षसहस्रिणम् ॥ ११ ॥**

( नारायणी इंद्रसेना-रूपवती म्हणून तुझ्या कानावर आली असेल-आपल्या हजार वर्षें ( आयुष्य ) असलेल्या पतीची सेवा करीत राहिली )

४८ ( २१-१२ )

**दुहिता जनकस्यापि वैदेही यदि ते श्रुता ।**
**पतीमन्वचरत्सीता महारण्यनिवासिनम् ॥ १२ ॥**

(जनकपुत्री वैदेही सीता जर तुझ्या ऐकण्यांत आली असेल, तर तीहि महारण्यांत राहणाऱ्या आपल्या पतीच्या मागोमाग गेली )

४९ ( २१-१३ )

रक्षसा निग्रहं प्राप्य रामस्य महिषी प्रिया ।
क्लिश्यमानाऽपि सुश्रोणी राममेवाऽन्वपद्यत ॥ १३ ॥

( रामाच्या त्या प्रिय महिषीला राक्षसानें ( रावणानें ) हरण करून नेल्यावर तिला फार क्लेश भोगावे लागले; तथापि ती सुंदरी रामासच अनुसरून राहिली )

५० ( २१-१४ )

लोपामुद्रा तथा भीरु वयोरूपसमन्विता ।
अगस्तिमन्वयाद्धित्वा कामान्सर्वानमानुषान् ॥ १४ ॥

( त्याचप्रमाणें, भीरु, लोपामुद्रा तरुण व सौंदर्यसंपन्न असतांहि सर्व दिव्य कामोपभोग सोडून अगस्तीच्या समागमें राहिली )

५१ ( २१-१५ )

द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवन्तमनिन्दिता ।
सावित्र्यनुचचारैका यमलोकं मनस्विनी ॥ १५ ॥

( तेजस्वी व निर्दोषी सावित्री तर द्युमत्सेनपुत्र वीर सत्यवानामागोमाग एकटी यमलोकापर्यंत गेली )

५२ ( २९-११ )

साम्ना भेदेन दानेन दण्डेन बलिकर्मणा ।
न्यायेनाऽऽक्रम्य च परान्बलाच्चाऽऽनम्य दुर्बलान् ॥ ११ ॥

( साम, भेद, दान व दंड ( किंवा ) खंडणी या नीतीच्या उपायांनीं शत्रूंना हस्तगत करावें. दुर्बळ शत्रूंना जबरदस्तीनेंच चेपावें )

## राजाचें कर्तव्य

५३ ( २९-१२ )

सान्त्वयित्वा तु मित्राणि बलं चाऽऽभाष्यतां सुखम् ।
सुकोशबलसंवृद्धः सम्यक् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १२ ॥

( मित्र राजांस संतुष्ट करावें. सैन्याशीं गोड व गौरवाचें भाषण करावें. धनभांडागार व सेनाहि वाढवावी, म्हणजे मग तुला जय चांगला मिळेल )

५४ ( ३८-२९ )

**नैष शूरैः स्मृतो धर्मः क्षत्रियस्य पलायनम् ।**
**श्रेयस्तु मरणं युद्धे न भीतस्य पलायनम् ॥ २९ ॥**

( पळून जाणें हा क्षत्रियांचा धर्म शूरांना मान्य नाहीं. युद्धांत मरणेंहि श्रेयस्कर आहे, भिऊन पळणें श्रेयस्कर नाहीं )

५५ ( ६८-३३ )

**किं ते द्यूतेन राजेन्द्र बहु दोषेण मानद ॥**
**देवने बहवो दोषास्तस्मात्तत्परि वर्जयेत् ॥ ३३ ॥**

( मानदा राजा, द्यूतांशीं तुला काय कर्तव्य आहे ? द्यूतांत फार दोष आहेत; ह्यासाठीं तें वर्ज्य करावें. )